# सम्राट अकबर

[ डॉ. ए. एल्. श्रीवास्तवलिखित 'Akbar the Great'
या ग्रंथाचा अनुवाद ]

अनुवादक

मा. रा. मा. गोळे

महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृती मंडळ, मुंबई

प्रथमावृत्ती :

११ जून, १९८४

प्रकाशक :

सचिव, महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृती मंडळ,
मंत्रालय, मुंबई ४०००३२.





मुद्रक :

महाराष्ट्र सहकारी मुद्रणालय,
९१५/१, शिवाजीनगर
पुणे ४११००४.

किंमत : Rs [illegible] 0

# निवेदन

महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृती मंडळाच्या वतीने डॉ. ए. एल्. श्रीवास्तव-लिखित "Akbar the Great" या पुस्तकाचा "सम्राट अकबर" या नावाने प्रा. रा. मा. गोळे यांनी अनुवाद केला आहे. तो प्रसिद्ध करण्यास मंडळास आनंद होत आहे.

मंत्रालय,
मुंबई, ४०००३२
दिनांक ११ जून, १९८४.

सुरेंद्र बारलिंगे
अध्यक्ष
महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृती मंडळ

# अनुक्रमणिका

# प्रकरण पहिले

## जन्म, शिक्षण आणि आरंभीची कारकीर्द

### कुलवृत्तान्त आणि जन्म

इतिहासात थोर मोगल सम्राट अकबर या नावाने प्रसिद्ध असलेल्या जलालउद्दिन महमद अकबराचा जन्म रविवार इ. स. १५ ऑक्टोबर १५४२ (जुने पंचांग) (५ रजब ९४९ हिजरी) या रोजी सिंधमधील अमरकोट या गावी राणा विरीसाल याच्या निवासस्थानी झाला. अकबराचा बाप हुमायून याला त्याचा विजयी प्रतिस्पर्धी शेरशहा (१५४० ते १५४५) याने त्याच्या राज्या-तून हाकलून दिल्यामुळे हुमायून घाईगडबडीने सिंधला पळून गेला व भक्करच्या समोर सिंधूच्या पूर्वपात्रावर रोहरी या गावी सुमारे सहा महिने तळ देऊन राहिला. या उजाड मुलुखात स्वतःचे आसन स्थिर करण्याचा हुमायूनने प्रयत्न केला; पण तो सफल झाला नाही. रोहरीपासून जवळजवळ शंभर मैल खाली नदीच्या तीरावर पाटार नावाच्या गावी हुमायूनचा भाऊ हिंदाल याची छावणी होती. त्या छावणीत हमीदा बानू बेगम (मीर बाबा दोस्त ऊर्फ अली अकबर जमी याची मुलगी) या नावाची १४ वर्षांची एक सुंदर इराणी मुलगी हुमायूनच्या सहजगत्या नजरेस पडली व प्रथमदर्शनीच त्याचे तिच्यावर प्रेम जडले. इतिहासात अजरामर झालेल्या श्रेष्ठ सम्राटांपैकी एकाची आई होण्याचे भाग्य तिला लाभावयाचे होते. हुमायूनच्या व तिच्या वयांतील खूप अंतर, हुमायूनच्या जनानखान्यातील त्याच्या लग्नाच्या अनेक बायका आणि एका संकटग्रस्त व पदच्युत राजाबरोबर आपली जन्मगाठ बांधून घेण्याची हमीदाची नाखुषी या सर्वांना न जुमानता १४ ऑक्टोबर १५४१ रोजी हुमायूनचे हमीदा बेगमशी लग्न लागलेच. हुमायूनचा भाऊ हा स्वभावाने लहरी होता आणि या लग्नाला त्याचा प्रामाणिक विरोध होता. म्हणून त्याचा पाठिंबा हुमायूनला मिळाला नाही. म्हणून लग्नानंतर लगेच आपल्या नव्या पत्नीसह हुमायून वाटेत उपासमार सहन करीत आणि अनेक

हालअपेष्टांना तोंड देत रोहरीला परतला. सिंध जिंकण्याचा त्याचा अखेरचा प्रयत्न त्या उजाड मुलखाचा कावेबाज राजा शहा हुसेन अर्घुन याने पूर्णत: हाणून पाडला. हुमायूनचा कारस्थानी चुलतभाऊ यादगार नासीर याला अर्घुनाने फितविले. आधीच गळती लागलेल्या हुमायूनच्या अनुयायांत भांडणे लावून दिली आणि सरसकट सर्वांनाच हैराण करून सोडले. त्यामुळे हुमायून अगदी हतबुद्ध झाला. शेवटी सेहवानचा वेढा त्याला उठविणे भाग पडून भक्कर यादगार नासीरच्या ताब्यात द्यावे लागले. जीवनाला कंटाळून फकिरी पत्करण्याचे विचारही या वेळी हुमायूनच्या डोक्यात घोळत होते. पण सुमारे दहा महिन्यांपूर्वी म्हणजे जून १५४१ मध्ये मारवाडच्या राव मालदेवाने आपल्या राज्यात येऊन राहण्याचे आमंत्रण हुमायूनला दिले होते. त्या आमंत्रणाचा स्वीकार करावा असा हुमायूनच्या मित्रांनी सल्ला देऊन उत्तेजन दिले. त्यामुळे त्याच्या खचलेल्या मनोवृत्ती उल्हसित झाल्या. त्याप्रमाणे ७ मे १५४२ रोजी जोधपूरच्या मार्गावर असलेल्या उच्छा या गावाकडे हुमायूनने कूच केले; पण वेळ निघून गेली होती. त्यामुळे तेथेही त्याच्या पदरी निराशाच पडली. कारण मध्यंतरीच्या काळात शेरशहाच्या लष्करी दडपणामुळे आणि बदललेल्या राजकीय परिस्थितीमुळे राठोडच्या राण्याच्या मित्रत्वाच्या वृत्तीचे रूपांतर शत्रुत्वात झाले होते. परिणामेकरून जोधपूरच्या वाटे-वरील फालोडी जवळच्या कुल–इ–जोगी गावाहून हुमायूनने लगबगीने माघार घेतली व तो सिंधला परतला. राजस्थानच्या रखरखीत वाळवंटातील त्याचा हा येता जाताचा ऐन उन्हाळ्यातील प्रवास अत्यंत धोक्याचा व अवर्णनीय कष्टाचा झाला. त्या वेळी हमीदाचे दिवस अगदी भरत आले होते. तिच्यासाठी योग्य ते वाहन मिळणेही मुष्किलीचे झाले होते, आणि आधीच घटत चाललेल्या संरक्षक दलाची उद्धट वर्तणूक यामुळे त्याच्या हालअपेष्टांत अधिकच भर पडली. या अवस्थेत ते सगळेच म्हणजे अवघे नऊजण ता. २३ ऑगस्ट रोजी (हिजरी ९४९ जमदी १० वी तिथी) अमरकोटला पोचले आणि तेथील रजपूत राजाच्या आतिथ्यशील स्वागतामुळे उल्हसित झाले.

रजपूत वंशाच्या उदात्त परंपरेला अनुसरून विरिसालने आपला स्वत:चा राहण्याचा किल्ला या पळपुट्या राजघराण्यासाठी खाली करून देऊन त्यांना भरपूर सुखसोयी उपलब्ध करून दिल्या. हमीदा बानू दिवसात होती, ती तेथे पोचल्यानंतर दोन महिन्यांच्या आतच प्रसूत होऊन तिला मुलगा झाला. हाच तो पुढे प्रसिद्धी पावलेला थोर सम्राट अकबर.

अकबराचा जन्म झाला त्या वेळचे ग्रह अत्यंत शुभ–फल–दायी होते. आणि अबुल फझलच्या म्हणण्याप्रमाणे अशी शुभ–वेळ हजार वर्षांतून एखाद्या वेळी येते. आपला चरित्र–नायक जन्मत:च अतिमानव होता हे दाखविण्याकरिता हा

दरबारी इतिहासकार लिहितो की मानव-जातीचे दु:ख हरण करण्यासाठी दैवी पुरुष पृथ्वीवर अवतरणार हे सूचित करणारे जसे अनेक अद्भुत चमत्कार घडतात, तशाच घटना अकबराच्या जन्मापूर्वीही घडल्या. या घटनांचे वर्णन अबुल फझलने अशा थाटात आणि अशा भाषेत केले आहे की ते वाचून कृष्ण, बुद्ध वगैरे हिंदू अवतारांच्या वेळी झालेल्या चमत्कारांची आठवण झाल्याशिवाय राहात नाही. अबुल फझलला या कथा नि:संशय परिचित होत्या. अबुल फझल लिहितो, " अशा दैवी अवताराची हजारो वर्षांपासून वाट पाहणाऱ्या स्वर्गीय महर्षींचे उत्सुक डोळे या बाल-प्रकाशाच्या प्रफुल्ल आगमनाने चमकू लागले. आणि पार्थिव आशांच्या झाकळलेल्या संध्येने प्रभातकालचे सुंदर रूप धारण केले. खलिफाच्या राज्यमुकुटाच्या मण्यांतून येणाऱ्या प्रकाशाचीच ही दीप्ति होती. " अशा विलक्षण घटनांपैकी पहिला चमत्कार म्हणजे शुक्रवार ता. १० जुलै १५४० रोजी हुमायूनला तो अस्वस्थ असता लाहोर येथे पडलेले प्रसिद्ध स्वप्न. त्या स्वप्नामध्ये आपल्याला देवकृपेने लवकरच एक मुलगा होणार असून त्याची थोरवी त्याच्या भालप्रदेशावरूनच उघड होईल असे त्याला दिसले. हे स्वप्न अगदीच अविश्वासार्ह वाटत नाही. या स्वप्नाचा उल्लेख त्या वेळच्या बहुतेक सर्व लेखकांनी प्रामुख्याने केलेला आढळतो. महमंद आरीफ कंधारी याने "तारीख-ई-अकबर शाही" हा ग्रंथ अबुल फझलच्या अकबरनाम्यापूर्वी सात वर्षे लिहिला. त्यातही या स्वप्नाचा उल्लेख आहे. हुमायूनला पडलेल्या स्वप्नापाठोपाठ शम्सुद्दीन अक्ताखानने स्वत:च्या बाहुपाशात चंद्र उतरलेला पाहणे, हमीदाबानू बेगमचा ललाटप्रदेश गरोदरपणी आरशाप्रमाणे चकाकणे, अकबराच्या भावी दाईच्या (मिर्झा आझीझ कोकाच्या आईच्या) वक्षस्थळात प्रकाशझोताचा प्रवेश होणे, अकबराच्या जन्मसंभवाच्या सुमारास हुमायूनच्या खोलीतील जाळीदार खिडकीतून दैवी प्रकाश-किरण आत शिरणे आणि पृथ्वीच्या बऱ्याचशा पृष्ठभागावर आपल्या किरणांचा झोत टाकणाऱ्या दैदीप्यमान ताऱ्यांचे दर्शन होणे, अशा घटना घडल्याचे सांगतात. ह्या सर्व कथांच्या धर्तीवरच अकबराच्या जन्मप्रसंगीच्या निमित्ताने झालेल्या श्रीमंती सोहळ्याचे काव्यमय वर्णन अबुल फझलने केले आहे, पण हुमायूनच्या या ओढगस्तीच्या काळात अशा प्रकारचे उत्सव समारंभ त्याला परवडण्यासारखे नव्हते. अबुल फझलने स्वत:च अनवधानाने हमीदाबानूच्या बाळंतपणाच्या व्यवस्थेचा दर्जा कसा काय होता याचा सूचक उल्लेख केला आहे. तो म्हणतो, "हमीदाबानू बेगमच्या बाळंतपणाकरिता आणलेली दाई इतकी कुरूप (आणि बहुधा अकार्यक्षम,) होती की तिचे हिडीस रूप पाहून राणीला शिसारी आली आणि एरवी शांत स्वभावाची असूनही ती फार अस्वस्थ झाली. वाऱ्यावर हिंडणाऱ्या राजाची घसरंडीला लागलेली सत्ता आणि मत्ता यांचा परिणाम बाळंतिणीच्या सुखसोयींवर झाला हे उघड आहे.

ऑक्टोबर ११ तारखेला (१ ला रजब, ९४९ हिजरी) म्हणजे अकबराच्या जन्माच्या चार दिवस आधी, आपले थोडे अनुयायी व राण्याने दिलेली ७००० फौज घेऊन हुमायून अमरकोट सोडून भक्कर आणि ठट्टा या सुभ्यांच्या मोहिमेवर गेला होता. त्याचा मुक्काम अमरकोटपासून नैर्ऋत्येला ३० मैलांवर असलेल्या एका तळ्याकाठच्या बगिच्यात (जुनच्या रस्त्यावर) होता. तेथे असताना १७ ता. ला सकाळी प्रार्थनेच्या वेळी (फजर) पुत्रजन्माची खुषखबर घेऊन एक जासूद आला. या वेळी हुमायूनची आर्थिक परिस्थिती इतकी हलाखीची होती की कोणत्याही प्रकारचा दानधर्म करण्याची किंवा पुत्रजन्माप्रीत्यर्थ एखादी मेजवानी देण्याचीही शक्ती त्याला नव्हती. एका माणसाकडून हिरावून घेतलेली दोनशे चांदीची नाणी (शाहरुखी) आणि एक रुपेरी कंकण त्याने ज्याचे त्याला परत केले. आपल्या कस्तुरीच्या अत्तरदाणीचे सुटे भाग आपल्या मुख्य अनुयायांत वाटून तो उद्‌गारला, "माझ्या पुत्रजन्माच्या प्रसंगी तुम्हांला एवढेच मी देऊ शकतो. मात्र या कस्तुरीच्या सुगंधाने ही खोली जशी भरून राहिली आहे त्याचप्रमाणे माझ्या मुलाची कीर्ती सर्व जगभर पसरेल असा मला विश्वास वाटतो." हुमायूनने आपल्या मुलाचे नाव जलाल–उद्दीन महंमद अकबर असे ठेवले. जवळजवळ सव्वादोन वर्षांपूर्वी लाहोर येथे पडलेल्या स्वप्नात हुमायूनने हे नाव ऐकले होते. त्यावेळी नगारे आणि तुताऱ्या वाजविण्याची आज्ञा झाली आणि त्यांच्या आनंदसूचक दुमदुमीने पुत्र–जन्माची बातमी सर्व जगाला जाहीर करण्यात आली.

अमरकोट येथील राणा विरिसालच्या राजवाड्यात ३६ दिवसपर्यंत अकबर व त्याची आई राहिली. ८ डिसेंबर १५४२ रोजी अकबर ५५ दिवसांचा असताना त्याला जुन येथे त्याच्या पित्याच्या छावणीत आणले. अकबर अतिशय निकोप, देखणा आणि लाघवी मुलगा असून त्याचे हसणे फार आकर्षक होते. अबुल फझल याने दिलेल्या दायांच्या लांबलचक यादीवरून त्यांची निवड फार काळजीपूर्वक आणि तारतम्याने करण्यात आली होती असे सूचित होते. या दायांमध्ये जिजी अनगा (शमसुद्दीन महमद याची बायको) प्रमुख होती. हिनेच अकबराला तान्हेपणी अंगावर पाजले होते असे समजतात. पण हुमायूनच्या चाकरांची मर्यादित संख्या आणि सुदृढ प्रकृतीच्या तान्ह्या मुलांच्या तरुण मातांचा अभाव यामुळे दायांची निवड अतिशय मर्यादित झाली असली पाहिजे. त्यातच अकबराच्या आईवडिलांच्या अस्थिर जीवनाची भर पडलेली. ही अवस्था अकबराचे अंगावरचे दूध तुटेपर्यंत टिकून होती. तो एक वर्षाचा असतानाच त्याची व आईबापांची ताटातूट झाली. त्यांची भेट तो तीन वर्षांचा होईपर्यंत पुनः झाली नाही.

## अकबर असकरीच्या हातात सापडतो–

जुनच्या तळावरून भक्कर आणि ठट्टा काबीज करण्याचे हुमायूनचे सर्व प्रयत्न निष्फळ झाले. काही मोगल अधिकाऱ्यांशी भांडण झाल्याने राणा विरिसाल आपली फौज घेऊन अमरकोटला परत गेला व त्यामुळे हुमायून आणि त्याचे तुरळक सैन्य यांच्यावर हल्ला करण्यास अर्घुनाला फावले. अर्घुनाची यशस्वी मुत्सद्देगिरी व लढाऊ सामर्थ्य पाहून हुमायून इतका हताश झाला की त्याने भक्कर आणि ठट्टाचा नाद सोडून कंदाहारला माघार घेण्याचे ठरविले. तो निघण्याच्या तयारीत असतानाच बिलग्रामच्या लढाईनंतर (१७ मे १५४०) अडकून पडलेला बैरामखान त्याला १३ एप्रिल १५४३ मध्ये येऊन मिळाला (७ वा मोहरम ९५० हिजरी) हुमायून कंदाहारला जाणार असल्याचा सुगावा अर्घुनाला लागताच त्याने शक्य तितक्या लवकर प्रयाण करावे म्हणून शहा हुसेन अर्घून याने त्याच्याशी तहाची इच्छा दर्शवून त्याला काही धान्यसामग्री, तीस बोटी व ३०० उंट देऊ केले. जवळ जवळ नऊ महिन्यांच्या मुक्कामानंतर ११ जुलैला हुमायूनने जुन सोडले आणि तो सिबीच्या मार्गाने कंदाहारकडे जाण्यास निघाला. त्याचा भाऊ अस्करी हा कामरानच्या तर्फे कंदाहारच्या किल्ल्याचा सुभेदार होता. त्याला जेव्हा या पळपुट्या राजाचा बेत समजला तेव्हा त्याने किल्ल्याच्या रक्षणाची तयारी केली व कामरानच्या इच्छेनुसार मोठी फौज बरोबर घेऊन हुमायूनवर अचानक हल्ला करून त्याला कैद करण्यासाठी तो निघाला. हे समजताच हुमायूनने कंदाहारला जाण्याचा आपला बेत बदलला आणि अर्ध्या वाटेतच क्वेट्टापासून नैर्ऋत्येला ३० मैलांवर असलेल्या मुष्तांग गावाकडे तो वळला. तथापि अस्करीनेही आपल्या सैन्याची कूच मुश्तांग जवळील हुमायूनच्या छावणीच्या दिशेने चालू ठेवली. ही वार्ता वेळीच समजल्यामुळे हुमायून ताबडतोब घोड्यावर स्वार होऊन सी–ईस्तानकडे पळाला. तेथून इराण आणि नंतर मक्केकडे जाण्याचा त्याचा बेत होता. एक फर्लांग गेल्यावर त्याने छावणीतून हमीदा बानू बेगमला बोलावून घेतले. त्याच्याजवळ घोड्याची वाण होती. जेव्हा तार्दी बेगखानाने त्याला आपला घोडा उसना देण्याचे नाकारले, तेव्हा हुमायूनने हमीदा बानू बेगमला आपल्या घोड्यावर घेतले व तो मार्गस्थ झाला. एक वर्षाच्या लहानग्या अकबरला बरोबर नेण्याला वेळ नसल्याने छावणीतल्या काही खाजगी नोकरांच्या ताब्यात त्याला सोडून हुमायून आणि हमीदा बानू निघून गेले. ही घटना १५ आक्टोबर १५४३ या दिवशी घडली. या वेळी हुमायूनच्या परिवारात एकूण ४२ माणसे असून त्यांत हमीदासकट फक्त दोन स्त्रिया होत्या. हमीदा बानू बेगम छावणी सोडून जाते न जाते तोच असकरी दोनशे सैनिक घेऊन छावणीत दाखल झाला. हातातला पक्षी उडून गेल्याचे पाहून तो हिरमुसला झाला. त्याने आपल्या भावाच्या छाव-

णीला गराडा घातला आणि हुमायूनच्या सर्व नोकरांना गिरफदार करण्याचा हुकूम सोडला. हुमायूनची सर्व मालमत्ता ताब्यात घेतली. हुमायून पळून गेला तरी निदान बाळ अकबर छावणीतच राहिला आहे हे ऐकून त्याला आनंद झाला आणि त्याने त्याच्याकरता उंटावरून गोणीभर फळे पाठविली.

दुसऱ्या दिवशी सकाळी असकरी हुमायूनच्या छावणीपाशी गेला आणि बाळ राजपुत्र अकबर याला त्याने आपल्यासमोर आणविले. बाळाचा चेहरा गंभीर दिसत होता. त्याच्या तोंडावर जरासेही हसू उमटले नाही. काही क्षणानंतर मिर्झाच्या गळ्यांत असलेली तांबडी फीत आणि त्यांत अडकविलेली अंगठी धरण्याकरिता अकबराने आपले चिमुकले हात पुढे केले. असकरीने आपल्या गळ्यांतील फीत काढून अंगठीसकट ती अकबराला बहाल केली. १६ डिसेंबर रोजी (१८ रमझान, ९५०हिजरी) तो कंदाहारला पोचला आणि अकबराला त्याने स्वत:जवळ ओलीस ठेवून घेतले. किल्ल्यात स्वतंत्र ठिकाणी अकबराची राहण्याची व्यवस्था करण्यात आली. असकरीची पत्नी सुलतानाबेगम ही अकबराची चांगली देखभाल करीत होती. महाम अनगा आणि जिजी अनगा ह्या दोन दाया आणि ज्याला पुढे अतका खान नाव मिळाले तो मीर शम्सुद्दीन गझनवी यांना राजपुत्रांच्या तैनातीस राहण्याची परवानगी मिळाली. अकबर सुमारे दोन वर्षे असकरींच्या ताब्यात होता.

## बंदिस्त अकबर

मूल चालू लागल्याबरोबर त्याला बापाने आपल्या पागोटयाने मारण्याचा समारंभ करणे मोगल घराण्यात आवश्यक मानतात. आता हुमायूनच्या गैरहजेरीत त्याची जागा अस्करीने घेतली असल्यामुळे त्याने हुमायूनच्या वतीने तो समारंभ करावा असे महाम अनगा या दाईने सुचविले. त्या सूचनेनुसार अस्करीने कंदाहार-मध्येच हा समारंभ पार पाडला. अकबराला या प्रसंगाची ठळकपणे आठवण राहिली होती. "अस्करीने आपले पागोटे काढून माझ्याकडे फेकले आणि मी खाली पडलो." असे अकबर नेहमी सांगत असे. तसेच कंदाहारपासून पश्चिमेला थोड्या मैलांवर असलेल्या बाबा हसन अब्दलच्या दरग्यावर अकबराला नेऊन तेथे मोगली रिवाजानुसार आपले जावळ काढले याचीही त्याला आठवण होती. हुमायून इराणात हद्दपारीत असे तोपर्यंत कंदाहारमध्ये अकबराचे पालनपोषण व्यवस्थित होत असले तरी तो कैदेतच होता. इराणच्या शहाने दिलेल्या १२,००० सैन्यानिशी हुमायून कंदाहारवर चाल करून येत आहे ही बातमी कळल्यावर राजपुत्राला काबूलला पाठवून द्यावे असे कामरानने अस्करीला फर्माविले. या वेळी हिवाळ्याचा ऐन बहर होता आणि बर्फ पडत होते. असे असूनही (१५४५ च्या

सुरुवातीला म्हणजे ९५१ हिजरी) अकबर आणि त्याची सावत्र बहीण बानू बेगम यांना वेषांतर करून काबूलला पाठविण्यात आले. प्रवासात त्यांचे खरे स्वरूप उघडकीस येऊ नये म्हणून अकबराला मीरक आणि बहिणीला बीजा अशी नावे देण्यात आली. गझनीहून एक मुक्काम पुढे गेल्यावर एक मजेदार गोष्ट घडली. मुले ज्या घरात रात्री मुक्कामाला राहिली होती, तेथील दिवा विझला आणि त्यामुळे झालेल्या दाट काळोखाला घाबरून अकबर रडू लागला. त्याला उगी करण्याचा दायांचा प्रयत्न व्यर्थ ठरला. शेवटी दिवा लावून सगळीकडे उजेड झाल्यावरच अकबर रडायचा थांबला. काबूल येथे पोचल्यावर कामरानने या दोन्ही मुलांना बाबरची थोरली बहीण खानजादा बेगम हिच्या हवाली केले. २२ ऑक्टोबर १५४५ या दिवशी शबई बरतच्या मेजवानीच्या (१४ वी शबन) निमित्ताने एक नक्षीदार 'पडघम' आपला मुलगा इब्राहिम मिर्झा याला कामरानने बक्षीस दिला. इब्राहिमपेक्षा अकबर लहान होता. त्याला तो 'पडघम' फार आवडला व त्यासाठी तो हट्ट धरून बसला. कामरानने दोघांना कुस्ती खेळायला लावून जो कुस्तीत जिंकेल त्याला तो 'पडघम' मिळेल असे सांगितले. अकबर वयाने लहान असूनही त्याने इब्राहिमला कुस्तीत पाडले, पडघम हस्तगत केला आणि मोठ्या आनंदाने तो बडवू लागला. कामरान या गोष्टीमुळे चिडला आणि त्याने अकबराचे अंगावरचे दूध तोडण्याचा हुकूम दिला.

मध्यंतरी हुमायून कंदाहारपर्यंत येऊन पोचला आणि सुरुवातीची सलामी म्हणून हेलमंड नदीच्या पूर्व किनाऱ्यावरील बास्ट किल्ला त्याने काबीज केला. खुद्द कंदाहारलाही वेढा घालण्यात आला आणि हुमायूनने बैरामखानला कामरानशी बोलणी करून त्याचा अंदाज घ्यायला काबूलला पाठविले. तेथे बैरामखानने अकबराची भेट घेतली आणि अकबराच्या सुरक्षिततेबद्दल हुमायूनला वाटणारी चिंता दूर केली. असे सांगतात की, युवराजाला खूप भरभराटीचे आणि सुदीर्घ आयुष्य आहे, असे भविष्य त्याच्या जन्मपत्रिकेवरून कळल्यानंतर हुमायूनला राज–पुत्राच्या भवितव्याबद्दल विश्वास वाटू लागला. असकरीने कंदाहार ३ सप्टेंबर १५४५ मध्ये हुमायूनच्या स्वाधीन केले. (गुरुवार २५, जमाद–उल–आखीर) इराणच्या शहाशी केलेला करार मोडून हुमायूनने इराणी फौजांना किल्ल्याबाहेर हाकलून दिले आणि बैरामखानला किल्ल्याचा सुभेदार नेमले. नंतर त्याने काबूलवर चालून जाण्याची तयारी केली. कामरानही मग बिथरला आणि त्याने खानजादा बेगमच्या घरातून अकबराला काढून त्याला आपल्या बायकोच्या म्हणजे खानम बेगमच्या ताब्यात दिले. अकबरचा पालनकर्ता शम्सुद्दीन अकताखान याला त्याने कैदेत टाकले आणि अकबराच्या दायांवर अनेक निर्बंध घातले. अकबराच्या जिवाला धोका असल्यामुळे लवकरात लवकर काबूल हस्तगत करण्याच्या दृष्टीने पावले टाकणे अत्यंत आवश्यक होते म्हणून हुमायून शक्य तितक्या तातडीने

काबूलकडे निघाला. तेव्हा कामरान गझनीला पळून गेला आणि ता. १८ नोव्हेंबर १५४५ रोजी (बुधवार १२, रमझान, हिजरीची रात्र) काबूल हुमायूनच्या ताब्यात आले. दोन वर्षांच्या विरहानंतर आपला मुलगा पाहण्याचे सुख बादशहाला लाभले. या वेळी अकबर हिजरी पंचांगाप्रमाणें ३ वर्षे २ महिने आणि ८ दिवसांचा होता.

## अकबराची सुंता

काबूल जिंकल्यानंतर १५४५ च्या वसंतऋतूमध्ये अकबराची सुंता करावी असे हुमायूनने ठरविले. त्यासाठी हमिदा बानू बेगम (जिला पुढे दरबारात मरियम मकानी हे नाव मिळाले) हिला कंदाहारहून काबूलला बोलाविण्यात आले, आणि समारंभाच्या थोडेच दिवस आधी ती काबूलला येऊन पोचली. अकबर एक वर्षाचा असतानाच त्याची व आईची ताटातूट झाली होती व तेव्हापासून त्याने आपल्या आईला पाहिले नव्हते. तेव्हा तो आपल्या आईला ओळखू शकेल की नाही ते पाहण्याकरता हुमायूनच्या जनानखान्यांतील खूपशा स्त्रियांना एका घोळक्यात बसविण्यात आले. या स्त्रियांपेक्षा कोणत्याही तऱ्हेने वेगळेपणाने उठून दिसणार नाही अशा बेताने याच घोळक्यात हमीदा बानू बेगम ही होती. चार वर्षांहूनही लहान असलेल्या अकबराला या ठिकाणी आणण्यात येऊन 'तुझी आई शोधून काढ' म्हणून सांगण्यात आले. अबुल फझल लिहितो-"जन्मजात बुद्धीची तरलता, आणि सूक्ष्म दृष्टी यामुळे कोणत्याही प्रकारच्या अडचणीत किंवा संभ्रमात न पडता, क्षणाचाही विलंब न लावता बादशहाने (अकबराने) दैवी प्रेरणेने आपल्या साध्वी आईकडे झेप घेतली आणि तो तिच्या कुशीत शिरला." या वेळी तेथे हजर असलेल्या प्रत्येक व्यक्तीलाच राजकुमाराची विलक्षण बुद्धिमत्ता पाहून आश्चर्य वाटले.

नंतर अत्यंत आनंदात राजपुत्राची सुंता करण्याचा समारंभ पार पडला. हुमायूनला मेजवान्या व समारंभाची फार हौस होती. त्यांतून आता दीर्घकाळाच्या विरहानंतर कुटुंबियांचे पुनर्मीलन झालेले असल्याने मेजवान्या आणि उत्सव समारंभांना या वेळी ऊत आला.

## पुन: कैदेत–

बदक्शन आपल्या सत्तेखाली आणण्याची हुमायूनला तीव्र आकांक्षा होती. म्हणून अकबराला काबूल येथे सोडून तो त्या प्रांतावरच्या स्वारीसाठी मार्च १५४६ मध्ये (९५३ हिजरीची सुरुवात) केव्हातरी निघाला. पण किशम आणि किला झाफर यांच्या दरम्यान शरवदन येथे तो आजारी पडला आणि तेथेच दोन महिन्यापर्यंत अंथरुणाला खिळून होता. आजारातले पहिले चार दिवस तर त्याला शुद्धही

नसल्याने नाना तऱ्हेच्या अफवा सर्वत्र पसरल्या आणि हुमायून मेला असे लोकांना वाटले. या अफवांचा फायदा घेऊन कामरान याने पुन: काबूल हस्तगत केले आणि अकबराला कैद करून आपल्या लोकांच्या ताब्यात दिले. आजारातून उठल्यावर नोव्हेंबर १५४७ मध्ये जेव्हा हुमायूनने काबूलला वेढा घातला तेव्हा हुमायूनचा तोफखाना बंद पाडण्यासाठी कामरानने अत्यंत निर्दयपणे अकबराला किल्ल्याच्या तटबंदीबाहेर आणून उघड्यावर ठेवले. यातून अकबर दैवी चमत्कारानेच बचावला. आपला मुलगा आपल्या तोफगोळ्यांचे लक्ष्य होण्याचा संभव आहे असे ध्यानात येताच हुमायूनने आपला मुख्य गोलंदाज संबलखान याला किल्ल्यावर तोफा डागण्यास बंदी केली. २७ एप्रिल १५४८ मध्ये (७ वी रवि–उल–आखिर, ९५५ हिजरी) हुमायूनने काबूल परत जिंकून घेतले आणि कामरान बदक्शनला पळून गेला.

काबूलला वडिलांच्या घरी राजपुत्राचे दिवस कसे चालले होते याबद्दलची खुद्द अकबरानेच सांगितलेली आख्यायिका आहे. त्यावरून असे दिसते की, जनानखान्यात सवतीमत्सरामुळे राजघराण्यातील मुलांना विषबाधेची सतत भीती असली तरी अकबर मात्र त्याच्या सावत्र आयांचा आणि विशेषत: हाजी बेगमचा फार लाडका होता. राजपुत्र अकबर सहा वर्षांचा असतानाची गोष्ट. एक दिवस त्याचा दात फार दुखू लागला—इतका की, त्याच्या वेदना हाजी बेगमला बघवेनात. म्हणून स्वत:च्या दालनातून धावत जाऊन तिने औषध आणले. ते औषध रामबाण आहे असेही तिने हमीदा बानूला सांगितले. तरीही हमीदेला मुलाच्या जीविताला धोका पोचेल अशी चिंता वाटू लागली. हुमायूनला हाजी बेगमबद्दल फार आदर वाटे हे लक्षात घेता तिला औषध देऊ करण्याला उघड उघड हरकतही घेता येईना. म्हणून अकबरलाच उचलून स्वत:च्या घरी नेण्याचा तिने प्रयत्न केला पण अकबराने आपल्या सावत्र आईला सोडून जाण्याचे साफ नाकारले. हमीदाला पडलेला पेच ओळखून हाजी बेगमने थोडेसे औषध प्रथम स्वत:च्या तोंडात टाकून हमीदेचे शंकानिरसन केले आणि उरलेले औषध अकबराच्या दुखऱ्या दातावर चोळले. ते गुणकारी ठरले. पुष्कळ वर्षांनंतर अकबराने अबुल फझलला सांगितले की, माझी सख्खी आई कोण हे ज्यांना माहीत नव्हते असे पुष्कळ लोक मला हाजी बेगमचाच मुलगा समजत असत.

## अकबराचे शिक्षण

अगदी लहानपणापासून आईबापांच्या प्रेमळ देखरेखीला मुकलेल्या अकबराचे बालपण अत्यंत प्रतिकूल परिस्थितीत गेले. साहजिकच त्याचे शिक्षण आणि संगोपन व्हावे तसे झाले नाही. सर्व वेळ तो त्याच्या वाईटावर असलेल्या चुलत्यांच्या सक्त

पहाऱ्यात होता आणि काही वेळा त्याचा जीवही धोक्यात होता. आता हुमायूनच्या जीवनात काहीशी स्थिरता प्राप्त झाल्यामुळे मुलाच्या शिक्षणाची योग्य तजवीज त्याने केली. चांद्रमासाप्रमाणे अकबर चार वर्षे चार महिने आणि चार दिवसांचा असताना २० नोव्हेंबर १५४७ (७ शव्वल, हिजरी ९५४) रोजी त्याला शाळेत घालण्याचा समारंभ होणार होता. असे सांगतात की हुमायूनने चांगला मुहूर्त पाहून हा दिवस नक्की केला होता, पण ऐन वेळी अकबर गुपचूप घरातून नाहीसा झाला. तो कोठेच सापडेना. त्यामुळे मुहुर्ताची वेळ टळली आणि तो समारंभ बहुधा त्याच दिवशी नंतर केव्हातरी पार पडला. मुल्ला जादा मुल्ला असमुद्दिन इब्राहिम हा अकबराचा पहिला शिक्षक. तो स्वतः अत्यंत विद्वान असूनही अकबराला एका जागी बसवून त्याला लिहायला वाचायला शिकवणे त्याला जमले नाही. ह्या शिक्षकाला कबूतरे उडविण्याच्या खेळाचा नाद होता आणि त्यानेच अकबराला या खेळाची चटक लावली असे सांगतात. म्हणून त्याला नोकरीवरून दूर करण्यात आले. पण वस्तुस्थिती अशी दिसते की कबुतरे उडविता उडविता अकबराला अभ्यासाची गोडी लागावी म्हणून तो खेळात भाग घेत असावा. यानंतर मौलाना बायाझिद आणि मौलाना अब्दुल कादीर ह्या दोन शिक्षकांची नेमणूक करण्यात आली. पण त्यांच्याही पदरी अपयशच आले.

अकबराला लिहिण्यावाचण्याचा फार कंटाळा होता. त्याचा चरित्रकार अबुल फझल याची कबुली देऊन लिहितो की, "लहानपणी अकबराचे पवित्र मन अप्रस्तुत विषयांच्या अभ्यासापासून अलिप्त होते."

हुमायून हा स्वतः फार विद्वान असून विज्ञान आणि मानव्य या दोन्ही शास्त्रांची त्याला आवड होती. आपल्या मुलाचे अभ्यासाकडील दुर्लक्ष पाहून त्याच्या मनाला क्लेश झाले आणि जेव्हा काही सरदारांनी अकबराबद्दल त्याच्याकडे तक्रार केली तेव्हा त्याने प्रेमापोटी अकबराला कानउघाडणी आणि उपदेश करणारे एक पत्र लिहिले. त्यात त्याने शेख निझामीच्या खालील अर्थाच्या पंक्ती उद्धृत केल्या होत्या.

"आळसात वेळ घालवू नको
ही काही खेळायची वेळ नाही.
काम करण्याची आणि कला संपादन
करण्याची हीच वेळ आहे."

पित्याच्या कानउघाडणीचा अकबरावर फारसा परिणाम झालेला दिसला नाही. खेळात विशेषतः घोड्यावर आणि उंटावर बसणे, कुत्री आणि वन्य पशूंना शिकविणे, कबुतरे उडविणे, शिकार करणे यात वेळ घालविण्याचे त्याचे उद्योग चालूच होते.

दुसरे शिक्षक नेमल्यास काही फायदा होईल असे हुमायूनला वाटले. पण तो मनाने दुबळा असल्यामुळे अयोग्य शिक्षकाच्या बदली दुसरा एखादा चांगला शिक्षक उघडपणे तो नेमू शकला नाही. त्याऐवजी त्याने जुन्याच तीन शिक्षकांमधून चिठ्ठ्या टाकून अबुल कादीर या एकालाच अकबराचा शिक्षक म्हणून नेमले. पण तोसुद्धा अपेशी ठरला. अकबराच्या उनाडपणाविषयी सारवासारव करून अबुल फझल लिहितो, "अकबराचा पवित्र आत्मा, निष्पाप हृदय-बाह्यात्कारी शिक्षणाकडे कधीच वळले नाही."

## तिसऱ्यांदा कैद

१५४९ साली बाल्खच्या स्वारीमध्ये हुमायूनचा दणदणीत पराभव ाला. त्याच्या मांडीखालचा घोडा बाणाने जखमी होऊन खाली पडला, आणि जरी त्याने दुसरा घोडा घेतला तरी त्याला काबूलकडे माघार घेणे भाग पडले. आपल्या पराजित वडिलांची भेट घ्यायला अकबर शहराच्या वेशीत आला. जुलै १५५० मध्ये अकबराला काबूलमध्येच ठेवून हुमायूनने कामरान विरुद्ध पुनः चढाई केली. या वेळीही त्याचा पराभव होऊन तो जखमी झाला, तेव्हा तो मेलाच अशी अफवा उठली. म्हणून मी जिवंत आणि सुरक्षित आहे अशा आशयाचे एक पत्र हुमायूनने स्वतःच्या हस्ताक्षराने अकबराला लिहिले. कामरानने काबूलला पुनः वेढा घालून ते परत जिंकून घेतले आणि फिरून एकदा अकबराला कैद केले. आपल्या काबूल येथील तीन महिन्यांच्या कारकीर्दीत कामरानने हुमायूनच्या अनुयायांचे अनन्वित हाल केले आणि हुमायून आपल्यावर चालून येत आहे असे कळताच त्याच्याशी सामना देण्यासाठी तो अकबराला बरोबर घेऊन काबूलहून स्वारीवर निघाला. दोघांची सैन्ये समोरासमोर आल्यावर हुमायूनने कामरानची समजूत घालण्याचा पुनः एकदा प्रयत्न केला. पण त्याचा काही उपयोग झाला नाही. नंतर झालेल्या लढाईत कामरान टिकाव धरू शकला नाही व युद्धभूमिवरून त्याला पळ काढावा लागला. अस्करीला कैद करून त्याला मक्केला हद्दपार करण्यात आले. कामरान पळून गेल्यावर अकबराला हुमायूनसमोर आणण्यात आले. तेव्हा आपल्या मुलाच्या सुरक्षिततेबद्दल वाटणारी हुमायूनची चिंता दूर झाली. क्विबचकच्या लढाईत गमावलेले आपले मौल्यवान ग्रंथालय परत मिळाल्याचाही हुमायूनला आनंद झाला.

## सुरुवातीची अधिकारपदे

हुमायूनचा राजद्रोही भाऊ कामरान याच्या कारवायांमुळे ओढवलेल्या हालअपेष्टांतून काही काळ हुमायूनला जरासा विसावा मिळाला. हुमायूनने

आपली कन्या व अकबराची सावत्र बहीण बक्षी बानू हिचा विवाह इब्राहिम मिर्झा याच्याशी ठरविला आणि काबूलच्या आग्नेयेस असलेले चर्क हे खेडे अकबराच्या नावाने करून दिले. युवराज अकबरावर सोपविलेले हे पहिले अधिकारपद होते. यानंतर लवकरच त्याला गझनीचा सुभेदार नेमण्यात आले. कामरान विरुद्ध केलेल्या चढाईमध्ये हिंदाल मारला गेला. त्यामुळे नोव्हेंबर १५५१ मध्ये गझनी आणि त्याला जोडून असलेला हिंदालच्या जहागिरीचा सर्व मुलूख अकबराला बहाल करण्यात आला. या वेळी अकबराचे वय पुरे दहा वर्षांचेही नव्हते. राज्यकारभार कसा करावा आणि माणसे आणि कामे कशी हाताळावीत याचा अनुभव मिळावा म्हणून हिंदालचा सर्व जमीनजुमला त्याच्या सेवकांसुद्धा अकबराच्या हवाली करण्याचे ठरले. एकदा असे घडले की, अकबर घोड्यावरून रपेट करायला निघाला असता त्याचे पागोटे खाली पडले तेव्हा त्याच्या बरोबरच्या सेवक वर्गातील हिंदालने स्वत:ची टोपी अकबराच्या डोक्यावर ठेवली. या घटनेनंतर थोड्याच दिवसांत हिंदाल मृत्यू पावला व त्याच्या जागी अकबर गझनीचा सुभेदार झाला.

पुस्तकी अभ्यासाकडे अकबरचे लक्ष नसले तरी खेळ, शिकार, जंगली श्वापदांना माणसाळवणे यांमध्ये त्याला फार रस वाटे. अकबर दहा वर्षांचा झाला तेव्हा राज्यकारभाराशी त्याचा प्रत्यक्ष संबंध यावा अशी खबरदारी हुमायूनने घेतली. कामरानला आश्रय देणाऱ्या अफगाणांवर हुमायून चालून गेला तेव्हा काबूलच्या संरक्षणाकरता त्याने अकबरला काबूलला परत पाठविले. (१५५१ डिसेंबर अखेरीस) हुमायूनने स्वत:च्या सेवक वर्गातील काही निवडक मंडळी आणि अतकाखान यांना बरोबर देऊन अकबराला लवकरच गझनीची सूत्रे हाती घेण्यास पाठविले. या वेळी राज्यव्यवस्थेचे मंत्र आणि तंत्र अकबराला शिकविण्याचा आदेश या अधिकाऱ्यांना दिला होता. प्रवास करण्यात, शिकारीत आणि स्थानिक लोकांच्या ओळखी करून घेण्यात अकबराने गझनीला सहा महिने घालविले. यानंतर घोड्यावरून पडून दुखापत झाल्यामुळे हुमायूनने त्याला काबूलला परत बोलावून घेतले.

इ. स. १५५२ च्या नोव्हेंबर महिन्यात गर्दीझ व बंगशच्या अफगाणाविरुद्ध सुरू केलेल्या मोहिमेत हुमायूनने दुसऱ्यांदा अकबराला बरोबर घेतले. लहान प्रमाणावरील युद्धाचा अनुभव घेण्याची ही अकबराची बहुधा दुसरी खेप होती. यापूर्वी इ. स. १५५१ च्या नोव्हेंबर महिन्यात कामराननने एका रात्रीत हुमायुनच्या छावणीवर अचानक हल्ला केला तेव्हा अकबराला लढाईची पहिली चुणूक दिसली. अकबर त्या वेळी खंदकात हजर होता आणि हा अचानक हल्ला झाला तेव्हा हुमायूनने त्याला आपल्याजवळ बोलावून घेतले. या दुसऱ्या मोहिमेत

गबखर जमातीचा (झेलम आणि सिंधूच्या खोऱ्यात राहणारी ही मूळ हिंदू जमात) सुलतान आदम याच्याकडून पत्र घेऊन एक गुप्तचर आला आणि हिंदुस्थानला पळून गेलेला कामरान आता आपल्या हद्दीत आसऱ्याला आलेला आहे अशी माहिती त्याने हुमायूनला दिली. अकबरासह हुमायून सिंधू नदीकडे चाल करून गेला तेव्हा सुलतान आदमने कामरानला हुमायूनच्या स्वाधीन केले. पुष्कळ विचारानंतर हुमायूनने नाखुशीने आपल्या विद्रोही भावाचे दोन्ही डोळे काढून त्याला हतबल केले आणि मक्केच्या यात्रेला पाठवून दिले. यानंतर अकबराला काबूलला परत पाठवून हुमायूनने काश्मीरला जाण्याचे ठरविले. पण त्याच्याबरोबर येण्याला त्याचे लोक कबूल न झाल्याने इ. स. १५५३ च्या डिसेंबरात त्याला काबूलला परत फिरणे भाग पडले.

इ. स. १५५४ च्या हिवाळ्यात गझनीच्या जहागिरी मुलखातून हुमायून कंदाहारला जात असता त्या वेळच्या रिवाजाप्रमाणे अकबर येता जाता दोनही वेळा हुमायूनच्या तैनातीला हजर राहिला. काबूलला परत गेल्यानंतर राजाने मुन्नीम खानला अकबराचा पालक (अतालीक) नेमले. या वेळी युवराजाने आपले धनुर्विद्येतील कौशल्य दाखविले.

इ. स. १५५४ च्या नोव्हेंबरात हिंदुस्थान परत जिंकून घेण्याच्या मोहिमेवर हुमायून निघाला. तेव्हा वडिलांबरोबर अकबरही निघाला. या वेळी त्याच्या वयाला जेमतेम १२ वर्षे १ महिना पूर्ण झालेला होता. (चांद्रमासानुसार १२ वर्षे ८ महिने पूर्ण.) सलिमशहा सूर याच्या मृत्यूमुळे अफगाण राज्यात बेबंदशाही माजून लढाया, निरनिराळ्या पक्षांचे झगडे, तंटेबखेडे याला नुसता उत आला होता, व त्या वेळी दिल्लीच्या तख्तावर आपलाच हक्क आहे असे सांगून महंमद अदील शहा, इब्राहिम शहा, व शिकंदर शहा हे तिघे आपापसात निकराने लढत होते. अशा परिस्थितीत पंजाब काबीज करणे हुमायूनला सुलभ होते. तथापि सरहिंदला बैरामखान भोवती अफगाणांनी वेढा घातला तेव्हा स्वत: बादशहाने आपल्या सुटकेसाठी यावे म्हणून त्याने निकडीची पत्रे धाडली. पोटदुखीच्या आजाराने राजा अंथरुणाला खिळून असल्याने त्याने प्रथम अकबरला लाहोरहून सरहिंदला पाठविले व बरा झाल्यानंतर तो स्वतःही अकबराला येऊन मिळाला. बादशहाच्या छावणीभोवती गस्त घालणे आणि प्रत्यक्ष युद्धात भाग घेणे वगैरे कामे आळीपाळीने इतर सरदारांप्रमाणेच अकबर हा करत असल्यामुळे सरहिंदच्या लढाईतील जयाचा मानकरी बैरामखान की शहा अब्दुल गाली असा वाद सुरू झाला तेव्हा ते श्रेय दूरदर्शीपणाने अकबरालाच देण्यात आले.

ता. २३ जुलै १५५५ रोजी हुमायूनने दिल्लीत प्रवेश केला व दरबार भरवून औपचारिकरीत्या अकबराला हिसारची जहागिरी बहाल केली. उत्तर

हिंदुस्थान जिंकल्यानंतर बाबरने स्वत:च्या सर्वात वडील मुलाला, हुमायूनला, हिसारची जहागिरी दिली, त्या वेळेपासून हिसार ही मोगल बादशहाच्या युवराजाची दौलत म्हणून समजण्यात येऊ लागली. इ. स. १५५५ च्या नोव्हेंबर महिन्यात (९६३ हिजरीची सुरुवात) अबुमालीच्या जागी अकबराची पंजाबचा सुभेदार म्हणून नेमणूक झाली. मुनीमखानाऐवजी बैरामखानला युवराजाचा पालक नेमले. शेरशहाचा वंशज शिकंदर सूर हिंदुस्थानच्या सिंहासनावर आपला हक्क सांगून मोगलाशी लढण्याकरिता त्याच मुलखात सैन्याची जमवाजमव करत होता. म्हणून हुमायूनने तातडीने अकबराला पंजाबचा ताबा घेण्याला पाठविले. त्याच वेळी हुमायूनने आपला जनाना काबूलहून दिल्लीला बोलविला होता. त्यांचा मार्गही पंजाबातूनच असल्याने तो सुरक्षित असणे आवश्यक होते. हिसारवर नेमलेली अकबराची काही माणसे त्याला पंजाबच्या वाटेवर येऊन मिळाली.

सिकंदर सूर खिंडीतून बाहेर पडला; पण अकबर चालून येत आहे असे समजताच तो डोंगरात परत गेला. बिआस नदीच्या किनाऱ्यावरील सुलतानपूर या गावी अकबरापूर्वीचा पंजाबचा सुभेदार शहा अब्दुल माली याने राजपुत्रास गाठले. अकबराने स्वत:समोर बसण्यास आसन देऊन त्याचा सन्मान केला. पण तेवढ्याने त्याचे समाधान झाले नाही आणि स्वत:च्या छावणीत परत जाऊन त्याने निरोप पाठविला की, "अकबराचा पिता हुमायून त्याला स्वत:चा 'पुत्र' संबोधून आपल्याबरोबरच नव्हे तर आपल्या थाळीतसुद्धा जेवण करू देत असे. पण अकबराने मात्र मला वेगळे बसवून जेवण घेतले. तेव्हा माझे हे स्थान लक्षात घेता मी तुमच्या छावणीत आलो असता माझ्यासाठी वेगळा गालिचा व वेगळे ताट का ठेवले गेले?" अशी त्याने पृच्छा केली. तेव्हा "राज्याचे कायदे व प्रेमाचे नियम हे वेगळे असतात शहानशहा जहाबानी (हुमायून) यांचे व तुमचे नाते आणि आमचे व तुमचे संबंध सारखेच नाहीत. या दोहोतील फरक लक्षात न घेता तुम्ही तक्रार करावी हे विलक्षण आहे असे त्याला सांगा" असे अकबराने उत्तर धाडले.

पंजाबात प्रवेश केल्यानंतर शिकंदर सूरने मणकोट किल्ल्यात आसरा घेतल्याचे समजल्यावरून त्याचा बंदोबस्त करण्याकरिता अकबर त्या डोंगराच्या दिशेने निघाला. हरयाना परगण्यापर्यंत तो पोचला तेव्हा पित्याला पडून जखम झाल्याचा संदेश दिल्लीहून त्याला मिळाला. म्हणून तो सध्याच्या गुरदासपूर जिल्ह्यातील कलनौर येथे राजधानीहून येणाऱ्या बातमीची वाट पाहाण्यासाठी दाखल झाला. हुमायून शुक्रवार २४ जानेवारी १५५६ रोजी दोन प्रहरी शेरमंडळमधील त्याच्या ग्रंथालयाच्या जिन्यावरून खाली पडला आणि

तिसऱ्या दिवशी, सोमवार २७ जानेवारी रोजी मरण पावला. अपघाताच्या दुसऱ्या दिवशी आपले दुखणे गंभीर असल्याचा निरोप जासुदाकरवी पंजाबात अकबराकडे त्याने पाठविला. त्याच्या मृत्यूची बातमी अकबराचे राज्यारोहण होईपर्यंत १७ दिवस गुप्त ठेवण्यात आली होती. हुमायूनशी ज्याचे शरीरसाम्य होते अशा मुल्ला बेकाशी याला दरबारी पोषाखात सजवून रोज सकाळी राजवाड्याच्या गच्चीतून दाखविण्यात येत असे.

**चार वर्षांचा राजप्रतिनिधीचा कारभार, (इ. स. १५५६ ते १५६०) अकबराचा राज्याभिषेक**

पंजाबमध्ये गुरदासपूरच्या पश्चिमेला १५ मैलांवर कलनौर येथे अकबराने त्याचा पालक बैरामखान व मोगल सैन्य यांच्यासह छावणी ठोकली व दिल्लीच्या बातमीची तो वाट पाहात राहिला. आपला पिता पैगंबरवासी झाल्याची बातमी अकबराला येथेच समजली. ती समजताच बैरामखानाने युवराजाच्या राज्यारोहणाची मोठ्या तातडीने तयारी केली. त्या वेळची असामान्य परिस्थिती, व फक्त दिल्ली, आग्रा आणि पंजाबचा काही भाग एवढ्या मर्यादित मुलखावर मोगलांची असलेली डळमळीत सत्ता लक्षात घेता दिल्लीचे तख्त मोकळे ठेवणे धोक्याचे समजले जात होते म्हणून कलनौरच्या बगिच्यात राज्यारोहणासाठी म्हणून घाईघाईने बांधण्यात आलेल्या विटांच्या चौथऱ्यावर अकबराच्या राज्यारोहणाचा समारंभ उरकून घेण्यात आला. इतक्या उदास वातावरणात मोगल राज्याची सूत्रे हाती घेणाऱ्या या विशीच्या आतल्या कुमार राजाची कारकीर्द इतिहासात सुवर्णाक्षरांनी नोंदली जाण्याइतकी यशस्वी होणार आहे, अशी त्या वेळेला कोणाला अंधुकशीही कल्पना आली नसेल. राज्यारोहणाचा समारंभ १४ फेब्रुवारी १५५६ रोजी (शुक्रवार २, रबी-उल-अखीर, ९६३ हिजरी) दुपारी पार पडला. अर्थात् या वेळी दरबार भरविण्यात येऊन निरनिराळ्या जागांवर नेमणुका करण्यात आल्या आणि नवीन राजाच्या नावाने खुतबा वाचण्यात आला.

बैरामखानला खान-इ-खानान ही पदवी देऊन वकील-उस-सलतनत म्हणजेच पंतप्रधानाच्या जागेवर त्याची बढती करण्यात आली. दिवंगत राजाच्या वेळी असलेल्या इतर पदाधिकाऱ्यांच्या जागा नव्या राजवटीतही कायम करण्यात आल्या.

**इ. स. १५५६ मधील मोगल साम्राज्य**

अकबर गादीवर आला त्या वेळी दिल्ली आणि आग्रा हे प्रांत आणि पंजाबचा काही भाग एवढ्यापुरती हिंदुस्थानातील मोगल सत्ता मर्यादित होती. दक्षिणे

कडे बयानापासून यमुनानदीपर्यंत (धोलपूर सोडून ) आणि आग्नेयेकडे त्याच नदीच्या बाजूबाजूने आग्रा ते काल्पीपर्यंत, पूर्वेकडे वेडयावाकडया रेषेने काल्पी-पासून कनौजपर्यंत आणि पुढे गंगेच्या दक्षिण तीराने हरद्वारपर्यंत, आणि उत्तरे-कडे हरद्वारपासून पठाणकोटपर्यंत असा अकबराच्या राज्याचा विस्तार होता, पश्चिमेकडे त्याच्या राज्यात अलवार सोडून लाहोर, फिरोझपूर, भटिंडा, हिस्सार, रेवारी आणि नरनौल यांचा समावेश होता. उत्तरेस पठाणकोटपासून दक्षिणेस काल्पीपर्यंत या मुलखाची लांबी जवळ जवळ ५०० मैल होती आणि पश्चिमेस हिस्सारपासून पूर्वेस हरद्वारपर्यंत त्याची रुंदी जवळ जवळ १६० मैल होती. या जवळ जवळ ८०,००० चौरस मैलाच्या मर्यादित प्रदेशातसुद्धा मोगल सत्तेचे बूड डळमळीत होते. प्रमुख शहरांचे रक्षण परकी फौजांच्या हातात होते आणि उत्तर पंजाबात सूर घराण्यातला सर्वांत बलवान शिकंदर सूर दिल्लीच्या तख्तासाठी मोगल सत्तेशी झगडत होता. या लहानशा मुलखाला साम्राज्य म्हणणे चुकीचे होते.

अकबराला गादीवर येऊन सात महिने होतात न होतात तोच बयाना, एटावा, सम्भल, काल्पी, नरौल आणि आग्रा येथील मोगल सुभेदारांची हकाल-पट्टी करण्यात आली आणि ऑक्टोबर १५५६ मध्ये दिल्लीची राजधानी पण मोगलांच्या हातातून गेली. मोगल सरदारांची आपसातली भांडणे आणि सैन्या-तील बेबनाव यामुळे राज्यातल्या इतर भागांतही खूप धामधूम आणि असंतोष होता. वरिष्ठ अधिकारी स्वतःच्या तोऱ्यात राहून राज्यसत्तेला जुमानीनासे झाले होते.

हिंदुस्थानाबाहेर काबूल आणि गझनी या मोगली सुभ्यावर अकबराचा सावत्र भाऊ महमंद हकीम मिर्झा याची नाममात्र सत्ता होती. प्रांताचा कारभार मुनीमखानाकडे होता. अकबराचा वझीर आणि पालनकर्ता बैरामखान याच्या-बद्दल मुनीमखानाच्या मनात संशय असल्याने नवीन राज्याबद्दल त्याची वृत्ती साफ नव्हती. सुलेमान मिर्झा याच्याकडे बदकशनचा स्वतंत्र कारभार होता. अकबराचा चुलत भाऊ असूनही त्याची आधाशी नजर काबूलवर होती.

याच वेळी डळमळत्या मोगल राज्याचा बालेकिल्ला समजले जाणारे दोन प्रांत दिल्ली आणि आग्रा हे पावसाअभावी भयंकर दुष्काळाच्या कचाटयात सापडले होते. अकबर राज्यावर येण्यापूर्वी एक वर्ष जो दुष्काळ सुरू झाला तो अकबर गादीवर आल्यावर एक वर्षभर चालू राहिला. दुष्काळाने सर्व उत्तर हिंदुस्थान ग्रासले होते, विशेषतः दिल्ली आणि आग्रा या प्रांतांत तो फारच तीव्र होता. दुष्काळामागोमाग रोगाची साथ या प्रांतांत पसरली आणि या दोहोंमुळे हजारो लोक बळी पडले. या भयंकर दुष्काळाचे प्रत्यक्ष वर्णन करताना बदायुनी याने

असे लिहून ठेवले आहे की, लोक अन्नान्न करून मृत्युमुखी पडत होते आणि कित्येक तर नरमांस भक्षण करीत होते.

या वेळी दिल्लीवर हक्क सांगणारे सूर घराण्यातले शिकंदर, अदाली आणि इब्राहिम हे तीन प्रतिस्पर्धी होते. पंजाबच्या ईशान्य दिशेवर शिकंदर आपले पाय रोवून बसला होता. मिर्झापूरजवळ चिनार येथे अदालीने आपला दरबार थाटला होता आणि बंगालवर सत्ता स्थापण्याचे इब्राहिमचे प्रयत्न चालू होते. इतर लहान लहान अफगाण राजांनी मोगल राज्याच्या दक्षिण, पश्चिम आणि पूर्वेकडला बराचसा मुलूख व्यापला होता. जौनपूरजवळ ५०,००० अफगाण फौजेनिशी हसन बच्छगोटी आणि जलालखान सूर यांच्या मुलांनी ठाणे दिले होते. दिल्लीच्या तख्तावर हक्क सांगणाऱ्यात अदालीचा वजीर हेमू याची सर्वांत जास्त धास्ती होती. उत्तर हिंदुस्थानात स्वतंत्र राज्यकर्ता म्हणून सत्ता प्रस्थापित करण्याची योजना त्याने आखली होती असे दिसते.

देशाच्या इतर भागांत निरनिराळ्या राजांची स्वतंत्र राज्ये होती.

## शहा अबुल मालीची कैद

हुमायूनच्या वेळी पुष्कळ वेळा होत असे त्याप्रमाणे काही वरिष्ठ अधिकारी अकबरास जुमानिनासे झाले होते. आज्ञा न मानणाऱ्यास माफी करायची असा हुमायूनच्या राज्यात जणू काय पायंडाच पडला होता आणि अकबर वयाने लहान असल्यामुळे तो कडक उपाय योजू शकणार नाही अशी अपेक्षा होती. शिवाय राज्याच्या अस्थिर परिस्थितीत आपली पोळी भाजून घेता येईल असे पण पुष्कळ अधिकाऱ्यांना वाटले असावे. अशा अधिकाऱ्यांपैकी शहा अबुल माली हा एक होता. या त्रिक्षिप्त सरदाराच्या स्वतःविषयी भलत्याच कल्पना होत्या आणि तो हुमायूनच्या मर्जीतला होता. अकबराच्या राज्याभिषेकानंतर तिसऱ्या दिवशी (फेब्रुवारी १६) भरलेल्या दरबारात हजर राहण्याचे आमंत्रण हुमायूनच्या मृत्यूच्या शोकात आपण आहोत अशी सबब पुढे करून त्याने नाकारले. दरबारला आपण आलो तर आपल्याला सामोरे कोण येईल आणि आपली बसण्याची जागा कुठे असेल अशी चौकशी त्याने केली. शेवटी काही अटींवर तो दरबारात हजर झाला आणि अकबराच्या उजव्या बाजूस जाऊन बसला. नंतर मेजवानीला बसण्यापूर्वी हात धुण्यासाठी तो उठला असता,उघडच बैरामखानच्या इशाऱ्यावरून राजवाड्यातला एक नोकर मागून आला आणि मालीचे दोन्ही हात पकडून त्याने त्याला गिरफदार केले. अबुल माली शरण आला. या गोष्टीचा इतर उच्चपदस्थ छगताई अधिकाऱ्यांवर योग्य तो परिणाम झाला कारण धामधुमीच्या काळात आपल्या बादशहाचे हित न पाहता स्वतःचा स्वार्थ साधता येतो ही त्याची समजूत चुकीची ठरली.

## सुरुवातीसउपाय योजना: मुघलाविरुद्ध बंडे

राज्यारोहण समारंभानंतर लगेच शिकंदर सूर याच्याविरुद्ध हालचाली सुरू झाल्या. शेवालिक डोंगरपट्टीच्या आश्रयाने शिकंदर सूरचा मुघल साम्राज्याविरुद्ध लढा चालू होता. राज्याभिषेकानंतर पाचव्याच दिवशी दिल्लीच्या तख्तावर अधिकार सांगणाऱ्या शिकंदर सूरचा पाठलाग करण्यासाठी मुघल फौजा निघाल्या. याच वेळी काबूलमध्ये असलेल्या राजमाता आणि हुमायूनच्या कुटुंबातील इतर स्त्रिया यांच्याकडे नजराणे पाठविण्यात आले आणि संरक्षणाखाली त्यांना काबूलहून दिल्लीला आणण्याची व्यवस्था करण्यात आली. नवीन राजा गादीवर आला की त्या निमित्ताने काही कर माफ करण्याच्या पूर्वापार रिवाजास अनुसरून अकबर गादीवर आल्यावर काही जकातीचे आणि व्यवसायांवरचे कर रद्द करण्यात आले. अबुल फझलने काहीही लिहून ठेवले असले तरी याबाबतच्या हुकमांची अंमल-बजावणी होत नव्हती. आणि राज्यारोहणाच्या नवव्या वर्षी हेच कर रद्द केल्याचा हुकूम पुन्हा काढावा लागला. दरम्यान पीर महम्मद खानच्या हाताखालील आघाडीचे सैन्य शिवालिक रांगेच्या पायथ्याशी येऊन पोचले होते. शिकंदर पायथ्यापासून पळून डोंगरपट्टीच्या आश्रयाला गेला म्हणून मुघल फौजा तेथून निघून हल्लीच्या पठाणकोटजवळच्या डहामेरी गावी अकबराच्या छावणीत परत आल्या. डाहामेरी येथील आपल्या तीन महिन्यांच्या वास्तव्यात अकबराने आपला बहुतेक वेळ शिकार करण्यात घालवला. पंजाबातल्या पुष्कळ प्रतिष्ठित व्यक्ती डहामेरीला अकबराला मुजरा करून त्याच्या सेवेसाठी हजर झाल्या. त्यांमध्ये नागरकोटचा राजा धरमचंद (बदायुनी आणि निझाम–उद्दिन यांच्या मते राजा रामचंद) हा पण होता. तथापि या वेळी बयाना आग्र्यापासून लाहोरपर्यंतच्या सर्व मुलखात एकच गोंधळ माजला होता. हुमायूनच्या मृत्यूनंतर या भागातील जहागीरदारांनी सर्वत्र मुघलांविरुद्ध बंडाचे निशाण उभारले होते. हल्लीच्या महेन्द्रगड जिल्ह्यातला नरनौल या मजबूत किल्ल्याला शेरशहाचा गुलाम हाजी खान याने वेढा घातला होता. अम्बरचा राजा भारमल याच्या मध्यस्थीने तेथील मुघल किल्लेदार मजनून खान यास किल्ला खाली करून दिल्लीस जाऊ देण्यात आले. यानंतर दिल्लीचा मुघल सुभेदार तारदी बेग खान याने वेळ साधून हल्ला केल्यावरच नर-नौलचा किल्ला मुघलांच्या पुन्हा ताब्यात आला. संबळ आणि मेवाडवरसुद्धा मुघलांनी आपले वर्चस्व पुन्हा प्रस्थापित केले पण तेसुद्धा मागाहून आणि युद्ध करूनच.

पावसाळा जवळ येऊ लागला तेव्हा अकबराने आपली छावणी जलंदरला हलवली. येथे त्याचा मुक्काम जवळ जवळ पाच महिने होता. येथे काशगरचा राजा अबदुर रशीद खान याचा वकील अकबराला भेटला. रशीद खानाने दिलेली

दोन पत्रे, एक हुमायूनच्या मृत्यूबद्दल दुःख व्यक्त करणारे आणि दुसरे राज्यप्राप्ती-बद्दल अकबराचे अभिनंदन करणारे, त्याने अकबराला सादर केली. याच वेळी कमाल खान गख्खर याने सुलतान सारंग (सुलतान आंदमचा धाकटा भाऊ) याला नव्या राजाला मुजरा करण्यासाठी धाडले होते.

## सुलेमानची काबूलवर स्वारी

याच सुमारास बदकशानच्या सुलेमान मिर्झाने बंड केल्याची बातमी आली. हिंदालच्या मृत्यूनंतर त्याच्या कुटुंबाच्या समाचारासाठी सुलेमान मिर्झा आला होता. तेथील भोंगळ कारभार पाहून आणि आपली बायको हराम बेगम हिच्या भरीस पडून सुलेमान मिर्झाने मोठ्या सैन्यानिशी काबूलवर स्वारी केली. काबूलचा सुभेदार मुनीमखान याने आपला कमकुवतपणा जाणून किल्ल्याच्या रक्षणाची सर्व तयारी केली, आणि वेढ्यास तोंड देण्यास तो सज्ज झाला. सुलेमानने काबूलला वेढा दिला पण किल्ल्यावर फारशी शिबंदी नसतानासुद्धा तो त्याला सर करता आला नाही. याच वेळी राजघराण्यातील स्त्रियांना घेऊन जाण्यासाठी पाठविलेली मुघल फौजेची तुकडी सिंधूनदी पार करून आली. हे पाहताच सुलेमान मिर्झा बदकशानला निघून गेला. या स्वारीपासून बरानच्या पलीकडला प्रदेश त्याला देण्याचे वचन आणि त्याच्या नावाने पुकारलेला तोंड-देखला खुदबा याव्यतिरिक्त त्याचा काहीच फायदा झाला नाही. कारण त्याची पाठ वळते न वळते तोच त्याच्या वकिलाला काबूलमधून हाकून देण्यात आले आणि झालेला तह म्हणजे कागदाचा चिटोराच ठरला.

## हेमू दिल्ली आणि आग्रा काबीज करतो

१३ आक्टोबर १५५६ रोजी हेमूने दिल्ली घेतली ही बातमी जलंदरला अकबराच्या छावणीत पोचली. रेवाडीच्या रस्त्यावर डोक्यावरून सोरमीठ विक-णारा हेमू आता महमंदशहा अदिल सूर (१५५४–१५५७) याचा पंतप्रधान झाला होता. धुसार (आता भार्गव) या पोटजातीतला आणि किरकोळ बांध्याचा गौड ब्राह्मण हेमू हा अतिशय हुशार, स्वामिनिष्ठ आणि पुढारी होण्यास अत्यंत योग्य होता. आपल्या ह्या गुणांमुळे हळूहळू चढत चढत तो सूर राज्याचा प्रत्यक्षात राजाच झाला, आणि अदिलशहा सूर (अदली या टोपण नावाने ओळखला जाणारा) हा आळशी राजा अज्ञातच राहिला. इब्राहिम सूर, सिकंदर सूर आणि अहमदशहा सूर आणि त्यांचे साथीदार यांच्याविरुद्ध हेमू आपल्या राजाच्या-वतीने एकूण बावीस लढाया लढला आणि त्याने त्या जिंकल्या. हुमायूनच्या

मरणाची बातमी कळताच अदलीला चुनार येथे सोडून हेमू ग्वाल्हेरच्या मार्गाने दिल्लीकडे निघाला. तेथील अस्थिर परिस्थितीचा फायदा घेऊन मुघलांना हिंदुस्थानच्या बाहेर हाकून देण्याचा त्याचा विचार होता. या प्रयत्नात सुरुवाती सुरुवातीला त्याला घवघवीत यश मिळाले आणि बयानापासून दिल्लीपर्यंतचा सर्व प्रदेश आणि गंगा–यमुना दुआबामधील पुष्कळ जिल्हे लढाई न करताच आपोआप त्याच्या ताब्यात आले. आग्र्याचा सुभेदार इस्कंदर खान उझबेक लढाई न करताच पळून गेला. कियाखान याने एटावा खाली केले, आणि अब-दुल्ला खान उझबेक काल्पी, हैदर महमंद खान बयाना आणि इतर अनेक सरदार आपापली ठिकाणे सोडून दिल्लीला पळून गेले. राजधानीचा मुघल सरदार तारदी बेग खान याने स्वतःच्या सैन्यानिशी आणि आग्रा व इतर ठिकाणांहून आलेल्या सरदारांची मदत घेऊन हेमूबरोबर सामना करण्याची तयारी केली. याच वेळी अली कुली खान हा अदलीचा एक सरदार शादीखान याच्याकडून संभल जिंकून घेण्याच्या तयारीत होता. त्याच्याकडे आपल्या मदतीस ताबडतोब येण्याचा निरोप तारदीबेग खान याने पाठविला. कारण राजधानीचे संरक्षण करणे हे सर्वांत महत्त्वाचे काम होते. पण अली कुली खान दिल्लीला पोचण्यापूर्वीच ता. ७ आक्टोबर १५५६ रोजी (२ झिल हिज्जा) तुघलकाबादजवळ तारदीबेग खान आणि हेमू यांच्यामधील लढाईला तोंड लागले. ६ ऑक्टोबरला हेमूने आपल्या सैन्याचा तळ तुघलकाबाद येथे दिला होता. अबुल फझल म्हणतो की या वेळी हेमूच्या प्रचंड फौजेमध्ये ५०,००० घोडेस्वार, १,००० हत्ती, ५१ मोठ्या तोफा आणि ५०० लहान तोफा होत्या. उलटपक्षी तारदी बेग खानच्या हाताखालची मुघल फौज फारच लहान होती आणि अबुल फझलवर विश्वास ठेवावयाचा तर आप-सातल्या भांडणामुळे ती अधिकच दुर्बल झाली होती. एकंदर मुघल फौज चार भागांत वाटली गेली होती. आघाडीवर अबदुल्ला उझबेक असून, मध्यभागी तारदीबेग खान स्वतः होता. उजव्या बाजूचे सैन्य हैदरमहमंदखान याच्या हाता खाली होते. डाव्या बाजूला इष्कंदरखान होता. सुरुवाती सुरुवातीस मुघल सैन्याला लढाईत पुष्कळ यश मिळाले. हेमूच्या आघाडीच्या फौजेचा पराभव करून मोगल सैन्याने त्याच्या उजव्या बगलेवर मात केली आणि हेमूच्या सैन्याचा पाठलाग करून ३००० वर लोक ठार केले आणि ४०० हत्ती काबीज केले. पण हेमू हा एक कसलेला सेनानायक होता. तो संधीची वाट पाहात होता. मुघलांचे सैन्य आपल्या सैन्याच्या एका भागाचा पाठलाग करीत असलेले आणि लुटीच्या आवडत्या कामात गुंतलेले पाहून हेमूने आपले ३०० लढाऊ हत्ती तारदीबेगच्या मुख्य सैन्यावर सोडले. आणि तारदीबेगसकट त्याच्या सर्व सैन्याला लढाईतून पळवून लावले. अशा तऱ्हेने तुघलकाबादच्या लढाईत हेमूचा जय झाला. पळून जाणाऱ्या

शत्रूचा पाटलाग हेमूने केला नाही. शत्रूच्या पळून जाण्यामागे काही तरी डाव असावा असे त्याला वाटले. नंतर त्याने युद्धक्षेत्रावर आपले सैन्य शिस्तीत खडे ठेवले.

## हेमूचा स्वतःला राज्याभिषेक, अकबराची युद्धाची तयारी

तुघलकाबादच्या विजयानंतर हेमूने दिल्लीचा कबजा घेतला आणि तेथील आपले स्थान बळकट करण्याच्या उद्योगास तो लागला. दिल्लीची लूट आपल्या अफगाण अनुयायात वाटून त्यांना त्याने आपल्या बाजूचे करून घेतले. आणि नंतर दिल्लीच्या तख्तावर बसण्याला पुरेसे समर्थ झालो असे वाटून त्याने विक्रमादित्य ही पदवी धारण केली. दिल्ली पडल्याची बातमी अकबराला मिळाली तेव्हा बैरामखानशी मसलत करून हेमूवर चालून जाण्याचा धाडशी निश्चय त्याने केला. तसे करण्यापूर्वी त्याने आपल्या सैन्यातला काही भाग खिजर ख्वाजाखान (गुलबदन बेगमचा नवरा) याच्या हाताखालीं देऊन सिकंदर सूर याच्या बंडाचा बिमोड करण्यासाठी पंजाबमध्ये ठेवून दिला. तारदीबेग खान आणि इतर पळून गेलेल्या सरदारांना ठाणेश्वर येथे एकत्र जमून बादशाही सैन्याची वाट पाहण्याचे हुकूम सुटले. १० झिल हिज्झा – ऑक्टोबर १७, १५५६ या दिवशी ईद–उझा झुवाचा सण साजरा करून अकबराचे सैन्य ता. २५ ऑक्टोबर रोजी सरहिंदला येऊन पोचले. बैरामखान हा तारदीबेग खान याला स्वतःचा प्रतिस्पर्धी समजत असे. त्यामुळे दिल्लीच्या लढाईतून पळून जाऊन राजद्रोह केल्याबद्दल तारदीबेगला ठार मारण्याचा हुकूम बैरामखानने दिला, आणि तारदीबेग खानच्या काही विश्वासू अनुयायांना त्याने कैदेत टाकले. या वेळी अकबर सरहिंदच्या रम्य प्रदेशात ससाण्यांच्या साह्याने पक्षांची शिकार करण्यात गुंतला होता. शिकारीहून परत आल्यावर या प्रकाराची बातमी ऐकून त्याला फार आश्चर्य वाटले. पण बैरामखानने केलेल्या कृत्याबद्दल त्याने मान्यता दर्शविली. तारदीबेग खानला दिलेली शिक्षा योग्य आणि न्याय्य होती आणि त्यामुळे मोंगल सैन्याचा विश्वास वाढला असे इतिहासकार व्ही. ए. स्मिथ यांनी म्हटले आहे ते योग्यच आहे.

## पानिपतची दुसरी लढाई. ५ नोव्हेंबर, १५५६, हेमूचा शेवट

सरहिंदहून अकबराची फौज पानिपतच्या रोखाने निघाली. सराई कुरुंडाला पोचल्यावर अली कुली खान शैवानी याला फौजेनिशी दिल्लीच्या रोखाने आघाडी–वर पाठविण्याचे ठरविले.

मुबारक खान आणि बहादुर खान यांच्या हाताखाली आपला तोफखाना देऊन हेमूने त्यांची रवानगी पानिपतला केली. असे करण्यात अकबराच्या सैन्याला

वाटेतच रोखण्याचा त्याचा हेतू होता. हेमूच्या हालचालींची खबर मिळताच बैरामखानने हेमूच्या सैन्याचा तोफखाना काबीज करण्याकरता एक तुकडी पुढे पाठविली. त्यांनी विनासायास हेमूचा तोफखाना सर केला आणि हेमूच्या आघाडीची तुकडी दिल्लीला परत फिरली. इतके होईपर्यंत हेमू स्वतःच पानिपतला येऊन पोचला होता. कसलेले अफगाण आणि रजपूत शिपाई असलेली आपली ३०,००० फौज आणि १५०० हत्ती यांची हेमूने तीन भागांत विभागणी केली. उजवी बाजू शादी खान कक्कर याच्या हाताखाली आणि डावी बगल आपल्या बहिणीचा शूर मुलगा रामय्या याच्या ताब्यात देऊन हेमू स्वतः सैन्याच्या मध्यभागी राहिला. सैन्याच्या समोर आपले ६०० लढाऊ हत्ती त्याने ओळीने उभे केले. मुघली घोडदळाने हल्ला केला तर गोंधळ उडवून देण्यासाठी त्याने ही योजना केली होती. चिलखत घातलेले तिरंदाज आणि बंदूकधारी शिपाई या हत्तींवर बसवले होते. हत्तींच्या सोंडांनापण भाले आणि चाकू लावले होते आणि चढाईची लढाई कशी करावी याचे शिक्षण त्यांना दिलेले होते. अशा तयारीनिशी हेमूने मोठ्या धीटाईने पानिपतकडे कूच केले. पानिपतवर तळ देऊन असलेल्या मुघल सैन्याला ५ नोव्हेंबर रोजी हेमू चाल करून येत आहे आणि त्याने आपली बरीचशी फौज शादीखान कक्कर याच्या हाताखाली आघाडीवर पाठविली आहे अशी बातमी कळली आणि त्यांच्यात भीतीचे वातावरण पसरले. तथापि त्यांच्यातल्या काही धाडशी लोकांनी शत्रूशी सामना देण्याचे ठरविले आणि १०,००० मुघली फौज लढाईला सज्ज झाली. उजवी बगल इस्कंदरखान याच्या हाताखाली, डावी बगल अब्दुल्लाखान याच्याकडे आणि मध्यभागी हुसेन कुली खान आणि शहापुरी महरन यांच्यासहित अली कुली खान शैबानी अशी सैन्यरचना करण्यात आली. आघाडीवर कित्येक नाणावलेल्या तुकड्या ठेवण्यात आल्या होत्या.

अकबर आणि बैरामखान यांच्या हाताखालची कर्नालहून निघालेली मोठी फौज पानिपतपासून पाच मैल दूर असतानाच मोंगल सैन्याच्या आघाडीच्या तुकड्या आणि हेमूचे सैन्य यांच्यामध्ये पानिपत येथे ५ नोव्हेंबर १५५६ रोजी लढाईला तोंड लागले. आपला तोफखाना शत्रूच्या हातात सापडल्यामुळे त्यांच्या अचानक वाढलेल्या सामर्थ्याकडे दुर्लक्ष करून हेमूने क्षणाचाही विलंब न लावता शत्रूवर प्रचंड हल्ला चढविला. बैरामखानच्या हाताखालील मोंगल फौज पानिपतला पोचण्यापूर्वीच त्याला लढाईचा सोक्षमोक्ष करून टाकावयाचा होता. हेमूच्या हत्तींच्या जबरदस्त माऱ्यापुढे मोंगलांची उजवी आणि डावी बगल कोलमडून पडली, आणि आपल्या पराभवाची स्पष्ट चिन्हे त्यांना दिसू लागली. सुदैवाने मध्यभागी असलेला अली कुली खान शैबानी हा आपली जागा पक्की धरून राहिला, आणि त्याच्या हाताखालचे महंमद कासीमखान निशापुरी,

हुसेन कुलीखान, शहा कुली महरम आणि लाल खान बदक्षी असे शूर सेनानी हे कुलीखानच्या सैन्यापासून अलग झाले आणि लांबचे वळण घेऊन हेमूच्या पिछाडी–वर त्यांनी हल्ला चढविला. दरम्यान अली कुली खान शैबानीची मधली आघाडी पुढे सरकली आणि एक रुंद घळीच्या जागी येऊन पोचली. ही घळ हत्तींना पार करणे शक्य नव्हते. यामुळे अली कुली खानची मधली आघाडी सुरक्षित राहिली एवढेच नव्हे तर शत्रूच्या हत्तींवर बाणांचा आणि बंदुकींचा यशस्वी मारा करण्याची संधी त्यांना मिळाली. त्यांच्यापुढे हेमूच्या हत्तींना मागे फिरणे भाग पडले. याचा फायदा घेऊन हेमूच्या पिछाडीवर बाण आणि तलवारीच्या साहृयाने मोंगल सैन्याने हल्ला केला. आपल्या हवाई नावाच्या प्रख्यात हत्तीवर ऐटीत बसून हेमू रणांगणाची पाहणी करू लागला. याबद्दल लिहिताना अबुल फजल म्हणतो; "युद्धातले सर्व डावपेच वापरून आणि मनात येतील ती साहसी कृत्ये करून हेमूने आपल्या अंगचे कसब सर्वांना दाखवून दिले. मुघल सैन्यावर निरनिराळ्या वेळी जोरदार हल्ले करून आपल्या अचाट धाडसी कृत्यांनी हेमूने प्रचंड मुघली सैन्याला हरविले. घनघोर युद्ध झाले आणि त्या धुमश्चक्रीत हेमूचे दोन शूर सेनापती, भगवानदास आणि शादीखान हे धारातीर्थी पडले. लढाईचे पारडे कोणाकडे झुकणार हे कोणालाच सांगता येईना." अबुल फजल पुढे लिहितो, "लढाई ऐन रंगात आली असताना दैवी कोपाने भारलेला एक बाण एकाकी हेमूच्या डोळ्यात शिरून डोक्यातून बाहेर आला." हेमच्या सैन्याचा धीर सुटून ते सैरावैरा पळू लागले. पळून चाललेल्या सैन्याचा जबरदस्त पाठलाग करून मुघलांनी अनेकांना यम-सदनी पाठविले आणि खूप मोठी लूट मिळविली. या लढाईत हेमूचे ५००० सैन्य गारद झाले आणि पळणाऱ्या सैनिकांमधल्या मृतांची संख्यापण यापेक्षा खूपच मोठी असली पाहिजे. इतर संपत्तीबरोबरच १५०० हत्ती पण विजयी मुघल सैन्याच्या ताब्यात आले. कत्तल आणि लूट चालू असतानाच शहा कुली खान हेमूच्या हत्तीजवळ गेला आणि हत्तीवर कोण स्वार आहे हे माहीत नसल्याने माहुताला ठार करून लढाईतील लूट म्हणून तो हत्ती स्वतःच्या ताब्यात घेण्याचा विचार त्याने केला. स्वतःचा जीव वाचविण्यासाठी माहुताने हेमूकडे बोट करून दाखविले तेव्हा शहा कुली खानने तो हत्ती रणांगणातून बाहेर काढला आणि पाच मैल मागे असलेल्या मुघल फौजेकडे जाऊन बेशुद्ध अवस्थेत असलेल्या हेमूला अकबरासमोर आणले. "या काफिराचे मुंडके स्वतःच उडवून गाझी ही पदवी आपण मिळवा" अशी बैरामखानने अकबराला विनंती केली. मृत्यूच्या दारी जाऊन बसलेल्या माणसाला ठार करण्याचे अकबराने नाकारले असे अबुल फजल म्हणतो. पण बैरामखानच्या नोकरीत असलेला समकालीन महंमद अशीफ कंदाहारी, जो बहुधा युद्धात हजर असावा, याने असे लिहून ठेवले आहे की " बैरामखानच्या विनंतीला मान देऊन अकबराने तलवारीचा एक वार हेमूवर केला आणि बैरामखानने डोके उडविले. धडापासून वेगळे झालेले

हेमूचे शीर काबूलला पाठविण्यात आले आणि त्याचे धड सुळावर लटकवून ठेवण्यासाठी दिल्लीला रवाना केले."

त्या वेळी अकबराला योग्य सल्ला देणारा कोणी शहाणा पुरुष त्याच्या दरबारी नव्हता असे अबुल फजल खेदाने म्हणतो. कारण हेमू हा असामान्य बुद्धीचा माणूस होता. म्हणून त्याला जीवे न मारता कैदेत ठेवले असते तर अकबराला पुढेमागे त्याचा उपयोग करून घेता आला असता. अकबराच्या कुठल्याही शत्रूस चांगले म्हणावयाचे टाळणाऱ्या अबुल फजलने अकबराच्या सर्वांत मोठ्या शत्रूचा नकळत का होईना मोठ्या गौरवाने उल्लेख केला आहे. तो म्हणतो, "तो (हेमू) एक अप्रतिम स्वामिनिष्ठ सेवक होता आणि त्याच्या मनाची भरारी फार मोठी होती. (अकबरासारख्या) एखाद्या मोठ्या व्यक्तीची शिकवण त्याला जर मिळती तर केवढी मोठाली कामे त्याने करून दाखविली असती."

हेमूच्या वधानंतर त्याचे वडील आणि विधवा पत्नी आपल्याजवळ असलेली संपत्ती आणि मौल्यवान चीजवस्तू घेऊन अलवारला पळून गेले आणि अलवारच्या दक्षिणेस असलेल्या देवती आणि माचारी या आपल्या दोन मजबूत किल्ल्यांचा आश्रय त्यांनी घेतला. हे दोन्ही किल्ले त्यांच्या कुटुंबियांची निवास-स्थाने होती. नासीर–उल–मुल्क ही पदवी आता मिळालेल्या पीर महमंद शिरवानीला अलवारच्या स्वारीवर पाठविण्यात आले. शेरशहाचा गुलाम हाजीखान याचा पराभव करून पीर महमंदने अलवार काबीज केले आणि नंतर तो देवती आणि माचारीकडे वळला. एका छोट्याशा लढाईनंतर हेमूच्या वडिलांना कैद करून नासीर–उल–मुल्कच्या समोर आणण्यात आले. नासीर–उल–मुल्कने त्याला मुसलमान धर्म स्वीकारण्यास सांगितले. ते नाकारून हेमूचा बाप म्हणाला, "८० वर्षे ह्या हिंदू धर्माप्रमाणे मी माझ्या देवाची पूजा केली आहे. माझ्या उतारवयात तुमच्या धर्माची तत्त्वे न समजता केवळ प्राण वाचविण्यासाठी माझ्या धर्माचा त्याग करून तुमच्या धर्माचा स्वीकार मी का करावा ?" त्याच्याशी वाद घालण्याच्या भरीस न पडता पीर महमंदाने निष्ठुरपणे त्याला ठार मारले. आपल्याजवळची संपत्ती हत्तीवर लादून हेमूची विधवा स्त्री पंजाबमधील हुशारपूरच्या आग्नेयेस दोन मैलांवर असलेल्या बजवारा गावानजीकच्या जंगलात जित्रानीशी पळून गेली. तिचा पाठलाग करून तिची संपत्ती हिरावून घेण्यात आली. त्यांतला काही भाग बादशाही नोकरांच्या हातात पडून बाकीचा लुटला गेला. मोठी लूट आणि ५० हत्ती घेऊन पीर महमंद अकबराकडे आला आणि अकबराने मोठ्या खुषीने त्याचे स्वागत केले.

## दिल्ली आणि आग्रा पुन: अकबराच्या अंमलाखाली येतात.

हेमूचा पराभव झाला त्याच दिवशी पळून जात असलेल्या शत्रूचा जोरदार पाठलाग करण्याचा हुकूम इस्कंदरखान उझबेग यास देण्यात आला. त्याप्रमाणे शत्रूचा पाठलाग करून ता. ५ नोव्हेंबर १५५६ रोजी दिल्लीची राजधानी इस्कंदरखानने पुन: काबीज केली. दुसऱ्या दिवशी आपल्या मुख्य सैन्यासहित अकबराने दिल्लीत रीतसर प्रवेश केला. त्यानंतर विजयोत्सव होऊन यश मिळविण्यात भागीदार असलेल्यांना बक्षिसे वाटण्यात आली. अली कुली खान शैबानी याला " खान–ई–झमन " ही पदवी आणि संबळ प्रांत व दुआब मधील काही परगण्यांची जहागीर देण्यात आली. अबदुल्लाखान उझबेग याला "शुजात खान " ही पदवी मिळून काल्पी प्रांतावर त्याची नेमणूक करण्यात आली. इस्कंदरखान उझबेग याला "खान–ई–अलम् " ही पदवी आणि सियालकोटची जहागीर मिळाली. आणि मुल्ला पीर महमंदखान शिरवानी याला " नझीर–उल–मुल्क " ही पदवी आणि मेवातचे (हल्लीचे अलवर, मथुरा गुरगाव आणि भरतपूर या जिह्यांचा काही भाग ) अधिकार सोपविण्यात आले. कियाखान याची आग्र्याचा सुभेदार म्हणून नेमणूक होऊन ताबडतोब आपल्या जागेचा ताबा घेण्याचा त्याला आदेश देण्यात आला. मजनूनखान काकशाल याला नार नौलच्या वेढ्यात मदत करणारा अंबरचा राजा भारमल याचापण सन्मान करण्यात आला. निरोप देण्याच्या समारंभाच्या वेळी अकबराच्या उधळलेल्या हत्तीला न जुमानता आपल्या रजपूत तुकडीच्या अग्रभागी निर्भयपणे उभे राहणाऱ्या भारमलच्या शौर्याचा कायमचा ठसा सर्वांवर राहिला.

## शिकंदर सूरचा शेवट–मे १५५७

विजयोत्सव चालू असतानाच शिकंदर सूर याच्यावर ऑक्टोबर १५५६ मध्ये पाठविलेल्या खिझर ख्वाजाखान याचा चामियारी (लाहोरच्या ईशान्येस ३५ मैलांवर) येथे पराभव होऊन त्याला लाहोरकडे पिटाळून लावण्याची बातमी दिल्लीला आली. आजूबाजूचा मुलूख उध्वस्त करण्यासाठी शिवालिक डोंगरपट्टीचा आश्रय सोडून शिकंदर सूर पंजाबात लूटमार करीत होता आणि तेथल्या काही प्रदेशांचा कबजा घेऊन तेथे करवसुली करीत होता. या कामात मुखदुम–उल–मुल्क हा किताब धारण करणाऱ्या मुल्ला अब्दुल्ला सुलतानपुरी याची त्याला फूस होती. सियालकोटची जहागीर आणि खान–इ–अलम ही पदवी बहाल करून अकबराने इस्कंदरखानला खिजर ख्वाजाच्या मदतीस पाठवून दिले. यानंतरच लवकरच म्हणजे डिसेंबर ७, १५५६ रोजी महादी कासीमखान याच्या ताब्यात दिल्ली देऊन अकबर स्वतः पंजाबच्या मार्गाने कूच करीत

निघाला. वाटेत प्रमुख जहागीरदार त्याला येऊन मिळाले. अकबराचे सैन्य जलंदरला पोचताच शिकंदर सूर पुन्हा डोंगराळ मुलखात पळून गेला. आपल्या फौजेची एक तुकडी बंडखोराचा पाठलाग करण्यास पुढे पाठवून पठाणकोटजवळील डाहमेरी या गावात अकबराने आपला तळ दिला. मुघल सैन्याला खिंडीत येऊ देऊन नंतर त्यावर मोक्याच्या जागेवरून जोराचा हल्ला चढविण्याचा शिकंदराचा डाव होता. तरीसुद्धा अकबर कूच करीत पुढे निघाला आणि शिकंदराला जाऊन मिळालेल्या जमीनदारांचा प्रदेश उध्वस्त करून टाकाण्या-साठी त्याने काही तुकड्या तिकडे पाठविल्या या हालचालीमुळे घाबरून शिकंदर मानकोट किल्ल्याच्या आश्रयाला जाऊन राहिला. मानकोटचा किल्ला म्हणजे सलीम शहा सूर (१५४५ ते १५५४) याने गख्खर जातीच्या टोळ्यांचे पारिपत्य करण्या-साठी आजूबाजूच्या टेकड्यांवर बांधलेल्या चार अत्यंत मजबूत किल्ल्यांचा एक गट होता. मानकोटच्या किल्ल्यावर भरपूर दाणापाणी असून तो अभेद्य समजला जात असे आणि शत्रूच्या फौजांना तेथे जाणे जवळजवळ अशक्य होते. तथापि पीर महमद खान शिरवानी यांच्या हाताखालील मुघल सैन्याने मानकोटला वेढा दिला. किल्ल्याबाहेर पडून अफगाण फौजेने मुघल सैन्यावर जोराचा हल्ला चढविला. मुघलांनी प्रतिकार केला आणि नंतरच्या घनघोर युद्धात महाम अनघाचा मुलगा अधमखान याने फार पराक्रम गाजविला. अली कुली खान शैबानीचा भाऊ बहादूरखान या आणखी एका सेनापतीने पण दैनंदिन चाललेल्या लढाईत मोठे शौर्य दाखविले. कंदहार काबीज करण्याचा बेत फिसकटल्या-नंतर बहादूरखान मानकोटला आला होता आणि बैरामखानच्या मध्यस्थीमुळे बादशहाने त्याला माफी दिली होती. किल्ल्याला दरोबस्त वेढा घालून मुघल सैन्याने चारी बाजूंना खंदक खणून त्यावर तोफा उभ्या केल्या. किल्ल्याच्या मजबुतीवर भरवसा ठेवून आतील अफगाण फौज लढत होती. तसेच चुनारहून निघून अदली दक्षिणेच्या बाजूने शत्रूला हूल दाखवील अशी आशा त्यांना वाटत होती. पण सुदवाने याच वेळी (इ. स. १५५७ च्या सुरुवातीस) बंगालचा राजा जलालउद्दिन याच्याबरोबर झालेल्या लढाईत अदली मारला गेला. या बातमीने धीर खचून बैरामखानच्या मध्यस्थीने शिकंदर सूरने बादशहाला शरण येण्याचे कबूल केले. त्याला जीवदान आणि जहागिरी यांची हमी देण्यात आली होती. आपला मुलगा अबदुर रहमान याला बादशहाच्या दरबारात ओलीस पाठवून शिकंदर सूरने बादशहाकडे निवडक हत्तींसह मौल्यवान नजराणा पाठवून दिला. २४ मे १५५७ रोजी किल्ल्याबाहेर येऊन गडाच्या किल्ल्या त्याने अकबराच्या स्वाधीन केल्या आणि अकबराने त्याला खरीद आणि बिहारची जहागीर बहाल केली. अबुल कासीम याची किल्ल्यावर नेमणूक करून ता. ३१ जुलै १५५७ रोजी अकबराने मानकोट सोडले. मानकोटचा हा वेढा ६ महिने चालू होता.

## अकबराचा विवाह, १५५७ सालामधील इतर घटना.

मानकोटचा वेढा चालू असतानाच दुसऱ्या एका भागातून छोट्याशा विजयाची बातमी आली. इस्लाम शहा सूरचा गुलाम बहबल खान याच्या ताब्यातच ग्वाल्हेरचा किल्ला या वेळी होता. पूर्वजांपासून चालत आलेल्या या किल्ल्यावरचा आपला अधिकार परत मिळविण्यासाठी राजाराम शहा याने किल्ल्याला वेढा दिला होता. किल्ल्यावरील फौज शरण जाण्याच्या बेतात होती. एवढ्यात तो जिंकण्याकरिता आग्र्याहून कियाखान ग्वाल्हेरवर चालून आला. किल्ल्याचा वेढा उठवून राम शहाने कियाखानच्या सैन्याला तोंड दिले. त्याचा पराभव करून कियाखानने त्याला पिटाळून लावले. आता कियाखानच्या सैन्याने ग्वाल्हेरला वेढा दिला पण १५५९ च्या सुरुवातीपर्यंत किल्ला त्याला घेता आला नाही.

या वेळची दुसरी महत्त्वाची गोष्ट म्हणजे इ. स. १५५७ च्या सुरुवातीस अबदुल्ला खान मुघल याच्या मुलीबरोबर झालेले अकबराचे लग्न. हा विवाह बैरामखानला विशेष पसंत नव्हता. अबदुल्ला खानची बहीण कामरानला दिली असल्यामुळे तो कामरानच्या बाजूचा म्हणून समजला जात होता. अकबराचे हे दुसरे लग्न. त्याची पहिली बायको रुकिया बेगम, ही हिंदालची मुलगी होती आणि अकबराबरोबर तिचा वाङ्निश्चय नोव्हेंबर १५५१ मध्ये झाला होता.

दिल्ली आणि आग्रा परत जिंकून घेतल्यावर हुमायूनने आपला जनानखाना इकडे बोलावला होता. त्याचा उल्लेख पूर्वी आलेलाच आहे. पण सुलेमान मिर्झाची काबूलवरील स्वारी आणि हुमायूनच्या मृत्यूनंतरचे हिंदुस्थानातले अस्थिर वातावरण यामुळे त्यांना सुरक्षितपणे आणणे शक्य झाले नाही. मानकोटचा वेढा चालू असताना हमीदा बानू बेगम आणि जनानखान्यातल्या इतर स्त्रिया हिंदुस्थानात येऊन पोचल्या. मानकोटहून निघून अकबराने स्वतः वाटेत त्यांचे एका टप्प्यावर स्वागत केले. सर्व कुटुंब पुनः एकत्र आल्यामुळे परस्परांना आनंदाचे भरते आले.

खान-इ-झमन ही पदवी आणि संबळूची जहागीर मिळालेल्या अली कुली खानने अदलीचा नावाजलेला सुभेदार रुक्नखान लोहानी याचा पराभव करून संबळ आणि त्याच्या भोवतालचा प्रांत काबीज केला. याच वेळी हसनखान बच्छगोटी आणि जलालखान हे दोघे ५०,००० अफगाण फौजेनिशी संबळच्या मार्गाने येत आहेत अशी बातमी मिळताच अली कुली खान आणखी पूर्वेकडे वळला. लखनौजवळ दोन्ही सैन्ये एकमेकांना भिडली. आपल्या जवळच्या फक्त ४००० सैन्यानिशी शत्रूच्या २०,००० घोडदळाची धूळदाण उडवून अली कुली खानने

शत्रूचा संपूर्ण पराभव केला, आणि अनेक हत्ती व फार मोठी लूट हस्तगत केली. सबदिलिया आणि दिलशंकर हे दोन सर्वोत्तम हत्ती अकबराला नजराणा म्हणून पाठवून देण्यात आले.

मानकोटचा किल्ला पडण्यापूर्वीच, १५५७ च्या सुरुवातीस महंमद अदिलशहा सूरच्या मृत्यूची बातमी आली. आपला बाप महंमदखान हा अदिलशहाच्या हातून लढाईत मारला गेला हे पाहून बापाच्या वधाचा सूड घेण्याच्या हेतूने बंगालचा राजा जलालउद्दिन याने महंमद अदिलशहाच्या राज्यावर स्वारी केली. या स्वारीत अदलीचा पराभव होऊन तो मारला गेला. अदलीच्या मृत्यूने हिंदुस्थानच्या गादीवर हक्क सांगणारा शेवटला सूर नाहीसा झाला.

मानकोटहून लाहोरला परत येताना वाटेत अकबराला आपल्या सहकाऱ्यांचा इतका वीट आला की हैरापा नावाच्या कोणालाही स्वार होऊ न देणाऱ्या एका अत्यंत अवखळ इराकी घोड्यावर स्वार होऊन तो आपल्या परिवारापासून एकटाच दूर, आपले हुजरे आणि चाकरसुद्धा बरोबर न घेता निघून गेला. अकबराला घेऊन घोडा मनुष्य वस्तीपासून दूरवर निघून गेला. असे दिसते की अकबराला पाठीवरून फेकून देऊन घोडा तरुण बादशहाला 'ईश्वराशी तादात्म्य पावलेल्या अवस्थेत' सोडून तसाच निघून गेला असावा असे वाटते सगळ्यात नवलाची गोष्ट म्हणजे तो आडदांड घोडा अकबर पडला होता त्या जागी परत आला आणि त्यावर पुन्हा स्वार होऊन अकबराने छावणी गाठली. काळजीत पडलेल्या शाही फौजेला राजा परत आलेला पाहून आनंद झाला. ही घटना म्हणजे दैवी प्रेरणेचे फळ होते असे अबुल फजल म्हणतो. पण अकबर हा काहीसा गूढवादी असून त्याला अधूनमधून झटके येत असत हे डॉ. व्ही. ए. स्मिथ या इतिहासकाराचे मत योग्य वाटते. ता. ७ ऑगस्ट १५५७ रोजी सैन्य लाहोरला येऊन पोचले.

बहादुर खान उझबेक याला मानकोटच्या वेढ्यातील त्याच्या कामगिरीबद्दल मुलतानचा अधिकार देण्यात आला होता. त्याने एक महिन्याच्या लढाईनंतर बलूची लोकांचा पराभव करून तो प्रांत काबीज केल्याची बातमी लाहोरला येऊन थडकली.

अकबर लाहोरला साडेचार महिने होता, तेथे त्याचा बहुतेक वेळ शिकार करण्यातच गेला. येथे सुलतान आदम गखखर त्याच्या सेवेस हजर झाला. माऊचा (म्हणजे गुरुदासपूर जिल्ह्यातील पठाणकोटचा) राजा तखतमल हा काही

---

**टीप**:– या वेळी अकबर १४½ वर्षांचा होता. स्मिथ आणि हेग या दोघांचीही हे लग्न रुकिया बेगमशी झाले अशी चुकीची समजूत आहे.

काळ सिकंदर सूरला जाऊन मिळाला होता. त्याला बैरामखानने ठार मारून त्याच्या जागी त्याचा भाऊ तखतमल याची नेमणूक केली. तखतमलला ठार मारल्याबद्दल अकबराला खान-इ-खानाचा राग आला कारण ही गोष्ट अकबराच्या मताविरुद्ध घडली होती.

डिसेंबरच्या सुरुवातीला महदी कासीम खानच्या बहिणीचा मुलगा हुसेन खान याच्याकडे लाहोरचा कारभार सोपवून १७ डिसेंबर १५५७ रोजी दिल्लीला जाण्याकरता अकबराने लाहोर सोडले. हुमायूनची बहीण गुलरख बेगम हिची मुलगी म्हणजेच अकबराची आते बहीण सलिमा सुलतान बेगम, ही अतिशय सुंदर व गुणसंपन्न होती. हिच्याशी विवाह करण्याला बैरामखान याला परवानगी देऊन त्यायोगे आपल्या पालकाविषयी वाटणारा आदर अकबराने व्यक्त केला. या वेळी अकबर दिल्लीच्या वाटेवर होता. यानंतर लवकरच महमंद कासीम खान निशापुरीने अजमेर ताब्यात घेतल्याची आणि जोधपूरच्या हद्दीतील जयतरण किल्ला शहा कुली खान महरम याने जिंकून घेतल्याची बातमी आली.

## सुलतान हुसेन मिर्झाला कंदाहार दिले

बाबरच्या वेळेपासून हिंदुस्थान आणि इराण यांच्या राजांमध्ये कंदहारच्या किल्ल्यासाठी वाद चालू होता. इ. स. १५५६ मध्ये खान-इ-झमन अली कुली खान याचा भाऊ बहादुर खान याने इराणच्या शहाचा पुतण्या सुलतान हुसेन मिर्झा याच्या हाताखाली सैन्य देऊन कंदहारचा किल्ला काबीज करण्यासाठी पाठविण्यास इराणच्या शहाला चिथावणी दिली. किल्ला लढविण्यास अधिक कुमक मिळू न शकल्यामुळे त्या वेळचा कंदहारचा मुघल किल्लेदार शहा महंमद किलाती याला किल्ला सुलतान हुसेन मिर्झाच्या स्वाधीन करून आग्र्याला परतणे भाग पडले. या प्रसंगाची सारवासारव करताना अबुल फजल म्हणतो की किल्ला मोगलांकडून इराणने जिंकून घेतला नाही. तर हिंदुस्थानचे राज्य परत मिळाल्यावर कंदहारचा किल्ला इराणच्या शहाला परत देऊ असे हुमायूनने शहाला दिलेले वचन खरे करण्यासाठी अकबराच्या आदेशानुसार इराणच्या शहाला किल्ला परत देण्यात आला.

## जोनपूरच्या बंडाचा बिमोड

दिल्लीच्या तख्तावर हक्क सांगणारे प्रमुख सूर प्रतिस्पर्धी जरी एकामागून एक नाहीसे झाले, तरी सामान्य अफगाण लोक आपली सत्ता नष्ट झाली आहे असे मानायला अद्याप तयार नव्हते. जोनपूरच्या आसपासच्या भागात स्वत:चे राज्य

प्रस्थापित करण्याच्या उद्देशाने इब्राहिम सूरच्या नेतृत्वाखाली काही अफगाण एकत्र झाले होते. बंगालच्या सुलतान बहादूरचा त्यांना जोरदार पाठिंबा होता. त्यामुळे या बंडखोरांचे पारिपत्य करायला पाठविलेल्या अली कुली खानला आणखी कुमक म्हणून बरेचसे सैन्य धाडण्यात आले. सुदैवाने लढाई न करताच जोनपूर आणि त्याबरोबरच त्याच्या आसपासचा बराचसा मुलूख अली कुली खानच्या ताब्यात आला.

## अकबराच्या अज्ञानावस्थेतील राज्यकारभार

१४ एप्रिल १५५८ रोजी अकबर दिल्लीला परत आला. त्याचा बहुतेक वेळ जरी खेळ खेळण्यात जात असला तरी या सुमारास त्याने आपल्या अभ्यासाकडेही थोडे लक्ष देण्यास सुरुवात केली, आणि उदार धार्मिक मत असलेल्या विद्वान मीर अब्दुल लतीफ याच्यापाशी तो शिक्षण घेऊ लागला. या शिक्षकाने आपल्या शाही शिष्याला सर्वांशी सलोख्याने राहण्याचे (सलाह–इ–कुल) तत्त्व शिकवले. अकबराच्या पुढील सर्व आयुष्यावर या मार्गदर्शक तत्त्वाची छाप पडल्याचे दिसून येते. तरुण बादशहा आता राज्यकारभारात पण पहिल्यापेक्षा अधिक लक्ष घालू लागला. आठवड्यातून दोन दिवस प्रधान मंत्री खान–ई–खानान याच्या नेतृत्वाखालील प्रमुख अधिकाऱ्यांना बैठकीत बोलावून तो राज्यकारभार चालवू लागला. महत्त्वाचे राजकीय आणि आर्थिक कागद त्याच्यासमोर ठेवून त्याच्या हुकमाप्रमाणे प्रकरणे निकालात निघू लागली. सर्व महत्त्वाच्या कागदपत्रावर त्याचे शिक्का–मोर्तब होऊ लागले. प्रत्यक्ष राज्यकारभार प्रधान मंत्र्याचा उजवा हात (वकी–इ–मुत्लक) पीर महंमद याच्या हातात होता. काही कालानंतर पीर महंमदखान याच्यावरचा विश्वास उडाल्याने प्रधान मंत्र्यांने हाजी महंमद खान सीअेस्तानी याची त्याच्या जागी नेमणूक केली. पण हा नावापुरताच वकील राहून खरी सत्ता मुख्य सदर शेख गदाई याच्या हाती आली. शेख गदाई हा एक उपटसुंभ उर्मट गृहस्थ होता; पण त्याच्यावर खान–इ–खानानचा इतका विश्वास होता की, त्याचा सल्ला घेतल्याशिवाय कुठल्याही आर्थिक किंवा राजकीय गोष्टी तो करीत नसे. अकबर "अज्ञान" असताना राज्याचा कारभार कसा चालत असे याचा पहिला उल्लेख येथे सापडतो. *

बादशहा दिल्लीत असताना जम्मूचा राजा कपूरचंद याच्याविरुद्ध ख्वाजा अबदुल्ला, तिरमिझचा मिर्झा हसन आणि काशगरचा करा बहादूर यांना फौज देऊन पाठविण्यात आले. जम्मूच्या किल्याला वेढा देऊन त्याचा पराभव करण्यात आला पण त्याला जिंकून घेता आले नाही. पुष्कळशी लूट हस्तगत करून हल्ला करणारी

* अकबर मामा–अबुल फझल, पाने ६७–६९

फौज ख्वाजा अब्दुल्लाच्या जहागिरीचे गाव तलुंडी येथे परत आली.

दिल्लीच्या सहा महिन्यांच्या मुक्कामानंतर अकबर आणि त्याचा दरबार जलमार्गाने आग्र्याला जाण्यासाठी ९ ऑक्टोबर १५५८ रोजी निघून ता. ३० आक्टोबर रोजी आग्र्यास पोचला. शिकंदर लोदीच्या बादलगड नावाच्या विटांनी बांधलेल्या किल्लयात अकबर राहू लागला आणि ग्वाल्हेरच्या वेढयात गुंतलेल्या खानाच्या मदतीस हबीब अल्लीखान आणि क्यू अल्लीखान यांना सैन्य देऊन त्याने पाठविले. ग्वाल्हेरचा अजिक्य किल्ला लढून सर करणे केवळ अशक्य असल्याने किल्ल्यावरचा अधिकारी बहाबलखान याला समजुतीच्या गोष्टी सांगून किल्ला बादशहाकडे देण्यास त्याचे मन वळवण्यात आले. याबद्दल बहाबलखानास बादशहाच्या नोकरीत दाखल करून घेण्यात आले. (जानेवारी, १५५९) शत्रूला दिलेला शब्द पाळून त्याला उदारतेने वागविण्याच्या धोरणामुळे अकबराच्या कीर्तीत भर पडून त्याची लोकप्रियता आणि प्रतिष्ठा वाढली.

आग्र्याहून अकबराने कमलखान गख्खर याला माळव्यातील सिरोंजच्या मियाना अफगाणांच्या विरूद्ध पाठवले. तेथे फत्ते मिळवून परत आल्यावर त्याला कोरा, फत्तेपूर, हन्सुआ आणि इतर काही गावे (हल्लीचा फत्तेपूर जिल्हा) जहागीर देण्यात आली.

यावेळची आणखी एक महत्त्वाची गोष्ट म्हणजे हतकान्तच्या भदेरिया रजपुतांवर बादशहाचा विजय. आग्र्याच्या आग्नेय दिशेस ५२ मैलावर हतकान्त (आग्र्या जिल्हयातील बाह प्रांत) च्या विटांच्या किल्लयाचे मजबूत ठाणे होते. भादौरिया रजपूत नेहमीच दिल्लीच्या सुलतानाविरुद्ध बंडे करीत असत आणि स्वातंत्र्य प्रेम, बंडखोरी आणि धाडसी वृत्ती यासाठी ते प्रसिद्ध होते. हातकान्तची जहागीर मिळालेल्या अदमखानने भादोरियांचा पराभव करून त्यांना शरण यायला लावले.

लढाई न करता चुनारगडचा किल्ला घेण्याचा डाव फसला. याच वेळी बैरामखानचे राजप्रतिनिधित्व संपुष्टात येण्याच्या बेतात असल्याने ख्यंभोर आणि माळव्याच्या स्वारीवर गेलेले हबीब अल्ली खान आणि बहादुरखान उझबेक याना परत बोलावण्यात आले. यावेळी कोणतेही मोठे साहस पत्करणे अकबराला धोक्याचे वाटले.

बैरामखानची राजप्रतिनिधीची चार वर्षे अकबराच्या कारकीर्दीत तशीच भारताच्या इतिहासात महत्त्वपूर्ण झाली. या काळात तरुण राजांचे दिल्लीचे आसन बळकट झाले, अंतर्गत कलह निपटून काढण्यात आले, काही तरी शिस्त-

बद्ध राज्ययंत्रणा प्रस्थापित झाली, एवढेच नव्हे तर अकबराच्या प्रमुख शत्रूंचा, पूर्णपणे काटा काढून राज्यविस्तार करण्यात आला. संपूर्ण पंजाब व मुलतान, दिल्लीचा प्रांत, हल्लीच्या उत्तर प्रदेशाची जोनपूरपर्यंतची पूर्व सीमा, आणि नैर्ऋत्येकडे घोलपूर, ग्वालियर, अजमेर, नागौर आणि जैतरण एवढ्या सर्व मुलखावर मुघलसत्ता प्रस्थापित झाली. उत्तर हिंदुस्थान आणि दक्षिण हिंदुस्थानच्या काही भागाचे १५० वर्षापर्यंतचे भवितव्य निश्चित झाले. तरुण अकबर आणि त्याचे साम्राज्य यासाठी बैरामखानने केलेल्या सेवेचे मोल खरोखरच फार मोठे आहे.

# प्रकरण तिसरे

## बैरामखानाची बडतर्फी : त्याच्या मागून आलेले अधिकारी

### बेबनावाची कारणे

खान खानान बैरामखान याची पदच्युती आणि बडतर्फी यासंबंधी अबुल फझलने खूप विस्ताराने लिहिले आहे. राजद्रोही आणि बेइमानी अशा अयोग्य विशेषणांनी जरी बैरामखानचा तो उल्लेख करतो तरी पुढे असे म्हणतो की बैरामखान हा मूलतः सत्प्रवृत्तीचा माणूस असून स्वामीनिष्ठ आणि कर्तबगार सेवक होता. तथापि कुचकामी, तोंडपुजे आणि उद्धट लोकांनी त्याला घेरले होते. त्यांनी चुकीचा सल्ला देऊन त्याला बंड करण्याला प्रवृत्त केले. अकबर ज्याला "खान बाबा" म्हणून संबोधित असे, अशा या प्रभावी व्यक्तीच्या एकाएकी निघून जाण्याला जबाबदार असणारी कारणे खोलवर गेली होती आणि ती बराच काळ धुमसत होती. त्या सर्व प्रसंगांच्या तपशिलात शिरून उजळणी करणे निरर्थक आहे. त्यांपैकी काही महत्त्वाचे प्रसंग सारांशाने सांगणे एवढेच येथे शक्य आहे.

अकबराचा पालक आणि प्रधान मंत्री म्हणून बैरामखानाचे सर्वोच्च स्थान आणि त्याच्या हातात केंद्रित झालेली नेमणुका करण्याची आणि राज्यकारभाराची सत्ता यांचा हेवा वाटून जुने तुर्की सरदार आणि तरुण बादशहाच्या लोभातल्या मंडळींनी, खास करून महाम अनगा आणि तिचा मुलगा आदम खान यांनी, खान खानानविरुद्ध बादशहाचे कान भरण्यास सुरुवात केली. त्यांनी त्याच्या लहानसहान चुकांचा मोठा डोंगर उभा केला आणि त्याच्या हेतूबद्दल बादशहाचा गैरसमज करून दिला. अर्थात स्वतःचे घोडे पुढे दामटण्याचा त्यांचा उद्देश त्यात होताच. अकबराला खाजगी तनखा असा नव्हता. त्याला मिळणारा भत्ता तुटपुंजा असे. त्याचे नोकरचाकर आणि परिवार यांची तर जवळ जवळ उपासमार होत असे. या उलट बैरामखानचे कुटुंब आणि इतर परिवार मोठ्या थाटात राहात असे.

त्याच्या नातलगांची आणि हाताखालच्या लोकांची वेडीवाकडी बोलणी अकबराच्या कानावर येऊन तो त्रस्त होत असे. बैरामखानाची मोंगल घराण्याबद्दलची आणि अकबराबद्दलची अतुल स्वामीनिष्ठा आणि त्या घराण्याच्या सेवेत घालविलेले निष्कलंक उभे आयुष्य हे लक्षात घेऊन तरुण राजा चहाडखोरांच्या बोलण्याकडे फारसे लक्ष देत नसे. पण खुद्द अकबराशी संबंध असलेल्या बाबतीत खान खानानने केलेली काही कृत्ये आणि त्याच्या स्वतःच्या शंका-कुशंका हीच बैरामखानच्या बडतर्फीस कारणीभूत झाली.

ऑगस्ट १५५७ मध्येच आपल्या विरुद्ध एक कट शिजतो आहे अशी शंका बैरामखानला येऊ लागली. मानकोटहून दरबारचा मुक्काम हलल्यावर एक दिवस फतुहा आणि लगना या दोन हत्तींमधील साठमारी पाहण्यात अकबर दंग झाला असताना हे दोन्ही हत्ती एकाएकी आजारी असलेल्या खान खानानच्या तंबूकडे धावले आणि त्यामुळे जमलेल्या मंडळीत खूपच गोंधळ आणि घबराट उत्पन्न झाला. पण हे सर्व पूर्वनियोजित असून अकबराचा त्यात हात होता असे बैरामखानाच्या मनाने घेतले. पण ही केवळ अकस्मात घडलेली घटना होती असे सांगून महाम अनगाने त्याची समजूत घातली. दुसरे, शमसुद्दीन अतकाखान याने आपल्या विरुद्ध अकबराचे कान भरले असे त्याला वाटू लागले. पण अतकाखानने शपथेवर त्याला सांगितले की, त्याच्या विरुद्ध बादशहाकडे आपण कधी एक शब्दही काढला नाही आणि आपल्या हातून तसे कधी होणारही नाही. तिसरे, साठमारीच्या खेळाबद्दल अकबराला वाटणारे आकर्षण बैरामखानला पसंत नव्हते. त्यावर उपाय म्हणून बैरामखानाने सर्व हत्तीखाना आपल्या ताब्यात घेतला आणि त्यांतले काही हत्ती तेथून दूर हलविले. अकबर अर्थातच त्यामुळे चिडला. पण प्रधान मंत्री सर्व सत्ताधारी असल्यामुळे अकबराने ह्या गोष्टीकडे कानाडोळा केला. चौथे, माऊचा राजा तख्तमल याचा शिरच्छेद करण्याचा हुकूम बैरामखानने दिला. हेही अकबराला पसंत नव्हते. पण या वेळीही नाखुशी न दर्शविता तो गप्पच राहिला. पाचवे, आपला मुख्य दुय्यम अधिकारी (वकील) पीर महंमद खान याला सूडबुद्धीने राज्याच्या नोकरीतून एकाएकी बडतर्फ करून बैरामखानने त्याला बयानाच्या किल्ल्यात कैदेत टाकले. यामुळे सर्व दरबारी मंडळी खूपच अस्वस्थ झाली. सहावे, शिया पंथाचा धर्मगुरू शेख गदाई याला मुख्य सद्र ही महत्त्वाची जागा देऊन बैरामखानने दरबारातल्या सर्व सुन्नी पंथाच्या सरदारांचा रोष आपल्यावर ओढवून घेतला. आपल्या शिया पंथातल्या लोकांचे वर्चस्व वाढवून सुन्नी पंथातल्या लोकांना खाली ओढण्याचा प्रधान मंत्र्याचा डाव आहे असे दरबारात वाटू लागले. शेख महंमद घौस यासारख्या सर्वांच्या आदरास पात्र झालेल्या सुन्नी साधुपुरुषाचा मोठा अपमान करून बैरामखानने या संशयाला अधिकच बळकटी आणली. सातवे, याच वेळी

एक दिवस राजाचा एक हत्ती बेफाम होऊन त्याने बैरामखानच्या हत्तीवर जोराचा हल्ला केला आणि त्यातल्या एका हत्तीची आतडी बाहेर काढली. या चुकीबद्दल त्या हत्तीच्या माहुताला बैरामखानने ठार मारले. आठवे, एके दिवशी आग्र्याजवळ यमुनेत बैरामखान जलविहार करीत असताना अकबराचा एक हत्ती अनावर होऊन त्याच्या बोटीकडे धावत सुटला. यामुळे बैरामखान फार घाबरून गेला. पण माहुताने कसेबसे हत्तीला ताळ्यावर आणले. खान खानानचा राग घालवण्यासाठी अकबराने आपल्या त्या माहुताला हात बांधून खान खानानची माफी मागण्यास पाठवून दिले. पण त्यालाही बैरामखानने ठार मारण्याचा आदेश दिला. नववे, आपल्याशिवाय राज्याचा कारभार यशस्वीपणे चालणे अशक्य आहे असे बैरामखानला १९ व्या शतकातील जर्मनीच्या बिस्मार्कप्रमाणे वाटू लागले. त्याचा परिणाम म्हणजे इतरांना काय वाटेल याचा विचार न करता तो बऱ्याच वेळा मन मानेल तसा वागू लागला.

बैरामखानाच्या परिवाराची थाटाची राहणी आणि स्वत:साठी आणि स्वत:च्या कुटुंबियांसाठी लावून दिलेली अपुरी तैनात याची अकबराला पूर्ण जाणीव होती. अबुल फझल म्हणतो की, "बैरामखानच्या अनुयायांतच राज्याची वाटणी झाली होती." तरीपण बैरामखानशी संघर्ष येऊ देणे शहाणपणाचे नाही असे अकबराला वाटले. "बैरामखानचे सर्वोच्च पद, त्याच्या हाताखालचे मोठे सैन्य, आणि विरुद्ध पक्षांतल्या सरदारांचा जुलूम हे लक्षात घेता कुरापत काढावी असे विचार कोणाच्या बरे डोक्यात येतील ?" असे अबुल फझल लिहितो. पण वली बेग झुअल–कादर (बैरामखानच्या बहिणीचा नवरा) आणि शेख गदाई कंबू यांसारख्या बैरामखानच्या अनुयायांची उद्धट वागणूक आणि गैरकारभार, स्वत:च्या सेवक वर्गाची पैशाच्या हलाखीबद्दलची गाऱ्हाणी आणि महाम अनगा, आदम खान आणि सादिक महमंदखान इत्यादी दरबारातल्या सरदारांची महत्त्वाकांक्षा यामुळे तरुण बादशहाचे मन खान खानानबद्दल कलुषित झाले. तो स्वत:ही आता १८ वर्षांचा झाला होता आणि स्वत:चे स्थान पक्के करावे असे त्याला वाटणे साहजिकच होते.

## बैरामखानाविरुद्ध कट

बैरामखानाविरुद्ध झालेल्या कटातले पहिले पाऊल महाम अनगाने टाकले.* दिल्लीचा सुभेदार शिहाबुद्दिन अहमदखान याच्याशी संगनमत करून तिने

* निझाम-उद्दिन अहमद आपल्या तक्बत्-इ-अकबरीमध्ये लिहितो : "दिल्लीला येण्यासाठी बादशहाचे मन वळविण्याशिवाय दुसरी अधिक चांगली युक्ती सापडणार नाही असे महाम अनगाला वाटले." डॉ. आर. पी. त्रिपाठी यांनी जर्नल ऑफ इंडियन हिस्टरी, भाग १ मधील आपल्या "अकबर आणि महाम अनगा" या लेखात म्हटले आहे की, निझाम-उद्दिन अहमद आणि बदायुनी या दोघांनी बैरामचा मुलगा अबदुर रहिम याला खूष करण्याकरिता असे लिहिले आहे. हे चमत्कारिक वाटते. या दोघांनी विशेषत: निझाम-उद्दिन याने अब्दुर रहिम खान खानानपेक्षा अकबराला खूष करण्याकरिता लिहिणे हे स्वाभाविक होते.

अकबराला दिल्लीला बोलावून घेण्याचा बेत आखला. याच वेळी म्हणजे १९ मार्च १६६० रोजी योगायोगाने अकबर आग्र्याहून शिकारीसाठी बाहेर पडला होता.[१] तो सिकंदरा राऊ येथे पोचला तेव्हा "राजमाता आजारी असून आपल्या भेटीसाठी उत्सुक आहेत" असा निरोप महाम अनगाने त्याला पाठविला. हा निरोप पोचताच अकबर दिल्लीकडे निघाला. दिल्लीपासून ५५ मैलांवर आणि अलिगडपासून उत्तरेला ३३ मैलांवर असलेल्या खुर्जा या गावी शिहाबुद्दिन अहमदखान त्याला सामोरा गेला. योग्य संधी साधून महाम अनगाने बैरामखानविरुद्ध बादशहाकडे कागाळी केली, आणि खान खानान असेपर्यंत राज्यकारभारात तुला हात घालता येणार नाही असे त्याच्या मनावर बिंबविले. "मला मक्केला जाण्याची परवानगी द्या. कारण तुमच्या दिल्लीच्या प्रवासाला मीच जबाबदार आहे असे वाटून बैरामखान माझ्यावर आग पाखडल्याशिवाय राहणार नाही" असेही तिने बादशहाला सांगितले. तिचे म्हणणे न ऐकता "मी स्वत:हूनच तुला न कळविता दिल्लीला आलो आहे" असा निरोप त्याने खान खानानला पाठविला. त्याचप्रमाणे राजघराण्यातल्या सेवक वर्गाला आश्वासन देऊन नीट वागवावे आणि आपल्या येण्याला त्यांना जबाबदार धरण्यात येईल ही त्यांची भीती घालवावी असेही कळविले.

याच वेळी सावधगिरीचा उपाय म्हणून शिहाबुद्दिन अहंमद खान याने सैन्य आणि युद्धसामग्री जमवून किल्ल्यावर मोर्चे बांधून संरक्षणाची जय्यत तयारी केली. अकबराने खान खानानच्या विरुद्ध हालचाल सुरू केली आहे अशी खोटीच अफवा त्याने आणि महाम अनगाने सर्वत्र पसरविली.[२]

---

१ यमुना ओलांडल्यानंतर अकबराने आपला चुलतभाऊ कामरानचा मुलगा अबदुल कासीम याला बोलावणे पाठवून मोहिमेत सामील होण्याला सांगितले.

२ अकबर दिल्लीला २७ मार्च रोजी पोहोचला. मुहमद अरिफ कंदाहारी आणि अबुल फझल यांच्या म्हणण्याप्रमाणे अकबराने बैरामखानला शासन करून कारभाराची सर्व सूत्रे स्वत:च्या हाती घ्यायचे ठरविले होते आणि म्हणून शिकारीचे निमित्त करून तो दिल्लीला जायला निघाला. हे असंभवनीय वाटते. बदायुनी आणि निझाम–उद्दिन अहमद हे लिहितात की, महाम अनगा आणि इतर हा बेत ठरविण्याला जबाबदार होते हे योग्य वाटते आणि अबुल फझल याला दुजोरा देतो. अकबराने तंबू वगैरे साहित्य बरोबर घेतले नव्हते आणि उघडच दिल्लीला आपण जाऊ याची त्याला कल्पना नव्हती. आपण शिकारीला जात आहो हे त्याने बैरामखानला कळविले नव्हते. आपल्याविरुद्ध कट शिजतो आहे याचा सुगावा बैरामखानाला लागला असता तर त्याचा संशय दूर करण्याकरिता

## बैरामखानाची बडतर्फी : भेट घेण्यास अकबराचा नकार

अकबर शिकारीला गेल्याची बातमी बैरामखानला २० मार्चला समजली आणि नंतर अकबराचा निरोप मिळाला तेव्हा आपल्या विश्वासातल्या ख्वाजा अमीन–उद–दीन, हाजी महंमद खान सीईस्तानी आणि तार्सन बेग यांना बैरामखानने आपल्या राजनिष्ठेची ग्वाही देण्याकरिता आणि राजाने आपल्याला भेट द्यावी अशी विनंती करण्याकरता दिल्लीला पाठविले. अकबराने ही विनंती अमान्य करून बैरामखानचा निरोप घेऊन येणाऱ्यांना अडकवून ठेवले. आता बैरामखानचे अनुयायी एकामागून एक बैरामखानला सोडून अकबराला जाऊन मिळाले आणि राज्यकारभाराचे काम स्वत:वर घेतलेल्या महाम अनगा आणि शिहाबुद्दिन यांनी त्यांच्या इतमामाप्रमाणे त्यांना योग्य त्या अधिकाराच्या जागा देऊन अकबराला भरपूर अनुयायी मिळतील अशी व्यवस्था करून ठेवली.

---

अकबराने त्याला तसे कळविले असते. हमीदा बानू आजारी असल्याचा निरोप महाम अनगाने अकबराकडे पाठविला तो त्याला शिकंदरा राऊ येथे मिळाला. तोपर्यंत त्याला बहुधा कटाची माहिती नसावी. त्या कटाला अकबर जबाबदार असता तर त्याची आई आजारी असून अतिशय अशक्त झाली आहे आणि त्याची वारंवार आठवण काढते असा निरोप महाम अनगाने पाठविण्याचे काय प्रयोजन होते ? आग्रा ते दिल्ली तीन दिवसांचा प्रवास असता आग्र्याहून निघाल्यानंतर दिल्लीला पोचायला अकबराला ९ दिवस लागले. शिहाब–उद्दिन त्याचे स्वागत करायला पुढे गेला ते दिल्लीपासून जवळच नव्हे तर ५५ मैल दूर अशा खुर्जा येथे. अकबराने अबदुल कासीमला बरोबर घेतले होते ते काही आधी विचार करून घेतले असे दिसत नाही.

डॉ. सुकुमार रे हे आपल्या "अकबर आणि मार्च १५६२ चा आकस्मिक हल्ला" या उत्कृष्ट प्रबंधात उपलब्ध असलेल्या तत्कालीन सर्व फारशी लेखकांचे पुरावे परिश्रमपूर्वक आणि सापेक्षतेने तपासून त्या आधारावर कंदाहारी आणि अबुल फझल यांच्या बाजूने मत देतात. या निरनिराळ्या लेखकांच्या विधानांची त्या वेळच्या परिस्थितीची आणि संभाव्यतांची ते छाननी करत बसले नाहीत. कंदाहारी हा जरी समकालीनच असला तरी तो अकबर, त्याचा दरबार आणि जनानखाना यापेक्षा बैरामखानाशी त्याचा अधिक निकटचा संबंध येत असे आणि म्हणून अशा गुपितांच्या बाबतीत त्याला विश्वसनीय मानता येणार नाही. अबुल फझलला अकबराचा प्रत्येक विजय हा त्याच्या सेनापतीचे कर्तृत्व आणि सैन्याचा पराक्रम यापेक्षा शहानशहाच्या भाग्यामुळे मिळतो असे वाटत असे. म्हणून त्याचा इतिहास वाचताना सावधगिरी बाळगली पाहिजे.

लाहोर आणि काबूलच्या सुभेदारांना सावध राहण्याचा हुकूम देण्यात आला. शमसुद्दिन अतकाखानला भेऱ्याहून परत बोलवण्यात आले. बादशहाविरुद्ध बैरामखानने बंड पुकारण्याची शक्यता लक्षात घेऊन त्या दृष्टीने सावधगिरीच्या अशाच इतर उपाययोजना अंमलात आणल्या गेल्या.

अकबराने यानंतर बैरामखानला खालीलप्रमाणे पत्र पाठविले -- " खान बाबा, सलाम. माझ्या प्रेमळ निरोपाचा स्वीकार करावा! काही महत्त्वाच्या कामासाठी मी दिल्लीस आलो आहे. माझ्या भेटीस येण्याकरिता दिल्लीस येण्याचा तुमचा मनसुबा आहे असे मी ऐकले. म्हणून मी तार्सन बेग याच्या हस्ते तुम्हांला असे कळवितो की, तुमच्या विरुद्ध माझ्या काही तक्रारी असल्याने तुमच्यावर माझी इतराजी झाली आहे. असे असताना या वेळी तुम्हांला भेटण्याची मला मनापासून इच्छा नाही. तेव्हा तुम्ही आहात तिथेच राहून हाती असलेले काम चालू ठेवावे. जरूर वाटली तर मी स्वतःच आग्र्याला जाईन पण मी तसे करण्यापूर्वी तुम्ही ग्वाल्हेरच्या बाजूस जाऊन राहावे आणि मी बोलावीन तेव्हाच माझ्या भेटीला यावे. बाप आणि मुलामध्ये गैरसमज उत्पन्न झाला असला तरी त्याच्यात कटुता निर्माण होण्याचे कारण नाही असे आश्वासन देण्यासाठी मी तुम्हांस हे पत्र लिहीत आहे. तुम्ही माझे खान बाबा आहात म्हणूनच मी असे करण्याचे ठरविले. माझी सर्व गाऱ्हाणी, तुमच्यामुळे मला सहन कराव्या लागलेल्या हानिकारक आणि अनुचित गोष्टी ही सर्व बाजूला सारून मला तुमच्याबद्दल अद्यापही आदर व स्नेह वाटतो आणि नेहमीप्रमाणे 'खान बाबा' म्हणूनच मी तुमच्याकडे पाहतो. तरीही सध्या आपली दोघांची भेट होणे शक्य नाही. पवित्र स्थळांच्या यात्रेला जाऊ देण्याच्या तुमच्या विनंतीला माझी परवानगी आहे. सरहिंद आणि लाहोर येथील तुमची संपत्ती व चीजवस्तू कोणाच्यातरी स्वाधीन करून तुम्ही यात्रेस जावे."

**बैरामखान शरण येण्याचे ठरवितो**

बैरामखानची स्वामीनिष्ठा संशयातीत होती आणि मोंगल घराण्याच्या आजन्म केलेल्या सेवेला आता गालबोट लागावे हे त्याला रुचण्यासारखे नव्हते. अकबराच्या पक्षाच्या दरबारातल्या मंडळींना आपले सामर्थ्य वाढविण्यासाठी वेळ न देता ताबडतोब दिल्लीवर चढाई करून तरुण राजाला ताब्यात घ्यावे असा शेख गदाई आणि आजूबाजूच्या मंडळींनी दिलेला सल्ला बैरामखानने नाकारला. त्याच्यापाशी अद्याप राहिलेल्या राज्याच्या अधिकाऱ्यांना एकत्र बोलावून, "माझा मक्केला जाण्याचा विचार आहे" असे त्याने त्यांना सांगितले आणि दिल्लीला जाऊन अकबराला मिळण्याची परवानगी त्यांना दिली. ८ एप्रिलला

थोड्या अनुयायांसह आग्रा सोडून नागोरच्या मार्गे तो गुजराथकडे निघाला. तेथून हेज्जाज येथे जहाजाने जाण्याचा त्याचा विचार होता. तो अलवारला पोचण्याच्या सुमारास महाम अनगा आणि शिहाब–उद–दिन अहमद खान यांनी अकबराला असे सांगितले की बैरामखानचा पंजाबवर स्वारी करण्याचा बेत आहे. म्हणून आपला गुरू मीर–अब्दुल–लतीफ याच्या हाती अकबराने खालील निरोप खान खानानला पाठविला आणि आपण स्वत: बैरामखानची पंजाबची वाट रोखून धरण्यासाठी झज्जरला जाण्यासाठी निघाला. "आपली स्वामीनिष्ठा आणि सचोटी याबद्दल पूर्ण खात्री असल्यामुळे राज्याचा कारभार आपल्यावर सोपवून मी खेळ, शिकार आणि इतर करमणुकीच्या गोष्टींमध्ये गुंग होतो. पण आता राज्याची सर्व सूत्रे स्वत:च्या हाती घेण्याचा मी निश्चय केला आहे. मक्केला जाण्याचा आपला अनेक वर्षांपासूनचा बेत आपण आता अंमलात आणावा हे योग्य. हिंदुस्थानातले तुम्ही मागाल ते परगणे तुम्हांला जहागीर म्हणून देण्यात येतील आणि त्याचा वसूल तुम्ही नेमलेल्या माणसाकडून नियमितपणे तुमच्याकडे पाठविला जाईल."*

हा निरोप मिळताच बैरामखान अलवारहून नागोरला जाण्यास निघाला आणि तेथून त्याने अकबराला आपल्या शरणागतीचा निरोप पाठवून आपले निशाण, नौबत, आणि अधिकाराची इतर मानचिन्हे अकबराकडे पाठवून दिली. दरम्यान अकबर झज्जरला जाऊन पोचला होता (२२ एप्रिल). बैराम-खानचा शरणागतीचा निरोप ऐकून अर्थातच तो खूष झाला. याच वेळी खान खानान राजाच्या मर्जीतून उतरला आहे असे ऐकून बैरामखानच्या हाताखालचा एक वेळचा मुख्य अधिकारी पीर महमंद खान हद्दपारीतून राजाला येऊन मिळाला आणि त्याच्याच हाताखाली थोडीशी फौज आणि इतर अधिकारी देऊन बैराम-खानची मक्केला रवानगी करून देण्यासाठी अकबराने त्याला पाठविले. नंतर अकबर दिल्लीला परत आला. (मे, ३ )

---

*अबुल फझल आपल्या ऐने अकबरीत (भाग २, पान ९६) म्हणतो की, अकबर आपल्यावर उलटला आहे अशी बैरामखानची खात्री पटली, त्या वेळी त्याने काम-रानचा मुलगा अबुल फझल कासीम हा कोठे असतो याची चौकशी केली, पण अकबराने त्याला दिल्लीला नेले होते. कासीमच्या दिल्लीच्या गादीवरील हक्काला बैरामखानला पाठिंबा द्यावयाचा होता असे यात सूचित होते हे उघड आहे. हे जर खरे असेल तर अकबराला प्रतिस्पर्धी राजा उभा न करता त्याला आणि त्याच्या दरबारी पक्षाला धाक बसावा अशी त्याची इच्छा असावी हे बैरामखानचे एकंदर चरित्र आणि त्याचा स्वभाव पाहता अगदी संभवनीय वाटते.

## बैरामखानाचे अर्धचित बंड : त्याचा पराभव

बैरामखान आता अकबराच्या मुलखातून बाहेर पडला. पण गुजराथला जाण्याचा त्याचा मार्ग जोधपूरच्या मलदेवाने रोखला असल्यामुळे तो बिकानेरकडे वळला. बिकानेरचा राजा राय कल्याणमल याने त्याचे आदरातिथ्य केले. आपल्याला हाकून देण्यासाठी राजाने आपल्या पाठोपाठ सैन्य पाठविले, आणि तेसुद्धा आपला जुना हस्तक पीर महंमद खान याच्या नेतृत्वाखाली. यामुळे बैरामखान फार रुष्ट झाला आणि पीर महंमद खानचा प्रतिकार करण्याचा त्याने निश्चय केला. " आपल्याविरुद्ध राजाचे कान भरणाऱ्या आणि आपला सर्व नाश करू पाहणाऱ्या दरबारातल्या गटाचे पारिपत्य करून नंतरच मी मक्केला जाईन " असे त्याने जाहीर केले आणि त्यासाठी थोडीशी सैन्याची जमवाजमव केली. अकबराने एक पत्र लिहून बैरामखानने केलेल्या वशिलेबाजीची आणि जाणूनबुजून किंवा नकळत केलेल्या चुकांची बैरामखानाला जाणीव करून दिली आणि स्वामीनिष्ठेच्या मार्गापासून न ढळण्याची त्याला सूचना दिली. शरण आल्यास पूर्ण माफी देण्याचे आश्वासन त्याने दिले. पण बंड केल्यास जबरदस्तीने त्याचा बीमोड करण्यात येईल असेही त्याने बैरामखानाला बजावले. या आदेशास न जुमानता आपले कुटुंब आणि अवजड सामानसुमान भटिंडयांच्या किल्ल्यात ठेवून बैरामखान पंजाबच्या मार्गाने निघाला. थारा काबीज करण्यात यश न आल्याने तो जलंदरकडे वळला. खान खानानचा प्रतिकार करण्यासाठी अकबराने अत्काखान याच्या हाताखाली सैन्य देऊन त्याची आधीच रवानगी करून दिली होती. त्यानंतर १२ ऑगस्ट रोजी अकबराने स्वत: दिल्लीहून कूच केले व तो सरहिंदला जाऊन पोचला. दिल्लीहून निघण्यापूर्वी आसफखान ही पदवी मिळालेला ख्वाजा अब्दुल मजीद याला वजीर नेमून त्याने त्याच्याकडे दिल्लीचा कारभार सोपविला. दरम्यान जलंदरच्या आग्नेयेस असलेल्या गुणाचौर या गावी २३ ऑगस्ट रोजी बैरामखान आणि अत्काखान यांच्यात लढाई होऊन त्यात बैरामखानचा पराभव झाला. या वेळी अकबरचा मुक्काम सरहिंदला असून तेथेच त्याला या विजयाची बातमी मिळाली. तसेच १० सप्टेंबर १५६० रोजी काबूलहून मुद्दाम बोलावून आणलेल्या मुनीमखानाची पण अकबराने भेट घेतली. प्रधान मंत्र्याच्या (वकील) उच्च अधिकाराची वस्त्रे आणि खान खानान ही पदवी मुनीमखानला देण्यात आली. दरम्यान लढाईत मिळालेली लूट आणि पकडलेले कैदी घेऊन अत्काखान सरहिंदला आला. खान–ई–आझम ही पदवी देऊन अकबराने त्याचा गौरव केला. नंतर अकबराने लाहोरकडे कूच केले आणि पंजाबातल्या अत्यंत सुपीक प्रदेशावर अत्काखान आणि त्याचे भाऊ यांची नेमणूक केली.

## बैरामखान शरण येतो आणि त्याला माफी मिळते

लढाईत पराभूत झालेला बैरामखान तलवाराचा राजा गणेश याच्या आश्रयाला जाऊन राहिला. म्हणून त्याला शरण येणे भाग पाडण्यासाठी १ ऑक्टोबर रोजी अकबर तलवाराकडे निघाला. बादशहा स्वतः स्वारी करून येत आहे हे पाहून बैरामखानला त्याच्याशी लढाई करणे अनिष्ट वाटले. आपल्या हातून झालेले सर्व गुन्हे माफ करावे कारण ते जाणूनबुजून केले नसून मनात उडालेल्या गोंधळामुळे झाले होते असा निरोप त्याने अकबराला पाठविला आणि झालेल्या चुकांबद्दल खेद व्यक्त केला. बैरामखानच्या शरणागतीचा उदार अंतःकरणाने स्वीकार करून अकबराने आपला नवा मुख्य मंत्री मुनीमखान आणि मुखदुल–उल–मुल्क ही पदवी मिळालेला मुल्ला अबदुल्ला ह्यांना बैरामखानला आपल्या प्रेमाची खातरजमा करून देऊन दरबारात घेऊन येण्यासाठी पाठवून दिले. आपल्या स्वागतासाठी पाठविलेले मुनीमखान आणि इतर अधिकारी यांच्या समवेत बैरामखान अकबराच्या भेटीला आला, आणि त्याच्या पायावर त्याने आपले डोके ठेवले. या वेळी अकबराची छावणी सतलज आणि बियास यांच्यामधल्या डोंगर पायथ्याशी असलेल्या हाजीपूर या गावी होती. अकबराने बैरामखानला उठवून त्याला आलिंगन दिले. बैरामखानच्या खांद्यावरच्या वस्त्राने त्याचे डोळे पुसून बादशहाने मोठ्या प्रेमाने त्याच्या तब्येतीची चौकशी केली आणि आपल्या उजव्या बाजूस त्याला बसवून घेतले. त्यानंतर उठून उभे राहून आपल्या खांद्यावरचे उत्तरीय बादशहाने बैरामखानच्या खांद्यावर घातले आणि त्याला मक्केला जाण्याची परवानगी दिली. तत्पूर्वी काल्पी आणि चंदेरी या जिल्ह्यांची उत्कृष्ट जहागीर, बादशहाच्या खाजगी सल्लागाराची जागा किंवा मक्केच्या यात्रेची परवानगी या तिहींपैकी काय हवे ते तुम्हांला देण्यास मी तयार आहे असे उदार अंतःकरणाच्या अकबराने बैरामखानला सांगितले होते. पण मानी बैरामखानने त्यांपैकी तिसऱ्या पर्यायाचा तेवढाच स्वीकार केला आणि दोन दिवस बादशहाचा पाहुणचार घेतल्यानंतर गुजराथला जाण्यासाठी तो नागोरच्या मार्गाने निघाला. त्याच्या आगामी यात्रेसाठी लागणाऱ्या सर्व खर्चाची तरतूद मोठ्या सढळ हाताने बादशहाने केली.

## बैरामखानाचा खून

अकबराने माफी दिल्यानंतर बैरामखान आपल्या परिवारासह मक्केला जाण्यासाठी निघाला. वाटेत गुजराथमधील पाटण (अनहिलवाडा) या गावी त्याने काही दिवस मुक्काम केला. एक दिवस सहस्रलिंग नावाच्या पवित्र तळ्यात बोटीने सहल करून काठावर उतरत असताना मुबारकखान लोहानी

या अफगाणाने त्याच्यावर हल्ला करून आपल्या जवळची कट्यार त्याच्या पाठीत इतक्या जोरात खुपसली की ती त्याच्या छातीतून बाहेर आली. मुबारकखान लोहानीचा बाप १५५५ साली मच्छीवाराच्या लढाईत मारला गेला होता. त्याचा सूड म्हणून मुबारकखानने हा हल्ला केला. लगेच मुबारकखानच्या साथीदारांनी बैरामखानच्या डोक्यावर वार करून त्याला ठार मारले. बैरामखानचे नोकर लोक पळून गेले. काही फकिरांनी त्याच्या मृतदेहाला मूठमाती दिली. ही घटना ३१ जानेवारी १५६१ साली घडली. पाटणच्या गुंडांनी बैरामखानची छावणी लुटली. पण बैरामखानची पत्नी व त्याचा चार वर्षांचा मुलगा अब्दुल रहीम यांची सुटका करण्यात येऊन त्यांना प्रथम अहमदाबादला व तेथून बादशहाच्या दरबारात पोचवून देण्यात आले. अकबराच्या देखरेखीखाली लहानाचा मोठा होऊन अब्दुल रहीम मुघल सैन्याचा सरसेनापती झाला आणि त्याच्याच वडिलांची खान खानान ही पदवी बादशहाने त्याला बहाल केली.

## बैरामखानाच्या कारकीर्दीचे मूल्यमापन

बैरामखान उत्तम लढवय्या आणि सेनानी व अतिशय कुशल कारभारी होता, एवढेच नाही तर तो विद्वान व काव्यप्रेमी रसिकही होता. हुमायूनला हिंदुस्थानचा मुलूख परत मिळवून देण्याचे, आणि अकबराला राज्यावर बसवून त्याच्या राज्यकारभाराचा आराखडा तयार करण्याचे श्रेय बैरामखानालाच होते. पंडितांचा तो उदार आश्रयदाता होता आणि असे सांगतात की हाशमी कंदाहारी, लखनौचा रामदास आणि हिजाज खान बदायुनी या वाङ्मय आणि कलेच्या क्षेत्रातील तीन प्रसिद्ध व्यक्तींना त्याने प्रत्येकी एक लाख रुपये तनखा नेमून दिला होता. बैरामखानचा समकालीन छिद्रान्वेषी इतिहासकार अब्दुल कादीर बदायुनी हा धर्मवेडा कट्टर सुन्नी असून शियापंथीयाबद्दल तो नेहमी तिरस्काराने बोलत असे. असा हा इतिहासकार बैरामखानच्या स्वभाववैशिष्ट्याचे मूल्यमापन करताना काय लिहितो ते उद्धृत करण्यासारखे आहे. तो लिहितो "शहाणपणा, औदार्य, सच्चेपणा, मनाचा चांगुलपणा, आज्ञाधारकपणा आणि नम्रता या गुणांमध्ये बैरामखानची बरोबरी करणारा त्या वेळी कोणीही नव्हता. बैरामखान धर्मभिक्षुकांचा (दरवेशी) हितचिंतक आणि स्वत: अतिशय धार्मिक आणि सत्शील होता. हिंदुस्थानवर दुसऱ्यांदा मिळविलेला विजय आणि साम्राज्याची उभारणी ह्याच्या मुळाशी त्याचे दांडगे प्रयत्न, त्याचा पराक्रम आणि त्याची मुत्सद्देगिरी होती."

बैरामखान बंडाला प्रवृत्त झाला तो स्वत:च्या इच्छेविरुद्धच. त्यामुळेच त्याचा स्वामी व पाल्य तरुण राजा अकबर याला तो खुशीने शरण गेला.

त्याची दीर्घ आणि अमोल सेवा लक्षात घेऊन अकबराने त्याला जी उदार वागणूक दिली त्याबद्दल अकबराची वाखाणणी करणे जरूर आहे.

## अकबर आग्र्यास परत येतो

बैरामखानच्या बंडाचा बिमोड करून अकबर ता. २४ नोव्हेंबरला दिल्लीस परत आला. वाटेत हिसारला त्याने पुष्कळ चित्ते पकडले. अकबराने अबुल फताहला दिल्लीहून काबूलला पाठविले. कारण मुनीमखान हा आपला तरुण मुलगा गाझी खान याच्याकडे काबूलचा कारभार सोपवून दरबारी निघून आल्यामुळे तेथील राज्यव्यवस्थेत गोंधळ माजला होता. २१ डिसेंबर १५६० रोजी राजा जलमार्गाने आग्र्यास जाण्यास निघाला आणि ३१ डिसेंबर रोजी तेथे पोचला. तेथे यमुनेच्या तीरावर राहण्यास योग्य अशा अनेक इमारती बांधण्याचा आदेश त्याने दिला आणि अहरारच्या ख्वाजा नसीरुद्दिन उबैदुल्लाचा वंशज ख्वाजा अब्दुल शहीद, मौलाना सैय्यद तुर्कीस्तानी आणि ट्रान्स–ओशियानाचे इतर मौलवी अशा अनेक नामवंत मुस्लीम धर्मगुरूंची अकबराने भेट घेतली. आपली सावत्र बहीण बक्षी बानू बेगम (इब्राहिम मिर्झाची विधवा स्त्री) हिचे मिर्झा शराफ-उद्दीन हसन याच्याशी अकबराने लग्न लावून दिले व त्याची नागौरच्या जहागिरीकडे रवानगी केली. मिर्झा हैदर गुरगानीचा चुलत भाऊ कारा बहादूर खान याला त्याने काश्मीर जिंकून घेण्याकरिता पाठविले. पण ही मोहीम निष्फळ ठरली.

## महाम अनगा आणि शिहाबुद्दिन यांची संयुक्त कारकीर्द

बैरामखान गेल्यानंतर सहा महिन्यांच्या अवधीत एकामागून एक चार मुख्य मंत्री झाले. हे सर्व सामान्य कर्तृत्वाचे होते आणि त्यामुळे राज्याचे स्थैर्य व आदब नाहीसा झाला.

बैरामखानला अधिकृतरीत्या जरी अजून कामावरून दूर केले नव्हते तरी राज्यकारभाराची महत्त्वाची कामे पाहण्यासाठी आणि अद्याप बडतर्फ न झालेल्या बैरामखानची जागा घेण्यासाठी दुसऱ्या कोणाची तरी नेमणूक करणे अकबराला जरुरीचे वाटत होते. राज्यकारभाराला संपूर्णपणे खीळ पडू नये म्हणून या गोष्टीचा त्वरित निकाल लावणे अवश्य होते. त्यासाठी रिकाम्या होऊ घातलेल्या प्रधान मंत्र्याच्या जागेवर कोणाची तरी नेमणूक करण्याचा प्रश्न तरुण अकबरापुढे होता. बैरमखानविरुद्ध कट करण्यात महाम अनगा आणि शिहाबुद्दिन अहमद खान यांचा पुढाकार असल्यामुळे अकबराने या दोघांनाच संयुक्त प्रधान मंत्री (वकील) नेमले. एकामागून एक अधिकारी बैरामखानचा पक्ष सोडून दिल्लीला येऊ लागले होते आणि त्यांच्या लायकीप्रमाणे त्यांची नेमणूक करणे अवश्य होते. या बाबतीत महाम अनगा आणि शिहाबुद्दिन अहमद

खान अकबराशी सल्लामसलत करून त्याच्या हुकमाची अंमलबजावणी करू लागले. अशा तऱ्हेने हे दोघे प्रत्यक्षात प्रधान मंत्र्याचे काम पाहू लागले, आणि अकबर त्यांना मुख्य मंत्र्याप्रमाणे मानू लागला. अबुल फझल लिहितो, "महाम अनगा आणि शिहाबुद्दिन अहंमद खान या दोघांच्याकडे वकिलातीची कामे सोपविण्यात आली आणि दोघेजण आपले कामकाज अकबराकडे सादर करू लागली."

**बहादूर खान उझबेक प्रधान मंत्री होतो**

दोन प्रधान मंत्र्यांच्या नेमणुकीने कारभार नीट चालेना आणि महाम अनगा हिला आपलेच वर्चस्व ठेवण्याची इच्छा असल्यामुळे तिच्या सहकाऱ्याला दुय्यमस्थान प्राप्त झाले. "मोठ्या स्वामीनिष्ठेने महाम अनगाने सर्व कारभार आपल्या हाती घेतला आणि शिहाबुद्दिन अहंमद खान आणि ख्वाजा जहान यांना आपल्या हातातले बाहुले बनवून ठेवले", असे अबुल फझल लिहितो. अशा नेमणुकीने महाम अनगा आणि तिचे सहकारी यांमध्ये संघर्ष निर्माण झाले असले पाहिजेत. त्यांचे संबंध दुरावून तुटण्याच्या बेतात आले होते. म्हणून महान अनगाने शिहाबुद्दिन अहंमद खान याला कामावरून दूर करून बहादूर खान उझबेक याला 'वकील' (प्रधान मंत्री) या उच्च पदावर नेमण्याची शिफारस केली. अबुल फझल मान्य करतो की बहादूर खान हा उलटया काळजाचा, घालमेल्या आणि अविश्वासू असल्यामुळे या जागेसाठी अत्यंत अयोग्य होता आणि ही नेमणूक हंगामी होती. त्याची नेमणूक होण्याचे कारण दरबारातल्या तुर्की गटाचा तो पुढारी असून किया खान, सुलतान हुसेन जलेर, महंमद अमीन दिवाणा आणि इतर काही सरदार त्याच्या बाजूचे व शिहाबुद्दिन अहंमद खान आणि ख्वाजा जहान त्याच्या विरुद्ध होते. यासाठीच बहादूर खानाला प्रधान मंत्री करण्यात आले. बहादूर खानाच्या हाताखाली राज्यकारभार सुरळीत चालणे शक्य नव्हते हे उघड होते. म्हणून त्याचा पक्ष फोडण्यासाठी पावले उचलणे इष्ट होते. कियाखानची बहरीवर नेमणूक करून त्याला तिकडे पाठवून देण्यात आले. सुलतान हुसेन आणि इतर काही मंडळींना प्रथम तुरुंगात टाकून नंतर काही दिवसांनी सोडून देण्यात आले. महंमद अमीन दिवाणा पळून गेला आणि गुंडगिरी करू लागला. अशा प्रकारे बहादूर खानाचे साथीदार पांगल्यानंतर इटावाची जहागिरी देऊन बहादूर खानला तिकडे पाठवून देण्यात आले. अशा तऱ्हेने आपले नावापुरते गेलेले वर्चस्व महान अनगाने पुन: मिळविले. नावापुरते म्हणण्याचे कारण असे की बहादूर खान प्रधान मंत्री असतानासुद्धा सर्व कामकाज तीच पाहात असे.

**मुनीमखानाची प्रधान मंत्र्याच्या जागेवर नेमणूक**

सप्टेंबर १५६० मध्ये मुनीमखान याला खान खानान ही पदवी देऊन

प्रधान मंत्र्याच्या जागेवर नेमण्यात आले. आग्र्याला अकबर परत आल्यावर बैरामखानचा सरकारी वाडा पण त्याला राहण्यासाठी देण्यात आला. या नेमणुकी-मुळे राज्यकारभारात काही प्रमाणात सुसूत्रता आली.

बैरामखानशी अकबराचे संबंध दुरावण्याच्या मधल्या ५–६ महिन्यांच्या काळात शासनयंत्रणेत वरील आकस्मिक बदल झाले. त्यामुळे दैनंदिन राज्य-कारभारातले गुंतागुतीचे प्रश्न अकबराला स्वतःला डोळ्याखालून घालावे लागले आणि त्यांचा त्वरित निकाल लावणे भाग पडले. अद्यापि राज्यकारभारावर अकबराची पकड पक्की बसली नव्हती. "राजकीय प्रश्न कसे सोडवावे याचा त्याला सराव नव्हता" असे अबुल फझल म्हणतो. इ. स. १५६१ च्या सुरवातीस म्हणजे बैरामखानाच्या बडतर्फीनंतर एक वर्षाने तरुण बादशहा आपल्या राज्याच्या कारभाराकडे काही प्रमाणात लक्ष देऊ लागला.

वरील चार मुख्य मंत्र्यांपैकी मुनीमखानाशिवाय एकाही जवळ विशेष असे कर्तृत्व किंवा चारित्र्य नव्हते आणि युद्धकौशल्य किंवा मुत्सद्देगिरी या बाब-तीत बैरामखानशी त्याची तुलनाही होऊ शकत नव्हती. एप्रिल १५६० पासून १५६१ च्या अखेरपर्यंत चाललेला कारभार मुत्सद्देगिरीच्या शहाणपणाच्या तत्त्वां-नुसार चालला नव्हता. अकबराने स्वतःच्या हातात सर्व सूत्रे घेतल्यानंतर त्याच्या कारकीर्दीचे हे ठळक गुण होते. *

अकबराच्या कारकीर्दीतील १९ मार्च १५६० पासून १५६१ च्या अखेर-पर्यंतचा काळ स्त्रीराज्याचा काळ म्हणून योग्य रीतीने संबोधता येईल. इतिहास-कार स्मिथ म्हणतो त्याप्रमाणे १५६० ते १५६४ इतक्या वर्षांचा हा काळ नव्हता. त्याच्या निर्णयाशी मतभेद असण्याची कारणे पुढच्या प्रकरणात योग्य स्थळी देण्यात येतील.

---

* डॉ. आर. पी. त्रिपाठी म्हणतात की, अकबराने महाम अनगा आणि इतरांना आपल्या हातातील बाहुले बनविले. त्यांच्याकडून कामे करून घेतली आणि जेव्हा ते नालायक किंवा अविश्वासू वाटले तेव्हा त्यांना टाकून दिले. वरील वर्णनावरून या विद्वान डॉक्टर महाशयांचे म्हणणे सत्यापासून किती दूर आहे हे दिसून येईल. १७ व्या वर्षी अकबर इतका चाणाक्ष राज-कारणी नव्हता आणि त्या वेळी तो राज्यकारभारात फारसे लक्ष घालीत नसे.

# प्रकरण चौथे

## जनानखान्याच्या वर्चस्वातून सुटका

### माळव्यावर विजय

इ. स. १५६१ च्या सुरुवातीला (९६८ हिजरीची अखेर) अकबराने माळव्
जिंकून घेण्याचा बेत आखला. माळवा हा हिंदुस्थानातला एक अत्यंत भरभराटीच
प्रांत होता, तरी तेथे बाज बहादूरचा गैरकारभार चालू होता. त्याचा बाप सुजा
खान याच्या मृत्यूनंतर म्हणजे सुमारे नोव्हेंबर १५५५ मध्ये बाज बहादूर माळ
व्याचा सुभेदार झाला होता. आपल्या कारकीर्दीच्या सुरुवातीस त्याने आपल्य
लढाऊ कर्तृत्वाने सगळा माळवा जिंकून घेतला. शेजारचे गोंडवनाचे राज्य सुद्ध
जिंकून घेण्याचा त्याने प्रयत्न केला. पण गोंडवनाची राणी दुर्गावती हि
त्याचा प्रचंड पराभव करून त्याला जीव घेऊन पळावयास लावले. त्या विजयी राणी
त्याच्या सगळ्या सैन्याचा धुव्वा उडविला आणि बरेचसे कैदही केले. एक
बाईच्या हातून झालेल्या या पराभवामुळे बाज बहादुराची आजूबाजूचे प्रां
काबीज करण्याची हिंमत अजिबात खचून गेली आणि गाणेवजावणे व इष्कबाज
यांच्या आहारी जाऊन तो आळसात दिवस घालवू लागला.* मदिरा आणि मदिराक्षी
काव्य आणि संगीत यांच्यात पूर्णपणे गढलेला बाज बहादूर आपल्या राज्यकारभारा
कडे दुर्लक्ष करू लागला. आपल्या जनानखान्यात त्याने अनेक सुंदर गणिक
आणून ठेवल्या. त्या सर्वांमध्ये रूपमती ही अप्रतिम लावण्य आणि कवित्व याबद्द
सर्व देशभर प्रसिद्ध होती. तिला उद्देशून बाज बहादूर हिंदीत प्रणयगीते रचि
असे आणि ती त्याला प्रतिसाद देत असे. ही प्रणयगीते माळव्यात आणि माळव्याबाहे
इतकी प्रसिद्धी पावली की खेडोपाडी आणि शहरांतून ती सर्व लोकांच्या तों
बसली. पण राज्यकारभाराला आलेल्या अवकळेमुळे बाज बहादुराच्या अधिकाऱ्यां
आणि सैन्यात असंतोष माजला आणि स्थानिक नोकरवर्ग प्रजेला छळू लागल

* बाज बहादूर हा निष्णात आणि प्रसिद्ध गवई होता.

माळव्याची ही शोचनीय स्थिती म्हणजे परकीय सत्तेच्या हस्तक्षेपाला आमंत्रणच होते.

माळव्यातल्या अस्थिर परिस्थितीचा फायदा घेण्याचा मोह अकबराला झाल्यास नवल नाही. त्याने १५६१ सालच्या फेब्रुवारी महिन्यात आधमखान आणि पीर महंमद खान यांच्या हाताखाली मोठे सैन्य देऊन त्यांची माळव्याच्या स्वारीवर रवानगी केली. हे दोघेही सरदार अत्यंत क्रूर आणि दुष्ट होते. या वेळी बाज बहादूरचा मुक्काम सारंगपूर या त्याच्या मुख्य गावी होता. पण शत्रूचे सैन्य शहरापासून २० मैलांवर येईपर्यंत तो जागचा हललासुद्धा नाही. नंतर मात्र आळस बाजूला सारून सारंगपूरपासून ७ मैलांवर त्याने खंदक खणून मोर्चे बांधले.

तेथून ३–४ मैलांवर बादशाही सैन्याने आपला तळ दिला आणि दोन्ही बाजूंची सैन्ये आपल्या छावणीतून रोज बाहेर पडून एकमेकांशी लढू लागली. पण काही केल्या बाज बहादूर आपली छावणी सोडून उघडच्या मैदानात निकराची लढाई देण्यास येईना. परिणामी बादशाही फौजेने त्याची रसद तोडून २९ मार्च १५६१ (१२ रज्जब ) च्या आदल्या रात्री बाज बहादुराच्या छावणीवर अचानक हल्ला केला. दोन्ही सैन्यांमध्ये दुसरे दिवशी सकाळपर्यंत घनघोर लढाई झाली. त्यात बाज बहादुराचा पराभव होऊन सकाळी ९ वाजण्याच्या सुमारास तो खानदेशात बऱ्हाणपूरला पळून गेला. त्याची सर्व मालमत्ता, खजिना आणि त्याच्या नर्तिका व गायिकांसह जनानखाना आधमखानच्या हाती पडला.

माळव्यातल्या असाहाय्य लोकांवर भयानक अत्याचार करून आधम आणि पीर महंमद या निर्दय आणि जुलमी सरदारांनी आपल्या यशाची सांगता केली. विजयाच्या दिवशी पकडलेल्या बायका, पुरुष आणि मुले यांना घोळक्या घोळक्याने आपल्यासमोर आणून या दोघांनी त्यांची बेछूटपणे कत्तल केली. हे करीत असताना या निरपराध लोकांची क्रूर चेष्टा करण्यासही पीर महंमदने कमी केले नाही. हे भीषण हत्याकांड स्वतःच्या डोळ्यांनी पाहिलेला इतिहासकार बदायुनी असे म्हणतो की, शेख आणि सय्यदसुद्धा या कत्तलीत पीरच्या हातातून सुटले नाहीत.

या मोठ्या विजयानंतर आधमखानने माळव्यातील सारंगपूर आणि इतर निवडक परगणे आपल्या हातात ठेवून बाकीचे प्रांत आपल्या प्रमुख अधिकाऱ्यांत वाटून दिले. बाज बहादुराच्या जनानखान्यातल्या सर्व स्त्रिया, त्याचा सर्व खजिना आणि त्यातल्या सर्व मौल्यवान व दुर्मिळ वस्तू स्वतःसाठी ठेवून घेऊन त्याने अकबराकडे फक्त काही हत्ती पाठवून दिले. रणांगणातून पळून जाण्यापूर्वी

रजपूत पद्धतीप्रमाणे आपल्या सर्व स्त्रियांना मारून टाकण्याच्या सूचना बाज बहादुराने आपल्या माणसांना दिल्या होत्या. त्यानुसार अनेक निरपराध अबलांची हत्या झाली. रूपमतीलासुद्धा अनेक जखमा झाल्या आणि ती मेली असे समजून टाकून देण्यात आले होते. पण इतर काही स्त्रिया जिवाच्या भीतीने पळून जाऊन सापडेल तेथे लपून राहिल्या. त्यांचा शोध करून आधमखानाने जिवंत सापडलेल्या सर्वांना पकडून ठेवले पण त्याचा खरा डोळा रूपमतीवर होता. तिला शोधून काढण्यासाठी आपले लोक त्याने सगळीकडे पाठविले. रूपमती सापडल्यावर तिच्या जखमांवर उपचार करण्यात आले आणि बरी झाल्याबरोबर तिच्या प्रियकराकडे तिला पाठवून देण्याची हमी आधमखानाने घेतली. पण ती बरी होताच आपले वचन मोडून तिला आपल्यासमोर घेऊन येण्यासाठी त्याने एका इसमाला धाडले. 'खान साहेबांनी स्वत: येऊन आपली पायधूळ माझ्या महालात झाडावी' असा उलट निरोप त्या चतुर स्त्रीने आधमखानाला पाठविला व भेटण्याचा दिवस पण नक्की केला. त्या भेटीच्या दिवशी आपले उत्तमोत्तम वस्त्रालंकार अंगावर चढवून विष-प्राशन करून रूपमती आपल्या शय्येवर पांघरूण घेऊन पडून राहिली. तिच्या भेटीसाठी आतुर झालेल्या खानाने तिच्या चेहऱ्यावरचा बुरखा दूर करताच ती मेल्याचे त्याला आढळून आले. तथापि बेइज्जत करून घेण्यापेक्षा मरण पत्करून तिने आत्महत्या केली हे समजताच त्याची फार निराशा झाली.

## अफगाणांची जौनपूरवरची स्वारी परतवून लावली. (१५६१)

बैरामखान आणि अकबर यांच्यामधील बेबनावाचा फायदा घेऊन पूर्वेकडल्या अफगाण राजांनी आपली गेलेली सत्ता परत मिळविण्याचा फिरून एकदा प्रयत्न केला. अदलीचा मुलगा शेरखान याने २०,००० घोडदळ ५०,००० पायदळ आणि ५०० हत्ती अशा मोठ्या सैन्यानिशी जौनपूर आणि त्याच्या आजूबाजूचा मुलूख काबीज करण्याचा घाट घातला. शेरखानाच्या सत्तेखाली बराच मोठा मुलूख असून त्याचा कारभार चुनारगड या त्याच्या ठाण्याहून तो पाहात असे. सर्व अफगाण लोक त्याला आपला पुढारी मानीत असत. इ. स. १५६१ मध्ये अफगाण जौनपूरवर स्वारी करून गेले आणि गोमती नदीच्या तीरावर त्यांनी आपला तळ दिला. या वेळी जौनपूरचा सुभेदार अली-कुली-खान -खान-इ-झमन हा होता. तिसऱ्या दिवशी अफगाणांनी गोमती पार करून खान-इ-झमनच्या सैन्यावर हल्ला केला. दरम्यान बहादूरखान, इब्राहिमखान, मजनूनखान काकशल आणि इतर अनेक सरदार यांना अकबराने जौनपूरला खान-इ-झमनच्या मदतीस जाण्याची आज्ञा केली आणि हे सर्व सरदार अगदी ऐन वेळी खान-इ-झमनला येऊन मिळाले. पण शत्रूची सेना बादशाही

फौजेच्या मानाने फार मोठी असल्यामुळे शत्रूवर ताबडतोब हल्ला न चढविता आपल्यावर शत्रू चाल करून येण्याची वाट पाहात ते धीमेपणाने बसून राहिले. जौनपूर शहराच्या बाहेर शेख बहलुलच्या बंधाऱ्याजवळ लढाईला तोंड लागले. शेरखान आणि हशम खान बछगोटी यांच्या हाताखालील अफगाण सैन्याने सुरुवातीला चढाई करून मोगल सैन्याला शहराच्या तटबंदीमागे आश्रय घेण्यास भाग पाडले, पण अखेरीस त्यांचा पराभव करून मुघल सैन्याने त्यांना जौनपूरबाहेर हाकून दिले. पूर्व प्रांतातल्या अफगाणांवर बादशाही फौजांनी मिळवलेला हा दुसरा विजय होता आणि त्याचे श्रेय खान-इ-झमनच्या शौर्याला आणि तडफदारपणाला दिले पाहिजे.

## अकबर माळव्यात येतो

माळव्याच्या हत्याकांडाची बातमी कळताच अकबरच्या रागाला पारावार उरला नाही. लढाईत मिळालेली लूट हुकमाचा भंग करून आपल्यापासून लपवून ठेवल्याबद्दल आधमखानावरचा त्याचा राग अधिकच दुणावला. या अपराधाबद्दल खानाला योग्य ती शिक्षा देण्याचे अकबराने ठरविले. आपल्या प्रमुख अधिकाऱ्यांना कुठल्याही तऱ्हेची सूचना न देता मुनीमखानवर आग्र्याची जबाबदारी सोपवून २७ एप्रिल १५६१ रोजी तो आग्र्याहून निघाला. जलद कूच करून तो राजस्थानातील हल्लीच्या झालावार जिल्ह्यातल्या गग्रौन या मजबूत किल्ल्याकडे पोचला. त्या वेळेस हा किल्ला माळव्याच्या हद्दीत असून बाज बहादूरच्या एका सरदाराच्या ताब्यात होता. युद्ध न करताच हा महत्त्वाचा किल्ला सर करून संबंध रात्रभर मजल मारीत दुसऱ्या दिवशी उजाडताच (१३ मे) तो सारंगपूरजवळ येऊन पोचला. अकबराच्या जलद हालचालीची काहीच सूचना नसल्याने अकबर काही निवडक सैन्यानिशी सारंगपूरला आल्याचे पाहून आधमखान चकित होऊन गेला. अकबर अतिशय रागावला आहे आणि स्वत: सारंगपूरला येत आहे असा निरोप आधमखानची आई महाम अनगा हिने एका जासुदाकरवी सारंगपूरला आधीच पाठवला होता. पण त्यापूर्वीच अकबर सारंगपूरमध्ये दाखल झाला. या वेळी मोठा शहाणपणा दाखवून आधमखानाने बाज बहादूरचा सर्व खजिना आणि चीजवस्तू बादशहापुढे हजर करण्याचे ठरविले. त्यात बाज बहादूरच्या अंत:पुरातील नाणावलेल्या दोन स्त्रियांखेरीज बाकी सर्व होत्या. दरम्यान महाम अनगा सारंगपूरला येऊन दाखल झाली. अकबराला आधमखानच्या क्रौर्याची माहिती देतील अशा भीतीने तिने सर्व निरपराध स्त्रियांना ठार केले. या सर्व भीषण कृत्यांची बातमी अकबराला मिळाली होती. " पण जगाला प्रकाश देणाऱ्या त्याच्या डोळ्यावरचा पडदा अद्याप दूर झाला नव्हता आणि झालेल्या गोष्टी

झाल्याच नाहीत असे मानून अकबराने या सर्व अत्याचारांकडे कानाडोळा केला." आधमखानाला झालेल्या गुन्ह्याबद्दल क्षमा करून अकबर आग्र्याला परतला. आग्र्याहून सारंगपूरला जाण्यास १६ आणि परत येण्यास १७ दिवस आणि सारंगपूरच्या मुक्कामाचे ४ दिवस अशा एकूण ३७ दिवसांत अकबराने आपली ही घाईची स्वारी संपवली.

आग्र्याला परत येत असता अकबराने एक आश्चर्यकारक पराक्रम केला. नरवारजवळ तलवारीच्या एका घावाने एक दांडगी वाघीण त्याने मारली. शिकारीच्या जनावरावर स्वतः हल्ला करण्याची अकबराची ही पहिलीच वेळ होती. वाघिणीची पाच पिल्ले अकबराच्या अनुयायांनी तलवार आणि बाणांच्या साहाय्याने मारून टाकली. ४ जून १५६१ रोजी अकबर आग्र्याला परत आला.

## एका रात्रीची साहसी घटना

अकबराचा शिकारीचा त्यातल्या त्यात चित्त्याच्या शिकारीचा शौक चालूच होता. तरी आता तो राज्यकारभाराच्या बारीकसारीक गोष्टींकडे अधिक लक्ष घालू लागला. आपले प्रजाजन कसे राहतात आणि आपल्या राज्यकारभाराबद्दल त्यांना काय वाटते हे जाणून घेण्यासाठी तो वेश पालटून कधी कधी एकटाच त्यांच्यात जाऊन मिसळत असे. अशाच एका रात्री सालर–मसाऊद गाझीच्या वार्षिक उरुसाला जाण्यासाठी बहरैचकडे निघालेली बरीच मंडळी आग्र्याजवळ यमुनेच्या पैलतीरावर जमली होती. अकबर वेश पालटून त्या गर्दीत शिरला. गर्दीतल्या एका माणसाने त्याला ओळखले. अकबराने त्याला चुकविण्यासाठी आपल्या चेहऱ्यावरचे भाव असे काही बदलून टाकले की लोकांना तो झुकांडी देऊ शकला. पुष्कळ वर्षांनंतर अबुल फझलला ही गोष्ट सांगताना तो म्हणाला, " मला गर्दीतल्या कोणीतरी माणसाने ओळखले आहे असे समजताच मी तत्क्षणीच आपले डोळे चकणे करून माझा चेहरा असा काही बदलून टाकला की मी नियतीची वाट पाहणारा एक साधा प्रेक्षकच आहे असे तेथील लोकांना वाटावे. माझ्या चेहरेपालटीमुळे ते बिचारे लोक मला ओळखू शकले नाहीत. उलट हे डोळे आणि चेहरा राजाचा नाही असे म्हणू लागले. नंतर हळूच तेथून काढता पाय घेऊन मी राजवाड्यात परत आलो." ही घटना जून–जुलै १५६१ मध्ये घडली. अकबराचे कारभारावरचे लक्ष हळूहळू वाढू लागले.

## खान–इ–झमन विरुद्ध मोहीम

अली कुली खान हा शूर आणि निधड्या छातीचा योद्धा होता खरा, पण

हुमायूनच्या वेळच्या त्याच्या सारख्याच माणसांप्रमाणे अकबर आणि त्याचा दरबार यांची निरंकुश सार्वभौम सत्ता मान्य करण्यास तोही तयार नव्हता. यामुळे पुष्कळदा तो अकबराची सत्ता धाब्यावर बसवीत असे. शेरखानच्या वरचढ सैन्याविरुद्ध नुकत्याच मिळविलेल्या विजयामुळे त्याचा शिरजोरपणा आणखीनच वाढला होता. आधमखानाप्रमाणेच अफगाणांचा पराभव केल्यावर हाती पडलेली लूट त्याने अकबराकडे पाठविली नाही आणि फाजील घमेंडीने तो वागू लागला. याचा अकबराला राग आला आणि अपराध्याला योग्य ते शासन करण्यासाठी तो स्वत: आग्र्याहून १७ जुलै १५६१ रोजी निघाला. काल्पीला अब्दुल्लाखान उझबेक त्याला येऊन मिळाला आणि दोन्ही फौजा अलाहाबादजवळ कारा येथे येऊन पोचल्या. सर्व परिस्थितीचा शहाणपणाने विचार करून खान–ई–झमन आणि त्याचा भाऊ बहादूरखान हे दोघे अकबराला सामोरे गेले आणि अफगाणांच्याकडून मिळालेले हत्ती आणि इतर खजिना त्यांनी बादशहास नजर केला. अशा तऱ्हेने खान–इ–झमनची शरणागती पत्करून अकबर २९ ऑगस्ट १५६१ रोजी आग्र्यास परतला.

काल्पीला असताना अकबराने आपला वजीर अब्दुल मजीद आसफ याला भाथाचा राजा रामचंद्र याच्याकडे पाठवले. भाथाचा मुलूख बराच मोठा असून आताच्या अस्तंगत रेवा संस्थानाइतका होता. गाझीखान तनूरी आणि इतर काही अकबराला सोडून गेलेले लोक राजा रामचंद्राच्या आश्रयाला जाऊन राहिले होते. त्यांना आपल्या हवाली करावे असा निरोप वजीर अब्दुल मजीद आसफबरोबर पाठविला होता. आपल्या आश्रयास आलेल्या लोकांना बादशहाच्या हवाली करण्याचे राजा रामचंद्राने नाकारले आणि बादशाही फौजेला तेथून हात हलवीत परतावे लागले.

## अत्काखानास मुख्य प्रधानकीची वस्त्रे

काऱ्याहून परत आल्यावर नोव्हेंबर १५६१ मध्ये अकबराने शमसुद्दिन महम्मद अत्काखान याची भेट घेतली. त्याला पंजाबहून खास बोलावून घेतले आणि अकबराने अत्काखान याला प्रधान मंत्री नेमले. यामुळे महाम अनगा आणि मुनीमखान हे दोघेही फार नाराज झाले. महाम अनगा स्वत:लाच "खरीखुरी पंतप्रधान समजत असे" आणि मुनीमखान "वरकरणी वकील असून मनसदेत बसत असे."

## चुनारगडची प्राप्ती

१५६१ च्या अखेरीस चुनारगडचा बळकट किल्ला सामोपचाराने अकबराच्या

ताब्यात आला. अदलीचा मुलगा शेरखान याचा कारभार या किल्लयातून चालत असे. जोनपूर येथे झालेल्या पराभवानंतर त्याचा कब्जा फत्तू या नावाने ओळखल्या जाणाऱ्या फत्तेखान मसनदअली या शेरखानच्याच वंशातल्या माणसाकडे आला. सप्टेंबर १५६१ मध्ये हा किल्ला युद्ध किंवा तह यांपैकी कुठल्याही मार्गाने हस्तगत करण्यासाठी अकबराने अब्दुल मजीद आसफखान याची नेमणूक केली. ग्वाल्हेरचा शेख मुहम्मद घोष याने आपल्या जीविताची हमी दिल्यास आणि अकबराच्या हाताखाली मानाची जागा मिळत असल्यास किल्ला खाली करून देण्याचे फत्तूने मान्य केले. ऐंशी वर्षांच्या वयोवृद्ध आदरणीय शेखाने स्वत: चुनारला जाऊन फत्तूला आग्ऱ्यास आणले. अकबराने फत्तूला सरदारकीची वस्त्रे बहाल केली आणि हसन अली खान तुर्कोमन याला चुनारगडचा किल्लेदार नेमले.

## अकबराने स्वत: केलेली हत्तींची लढत

१५६१ साली हवाई नावाच्या एका मस्त हत्तीवर स्वार होऊन अकबराने तितक्याच हिंस्र रणबाघ नावाच्या हत्तीवरोबर आग्रा किल्ल्याजवळील पोलो मैदानात त्यांची झुंज लावली. हवाई हा बहुधा हेमूच्या हत्तींपैकी एक असावा. तरुण राजाचा जीव अत्यंत धोक्यात येईल या भीतीने अत्काखान आणि इतर दरबारी मंडळींनी अकबराला हे साहस सोडून देण्याची विनवणी केली. त्यांच्या विनंतीस न जुमानता अकबराने हवाईला त्या मस्त रणबाघावर चाल करून जाण्याचा इशारा दिला. हवाईची धडक इतकी जोराची होती की रणबाघ घाबरून यमुनेच्या पुलावरून पलीकडे पळाला. दोन पर्वतप्राय हत्तींच्या वजनाने पूल खचून जाऊन यमुनेच्या पाण्यात कोसळला. हे पाहताच किनाऱ्यावरच्या लोकांनी पुलाच्या दोन्ही बाजूंस उड्या टाकल्या आणि पाण्यातल्या हत्तींबरोबर ते पण पोहू लागले. काही अपघात झाल्यास वेळीच मदत पोचावी म्हणून ही तयारी होती. यमुनेच्या पैल-तीरावर गेल्यावर अकबराने आपला हत्ती विनासायास पुन्हा काबूत आणला. "लहानपणी मी अशा साहसी कृत्यात भाग घेत असे. कारण ईश्वराला जर माझे वर्तन आवडत नसेल, तर तो माझ्या आयुष्याचा अशा साहसी कृत्यात शेवट करील असे मला वाटे." अशा शब्दांत अकबराने ही हकीकत नंतर अबुल फझलला सांगितली होती.

## आधमखानला माळव्याहून परत बोलावले

आधमखानला माळव्यातून परत बोलावून तेथील कारभार एकट्या पीर महम्मदखानावर सोपवण्यात आला. आधमखानाने स्वत:ची वर्तणूक सुधारावी आणि

माळव्यावरचा अन्याय दूर व्हावा म्हणून ही गोष्ट केली असे अबुल फझल म्हणतो. पण क्रूरपणा आणि दुराचरण यात पीर महम्मद हा आधमखानापेक्षा कुठल्याच बाबतीत कमी नव्हता आणि माळव्यातल्या लोकांना दुर्दैवाने बरेच दिवस अन्याय आणि छळ सहन करावा लागला.

## अजमीरची पहिली यात्रा : अम्बरच्या राजकन्येशी विवाह

अकबर सुमारे वीस वर्षांचा होतो न होतो तोच त्याच्या मानसिक आणि आध्यात्मिक दृष्टिकोनात हळूहळू फरक दिसून येऊ लागला. मुलूख जिंकण्याची आणि राज्यकारभारात सुधारणा घडवून आणण्याची एक भव्य योजना त्याच्या मनात घोळू लागली. योगी, संन्यासी, कलंदर आणि इतर तापसी यांच्या संगतीत तो आपला वेळ घालवू लागला. "सिद्धीचा मार्ग दर्शविणाऱ्या हकिमांचा" शोध त्याने सुरू केला.

एकदा अकबर फत्तेपूर शिक्रीला शिकारीस गेला असता आग्र्याच्या पश्चिमेस आठ मैलांवर असलेल्या मिढाकूर या गावी त्याने काही भाटांची गाणी ऐकली. अजमीरच्या ख्वाजा मुइनुद्दिन चिस्तीची स्तुतिपर कवने (बहुधा कवाली) ते गात होते. ती ऐकून अकबराची जिज्ञासा जागृत होऊन अजमीरला जाऊन ख्वाजाच्या कबरीचे दर्शन घेण्याचे त्याने ठरविले. १४ जानेवारी १५६२ रोजी छोटेसे रक्षकदल बरोबर घेऊन तो अजमीरला जाण्याला निघाला. आपल्या जनानखान्याला घेऊन मेवातच्या मार्गाने अजमीरला येण्याचा आदेश जाण्यापूर्वी त्याने महाम अनगाला दिला. अजमीरच्या मार्गावर तोडा भोन आणि खरंडी यांच्या दरम्यान कलावली येथे चगताईखानच्या मार्फत मी आपल्याला भेटू इच्छितो असा अंबरचा राजा भारमल याने निरोप पाठविला. अकबराने परवानगी दिल्यावरून त्याची आणि राजा भारमल यांची भेट हल्लीच्या जयपूरच्या नैर्ऋत्येस असलेल्या संगनेर या गावी झाली. राजा भारमलने आपली थोरली मुलगी बादशहास देऊ केली. ते मान्य करून लग्नसमारंभाची तयारी करण्यासाठी बादशहाने भारमलला परत अम्बरला पाठवून दिले.

शर्फुद्दिनला कछव्याची राजधानी अम्बर जिंकून घ्यायची होती. म्हणून त्याने भारमलला नाना तऱ्हेने हैराण केले होते. यात त्याला भारमलचा थोरला भाऊ पूरणमल याचा मुलगा सुजा याची पूर्ण मदत होती. अम्बरचे राज्य स्वत:साठी मिळवण्याच्या लोभाने सुजा मेवातच्या मुघल सुभेदाराला जाऊन मिळाला होता. शर्फुद्दिनने अम्बरवर स्वारी करून भारमलकडून मोठी खंडणी वसूल केली व जगन्नाथ, राजसिंग आणि खंगर या भारमलच्या तिघा पुतण्यांस

ओलीस ठेवून घेतले. अशा तऱ्हेने कछव्याचे घराणे जवळ जवळ नामशेष होण्याच्या बेतात होते. त्यामुळे अगतिक होऊन भारमलने अकबराकडे रदबदलीची आणि मैत्रीची याचना केली.

ख्वाजाच्या कबरीचे मोठ्या समारंभाने दर्शन घेऊन अकबर परत फिरला. वाटेत सांभर येथे मुक्काम करून त्याने जगन्नाथ, राजसिंग आणि खांगर यांची सुटका करवून त्यांना भारमलच्या स्वाधीन केले. सांभरलाच त्याचा आणि भारमलच्या मुलीचा विवाह 'अत्यंत प्रशंसनीय रीतीने' साजरा झाला. लग्न–समारंभ मोठ्या थाटात करून भारमलने बादशहास खूप मोठा हुंडा दिला. सांभरला एक दिवस मुक्काम करून अकबराने आग्र्याकडे तातडीने कूच केले. वाटेत रतनभोरजवळ भारमलचे मुलगे, नातू आणि इतर नातेवाईक यांची अकबराशी ओळख करून देण्यात आली. भारमलचा नातू मानसिंग यास अकबराने दरबारच्या नोकरीत ठेवून घेतले. अकबराने आपल्या अम्बर राजधानीला भेट द्यावी अशी भारमलची इच्छा होती. पण आग्र्याला जाण्याची घाई असल्याने बादशहाने भेटीचा बेत पुढे ढकलला. भारमलचा मुलगा भगवंतदास आणि नातू मानसिंग हे दोघे अकबराबरोबर आग्र्यास गेले. पुढील १५० मैलांचा लांबचा प्रवास तीन दिवसांच्या आत संपवून शुक्रवार तारीख १३ फेब्रुवारी १५६२ रोजी (८ जमाय–उल–आखीर, ९६९ हिजरी) अकबर आग्र्याला पोचला.

भारमलच्या मुलीबरोबरचा अकबराचा विवाह म्हणजे मध्ययुगीन भारतीय इतिहासातील एक अर्थपूर्ण घटना होय. हा विवाह दोन्ही बाजूंच्या संमतीने घडून आला आणि त्यामुळे रजपूत आणि मुघल यांमध्ये भक्कम पायावर सलोखा निर्माण होण्यास मदत झाली. अशा विवाहास प्रत्यक्ष वधूची संमती मिळविणे हा विचारही येणे त्या वेळी अशक्य होते. सनातन हिंदू चालीनुसार मुलीच्या बापाने लग्नाची गोष्ट काढली आणि अकबराने काहीही अनमान न करता ती मान्य केली. तथापि हे सांगणे आवश्यक आहे की भारमलने आपली मुलगी अकबराला देण्याचे ठरवले ते केवळ तो संकटात सापडला होता आणि आपले घराणे आणि राज्य त्याला शाबूत राखावयाचे होते म्हणून. ह्यापूर्वीपण मुस्लिम राजे आणि रजपूत कन्या यांचे विवाह झाले होते. पण ते सक्तीचे आणि नाखुषीचे गैरविवाह होते. अशा मुलींना प्रथम मुसलमान करून मग मुस्लिम पद्धतीप्रमाणे त्यांची लग्ने होत असत. पण अम्बरच्या राजकन्येवर मुसलमान होण्याची सक्ती करण्यात आली नाही. अकबराचा वारस आणि भावी 'जहांगीर' याची अम्बरची राजकन्या हीच माता होती. या विवाहामुळे मुघल सिंहासनाला रजपूत राजांचा भक्कम आधार मिळून अकबराच्या साम्राज्याला स्थैर्य प्राप्त झाले. अकबराचे वैयक्तिक

जीवन आणि सार्वजनिक धोरण यांवर या विवाहाचे गाढ परिणाम झाले.

**मेरटचा किल्ला अकबर जिंकतो : फेब्रुवारी–मार्च १५६२**

अजमीरहून परत येताना पूर्वीच्या जोधपूर राज्यातला मेरटचा किल्ला हस्तगत करण्याचा हुकूम अकबराने मेवाड आणि अजमीरचा सुभेदार शर्फुद्दिन हुसेन यास दिला. या वेळी हा किल्ला जोधपूरचा राव भालदेव या उत्तर हिंदुस्थानातील अत्यंत बलाढ्य हिंदू राजाच्या ताब्यात होता. किल्ल्यावरचा अधिकारी जयमल राठोड होता. याच जयमल राठोडने पुढे चितोडचा किल्ला अकबराविरुद्ध लढवला. रजपुतांच्या निकाराच्या प्रतिकारामुळे किल्ल्यास वेढा देणे शर्फुद्दिनला जमेना. तेव्हा आस्ते जाण्याचे धोरण स्वीकारून शर्फुद्दिनने मेरट गावात तळ देण्याचे ठरविले. नंतर किल्ल्याच्या सर्व बाजूंवर तोफा डागून मुघलांनी त्याला सर्व बाजूंना सुरूंग लावले आणि रोजच्या रोज दोन्ही बाजूंच्या टेहळणीच्या फौजांत निकाराच्या लढाया सुरू झाल्या. किल्ल्याचा एक बुरूज तोफांनी जमीनदोस्त करून मुघल तटास खिंडार पाडू शकले; पण त्यातून मुघल फौज किल्ल्यात शिरू शकली नाही. कारण रातोरात रजपूत सैनिकांनी ते खिंडार बुजवून टाकले होते. त्या दिवशी रजपूत सैन्य अत्यंत शौर्याने लढले आणि दोन्ही बाजूंचे अनेक सैनिक त्या दिवशीच्या तुमुल युद्धात धारातीर्थी पडले. कुठलीच बाजू मागे हटण्याची चिन्हे दिसेनात. शेवटी किल्ल्यावरील अन्नधान्याचा साठा इतका कमी झाला की जयमलवर भुकेने मरण्याची पाळी आली. तेव्हा आपल्याला व आपल्या अनुयायांना जीवित-रक्षणाची हमी द्यावी या अटीवर किल्ला खाली करून देण्यास जयमल तयार झाला. त्याप्रमाणे किल्ला खाली करून तो निघाला. पण निघता निघता आपल्या ५०० अनुयायांसह देवदास नावाच्या प्रसिद्ध व शूर रजपुताने किल्ल्यातील कोठाराला आग लावून दिली. यामुळे तहाच्या अटी मोडल्या असे मानून शर्फुद्दिनने रजपूत फौजेवर हल्ला करण्याचा हुकूम आपल्या सैन्यास दिला. देवदासाला हे समजताच "मोठ्या धाडसाने तो परत फिरला व मुघल सैन्याच्या मध्यभागावर अगदी उघड्या मैदानात तुटून पडला." यानंतर झालेल्या भीषण संग्रामात अगदी शेवटच्या क्षणापर्यंत लढता लढता देवदास मृत्युमुखी पडला. जखमी होऊन घोड्यावरून कोसळलेल्या देवदासाभोवती गराडा घालून मुघल सैन्याने त्याचे तुकडे केले आणि किल्ला ताब्यात घेतला.

**अकबराची मानसिक क्रांती : युद्धकैद्यांना गुलाम करण्यास बंदी**

सन १५६२ च्या मध्यात जीवन, शासनाचे प्रश्न आणि त्याच्या स्वतःच्या ऐहिक आणि पारमार्थिक कल्याणाच्या कल्पना याविषयीच्या अकबराच्या

दृष्टिकोनात विलक्षण परिवर्तन घडून आले. तो म्हणतो, “विसावे वर्ष संपताक्षणीच एक आंतरिक कटुता मला जाणवू लागली आणि माझ्या अखेरच्या प्रवासाला लागणाऱ्या पारमार्थिक शिदोरीच्या अभावी माझा आत्मा अतिशय दु:खाने भरून आला”. आयुष्यातली वीस वर्षे जवळ जवळ फुकट गेली आणि शाश्वत सुख मिळविण्याच्या दृष्टीने फारच थोडी खटपट आपण केली अशी भावना त्याच्यामध्ये निर्माण झाली आणि त्यामुळे जात, धर्म आणि आपला आयुष्यक्रम यांच्याकडे लक्ष न देता प्रजेच्या हिताची कामे करण्याची इच्छा त्याच्यात निर्माण झाली. सर्व जातिधर्मांच्या प्रजाजनांची नि:स्वार्थ सेवा करण्याखेरीज परमेश्वराला खूष करण्याचा दुसरा मार्ग राजकर्त्याजवळ नाही ही श्रद्धा त्याने आयुष्याच्या पक्वावस्थेत जी दृढपणे बाळगली होती ती याच काळात त्याच्या हृदयात जागृत झाली. ही महत्त्वाची क्रांती कशामुळे झाली हे निश्चित सांगण्याला आधार उपलब्ध नसला तरी योगी, संन्यासी आणि तत्सम साधुपुरुषांची संगत याच्या मुळाशी असावी असे अनुमान काढण्यास हरकत नाही. त्याचप्रमाणे अम्बरच्या कछवा राजघराण्याशी जडलेला त्याचा निकट संबंध आणि त्या घराण्याचे शौर्य, स्वामीभक्ती आणि अव्यभिचारी निष्ठा यांचा त्याच्या विवेकी, संस्कारक्षम आणि ग्रहणशील मनावर जो खोल ठसा उमटला होता त्याचाही परिणाम असावा. याच्या उलट त्याचे पिढीजात मुघल उझबेक आणि इतर मुसलमान अधिकारी यांची डळमळती आणि संशयास्पद निष्ठा ही तो पाहात होता. मेरटच्या वेढ्यात स्वत:च्या जातिबांधवांविरुद्ध हिरिरीने लढणारे जयमल, लुकरण यांच्यासारखे रजपूत सरदार यांचा त्याच्या मनावर फार प्रभाव पडला. त्यातच एकापाठोपाठ एक नेमलेल्या वजिरांची नालायकी आणि कारस्थाने आणि आपल्या पदांची प्रतिष्ठा राखण्यात त्यांना आलेले अपयश ही पाहून त्याला मोठा धक्का बसला याचीही भर पडली. त्याच्यामध्ये घडून आलेल्या या परिवर्तनाचा प्रत्यक्ष परिणाम म्हणजे त्याने आपल्या २० व्या वाढदिवसानंतर (१० एप्रिल १५६२) काढलेला हुकूमनामा होय. त्याअन्वये युद्धकैद्यांना गुलाम करून त्यांना सक्तीने मुसलमान करण्याची बंदी करण्यात आली. आतापर्यंत त्याने स्वत: आणि दिल्लीच्या तक्तावरील त्याच्या पूर्वीच्या मुस्लिम राज्यकर्त्यांनी अनुसरलेल्या शासकीय तत्त्वात मूलभूत बदल घडून आला आणि नव्या धोरणाचा प्रारंभ झाला. “हिंदुस्थानातल्या लोकांची बायकामुले कैद करून त्यांना गुलाम करून विकणे किंवा त्यांचा उपभोग घेणे” ही प्रथा फार जुनी असून तिला मुसलमान धर्माचा पाठिंबा होता. “आपल्या राज्यातल्या कुठल्याही भागांत विजयी सैन्यातील कोणाही सैनिकाने या प्रकारे वागू नये”, “युद्धामध्ये शत्रूला कैद करणे भाग पडले तरी त्यांच्या कुटुंबातील मंडळींचे जगज्जेत्या लष्करापासून रक्षण केले पाहिजे. लष्करातल्या कुठल्याही वरिष्ठ वा कनिष्ठ सैनिकाने त्यांना गुलाम करावयाचे नसून त्यांना मोकळेपणाने आपापल्या घरी आणि नातेवाइकांकडे जाण्याची

परवानगी दिली पाहिजे," असा हुकूम त्याने काढला. शत्रुपक्षाकडील बायका आणि निरपराधी मुले यांना "युद्धाचा दारूगोळा" म्हणून समजावयाचे नाही आणि कोणत्याही प्रकारे त्यांचा छळ होता कामा नये हे त्या बादशाही फर्मानात स्पष्टपणे नमूद झाले होते. हा हुकूम इस्लामी तत्त्व व व्यवहार यांच्या विरुद्ध होता आणि त्याच्या अंमलबजावणीमुळे निरपराधी लोकांना जबरदस्तीने बाटवून त्यामुळे होणाऱ्या मुसलमान प्रजेची वाढ बंद झाल्याने त्या धर्माचे नुकसान झाले. तरी एकंदर प्रजेच्या दृष्टीने अकबराने केलेली ही सुधारणा मानवतावादी आणि फार महत्त्वाची होती आणि त्यामुळे अकबर सर्वांच्या प्रशंसेस पात्र ठरला.

## परौंखचे साहसी कृत्य

उत्तर प्रदेशातल्या हल्लीच्या एटाह जिल्ह्यातील साकीत या गावी अकबर एकदा शिकारीला गेला होता. त्या परगण्यातील आठगढ या नावाने ओळखल्या जाणाऱ्या आठ गावांतले लोक हे वक्र बुद्धीचे आणि लुटारू वृत्तीचे आहेत अशी तक्रार अकबराकडे आली. या परगण्यावरच्या अधिकाऱ्यांनी पण या गावातील लोकांच्या दुष्टपणाबद्दल अनेक वेळा तक्रार केली होती. अकबर साकीतला असताना आजूबाजूच्या गावातले काही लोक हप्पा ब्राह्मणाला पुढे करून अकबराकडे संरक्षण मागण्यास गेले. तरुण बादशहाने त्या लुटारूंना शासन करण्याचे ठरविले हे कळताच ते सर्व साकीतच्या आग्नेयेस १५ मैलांवर असलेल्या परौख या गावी पळून गेले आणि तेथे त्यांनी तटबंदी उभी केली. ज्या वेळी अकबर २०० घोडेस्वार व २०० हत्ती घेऊन तेथे पोचला तेव्हा त्यांनी गावाला आग लावून दिली आणि अकबराची वाट रोखली. आपल्याबरोबरचे लोक पुढे जाण्यास कचरत आहेत हे पाहताच अकबर स्वत: एका हत्तीवर बसून ४००० गुंडांनी मोर्चे बांधलेल्या गढीवर चालून गेला. या वेळी अकबराचा जीव अगदी धोक्यात होता. एका वेळी तर राजा भगवंतदास आणि राजा बेदीचंद या दोघांशिवाय तिसरा एकही रक्षक त्याच्याबरोबर नव्हता. ७ बाण त्याच्या ढालीवर आदळून त्यांतले ५ तीन ते चार इंच खोल रुतून बसले आणि त्याचा हत्ती एका धान्याच्या पेवात पडला आणि मागे बसलेला माणूस अकबराच्या अंगावर कोसळल्याने बादशहाला हादरा बसला. तथापि त्याने मोठ्या धैर्याने आणि निर्धाराने पुढे चाल केली. त्याने आपला हत्ती गढीच्या दरवाजावर घालून भिंत ढासळून टाकली आणि तो गढीत घुसला. आतील खेडूत पळून गेले. गढीचे छप्पर मोडून त्याला आग लावण्यात आली. नंतर झालेल्या चकमकीत त्यांपैकी १००० मारले गेले व बाकीचे शरण आले. या वेळी अकबराने आपला जीव धोक्यात घातला हे खरे. पण दुष्ट लोकांचे पारिपत्य करण्यासाठी त्याने अवलंबिलेल्या या धीट मार्गाचा लोकांवर फार चांगला

परिणाम झाला.

### पीर महंमदची खानदेशावर स्वारी, त्याचा मृत्यू

आधमखानाला परत बोलावल्यानंतर पीर महंमद हा माळव्याचा एकमेव सुभेदार झाला. माळव्याच्या दक्षिण सीमेवर दबा धरून बसलेल्या बाज बहादुराचा पाठलाग करून त्याने त्याला हद्दीबाहेर हाकून दिले. नंतर खानदेशातील बिजगड हा किल्ला जोराची झुंज देऊन त्याने काबीज केला. त्यानंतर सुलतानपूर ताब्यात घेऊन बाज बहादुराला आश्रय देणारा खानदेशचा राजा मीरान मुबारक शहा याचा बंदोबस्त करण्यासाठी त्याने दक्षिणेकडे आपला मोर्चा वळविला. बऱ्हाणपूरच्या वाटेवर शत्रूने बऱ्याच मोठ्या सैन्यानिशी त्याच्यावर हल्ला चढविला. तो हल्ला धाडसाने परतवून लावून पीर महंमदने मोठी लूट हस्तगत केली. नंतर बऱ्हाण-पूरला जाऊन तेथील लोकांची घरे जाळणे, त्यांची कत्तल करणे आणि लुटालूट करणे अशी अनेक अनन्वित कृत्ये त्याने केली. याच वेळी बाज बहादूर मोठ्या सैन्यानिशी समोर ठाकला. आपल्या अनुभवी सरदारांचा सल्ला न जुमानता पीर महंमदाने बाज बहादुराच्या सैन्याला तोंड दिले. त्यात त्याचा पराभव झाला. घाईघाईने नर्मदा नदी पार करण्याच्या प्रयत्नात असताना सामान लादून चाललेल्या खेचरांच्या एका तांड्याशी त्याच्या घोड्याची टक्कर होऊन पीर महंमद घोड्यावरून खाली पडून नदीत बुडून मेला.

बाज बहादूर आता माळव्याला परत आला आणि त्याने पुन: त्याचा ताबा घेतला. त्याचे हे यश क्षणिक ठरले. अकबराने ताबडतोब अब्दुल्लाखान उझबेक याला माळव्याचा सुभेदार नेमून त्याला माळवा परत जिंकून घेण्याकरिता पाठविले. त्याच्या बरोबर ख्वाजा मुईनुद्दिन अहंमद फरांखुडी याला देऊन त्याला माळव्या-तील जहागीरदारांचे कागदपत्र तपासून जमाबंदी करण्यास सांगितले. अब्दुल्लाखान माळव्यात पोचण्यापूर्वीच बाज बहादूर घाबरून माळव्यातून पळून गेला. पाठी-मागे लागलेल्या अब्दुल्लाखानच्या पुढे एका ठिकाणाहून दुसऱ्या ठिकाणी पळता पळता शेवटी तो चितोडगडचा राणा उदयसिंग याच्या आश्रयाला आला. माळव्याची राजधानी मांडू येथे आपले मुख्य ठाणे स्थापन करून अब्दुल्लाखानाने निरनिराळ्या जिल्ह्यांवर अधिकाऱ्यांची नेमणूक करून त्यांना त्यांचा ताबा घेण्यास पाठवून दिले. आपल्या भटकंतीला कंटाळून १५७० साली म्हणजे अकबराच्या कारकीर्दीच्या १५ व्या वर्षी बाज बहादूर अकबराला शरण आला आणि अकबराने त्याला १००० ची मनसबदारी दिली. बाज बहादूर हा उत्तम गवई असून भारतीय रागदारी संगीताचे त्याचे ज्ञान असाधारण होते. हे लक्षात घेऊन त्याची १००० ची मनसबदारी लवकरच २००० ची करण्यात आली.

**नंदनचा राजा गणेशची शरणागती**

पंजाबमधील बियास आणि सतलज या दोन नद्यांमध्ये नंदन नावाचा एक डोंगराळ मुलूख आहे. तेथील राजा गणेश याने बिरखा परगण्याचा बादशहाचा जहागीरदार जान महंमद याच्यावर स्वारी केली. पण त्यात पराभव पावून तो राज्य गमावून बसला. तथापि राजा तोडरमल याने रदबदली केल्यावरून बादशहाने राजा गणेशला माफी देऊन त्याला बादशाही तैनातीत ठेवून घेतले. अकबराच्या कारकीर्दीत राजा तोडरमलचा प्रथम उल्लेख या ठिकाणी सापडतो. यावरून असे दिसून येते की, १५६२ साली राजा तोडरमल अकबराच्या नोकरीत होता आणि तेव्हासुद्धा राजदरबारी त्याचे बरेच वजन होते.

या वेळी इराणचा शहा तहमास्प याने १५६२ साली आपला चुलत भाऊ सय्यद बेग याला राजदूत म्हणून मोठ्या लवाजम्यानिशी अकबराकडे भेटीसाठी पाठविले. बादशहाला पाठविलेल्या नजराण्यात इतर गोष्टींबरोबर इराकी, तुर्की आणि अरबी घोडे पण होते. सय्यद बेगबरोबर पाठविलेल्या पत्रात शहाने हुमायूनच्या मृत्यूबद्दल खेद व्यक्त करून अकबराला गादी मिळाल्याबद्दल त्याचे अभिनंदन केले होते. त्या राजदूताचे मोठ्या आत्मीयतेने स्वागत करण्यात आले.

**अत्काखानचा खून : आधमखानाचा शेवट**

"राजकीय आणि आर्थिक कारभाराची व्यवस्था तसेच मुलकी आणि लष्करी बाबी निकालात काढणे ही कामे" अत्काखानाकडे सोपविल्याचा उल्लेख यापूर्वी आलेलाच आहे. याचा अर्थ असा होतो की मुनीमखानाला मुख्य प्रधानाच्या जागेवरून कमी करण्यात आले आणि महाम अनगाची सत्ता आणि नेमणुकीचा अधिकार संपुष्टात आला. त्यामुळे फार नाराज होऊन या दोघांनी अत्काखानाला ठार मारण्याचा कट केला. महाम अनगा आणि अत्काखान यांचे जमत नसे. १५६१ साली बैरामखानच्या विरुद्ध त्याला मोहिमेला पाठविले होते. त्या वेळी तिची त्याच्या विरुद्ध कारस्थाने सुरू होती. पण आता तिचा मत्सर पराकोटीला पोचला आणि तिच्या कटात मुनीमखान, शिहाबुद्दिन अहमद, कासीमखान आणि तत्सम इतर असंतुष्ट दरबारी लोक सहजासहजी स्वखुषीने सामील झाले. या सर्वांनी मिळून महाम अनगाचा दुसरा मुलगा आधमखान याला अत्काखानचा खून करण्याची चिथावणी दिली. १६ मे १५६२ रोजी अत्काखान, मुनीमखान, शिहाबुद्दिन अहमद आणि इतर काही अधिकारी आग्र्याच्या राजमहालात सार्वजनिक कामकाजाचे कागद पाहात होते. त्या वेळी आधमखान थोड्याशा आडदांड लोकांना बरोबर घेऊन राजमहालात जाऊन धडकला. त्याला पाहताच

महालातले सर्व अधिकारी स्वागतासाठी उठून उभे राहिले. अत्काखानाने मात्र आपल्या जागेवरून अर्धवट उठल्यासारखे केले. आधमखान आपल्या कट्यारीला हात घालून तावडतोब अत्काखानाच्या पुढे येऊन उभा राहिला आणि 'आता कशाची वाट पाहता ?' असा खुणेचा प्रश्न त्याने आपल्याबरोबरचा खुशम उझबेक या माणसाला विचारला. खुशम उझबेगने लगेच आपली कट्यार अत्काखानाच्या छातीत खुपसली. या अनपेक्षित प्रकाराने घाबरून जाऊन अत्काखान महालाच्या दरबाराकडे पळून जाऊ लागला. तेवढ्यात आधमखानबरोबर आलेल्या दुसऱ्या एका माणसाने त्याच्यावर तलवारीचे दोन वार केले. त्यामुळे अत्काखान बाहेरच्या अंगणात गतप्राण होऊन पडला. या भीषण अत्याचाराने राजवाड्यात सर्वत्र हाहा:कार उडाला. हातात नंगी तलवार घेऊन आधमखान राजमहालातून गच्चीवर आला आणि तेथून अकबराच्या खाजगी महालात जबरदस्तीने घुसू लागला. पण पहाऱ्यावरच्या खोजाने दार आतून बंद करून घेतले. आधमखानाच्या धमक्यांना त्याने दाद दिली नाही. इतक्यात अकबर या गडबडीने जागा होऊन दुसऱ्या दरवाजाने बाहेर आला आणि काय गडबड आहे म्हणून चौकशी करू लागला. अत्काखानाचा खून झाला आहे असे कळताच अत्यंत क्रोधाविष्ट होऊन अन्त:पुराच्या दाराबाहेर उभ्या असलेल्या आधमखानला तो म्हणाला, 'मूर्ख माणसा, माझ्या अत्काला तू काय म्हणून ठार मारलेस ?' तेव्हा आधमखान मोठ्या उद्धट धीटाईने पुढे आला आणि अकबराचे दोन्ही हात पकडून त्याच्या हातातला जंबिया काढून घेण्यासाठी झटापट करू लागला. अन्त:पुरातून बाहेर पडण्यापूर्वी हा जंबिया अकबराच्या, हातात त्याच्या एका नोकराने दिला होता. आधमखान अकबराला म्हणाला "चौकशी करून मग काय तो विचार करा. अजून चौकशी मुळी झालीच नाही." आता मात्र अकबर बेभान झाला. त्याने आपले हात आधमखानाच्या हातातून सोडवून घेतले आणि आपल्या हातातला जंबिया टाकून आधमखानच्या हातातून त्याची तलवार हिसकावून घेण्याचा प्रयत्न तो करू लागला. आधमखान तलवार सोडीना. तेव्हा मोठे प्रसंगावधान राखून अकबराने आपला हात मागे घेऊन आधमखानच्या "तोंडावर असा जोराचा ठोसा मारला की तो दुष्ट माणूस कोलमडून जमिनीवर बेशुद्ध होऊन पडला." आधमखानाचे हातपाय बांधून त्याला राजवाड्याच्या गच्चीवरून खाली फेकून देण्याचा हुकूम अकबराने दिला. तरी तो खलपुरुष मेला नाही. मग त्याला गच्चीवरून पुन्हा एकदा खाली फेकून देण्याचा हुकूम अकबराने दिला. या वेळी मात्र मान मोडून आणि डोके फुटून आधमखान गतप्राण झाला.

आधमखानाला दिलेल्या कडक शिक्षेची बातमी समजताच मुनीमखान, शिहाबुद्दिन अहमदखान, कासीमखान मीरबहर इत्यादी त्याचे साथीदार आग्र्याहून पळाले. आपल्याला पकडता येऊ नये म्हणून यमुनेवरचा बोटींचा पूल त्यांनी

उध्वस्त करून टाकला.

## महाम अनगाचा मृत्यू

या वेळी प्रकृती बरी नसल्यामुळे महाम अनगा घरीच होती. ती बादशहाच्या भेटीस गेली तेव्हा "आधमखानने माझ्या अत्काला ठार मारले. त्याच्या पारिपत्या-दाखल मी त्याला शिक्षा केली" असे अकबराने तिला सांगितले. फक्त कैदेचीच शिक्षा असेल असे समजून म्हातारी हलक्या आवाजात 'महाराजांनी योग्य तेच केले' असे म्हणाली. पण अकबराने आधमखानला मृत्यूची सजा केली हे समजताच तिचे काळीजच फाटून गेले आणि अशा अवस्थेत तारीख २४ जून १५६२ रोजी आधमखानच्या मृत्यूनंतर ४० दिवसांनी ती मरण पावली. तिच्या मरणाचे अकबराला फार दुःख झाले आणि तिच्या प्रेतयात्रेबरोबर तो काही पावले चालत गेला. शाही इतमामाने तिचे दफन करण्यात आले. अकबराने तिच्या आणि आधम-खानाच्या थडग्यावर दिल्लीच्या कुतुबमिनारजवळ एक मोठी कबर बांधली.

महाम अनगा ही हुशार व बुद्धिमान स्त्री होती पण दूरदर्शी शासकाचे गुण तिच्यात नव्हते आणि अबुल फझल व्यर्थ दर्शविण्याचा प्रयत्न करतो त्याप्रमाणे थोर मुत्सद्याचेही गुण तिच्यात नव्हते. तथापि लोकांना एकत्र आणून आलेला प्रसंग निभावून नेण्याचे किंवा जैसे थे कायम ठेवण्याचे कसब तिच्यापाशी होते. मंत्र्यांची आणि इतर सेनाधिकाऱ्यांची तिची निवड सदोष होती आणि विशेषत: बहादूरखान उझबेक, पीर महम्मदखान आणि तिचा खुद्द मुलगा आधमखान हे नालायकच होते. कार स्थाने करण्यात तिचा हातखंडा होता. बैरामखान आणि अत्काखान यांच्या विरुद्ध केलेल्या यशस्वी कटावरून तिची सत्तालालसा दिसून येते. तिची अवास्तव स्तुती करूनसुद्धा तिच्या कारकीर्दीत राज्याच्या महसुलाचा कारभार अत्यंत गचाळ असून त्यात खूप लाचलुचपत होती, असे अबुल फझलला कबूल करणे भाग पडले. अकबर आणि त्याचे हित यावरची तिची नितान्त निष्ठा हा तिचा सर्वांत मोठा गुण होता. कुठल्याही अधिकाऱ्याचे किंवा मांडलिकाचे मूल्य-मापन त्याच्या स्वामीनिष्ठेवरून ठरवायचे असा अबुल फझलचा दंडक होता. म्हणून त्याने या हुशार स्त्रीची तोंडभर स्तुती केली आहे.

## १५६० नंतर स्त्रीराज्याचा शेवट

व्हिन्सेन्ट स्मिथ म्हणतो त्याप्रमाणे १५६१ – ६२ चा काल बायकी राज्याचा नव्हता. या दोन वर्षांत अनेक प्रसंगी अकबराने आपले बुद्धिस्वातंत्र्य आणि कृतिस्वातंत्र्य सिद्ध केले होते. आधमखान आणि खान–इ–झमन

यांना त्यांच्या आज्ञाभंगाच्या वर्तणुकीबद्दल शासन करण्यासाठी प्रदीर्घ आणि कष्टाच्या मोहिमा त्याने अंगावर घेतल्या होत्या. त्याने आधमखानाला माळव्याच्या सुभेदारीवरून काढून टाकले होते. एका रजपूत राजकन्येशी विवाह करून तिच्या नातेवाइकांना स्वतःच्या नातेवाइकांप्रमाणे त्याने वागविले. युद्धकैद्यांना गुलाम करून वाटवण्याची प्रथा त्याने रद्द केली. आधमखानालासुद्धा मृत्यूची सजा दिली. उघडच ही फार महत्त्वाची आणि क्रांतिकारक कामे महाम अनगाच्या किंवा अंतःपुरातल्या किंवा दरबारी व्यक्तींच्या प्रेरणेने किंवा त्यांच्या प्रभावाने होणे शक्य नव्हते. अकबराच्या स्वतंत्र बुद्धीचेच ते परिणाम होते. या काळात महाम अनगाचा थोडाबहुत प्रभाव बादशहावर निःसंशय होता, पण आधमखान आणि पीर महम्मदखान यांची माळव्यावर नेमणूक आणि इतर वारीकसारीक गोष्टी सोडल्यास १५६१–६२ या काळातील राज्याचा कारभार खास अकबराच्याच मताप्रमाणे चालला होता. अन्तःपुराच्या प्रभावातून तो हळूहळू मुक्त होत होता आणि त्याच्या मुख्य दायीच्या मृत्यूनंतर (जून २४, १५६२) त्याने तो प्रभाव पूर्णतः झुगारून दिला होता.

———

# प्रकरण पाचवे

## अकबराच्या उदार धोरणाचा प्रारंभ : १५६२ ते ६४ मधील घटना

### ऐतिमदखानाला शाही जमिनीचा दिवाण नेमण्यात आले.

महाम अनगाच्या कारकीर्दीत राज्याच्या महसूल आणि वित्त खात्यांत खूपच गोंधळ माजला होता. त्या खात्यातले अधिकारी स्वतःची तुंबडी भरून घेण्यात गुंतलेले होते आणि नेमून दिलेला महसूल जमा करण्याकरिता योग्य ती खबरदारी घेत नव्हते. राज्याचे उत्पन्न जमीन किंवा इतर साधनांतून वाढवण्याचा प्रयत्न त्या खात्याचे मंत्री किंवा अधिकारी कोणीच करीत नव्हते. राज्याचा खजिना जवळ जवळ रिकामा होता. एकदा अकबराने १८ रुपयांसारख्या क्षुल्लक रकमेची मागणी केली, पण ती रक्कमदेखील कोषाध्यक्ष ख्वाजा जहान देऊ शकला नाही.

महाम अनगाच्या मृत्यूनंतर या खात्याचा कारभार सुधारण्यासाठी अकबराने ताबडतोब उपाययोजना केली. बहलुल मलिक नावाच्या खोजास ऐतिमदखान या पदवीवर चढवून त्याला राखीव शाही जमिनीचा दिवाण नेमले. गरीब कुटुंबात जन्मलेला बहलुल मलिक प्रथम इस्लाम शहासूरच्या पदरी होता. त्याची हुषारी जाणून अकबराने त्याला शाही महसुलाची व्यवस्था पाहण्यासाठी नेमले. "आजपर्यंत हे काम खाबू लोकांच्या हातात होते." असे अबुल फझलने लिहून ठेवले आहे. बादशहाने जमीन महसुलाचे नवे नियम जाहीर करून ते सप्टेंबर १५६२ पासून अंमलात आणले. पण हे नवे नियम काय होते याचा निर्देश दुर्दैवाने त्या वेळच्या कुठल्याच लेखकांनी केला नाही. "राज्याचा आधार आणि सार्वभौमत्वाचा पाया तसेच लष्करी सामर्थ्याचे साधन असा जो महसूल तो योग्य पायावर उभा करण्यात आला" एवढे सांगण्यातच अबुल फझलने समाधान मानले आहे. बदायुनी म्हणतो की, खर्चात पूर्वी कधी नव्हती इतकी मोठी काटकसर करण्यात आली.

## मुनीमखानाची मुख्य प्रधान म्हणून पुन्हा नेमणूक

अत्काखानच्या खुनाच्या कटात सामील झाल्यामुळे मुनीमखान खान खानान हा आग्र्याहून पळून गेला होता. तो काबूलच्या मार्गावर असताना त्याला सहाराणपूर जिल्ह्यात सारवात येथें कासीमखान (मीर बहर) सकट अटक करण्यात येऊन आग्र्याला परत आणण्यात आले. मुनीमखानबद्दल अकबराचे मत विशेष चांगले नव्हते. अत्काखानच्या खुनाला तो जबाबदार होताच. शिवाय मुलकी आणि लष्करी कारभारात त्याने विशेष कौशल्य दाखविले नव्हते. तरीपण उदार अन्त:करणाने क्षमा करून अकबराने त्याला पुन्हा पंतप्रधान केले व खान खानान ही मानाची पदवी पण त्याला दिली. शिहाबुद्दिन अहमद आणि कासीमखान यांना पण बादशहाने क्षमा केली. मुनीमखानला पुन्हा प्रधान मंत्री नेमण्यात अकबराची काहीशी बेपर्वाई दिसून येते. कोणती व्यक्ती मंत्री होते यावद्दल तरुण बादशहाला फारशी फिकीर वाटेनाशी झाली. यापुढे सर्व राज्याचा आणि शासनाचा प्रमुख तोच होता. १५६० मध्ये त्याने शासनाची सूत्रे हाती घेतल्यापासून अनेक मंत्री आले आणि गेले. पण त्यांपैकी एकही त्या पदाच्या योग्यतेचा ठरला नाही. "मला समर्थ असा मंत्री मिळाला नाही हा ईश्वरी कृपेचा परिणाम म्हटला पाहिजे. नाहीतर मी केलेल्या सुधारणा त्यांनीच घडवून आणल्या असे लोक म्हणाले असते" असे मागाहून अकबर म्हणाला ते योग्यच होते. १५६२ च्या मध्यानंतर आपली धोरणे ठरवण्याचे महत्त्वाचे कार्य त्याने स्वत:कडे घेतले आणि त्याची अंमलबजावणी करणे आपल्या अधिकाऱ्यांवर सोपवून दिले.

## तानसेनचे दरबारात आगमन

या काळी अकबर राज्यविस्तार आणि कारभाराची पुनर्रचना यांच्या योजना आखण्यात गुंतला होता. इतकेच नव्हे तर संगीत आणि इतर ललितकला यांसारख्या सांस्कृतिक प्रयत्नाकडेही तो लक्ष देत होता. १५६२ च्या अखेरीस आपला दरबार सांस्कृतिक चळवळींचे केंद्र बनावे या आकांक्षेने तो प्रेरित झाला होता. या उद्देशाने त्या वेळचा अखिल हिंदुस्थानातला पहिल्या प्रतीचा गवई तानसेन याला त्याने आग्र्यास बोलावले आणि दरबारात त्याला मानाची जागा देऊ केली. हा गवई ग्वाल्हेरचा रहिवासी असून त्या वेळी साहित्य आणि कला यांचा मोठा पुरस्कर्ता भाथाचा (हल्लीचा रेवा) राजा रामचंद्र बाघेल याच्या पदरी होता. अकबराने राजा रामचंद्राकडे एक शिष्टमंडळ पाठवून तानसेनसाठी त्याच्याकडे मागणी केली. ती राजाने मान्य केल्यावर १५६२ च्या अखेरीस तानसेन अकबराच्या दरबारात दाखल झाला.

## अकबर भाठा पादाक्रांत करतो

१५६२ साली असफखानची वजिराची जागा ऐतिमदखानाला देण्यात आली आणि असफखानला इ स. १५६३ च्या सुरुवातीस अलाहाबादजवळ काराचा कमाविसदार नेमण्यात आले. त्याने भाथाचा राजा रामचंद्र बाघेलवर स्वारी केली. १५६१ साली त्याने अशीच एक स्वारी राजा बाघेलवर केली होती हे वाचकांच्या लक्षात असेलच. राजाने त्याच्या दरबारात आश्रयास येऊन राहिलेले गाझीखान तनूरी आणि इतर काही फरारी लोकांना बादशहाच्या स्वाधीन करावे असे त्याला सांगण्यात आले. पण या वेळीसुद्धा ते करण्यास राजा बाघेलने नकार दिला. याचा परिणाम लढाईत होऊन त्यात गाझीखान तनूरी आणि राजाचे अनेक लोक मारले गेले. राजा बाघेल पराभूत होऊन आपली राजधानी बान्धू येथल्या किल्ल्याचा आश्रय करून राहिला. पण राजा बिरबल आणि झेन खान कोका यांच्या मध्यस्थीने तो अकबराला शरण जाऊन त्याचा मांडलिक होऊन राहण्यास तयार झाला. अकबराने भाथाचे राज्य त्याच्याच ताब्यात ठेवले.

## काबूलमधील गैरकारभार : मुनीमखानाचे अपयश

१५६० च्या सप्टेंबरमध्ये मुनीमखान प्रधान मंत्र्याचे पद स्वीकारण्यासाठी निघून गेल्यानंतर काबूल प्रांताचा कारभार फारच बिघडला. अकबराचा सावत्र भाऊ मिर्झा हकीम हा केवळ आठ वर्षांचा असून काबूल प्रांताचा केवळ नामधारी सुभेदार होता. त्याची आई महचुचक बेगम ही फार लोभी स्त्री असून प्रांताचा नायब सुभेदार महम्मदखान अख्ता बेगी जुलूमशहाप्रमाणे वागत होता. म्हणून त्याच्याऐवजी मुनीमखानाचा मुलगा घनी खान याची नेमणूक करण्यात आली. पण त्याची कारकीर्द अख्ता बेगीपेक्षाही वाईट ठरली. त्यामुळे मुनीमचा भाऊ फझिल बेग याच्या साहाय्याने राजमातेने घनीच्या विरुद्ध एक पक्ष उभा करून सत्ता हाती घेऊन त्याला प्रांताबाहेर हाकून देण्याचा घाट घातला. गाझीखानाविरुद्ध जय मिळाल्यानंतर तिने शहावली अत्का याच्याशी संगनमत करून नायब सुभेदाराच्या जागेवर असलेला फझिल बेग आणि त्याचा मुलगा अबुल फते बेग यांना ठार मारविले. 'अदिलशहा' हे नाव धारण करून शहावली अत्का आता एखाद्या स्वतंत्र राजासारखा वागू लागला. काबूलमधील बेबंदशाही मोडून काढून बंदोबस्त करण्याला लायक माणूस म्हणून आपला प्रधान मंत्री मुनीमखान याची तिकडे रवानगी करणे अकबराला भाग पडले. मुनीमखानाला मिर्झा हकीम याचा पालक नेमण्यात आले आणि काबूलचा राज्यकारभार आपल्या हाती घेऊन तेथे योग्य बंदोबस्त करण्याचा आदेश त्याला देण्यात

आला. परंतु आपल्या हातची सत्ता सोडण्यास बेगम तयार नव्हती. तिने मिर्झा हकीमला बरोबर घेतले आणि असंतुष्ट काबुली लोकांची मोठी फौज उभी करून ती मुनीमखानबरोबर सामना देण्यास निघाली. मुनीमखान जलद कूच करून जलालाबादला येऊन पोचला. पण शहराजवळ झालेल्या लढाईत पराभव पावून त्याला प्रथम पेशावर आणि तेथून नंतर सिंधू नदीकडे माघार घ्यावी लागली. सिंधू नदी ओलांडून त्याने गक्खर प्रांतात आश्रय घेतला. पेशावरहून अकबराला एक अर्ज पाठवून त्यात त्याने आपल्या लज्जास्पद पराभवाबद्दल खेद व्यक्त केला आणि बादशहाकडे मक्केच्या यात्रेस जाण्यासाठी परवानगी मागितली. ते शक्य न झाल्यास पंजाबमधील एखादी जहागीर आपल्याला द्यावी अशी विनंती त्याने बादशहास केली. अकबराने त्याला परत बोलावून घेतले आणि क्षमा करून १५६३ च्या जुलै–ऑगस्टमध्ये (९७० हिजरीचा शेवट) त्याची एका महत्त्वाच्या जागेवर नेमणूक केली.

## यात्रेकरूंवरील कर रद्द

मथुरेच्या शेजारच्या प्रदेशात शिकारीच्या मोहिमेवर असताना अकबराला असे आढळून आले की पूर्वीच्या मुसलमान राज्यकर्त्यांप्रमाणेच त्याच्या राज्यातही धार्मिक स्थळांना भेट देणाऱ्या हिंदू यात्रेकरूंवर कर लादण्यात येत असे. अकबराच्या मते हा कर गैरवाजवी होता. कारण त्यामुळे धार्मिक कार्यात गुंतलेल्या लोकांच्यावर अनावश्यक आणि त्रासदायक बंधन लादले जाई. काही लोकांची परमेश्वराला भजण्याची रीत मूर्खपणाची असून उदात्त नसली तरीसुद्धा त्यासाठी त्यांच्यापासून कर वसूल करणे किंवा त्यांच्या भक्तिमार्गात अडथळे निर्माण करणे योग्य नव्हे असे अकबराला वाटत असे. त्यानुसार यात्रेकरूंचा कर रद्द केल्याचा हुकूम त्याने सर्व राज्यभर जाहीर केला. अबुल फझलच्या म्हणण्याप्रमाणे हे कर म्हणजे "पूर्वीच्या राज्यकर्त्यांचा हावरेपणा, धर्मांधता आणि नालायकी यांचे अवशेष होते." हा कर रद्द केल्यामुळे राज्याच्या खजिन्यात जमा होणारी करोडो रुपयांची रक्कम बंद झाली.

शिकारीहून परत येताना अकबर ३६ मैलांचे अंतर एका दिवसात तोडून आग्र्याला चालत गेला. तिघांखेरीज त्याच्याबरोबरचे इतर सर्व साथीदार त्याच्या बरोबरीने चालण्यात असमर्थ ठरून मागे राहिले.

## अकबर गक्खर प्रांत काबीज करतो

गक्खर ही मूळची लढाऊ हिंदू जमात होती. पंजाबात सिंधू आणि बियास

या नद्यांमधील डोंगराळ भागात त्यांची वस्ती असे. सुलतानशाह्यांच्या अमदानीत (इ. स. १२०६ ते १५२६) कुठल्याही राजाने या जमातीला संपूर्णपणे आपल्या कह्यात आणले नव्हते. या दिशेने शेरशहा (इ. स. १५४० ते १५४५) याला थोडेसे यश मिळाले होते. सुलतान सारंग याचा पराभव करून व त्याला ठार मारून त्याचा मुलगा कमालखान याला शेरशहाने कैद केले होते. इतके करून-सुद्धा गक्खरचे राज्य सर करून त्यावर आपला अंमल बसविणे त्याला शक्य झाले नाही. सारंगच्या मृत्यूनंतर त्याचे राज्य त्याचा भाऊ सुलतान आदम याज-कडे आले. इस्लामशहा सूर (इ. स. १५४५ ते १५५३) याने कमालखानला सोडून दिल्यानंतर काही काळाने तो अकबराकडे नोकरीस येऊन राहिला. खान-इ-झमन आणि अदलीचा मुलगा शेर खान यांच्यात झालेल्या जौनपूरच्या लढाईत त्याने फार पराक्रम गाजवला. या कामाचे बक्षीस म्हणून गक्खरच्या वडिलो-पार्जित राज्याचा अर्धा भाग त्याला परत मिळवून देण्याचे अकबराने ठरविले. पण सुलतान आदम राज्याचा कुठलाही भाग कमालखानला देण्यास तयार नव्हता. त्याचे पारिपत्य करण्यासाठी मरहूम अत्काखानचा मुलगा खान-इ-कलम, मीर महमंद खान आणि इतर काही सरदार यांना बरोबर सैन्य देऊन सुलतान आदम विरुद्ध बादशहाने पाठवून दिले. बादशाही फौजा गक्खर प्रांतात शिरल्या आणि हैलान गावाजवळ त्यांची आणि गक्खर सैन्याची मोठी लढाई झाली. अत्यंत निकराने लढूनसुद्धा गक्खर सैन्याचा या लढाईत पराभव झाला. सुलतान आदमला कैद करण्यात आले आणि त्याचा मुलगा लष्करी काश्मीरला पळून गेला. पण शेवटी त्यालाही कैद करून कमालखानकडे पाठवून देण्यात आले. कमालखानने त्याला ठार मारले. सुलतान आदमला कैदेत ठेवण्यात आले आणि नंतर तो कैदेतच मरण पावला. आजपर्यंत कोणत्याही मुसलमान राजाने न जिंकलेला सर्व गक्खर प्रांत कमालखानला बादशहाचा मांडलिक म्हणून देण्यात आला.

## मिर्झा शर्फुद्दीनचे बंड

५ नोव्हेंबर १५६२ या दिवशी नागोर आणि अजमीरचा सुभेदार ख्वाजा मोइनुद्दीन या मुसलमान धर्मगुरूचा मुलगा मिर्झा शर्फुद्दीन हा एकाएकी दरबारातून नाहीसा होऊन नागोर-अजमीर या आपल्या सुभ्यात पळून गेला. या गोष्टीचा अकबराला फार राग आला. त्याने शर्फुद्दीनला बडतर्फ केले आणि वली बेग झुअल कादिर (बैरामखानच्या बहिणीचा नवरा) याचा मुलगा हुसेन कुली बेग याला हुसेन कुली खान ही पदवी देऊन त्याच्या जागी नेमले. त्यामुळे शर्फुद्दीन चकित झाला आणि बादशाही फौजा अजमीरजवळ पोहोचल्या तेव्हा आपला

विश्वासू अधिकारी तारखान दिवाना याच्या ताब्यात अजमीर सोडून तो आपल्या नागोरच्या जहागिरीत जलौरच्या किल्ल्याच्या आश्रयाला जाऊन राहिला. दरम्यान तारखान दिवाना याने लढाई न करता अजमीर हुसेन कुलीच्या ताब्यात दिले. बादशाही फौजांपुढे निभाव न लागल्यामुळे शर्फुद्दीनपण आपली सर्व जहागीर बादशहाने नेमलेल्या हुसेन कुली खानच्या ताब्यात देऊन गुजराथला पळून गेला (इ. स. १५६३). गुजराथहून पुढे तो मक्केला निघन गेला.

## जोधपूरवर विजय

हुसेन कुली आता राठोड या प्रमुख राज्याच्या सरहद्दीवर पोहोचला होता. त्याला मारवाडची राजधानी जोधपूर जिंकून घेण्याचा आदेश अकबराने दिला. जोधपूरचा राजा मालदेव हा उत्तर हिंदुस्थानातला सर्वांत बलवान हिंदू राजा होता. त्याच्या मागून त्याचा धाकटा मुलगा चंद्रसेन हा नुकताच गादीवर आला होता. आपला वारसाहक्क डावलल्यामुळे नाराज होऊन त्याचा थोरला भाऊ रामसिंग अकबराला येऊन मिळाला. मुघलांच्या साह्याने आपल्या पित्याचे राज्य मिळविण्याचा रामसिंगचा उद्देश होता. रामसिंगच्या मदतीसाठी आग्र्याहून अकबराने मोठी फौज पाठवून दिली आणि या दोन्ही सैन्यांनी मिळून " हिंदुस्थानातला अतिशय मजबूत असा मारवाडचा किल्ला" काबीज केला. रामसिंगाने अकबराचे मांडलिकत्व पत्करले आणि अशा तऱ्हेने मारवाडची राजधानी असलेला जोधपूरचा किल्ला आणि मारवाडचे राज्य त्याला मिळाले (इ. स. १५६३).

## मुझफ्फरखान तुर्बाती याची महसूल मंत्री म्हणून नेमणूक

इ. स. १५६३ मध्ये मुझफ्फरखान तुर्बाती याला महसूल मंत्री ( दिवाण-इ–कुल किंवा वजीर ) नेमण्यात आले. हा पूर्वी बैरामखानच्या नोकरीत असून बैरामखानला बडतर्फ केल्यानंतर त्याचा जीव धोक्यात आला होता. पसरूरचा (हे पश्चिम पाकिस्तानमधील हल्लीच्या सियालकोट जिल्ह्यात आहे) कमाविसदार म्हणून मुझफ्फरखानने चांगले काम केले होते. यानंतर राज्याच्या कोठीवरचा अधीक्षक ( दिवाण–इ–बयुतात ) या जागेवर त्याला बढती देण्यात आली. येथेसुद्धा आपले काम निष्ठेने आणि कामसूपणाने बजावल्यामुळे अकबराचे लक्ष त्याने वेधून घेतले. याच वेळी अकबर महसुलाच्या कारभारात पूर्ण माहीतगार आणि उद्योगी अशा माणसाच्या शोधात होता. म्हणून अकबराने त्याची महसूल मंत्र्याच्या जागेसाठी निवड केली. " मुझफ्फरखानने खजिन्याच्या व्यवहाराची व्यवस्था चोख ठेवली, शेतकरी वर्गाच्या स्थितीत पुष्कळ सुधारणा केल्या आणि लष्करावर चांगला ताबा ठेवला. " पुढे त्याला सरदारकीची वस्त्रे देण्यात आली.

## शहा अबुल मालीचे बंड

अकबराला राज्याभिषेक झाल्यानंतर तिसऱ्याच दिवशी उद्धट शहा अबुल माली याला कैद करून लाहोरला पाठविण्यात आले होते. याचा उल्लेख दुसऱ्या प्रकरणात आलाच आहे. पण थोडयाच काळानंतर हा विक्षिप्त आणि चळवळ्या तरुण तुरुंगातून पळून गेला आणि त्याला पुन: कैद करून या वेळी बयानाच्या किल्ल्यात ठेवण्यात आले. पण एप्रिल १५६० मध्ये बैरामखानने तेथून त्याची सुटका केली. साहसे आणि अपयश यांनी भरलेल्या वादळी आयुष्यक्रमानंतर त्याला देश सोडून जाणे भाग पडले. मक्केची यात्रा करून शर्फुद्दीन याने बंड केले त्या सुमारास तो हिंदुस्थानात परत आला. परतीच्या प्रवासात गुजराथमध्ये न थांबता अबुल माली जलौरला शर्फुद्दीनला घाईने जाऊन मिळाला. त्या दोघांनी एकमेकांबरोबर संगनमत करून अबुल मालीने शाही सरहद्दीवरच्या प्रदेशात लूटमार करावी असे ठरले. या कामासाठी शर्फुद्दीनने ३०० निवडक सैनिकांची एक तुकडी अबुल मालीच्या हाताखाली दिली. अबुल माली ताबडतोब पंजाबमधील हाजीपूर या गावावर चाल करून गेला. पण ते काबीज करता न आल्यामुळे त्याने नरनौलवर हल्ला करून ते लुटले आणि आग्ऱ्याला जाणाऱ्या खजिन्याच्या संरक्षक फळीचा ताबा मिळविला. दरम्यान बादशाही फौजांची तुकडी नरनौलला येऊन पोचल्याचे पाहून अबुल मालीने दहरसूकडे माघार घेतली व तेथून तो राजस्थानमधील जयपूर प्रांतातील झुनझुन येथे पोचला. तेथे त्याचा पाठलाग करण्यात आल्यामुळे तो हिसारला गेला. तेथून काबूलला जाऊन मिर्झा हकीमच्या नेतृत्वाखाली सैन्याची उभारणी करून अकबराविरुद्ध चढाई करण्याचा बेत त्याने रचला. याच वेळी शर्फुद्दीनने हिंदुस्थानात बंडखोरी करावी असे ठरले. अकबर या वेळी मथुरेच्या जंगलात शिकारीवर होता. अबुल मालीवर चालून जाण्याचे ठरवून त्याने त्या बंडखोरांचा पाठलाग करण्यासाठी फौज पाठविली आणि तो सापडेल तिथून त्याला पकडून आणण्याचा आदेश दिला.

## अकबराला ठार मारण्याचा प्रयत्न

अबुल मालीविरुद्ध चाललेल्या हालचालीवर प्रत्यक्ष देखरेख ठेवण्यासाठी ८ जानेवारी १५६४ रोजी अकबर जलद दौड करून १० तारखेला दिल्लीला येऊन पोचला. १२ जानेवारी १५६४ रोजी निजामउद्दीन अवलिया याच्या कबरीचे दर्शन घेऊन घोड्यावरून परत येत असताना जुन्या दिल्लीच्या एका चौकात महाम अनगाच्या पाठशाळेच्या सज्जावरून कोणीतरी फेकलेला बाण त्याच्यावर येऊन आदळला. त्या बाणाने बादशहाच्या उजव्या खांद्याला जवळ जवळ वीतभर जखम

झाली. पण ही जखम खोल नव्हती. बाण ताबडतोब उपटून काढण्यात आला आणि कुठल्याही तऱ्हेचा घबराट न दाखवता किंवा गोंधळून न जाता अकबर राजवाड्यात परत आला. खुनी माणसाला ताबडतोब पकडून त्याच्या शरीराची खांडोळी करण्यात आली. या कटात काही प्रतिष्ठित मंडळींचा हात असल्याचे उघडकीस येईल आणि "काही स्वामीनिष्ठ मंडळींवर वहीम येण्याचा संभव आहे" असे वाटून अकबराने या खुनी हल्ल्याबाबत अधिक चौकशी करण्यास नकार दिला. खुनी इसमाचे नाव कतलक फौलाद असे असून शर्फुद्दीन हुसेनच्या बापाचा तो गुलाम होता एवढे मात्र निश्चत समजले. जलौरहून बंड करून निघालेल्या अबुल माली-बरोबर तो होता. निष्णात हकिमांकडून बादशहाच्या जखमेवर उपचार करण्यात आले आणि जखम ८ दिवसांत भरून आली. २१ जानेवारी १५६४ रोजी अकबर पालखीतून आग्ऱ्यास जाण्यास निघाला आणि तेथे तो ३० तारखेला जाऊन पोचला.

या खुनी हल्ल्याची निरनिराळी कारणे अबुल फझल आणि अब्दुल कादिर बदायुनी यांनी दिली आहेत. अबुल फझलच्या म्हणण्याप्रमाणे खुनी माणूस हा शर्फुद्दीनच्या बापाचा दास्यमुक्त गुलाम असून अबुल मालीने अकबराचा खून करण्यासाठी त्याला पाठवून दिले होते. बदायुनी म्हणतो की राजधानीतल्या काही विशिष्ट प्रतिष्ठित घराण्यांच्या इज्जतीवर घाला घालण्याचा अकबराचा प्रयत्न होता. त्याविषयीची भीती आणि चीड यांची परिणती या हल्ल्यात झाली. शेख अब्दुल वासी याच्या सुंदर स्त्रीवर तरुण बादशहाची नजर गेली आणि त्याने अब्दुल वासीला आपल्या बायकोशी काडीमोड करण्यास भाग पाडले. बादशहाची आज्ञा मान्य करून नंतर शेख दक्षिणेत बिदरला निघून गेला आणि त्यानंतर त्याचे नावही ऐकू आले नाही. अकबराने या स्त्रीशी लग्न केले. अशाच प्रकारचे शरीरसंबंध जुळवून आणण्याकरिता खोजे आणि अशा कामात मध्यस्थी करणाऱ्या लोकांमार्फत वाटाघाटी चालू होत्या. म्हणून बदायुनीची हकीकत बरोबर दिसते. तसे नसते तर गुन्ह्याच्या हेतूची चौकशी करण्यात आणि त्याला चिथावणी देणाऱ्या लोकांची नावे शोधून काढण्यास अकबराने बंदी केली नसती. अशी बंदी अकबराने केली हे अबुल फझल कबूल करतो. हल्लेखोरास ताबडतोब ठार मारण्याचा हुकूम अकबराने दिला हे अबुल फझल आणि बदायुनी हे दोघेही लिहितात. आणि दिल्लीतील शेख या हल्ल्याला जबाबदार होते हे अकबराला ठाऊक होते म्हणून बादशहाने चौकशीला बंदी केली असे बदायुनी स्पष्टपणे म्हणतो. शिवाय या गोष्टी-पासून त्याने धडा घेतला असे दिसते, आणि बदायुनी म्हणतो की, राहिलेल्या दीर्घ आयुष्यात पुनः कधीही त्याने असले अपकीर्तिकारक कृत्य केले नाही. या वेळी अकबर २१ वर्षांचा तरणाबांड होता आणि ही लाजिरवाणी घटना त्याच्या दीर्घ आयुष्यात

पहिली आणि शेवटचीच ठरली याचे श्रेय त्याला दिले पाहिजे.

## जिझिया कर रद्द

१५६४ सालच्या मार्च महिन्यात एक महत्त्वपूर्ण पाऊल टाकून अकबराने आपल्या इच्छाशक्तीचे अद्भूत सामर्थ्य प्रकट केले. हिंदू लोकांवर दुजाभावाने लादलेला अत्यंत अप्रिय जिझिया कर त्याने रद्द केला. असे करून त्याने इस्लामी धर्माला सर्वत्र मान्य असलेली आठशे वर्षांची जुनी प्रथा मोडून टाकली आणि आपले मुसलमान मंत्री आणि सल्लागार यांचा सल्ला झुगारून दिला. महंमद बिन कासिम याने इ. स. ७११–१२ मध्ये सिंध जिंकल्यावेळेपासून जिझिया कर हिंदूंवर धार्मिक कर म्हणून लादण्यात आला होता. हिंदूंना 'झिम्मी' असे संबोधण्यात येत असे. निव्वळ आर्थिक दबाव आणून हिंदूंना इस्लामच्या गोटात ओढण्याचा त्यात हेतू होता. हिंदू लोक हे हीन आहेत असा छाप मारून दुय्यम प्रतीच्या नागरिकत्वात त्यांना लोटून देण्यात येत असे. याविरुद्ध मुस्लीम समाजाला किती तरी अधिक हक्क उपभोगता येऊन संपूर्ण नागरिकत्व प्राप्त होत असे. वस्तुत: मध्ययुगात हिंदुस्थानातील मुसलमान राजे स्वतःला फक्त मुसलमानांचे राजे समजत असत आणि या देशात इतर जे सर्व राहात असत ते " कर देणारे " असत आणि त्यांच्या प्रचंड संख्येमुळे त्यांचे निर्मूलन करणे शक्य नव्हते म्हणून त्यांना जगू देण्यात येत होते. तेव्हा जिझिया कर रद्द केल्याने खजिन्याला फार मोठी तूट सोसावी लागली हे तर खरेच; पण त्यामुळे राज्याच्या पूर्वापार चालत आलेल्या धोरणात मूलभूत बदल घडून आला. जिझिया कर रद्द केल्याचा हुकूम काढून आपण आपल्या सर्व प्रजाजनांचे, मग ते हिंदू असोत वा मुसलमान असोत, नि:पक्षपाती राजे आहोत हे अकबराने सिद्ध केले. अबुल फझल लिहितो, "या युगाच्या प्रभूच्या ( अकबराच्या ) अमाप सदिच्छा आणि दयाळूपणा यांच्या कृपेने दुसऱ्या धर्मांचे लोकसुद्धा सध्या एकदिलाने आणि एकधर्मीयाप्रमाणे कंबर कसून निष्ठेने आणि सेवाभावाने राज्याच्या प्रगतीकरिता झटत आहेत. तेव्हा या भिन्नधर्मीयांशी कट्टे वैर बाळगणाऱ्या, तिरस्करणीय आणि कत्तलीला बळी पडणाऱ्या जुन्या समूहाशी कशी बरे बरोबरी करता येईल ? "

अबुल फैझी, अबुल फझल आणि त्यांचा बाप शेख मुबारक यांच्या विचारांचा अकबराच्या धार्मिक आणि राजकीय मतांवर फार परिणाम झाला असा चुकीचा समज कधी कधी आढळतो. पण यांच्याशी संबंध येण्यापूर्वीच अकबराने युद्धकैद्यांना गुलाम करण्याची बंदी केली (१५६२), हिंदू यात्रेकरूंवरील कर रद्द केला (१५६३), जिझिया कर काढून टाकला (१५मार्च, १५६४) आणि हिंदूंना राजदरबारी नोकरीची द्वारे खुली केली (१५६२), याचा उल्लेख करणे

अवश्य आहे. फैझी १५६७ सालच्या सप्टेंबर महिन्यात पहिल्याप्रथम अकबराच्या दरबारी आला. त्यानंतर शेख मुबारक आणि अबुल फझल हे दोघे अनुक्रमे १५७३ व १५७४ साली आले. राज्यकारभारातल्या वर उल्लेखिलेल्या अमानुप प्रथा आणि अपमानास्पद कर हे अकबराने बंद केल्याचे वर्णन अबुल फझलने केले आहे. यावरून अगदी नि:संशय दिसून येते की सन १५६२ मध्ये जेमतेम २० वर्षांचा असतानाच अकबराला आपल्या कर्तव्याची स्पष्ट कल्पना होती आणि आपण आपल्या सर्व प्रजेचे, मुसलमानांचे तसेच हिंदूंचे, नि:पक्षपाती राजे आहोत हे त्याने सिद्ध केले होते. हे करण्यात त्याची न्याय्य आणि समबुद्धी इतकीच त्याची चतुर राजकारणी दृष्टीही दिसून येते. १५६२ सालच्या सुरवातीपासूनच तोडरमल, मानसिंग, भगवन्तदास, बेदीचंद, बिरबल, जलमल कछवा, लुंकरण इत्यादी वजनदार हिंदू त्याच्या पदरी होते. दरबारात असो किंवा शिकारीवर अथवा स्वारीवर असो, यांतले काही दरबारात आणि शिकारीच्या व इतर मोहिमांत त्याचे सततचे सोबती होते. राजा तोडरमलला मिळालेल्या बढतीमुळे मुसलमान सरदार आणि इतर अधिकारी यांना त्याचा मत्सर वाटू लागला आणि त्यांनी इ. स. १५६४ मध्ये अकबराकडे जोराचा निषेध प्रदर्शित केला आणि त्याला बडतर्फ करावे अशी मागणी केली. त्यांच्या अर्जाला उत्तर देताना अकबर म्हणतो, " तुमच्यापैकी प्रत्येकाने आपापल्या कारभारात हिंदू लोक नोकरीला ठेवले आहेत. मग मी माझ्या कारभारात एका हिंदूला नोकरीत ठेवले तर त्यात मी काय चूक केली ?" यावरून १५६२ मध्येच अकबराच्या मनाचा कल कसा होता हे दिसून येते.

## ख्वाजा मुअज्झमला दिलेली सजा

राजमाता हमिदा बानू बेगम हिचा सावत्र भाऊ ख्वाजा मुअज्झम हा हुमायूनशी असलेल्या आपल्या नात्याच्या तोऱ्यात लहानपणापासून सर्वांशी मोठ्या शिरजोरीने वागत असे. त्याने केलेल्या अनेक दुष्ट कृत्यांबद्दल त्याची अनेक वेळा दरबारातून हकालपट्टी पण करण्यात आली होती. त्याचा पहिला मोठा गुन्हा म्हणजे हुमायूनचा दिवाण ख्वाजा रशीदी याचा त्याने केलेला खून. त्यामागून असेच इतर गुन्हेही त्याने केले. अकबराच्या राज्याच्या सुरवातीसच मंत्री आणि इतर उच्च अधिकारी यांच्या मेळाव्यात मिर्झा अब्दुल्ला मुघल (बहुधा अकबराचा सासरा) यावर त्याने निष्कारण हल्ला चढविला होता. दुसऱ्या एका प्रसंगी बैरामखानाशी उद्धटपणे वागल्याबद्दल त्याला मक्केला हद्दपार करण्यात आले होते. तेथून आग्ऱ्याला परत आल्यावर क्षमा करून अकबराने त्याला पुन्हा दरबारात दाखल करून घेतले. तरीही त्याच्या वागण्यात काहीही फरक पडला नाही. आपली

बायको झुब्रा आघा हिचा खून ख्वाजा करणार आहे असे १५६४ च्या मार्च महिन्यात अकबराच्या कानावर आले. झुब्रा आघा ही शाही अंत:पुरातील वजनदार स्त्री बिबी फातिमा हिची मुलगी असून तिला आपल्या जहागिरीवर घेऊन जाऊन तिथे तिचा निकाल लावावा असे ख्वाजाच्या मनात होते. परिणामी हे भीषण कृत्य थांबविण्यासाठी शिकारीवर जाण्याचा बहाणा करून २० लोकांना बरोबर घेऊन अकबर यमुनेच्या पैलतीरावर गेला. 'यमुनेच्या पूर्व किनाऱ्यावर असलेल्या आपल्या घरी मी भेटीसाठी येत आहे' असा निरोप त्याने दोन माणसां-करवी ख्वाजाकडे पाठविला. त्याच वेळी ख्वाजाला घेऊन या दोघांनी घराजवळील रस्त्यावर यावे असेही सांगण्यात आले. अकबराचा निरोप मिळताच मुअज्झम रागाने लाल झाला आणि त्याने आपल्या बायकोला ठार मारले आणि तिच्या रक्ताने माखलेला खंजीर या दोघांपुढे टाकून 'परत जाऊन ही बातमी तुम्ही बादशहाला द्या' असा उद्धट जबाब त्याने त्यांच्याबरोबर पाठविला. या भीषण हत्येचा वृतान्त ऐकून अकबराच्या मनाला धक्का बसला. त्या दुष्टाच्या घरी पोचताच त्याच्या एका साथीदाराचा, तो अपाय करणार असे दिसल्यावरून, अकबराने शिरच्छेद करण्याचा हुकूम दिला. नंतर मुअज्झमचे हात व मान एकत्र बांधून इतर साथीदारांबरोबर त्याला नदीत बुडवून टाकण्यास सांगितले पण ख्वाजा नदीत बुडून मेला नाही. म्हणून अकबराने त्याला ग्वाल्हेरच्या किल्ल्यात कैद करून ठेवले. तेथे त्याचा मेंदू बिघडला आणि थोड्याच अवधीत त्याचा अंत झाला.

स्वत:च्या मामाला अकबराने जी योग्य शिक्षा दिली त्याचा सर्वांवर फार इष्ट परिणाम झाला. राजघराण्याशी कोणताही संबंध असो, किंवा राजदरबारी कुठलीही मानाची जागा असो, त्याची पर्वा न करता अकबर सर्व अपराध्यांना योग्य शिक्षा करण्यास मागेपुढे पाहात नाही हे सर्वांना कळून चुकले. कितीही जवळचा माणूस असला तरी राज्यकारभारात हस्तक्षेप करण्याला किंवा त्याच्या धोरणावर प्रभाव पाडण्याला कोणालाही वाव मिळत नसे हे अकबराने दाखवून दिले.

## काबूलमधील घडामोडी : अबुल मालीचा अंत

हिंदुस्थानातून हाकून दिल्यावर अबुल माली काबूलला गेला. तेथे मह-चुचक बेगम हिने त्याचे चांगले स्वागत केले. त्याचा खानदानी वंश, त्याचा रुबाब-दार चेहरा आणि आपला नवरा हुमायून याचा त्याच्याविषयीचा आदर लक्षात घेऊन तिने त्याला आसरा दिला; इतकेच नव्हे तर आपली मुलगी फकरुन्नीसा हिचे त्याच्याशी लग्न लावून दिले. पण उपकाराची आठवण ठेवणे किंवा दुय्यम स्थान स्वीकारणे अबुल मालीच्या स्वभावतच नव्हते.

स्वतःचाच एक गट निर्माण करून बेगमलाच ठार मारून सर्व सत्ता हाती घेण्याच्या खटपटीला तो लागला. एक दिवस शागुन आणि काझी झादा यांच्यासारख्या काही गुंडांना बरोबर घेऊन अंतःपुरातील बेगमच्या खोलीचे दार तोडून तो आत शिरला आणि त्याने बेगमला ठार मारले. ही घटना एप्रिल १५६४ च्या सुरुवातीस घडली. मिर्झा हकीमला आपल्या ताब्यात घेऊन त्याचा वकील हैदर कासीम कुभुर आणि तत्सम इतर स्वामीनिष्ठ अधिकारी यांना त्याने आपल्या मार्गातून बाजूला काढले. बेगमच्या घराण्याच्या बाजूच्या काही लोकांनी अबुल मालीला बळाने दडपून टाकण्याचा प्रयत्न केला पण उघड लढाईत त्यांचा पराभव होऊन किल्ला अबुल मालीच्या हातात पडला. घराण्याशी निष्ठा राखणारे अनेक सरदार या वेळी प्रांतात निरनिराळ्या ठिकाणी विखुरलेले होते. या सर्वांनी बदकशानचा मिर्झा सुलेमान याला कोसळलेली ही घोर आपत्ती कळवून हस्तक्षेप करण्याची विनंती केली. आपल्या आईच्या खुनामुळे मिर्झा हकीमला धक्का बसला होता आणि अबुल मालीच्या तापदायक वर्चस्वावर तो चिडला होता. त्याने पण त्याच हेतूने आपले जासूद गुप्तपणे बदकशानला पाठविले. त्याप्रमाणे सुलेमान मिर्झा काबूलवर चाल करून आला. मिर्झा हकीमला बरोबर घेऊन अबुल माली घोडबंदच्या पुलाजवळ आला आणि तेथे त्याची व सुलेमानची लढाई झाली. काबुली लोकांनी माघार घेतली हे पाहून अबुल माली त्यांच्या मदतीस सरसावला. पण याच वेळी आपल्या सेवकांच्या चिथावणीने मिर्झा हकीमने आपला घोडा वळवून चाल करून येणाऱ्या बदकशी सैन्याकडे दौडत गेला. काबुली सैन्याचा संपूर्ण पराभव होऊन धडपडद्या अबुल मालीला कैद करण्यात आले आणि मिर्झा हकीमच्या हुकमावरून १३ मे १५६४ रोजी त्याला ठार मारण्यात आले. काबूल प्रांताचा तीनचतुर्थांश भाग आपल्या अनुयायांत वाटून देऊन राहिलेला चौथा भाग सुलेमान मिर्झाने मिर्झा हकीमच्या हवाली केला. तरुण राजपुत्र मिर्झा हकीम याला आपली मुलगी देऊन आणि उम्मीद अली नावाच्या एका बदकशीला त्याचा वकील नेमून सुलेमान मिर्झा बदकशानला परत गेला.*

---

* निजामउद्दीन अहमद खानाने आपल्या तबकत–इ–अकबरीमध्ये १७ वी रमजान, ९७१ हिजरी (३० एप्रिल १५६४) ही अबुल मालीच्या मृत्यूची तारीख दिली आहे. मी अबुल फझलची तारीख मान्य करतो. कारण त्याने अकबरच्या कारकीर्दीचा कालक्रम फार परिश्रम घेऊन ठरविला आहे.

# प्रकरण सहावे

## गोंडवनावर विजय : उझबेकांचा बीमोड

### १५६४ पूर्वीचे गोंडवन

गोंडवन किंवा गढ–कटंगा हा एक विस्तीर्ण आणि संपन्न प्रदेश होता. त्यातील मुख्य शहर गढ आणि जबलपूर जिल्हयातील प्रमुख गाव कटंगा यावरून या मुलखाला हे नाव पडले होते. त्याच्या पूर्वेस झारखंड, उत्तरेस भाथाचे राज्य, दक्षिणेस दख्खनचे पठार आणि पश्चिमेस माळव्यातील रायसीन संस्थान होते. त्याचे क्षेत्रफळ पूर्व-पश्चिम ३०० मैल लांब आणि दक्षिणोत्तर १६० मैल रुंद होते. त्यामध्ये दाट वस्तीची पुष्कळ शहरे व गावे आणि अनेक मजबूत किल्ले होते. एकंदर ७०,००० खेडी या मुलखात असून त्यांची राजधानी चौरगडला होती. यातील मख्य वस्ती बव्हंशी गोंड लोकांची असून (ज्या–वरून त्याला गोंडवन हे नाव पडले) बाकी वस्ती लहान लहान खेड्यांतून राहणाऱ्या आदिवासी टोळ्यांची होती. या लोकांचा मुख्य व्यवसाय शेती असून ते मोठ्या सुखासमाधानाने आपले आयुष्य कंठित असत. खाणेपिणे आणि वैवाहिक जीवनाची मजा लुटणे ही त्यांच्या जीवनाची इतिकर्तव्यता होती. पूर्वीच्या काळी या प्रांतात लहान लहान राज्ये होती आणि त्यांवर गढ, गरोला, हरिया (हराई), सालवानी, डांकी, कथोळा, मुगडा, मांडला, देवहर, लांजी इत्यादींचे राजे स्वतंत्रपणे राज्य करीत होते. ह्या राजांच्या सैन्यांत बहुतेक सर्व पायदळ असून घोडेस्वार फारच थोडे होते. पण तेथल्या भौगोलिक परिस्थितीमुळे दिल्लीच्या सुलतानांना किंवा शेजारच्या माळवा, बिहार आणि बंगालच्या मुसलमान राजांना गोंडवन कधीच पादाक्रांत करता आले नाही. इ. स. १५६४ पर्यंत गोंडवन अनिर्बंध स्वातंत्र्य उपभोगीत होते.

## गोंडवनाचे राजघराणे

गोंडवनाची राणी दुर्गावती ही एक रजपूत राजकन्या रथ आणि महोबाचा चंदेल राजा शालिवाहन याची मुलगी व गढचा राजा दलपत याची विधवा स्त्री होती. ती अकबराची समकालीन विलक्षण रजपूत राज्यकन्या होती. आपल्याला वाईट दिवस आलेले पाहून तिच्या बापाने आपला रजपूत अभिमान गुंडाळून ठेवून आपल्यापेक्षा कनिष्ठ सामाजिक दर्जाचा गढचा राजा अमनदास याच्या मुलाबरोबर तिचे लग्न लावून दिले. अमनदास हा एक समृद्ध राज्याचा श्रीमान राजा असून तो गुजराथच्या बहादूरशहाने बहाल केलेला संग्रामशहा हा किताब धारण करीत असे. १५४८ साली दलपतच्या मृत्यूनंतर राणी दुर्गावती वीर नारायण या आपल्या पाच वर्षांच्या मुलाची राजमुखत्यार झाली. आपले दोन मंत्री अधर कायस्थ आणि मान ब्राह्मण यांच्या साहाय्याने सोळा वर्षे तिने यशस्वीरीतीने राज्याचा कारभार चालविला. तिने २०,००० घोडेस्वार, १००० हत्ती व बरेच मोठे पायदळ असे सुसज्ज सैन्य खडे केले. तिचे एकंदर सशस्त्र सैन्य यापेक्षा पुष्कळच मोठे असले पाहिजे. आपल्या पतीच्या पूर्वजांच्या पावलावर पाऊल ठेवून तिने आपल्या राज्याचा विस्तार खूप वाढवला आणि आपले शौर्य, औदार्य आणि चातुर्य यांच्या जोरावर सर्व गोंडवनाचे राजकीय ऐक्य घडवून आणले. तिच्या राज्यातल्या २३,००० गावांपैकी १२,००० गावे तिच्या प्रत्यक्ष शासनाखाली होती. बाकीची ११,००० तिच्या मांडलिकांच्या हातात होती. तिचा राज्यकारभार अतिशय चोख होता.

## राणी दुर्गावती : स्वभाव आणि गुणविशेष

' राणी ' या नावाने ओळखली जाणारी राणी दुर्गावती हिला स्त्रीसुलभ सौष्ठव आणि सौंदर्य यांचे वरदान मिळाले होते. त्याचबरोबर पुरुषाला साजेल असे धैर्य, शौर्य आणि कर्तव्य तिच्यापाशी होते. इतिहासकार अबुल फझलने तिची तोंडभर स्तुती केली आहे. पण अकबराला शरण जाऊन त्याचे वर्चस्व कबूल न करणे हा एकच दोष तिच्यात होता असा शेरा भाबडेपणाने तो शेवटी मारून ठेवतो. तो लिहितो, " शौर्य आणि परिश्रम या गुणांचा तिच्यात अभाव नव्हता (शब्दशः उपेक्षा करीत नव्हती). दूरदृष्टीच्या कार्यक्षमतेच्या योगाने अनेक महत्त्वाची कामे तिने तडीस नेली. माळव्याचा बाजबहादूर आणि सिरोजचे अफगाण मियाना यांच्याशी तिचे मोठे झगडे झाले पण त्यात ती नेहमीच विजयी झाली. बंदूक आणि धनुष्य या दोन्हींचा तिचा नेम अचूक असून शिकारीचा तिला फार नाद होता. आपल्या बंदुकीने ती शिकार

हमखास टिपत असे. एखादा वाघ आला आहे असे समजताच त्याची शिकार करीपर्यंत ती पाण्याला स्पर्श करीत नसे. तहाच्या वाटाघाटीत आणि समरांगणात तिने दाखवलेल्या पराक्रमांच्या कथा सर्व हिंदुस्थानात प्रचलित होत्या." *

## असफखानाची गोंडवनावर स्वारी

कारामाणिपूरचा (हल्लीचा अलाहाबादचा प्रदेश) सुभेदार असफखान याने राणीच्या राज्याच्या उत्तर सीमेवर असलेले भाठा (हल्लीचे रेवा) सर केल्यामुळे त्याचा गोंडवनाशी संपर्क आला. गोंडवनाची समृद्धी आणि संपत्ती पाहून त्याला त्याची हाव सुटली. सुरुवातीस त्याने गोंडवनातील लोकांशी मैत्रीचे संबंध सुरू करून स्वत:च्या प्रदेशाशी सुरळीत व्यापार करण्यास उत्तेजन दिले. त्याचबरोबर आपले हेर गोंडवनात पाठवून राणीचे लष्करी सामर्थ्य, खजिना आणि आयव्यय यांच्या परिस्थितीबद्दल माहिती गोळा केली. नंतर त्याने सरहद्दी-वरल्या गावांवर हल्ले करण्याचे धोरण पत्करले आणि अकबराच्या परवानगीने गोंडवन जिंकून घेण्याचा चंग बांधला. सर्व उत्तर हिंदुस्थान पादाक्रांत करण्याची योजना तरुण बादशहाने आधीच आखली होती आणि गोंडवन किंवा इतर कोणताही मुलूख, मग त्याचा कारभार किती का चांगला असो किंवा त्याच्याशी सख्य असो, त्यावर स्वारी करण्यास त्याला दुसऱ्या कोणत्याच सबबीची गरज नव्हती. आपले लष्करी सामर्थ्य, आपल्याजवळची साधनसामग्री आणि आपले कर्तृत्व यांवर पूर्ण भरंवसा असल्यामुळे तिच्या राज्यावर प्रत्यक्ष प्रचंड स्वारी होईपर्यंत अशा एखाद्या लोभी शेजाऱ्याची भीती किंवा शंकाही तिला वाटली नाही. पण जेव्हा असफखानच्या हाताखाली १०,००० निवडक घोडदळ आणि फार मोठे पायदळ असलेले शाही सैन्य आणि त्याच्या मदतीला देण्यात आलेले मुहिब अलीखान, महम्मद मुरादखान, वजीरखान आणि कित्येक अधिकारी आणि आसपासच्या मुलखाचे जहागीरदार त्यांच्या कित्येक तुकड्यानिशी तिच्या प्रदेशात दूरवर घुसले आणि १५६४ च्या मध्याच्या सुमारास दमोह या गावाजवळ पोहोचले तेव्हा राणी दुर्गावती चकित झाली. तिचे सैन्य विखुरले होते. काही ग्रामीण परिसरात कामावर होते. इतर आपल्या कुटुंबांना सुरक्षित स्थळी नेऊन ठेवण्यासाठी घरोघर रजेवर गेले होते आणि राजधानीत राणीजवळ फक्त ५०० लोकांची तुकडी होती. तथापि आजपर्यंत शत्रूबरोबर सामना करण्यात कधीही माघार न घेतलेल्या राणीने ताबडतोब आपल्या सैन्याची जमवाजमव करून शत्रूचा प्रतिकार करण्याची तयारी केली. ही तयारी पूर्ण होण्यापूर्वीच ती असफ-

* बदायुनी तिच्या शौर्याखेरीज तिचे लावण्य आणि मोहकता यांचे वर्णन करतो. निजामउद्दीन अहमदखानही तिच्या सौंदर्याविषयी लिहितो. देखणेपणा बुद्धिमत्ता आणि चारित्र्य यांचे तिला वरदान होते असे फेरिस्ता लिहितो.

खानवर चालून गेली. तिचा मुख्य मंत्री अधर याने मुघल सैन्य संख्येने फार मोठे आणि सुसज्ज असल्याचे सांगून घाईने कोणतीही कृती न करण्याचा सल्ला दिला. त्यावर राणी खूपच संतापली आणि सैन्य पांगल्याबद्दल तिने त्या मंत्र्यालाच जबाबदार धरले. ती म्हणाली, "इतकी वर्षे देशावर राज्य केल्यावर आता काय मी पळून जाऊ ? पराभवाची बदनामी स्वीकारण्यापेक्षा मोठे शौर्य गाजवून लढाईत मेलेले काय वाईट ?" अकबर स्वतः आपले सैन्य घेऊन आला असता तर वाटाघाटी, तह किंवा शरणागती याचा कदाचित तिने विचार केला असता. पण असफखानसारख्या एखाद्या मामुली सुभेदाराबरोबर वाटाघाटी करण्याइतके खाली येणे तिला कमीपणाचे वाटले. तेव्हा "आता शौर्याने लढून मरणेच सर्वथा उत्तम" असा निश्चय करून मुघल सैन्यांच्या दिशेने राजधानी सोडून ती चार टप्पे पुढे सरकली. यात शत्रूला चकविण्याचा पण तिचा हेतू असावा. राणी दुर्गावती ही दमोहच्या मार्गाने निघाली आहे हे समजताच राजधानीच्या मार्गाने जलद कूच करून येणारा असफखान दमोह येथेच थांबला. दरम्यान राणीच्या भोवती २००० सैन्य जमा झाले होते. एखाद्या सुरक्षित जागी मोर्चे बांधून अधिक सैन्य जमा होईपर्यंत प्रत्यक्ष लढाई काही दिवस पुढे ढकलावी, असा तिच्या लष्करी अधिकाऱ्यांनी दिलेला सल्ला बाजूला सारून अत्यंत विषम परिस्थितीशी सामना देण्याकरिता ती पुढे घुसली. दाट जंगलातून मार्ग काढीत ती गढ शहराच्या पश्चिमेस येऊन पोचली आणि तेथून उत्तरेकडे वळून दुसऱ्या एका जंगलातून गढच्या पूर्वेस असलेल्या नऱ्ही या गावी पोचली. हे गाव गढच्या पूर्वेस असून त्याभोवती डोंगरांची उंचउंच शिखरे असून एका बाजूस गौर नदी आणि दुसऱ्या बाजूस नर्मदेचे विशाल पात्र होते. मुघल सैन्याशी सामना देण्याकरिता तिने शहाणपणाने या मोक्याच्या जागेची निवड केली.

## नऱ्हीची लढाई; दुर्गावतीचा पराक्रम

अशा तऱ्हेचे नैसर्गिक रक्षण असलेल्या नऱ्ही गावाला जाण्याची वाट नदीच्या दरीमुळे तयार झालेल्या अवघड आणि अरुंद खिंडीतून होती. राणीचा मुक्काम नक्की कोठे आहे याचा पत्ता असफखानने पाठवून दिलेल्या हेरांना लागेना. म्हणून त्याने गढाकडे कूच केले. दमोह व गढ यांच्यामधला मुलूख त्याने आपल्या ताब्यात घेतला. राणीचा मुक्काम नऱ्हीला आहे असे कळताच सैन्याच्या ताब्यात गढ देऊन तो नऱ्हीच्या दिशेने निघाला. असफखानच्या हालचालीची बातमी लागताच राणीने आपल्या प्रमुख अधिकाऱ्यांची बैठक घेऊन त्यांना लढण्याला प्रवृत्त केले. तिच्या सैन्याची संख्या आता ५००० झाली होती आणि जंगल आणि डोंगर यांच्या आश्रयाने अधिक काळ लपून राहणे शक्य नव्हते. लढाई करण्यास नाखूष असलेल्या लोकांनी हवे तिकडे निघून जावे

अशी परवानगी पण तिने दिली. तिच्या भाषणाचा योग्य तो परिणाम होऊन सर्वांनी युद्ध करण्याचे ठरविले. पण दुसऱ्याच दिवशी नझर महंमद आणि आक महंमद यांनी मोठ्या मुघल सैन्यासह नऱ्हीकडे जाणाऱ्या खिंडीच्या दाराशी असलेल्या दरीचा माथा काबीज केला असून त्या खिंडीचे रक्षण करता करत राणीच्या हत्तीदलाचा प्रमुख अर्जुनदास बायस मारला गेला अशी अस्वस्थ करणारी बातमी तिच्या कानावर आली. ही बातमी ऐकताच राणीला चेव चढला. अंगावर चिलखत आणि शिरस्त्राण चढवून ती एका हत्तीवर स्वार झाली. हळूहळू पुढे सरकून शत्रूला खिंडीत शिरू द्यायचे आणि नंतर त्याच्यावर सर्व बाजूंनी हल्ला करून त्याला खलास करावयाचे असा आदेश तिने आपल्या सैन्याला दिला. राणीचा होरा खरा ठरला. तिच्या लहानशा सैन्याने आपल्याहून दसपट मोठ्या असलेल्या सैन्याचा पराभव केला. तिथल्या युद्धात ३०० निधडे मुघल ठार झाले आणि बाकीचे पळून जात असता शूर राणीने त्यांचा जोराचा पाठलाग केला. या विजयानंतर राणीने आपल्या युद्धमंडळाची बैठक घेऊन जवळच असलेल्या असफखानच्या सैन्यावर रातोरात हल्ला चढविण्याची सूचना केली. तसे न केल्यास दुसऱ्या दिवशी शत्रू खिंडीचा कब्जा घेऊन तेथे आपल्या तोफा डागील आणि मग तिथून त्याला हुसकावून लावणे अशक्यप्राय होईल असे तिचे म्हणणे होते. कारण दुर्गावती-जवळ कुठल्याच तऱ्हेचा तोफखाना नव्हता. तिच्या लष्करी अधिकाऱ्यांना तिचा सल्ला मान्य न झाल्यामुळे ती आपल्या छावणीत परत आली. तेथे युद्धात पडलेल्या सैनिकांच्या नातेवाइकांचे तिने सांत्वन केले आणि संध्याकाळी पुनः एकदा शत्रूवर रात्रीच हल्ला करण्याच्या औचित्याबद्दल आपल्या सेनापतींना आर्जवाने सांगून पाहिले. "पराक्रमात तिची बरोबरी करणारा एकही सेनापती तिच्या सैन्यात नव्हता." तिच्या या शहाणपणाच्या सूचनेला बहुतेकांचा विरोध असल्यामुळे तिला हार घ्यावी लागली. राणी म्हणत होती तेच बरोबर होते. कारण दुसऱ्या दिवशी सकाळीच खिंडीचा ताबा घेऊन असफखानने आपल्या तोफा डागून ठेवल्या. आपल्या सारमान या सर्वोत्तम हत्तीवर स्वार होऊन राणी दुर्गावती मुघल सैन्याशी सामना करण्यास निघाली. दोन्ही सैन्यांमध्ये सकाळ-पासून दुपारी ३ वाजेपर्यंत घनघोर लढाई झाली. राणीचा मुलगा राजा वीर नारायण आता २१ वर्षांचा झाला होता. त्याने या युद्धात अत्यंत शौर्याने लढून बादशाही सैन्याचे हल्ले तीन वेळा परतवून लावले. पण दुपारी ३ च्या सुमारास झालेल्या शेवटच्या हल्ल्यात तो जबर जखमी झाला आणि राणीने त्याला एखाद्या सुरक्षित स्थळी घेऊन जाण्याची आज्ञा दिली. वीर नारायण रणांगणातून नाहीसा झालेला पाहून गोंडवनच्या सैन्याचा धीर खचला आणि पराभव अटळ आहे असे वाटून युद्धातून ते पळून गेले. आता राणीजवळ फक्त ३०० लोकच राहिले. पण

त्यामुळे खचून न जाता तिने शौर्याने युद्ध चालूच ठेवले. तथापि दुर्दैवाने शत्रू-कडून आलेले दोन बाण तिला लागून ती जखमी झाली. पहिला बाण तिच्या उजव्या कानशिलात शिरला आणि दुसरा तिच्या मानेत घुसला. दोन्ही बाण तिने हाताने ओढून काढले पण त्यांपैकी एका बाणाचे टोक तिच्या जखमेतच रुतून बसले, आणि त्यामुळे ती मूर्छित झाली. शुद्धीवर येताच आपण लढाई हरलो हे तिला कळून चुकले. तेव्हा तिने आपला माहूत अधर वाघेला याला तीक्ष्ण कटचारीने स्वत:स ठार करावयास सांगितले. यात शत्रूच्या हाती जिवंत न सापडण्याचा तिचा उद्देश होता. तसे करण्यास मोठ्या आदबीने नकार देऊन 'हत्तीला मी जलद सुरक्षित स्थळी घेऊन जातो' असे त्याने तिला सुचविले. युद्धातून पळून जाण्याची किंवा शत्रूला पाठ दाखविण्याची कल्पनादेखील सहन न होऊन राणीने आपल्या हातानेच छातीत खंजीर खुपसून घेऊन आत्महत्या केली. शूर लढवय्याप्रमाणे तिचा अंत झाला. "गोंडवनातील जनतेवर १६ वर्षे लोकहित-कारक राज्य केल्यानंतर राणीचा अशा रीतीने अंत झाला. तिच्याबरोबरच कुंवर कल्याण वाघेला, चक्रमण, खान जहान, महासुख इत्यादी तिचे अनेक एकनिष्ठ साथीदार अखेरपर्यंत निकराने लढता लढता धारातीर्थी पडले. असफखानला फार मोठा विजय मिळाला आणि तितकीच मोठी लूट मिळाली, त्यात १००० हत्ती होते. *

## चौरागडची लढाई : गोंडवनाचा मुघल राज्यात समावेश

नऱ्हीच्या विजयानंतर जिंकलेल्या गोंडवनाच्या मुलखाची व्यवस्था लावण्या-करिता आणि झालेली हानी भरून काढण्याकरिता असफखानला दोन महिने लागले. त्यानंतर नरसिंगपूरच्या नैर्ऋत्येस २० मैलांवर असलेले राजधानीचे चौरागड हे शहर काबीज करण्यासाठी तो निघाला. त्याला सामना देण्यासाठी वीर नारायण किल्ल्यातून बाहेर पडला आणि नंतर झालेल्या छोटयाशा लढाईत "मोठा पराक्रम गाजवून मृत्युमुखी पडला." भोज कायस्थ आणि भिकारी रुमी यांच्या देखरेखीखाली त्याच्या घरातील स्त्रिया जोहार करून अग्नीच्या भक्षस्थानी पडल्या. "या अत्यंत शूर गुलाबाच्या बहराची राखरांगोळी झाल्यानंतर" चार दिवसांनी राणीची बहीण कमलावती आणि राजा वीर नारायणची वाग्दत्त वधू—पुरागडच्या राजाची मुलगी-या दोघी एका मोठ्या लाकडाच्या ओंडक्याखाली जिवंत सापडल्या. त्यांना अक-बराच्या जनानखान्यात पाठवून देण्यात आले. चौरागडच्या किल्ल्यातील अगणित

* अबुल फझल आणि फेरिश्ता यांच्या म्हणण्याप्रमाणे राणीने स्वत:ला ठार मारले. पण निजामउद्दीन आणि बदायुनी यांच्या मते तिच्या आज्ञेवरून माहुताने तिला ठार केले.

संपत्ती आणि सोन्याचांदीचा प्रचंड साठा आसफखानच्या हाती पडला. यामध्ये सोन्याचांदीच्या लडी आणि नाणी असून अल्लाउद्दिन खिलजीच्या अशरफीने भरलेले १०० हंडे होते. याशिवाय कोरीव काम केलेली चांदीची भांडी, रत्नखचित मूर्ती, अनेक सोन्याचे प्राणी, चित्रे, मोती आणि रत्ने ही पण आसफखानाच्या हातांत पडली. ही सर्व संपत्ती आणि रोकड त्याने आपल्याकडे जमा केली. मिळालेल्या १००० हत्तींपैकी २०० हत्तींखेरीज दुसरे काहीही आसफ-खानने अकबराकडे पाठविले नाही. करा माणिकपूर आणि भाठा यांच्या जोडीला गोंडवनाची भर पडल्यामुळे अकबराची सत्ता आणि प्रतिष्ठा खूपच वाढली.

## अफगाणांवर खान-इ-झमनचा तिसरा विजय

इ. स. १५६४ मध्ये पूर्व भागातील अफगाण लोकांनी आपले वर्चस्व परत प्रस्थापित करण्याचा तिसरा प्रयत्न केला. बिहारमधील रोहटसगडच्या अभेद्य किल्ल्यावरून उतरून आपला भाऊ हसन खान आणि मल्लू खानसारखे आपले मुख्य सरदार याना घेऊन फाथखान बटानीने बिहार काबीज करून पश्चिमेकडे कूच करून खान-इ-झमनच्या सुभेदारीतला काही मुलूख त्याने ताब्यात घेतला. सलीमखानचा मुलगा आवाझ खान याला त्याने अफगाणांचा राजा म्हणून गादीवर स्थापन केले. खान-इ-झमन त्यांच्यावर चाल करून गेला, पण शत्रू आपल्याला भारी आहे असे पाहून शोण नदीच्या तीरावरील अंध्यारी बारीच्या किल्ल्यांत ठाण देऊन बसला. किल्ल्याबाहेर खान-इ-झमनच्या सैन्यावर हल्ला करून अफगाणांनी त्याची धूळधाण उडविली. ते सैरावैरा पळून गेले. विजयी अफगाणांनी खान-इ-झमनची छावणी आणि सगळी सामग्री लुटली. त्यांचा पुढारी हसन बटानी किल्ला सर करून घेण्यासाठी पुढे सरसावला, पण मृत्यू आला तरी बेहत्तर अशा निश्चयाने खान-इ-झमनने निकराने किल्ला लढविण्याचे ठरविले. किल्ल्याच्या एका बुरुजावरून सोडलेला तोफेचा गोळा हसन बटानीच्या हत्तीच्या तोंडावर बसून हत्ती तावडतोब ठार झाला. त्यामुळे अफगाण सैन्यात गोंधळ माजला. याच वेळी अफगाण माहुतांच्या ताब्यात असलेल्या बहादूर खान उझबेक याच्या एका मोकळ्या सुटलेल्या हत्तीने अफगाण सैन्यातल्या एका हत्तीवर हल्ला करून त्याला मारून टाकले. यामुळे एकच ओरड उठली. लुटीत गुंतलेले अफगाण सैन्य मोगल सैन्याची कुमक येऊन पोचली असे समजून घाबरून पळून गेले. खान-इ-झमनने आपले पळणारे सैन्य पुनः एकत्र करून पळून चाललेल्या अफगाणांचा पाठलाग केला. अशा तऱ्हेने पराभवाचे विजयात रूपांतर झाले आणि तो मोठ्या थाटाने जौनपूरला परत आला.

## अब्दुल्ला खान उझबेकचे बंड

शासकांच्या बाबतीत माळवा दुर्दैवी होता. आदम खानला काढून टाकण्यात आले. पीर महंमद खान "आगीतून निघून पाण्यात" पडला आणि अब्दुल्ला खान हा कार्यक्षम कारभार करीत होता, तरी तो लोभी आणि बंडखोर निघाला. म्हणून त्याचे पारिपत्य करण्यासाठी १ जुलै १५६४ रोजी म्हणजे ऐन पावसाळ्यात, प्रतिकूल हवेची पर्वा न करता, अकबर आग्र्याहून निघाला. बंडखोर सुभेदाराला धडा शिकवावा आणि वाटेत रानटी हत्ती पकडावेत अशा दुहेरी हेतूने बादशहा निघाला होता. अतिवृष्टीने चंबळ नदीला महापूर आला असल्यामुळे ती ओलांडून जाण्यास त्याच्या सैन्याला दोन आठवडे लागले. ग्वाल्हेरच्या मार्गाने आगेकूच करून अकबर नरवारच्या घनदाट जंगलात शिरला. तेथे रानटी हत्तींची शिकार करण्याच्या धोक्याच्या खेळात कित्येक दिवस त्याने घालविले. नरवार ते सारंगपूर हा प्रवास पाऊस, चिखल आणि पूर यांमुळे फार त्रासदायक झाला. " घोडे छातीपर्यंत चिखलात रुतून बसले आणि उंटांना आपल्या केसांचाही भार वाटू लागला." या सर्व नैसर्गिक अडचणींस न जुमानता खिरार ते सारंगपूर ही ८० मैलांची मजल घोड्यावरून एका दिवसात पुरी करण्याची अजब करामत अकबराने केली. तेथून तो उज्जैनला आणि नंतर धारला गेला. धारला पोचल्यावर अब्दुल्ला खान मंडूच्या किल्ल्यात असून तो आपल्याला भेटून शरण येण्याचा संभव नाही असे अकबराला समजले. यानंतर काही दिवसांनी मंडूपासून ७ मैलांवर आणि धारच्या दक्षिणेस असलेल्या लावानी या गावाकडे अब्दुल्ला खान पळून गेला आहे अशी बातमी आली. तेव्हा अकबराने त्या बंडखोराचा पाठलाग सुरू केला. अब्दुल्ला खान गुजराथच्या दिशेने पुढे पळू लागला. ५ ऑगस्ट रोजी संध्याकाळी अकबर लावानीला पोचला आणि दुसऱ्या दिवशी म्हणजे ६ तारखेस अकबराची आघाडीची फौज आणि अब्दुल्ला खानचे सैन्य यांच्यामध्ये बाघ या गावाजवळ लढाईला तोंड लागले. आपल्याबरोबर ३०० लोकांना घेऊन अकबर लवकरच युद्धस्थळी दाखल झाला आणि त्याने लढाईत शौर्याने भाग घेतला. १००० पेक्षाही अधिक घोडेस्वार जवळ असलेल्या अब्दुल्ला खानचा पराभव होऊन त्याच्या सैन्याची फार मोठी कत्तल झाली. बंडखोराचा पाठलाग करीत ७ ऑगस्ट रोजी सकाळी छोट्या नागपूरच्या पूर्वेस असलेल्या अली राजपूर या गावी अकबर येऊन पोचला. अकबराच्या आघाडीच्या सेनेने चंपानेरजवळच्या खिंडीत अब्दुल्ला खानला गाठून त्याचा पुन: पराभव केला. त्याचा जनानखाना आणि खजिना विजयी सैन्याच्या हातांत पडला. कसाबसा जीव बचावून अब्दुल्ला खान गुजराथला पळून गेला. यानंतर अकबर १० ऑगस्ट रोजी मांडूला परत आला. तेथे जवळ जवळ महिनाभर राहून माळ-

त्याच्या कारभाराची घडी त्याने नीट बसवून दिली. गुजराथचा राजमुखत्यार चिंगीझखान याच्या आश्रयाला जाऊन राहिलेल्या अब्दुल्ला खानला आपल्या ताब्यात द्यावे किंवा त्याला बडतर्फ करावे अशी त्याने मागणी केली. चिंगीझखानाने सामोपचाराचे उत्तर अकबराकडे धाडून अब्दुल्लाला माफी करावी अशी याचना केली. पण त्याच वेळी माफीची विनंती मान्य न झाल्यास अब्दुल्ला खानला गुजराथ-मधून हाकून देण्याचे त्याने कबूल केले. करा बहादूर खान याला माळव्याचा सुभेदार नेमून आणि मुकरीब खान याला हंडियाची जहागीर देऊन इ. स. १५६४ च्या सप्टेंबरच्या पहिल्या आठवड्याच्या अखेरीस अकबर आग्र्यास परत जाण्यास निघाला. वाटेत शिप्रीच्या जंगलात त्याने पुष्कळ रानटी हत्ती पकडले. ८ ऑक्टोबर रोजी तो आग्र्यास येऊन पोचला.

**अकबराचा खानदेशच्या राजकन्येशी विवाह**

मांडूला तळ देऊन असताना अकबराने खानदेशचा राजा मीरान मुबारक शहा याच्याकडे त्याच्या मुलीसाठी मागणी घातली. राजाने ही मागणी मोठ्या आनंदाने मान्य केली. दरबारचा मुख्य खोजा ऐतीमदखान हा राजकन्येला घेऊन आला आणि सप्टेंबर १५६४ मध्ये ती अकबराच्या जनानखान्यात दाखल झाली. या वेळी अकबराचा दरबार आग्र्याच्या मार्गावर मांडूपासून एका टप्प्यावर होता.

**जुळ्या मुलांचा जन्म**

याच सुमारास अकबराला दोन जुळी मुले झाली. त्यांची नावे हसन आणि हुसेन अशी ठेवण्यात आली. पण जन्मल्यानंतर एकच महिन्यात तीं मरण पावली.

**नगरचैनचा पाया घातला (१५६४)**

१५६४ च्या ऑक्टोबर महिन्यात मांडूहून परत आल्यावर ककराली या गावी राहण्यासाठी हवेल्या बांधण्याचा आणि सुंदर बगीच्यांची आखणी करण्याचा हुकूम अकबराने दिला. आग्र्याच्या दक्षिणेस सात मैलांवर आणि ग्वाल्हेरच्या रस्त्यापासून सुमारे एक मैल आत ककराली गाव होते. अकबराला ही जागा फार आवडली होती. शिकारीवर असताना तो पुष्कळ वेळा येथे मुक्काम करीत असे. तिथल्या रम्य कुरणात ससाण्यांच्याकरवी पक्ष्यांची शिकार करण्यात त्याला मोठी मौज वाटे. त्याच्या सरदारांनी आणि अधिकाऱ्यांनीही स्वतःसाठी तेथे घरे बांधली व बागा सजविल्या. या खेडेगावाला लहानशा शहराचे स्वरूप आले आणि अकबराने त्याला नगरचैन ( विश्रांतीचे नगर ) असे नाव दिले. बादशहाचे ते आवडते स्थान झाले. तेथे धाकाच्या पेटत्या गोळ्याने तो रात्रीच्या वेळी पोलो खेळत असे (धाक हे एक प्रकारचे लाकूड असून ते पेटविले

म्हणजे ते धुमसत राहते. ) आणि शिकारीचा आनंद लुटत असे. कालांतराने अकबराच्या हुकमावरून तेथल्या सरकारी इमारती पाडून टाकण्यात आल्या. बदायुनीने मुनताखाब–उत्–तवारीख लिहिली त्या वेळेस त्या इमारतींचा मागमूस-देखील राहिला नव्हता. आता हे गाव अगदी ओसाड पडले असून तेथे एक विहीर आणि काही कबरींचे अवशेष आणि हल्लीच्या काकुवा गावाच्या पश्चिमेस असलेली दोन थडगी याशिवाय काहीही शिल्लक राहिलेले नाही.

नगरचैनची रचना कामचलाऊ होती. याच वेळी आग्र्याचा किल्ला बांधण्याचे काम सुरू झाले. तेव्हा तिथल्या गोंगाटापासून स्वस्थता मिळावी आणि शाही कुटुंबाची आणि दरबाराची तात्पुरती व्यवस्था व्हावी यासाठी त्याची योजना होती.

## मिर्झा सुलेमानची काबूलवरची तिसरी स्वारी परतून लावली

हुमायूनच्या मृत्यूपासूनच मिर्झा सुलेमानची काबूलवर लोभी नजर होती. इ. स. १५६४ च्या मे महिन्यात अबुल मालीचा पराभव केल्यानंतर काबूलवर कबजा मिळविण्याची तीव्र इच्छा मिर्झा सुलेमानला झाली. आपण काबूल बळकावले तरी त्याला आक्रमण केल्याचे स्वरूप येऊ नये म्हणून त्याने आपले अधिकारी आणि सैन्य छोटया छोटया तुकडयांनी मधून मधून काबूलच्या निरनिराळया भागांत पाठवून दिले. यात काबूल व्यापून मिर्झा हकीमला नामधारी सुभेदार बनवावे आणि शेवटी त्याला काबूलमधून काढून बदकशानमधील कुठला तरी एक सुभा त्याला द्यावा असा त्याचा बेत होता. मिर्झा हकीम आता वयात आला होता आणि त्याने आपल्या राज्यावरील या आक्रमणाचा प्रतिकार केला आणि सर्व बदकशी लोकांना काबूलमधून हाकून दिले. यामुळे चिडून जाऊन सुलेमानने काबूलवर स्वारी केली. राजधानीच्या रक्षणासाठी आपले विश्वासू लोक ठेवून मिर्झा हकीम जलालाबादला गेला. हे समजताच तेथून त्याला कैद करून आणण्यासाठी सुलेमान जलालाबादकडे वळला. तेथून मिर्झा हकीम पंजाबमध्ये पळून गेला आणि अकबराकडे त्याने संरक्षणाची याचना केली. त्याचे दूत अकबराला नगरचैन या नव्याने वसलेल्या गावी येऊन भेटले. अकबराने ताबडतोब कुतुबुद्दिन खान ( खान–इ–कलन ) याला मिर्झा हकीमचा पालक नेमले आणि पंजाबचा सुभेदार मीर महंमद खान आणि इतर काही अधिकारी यांना मिर्झा हकीमला सुरक्षितपणे काबूलला घेऊन जाऊन काबूलची सुभेदारी त्याला परत मिळवून देण्याचा आदेश दिला. अकबराचे सरदार जलालाबादवर चालून गेले आणि सुलेमानाने नेमलेला तिथला किल्ले-दार कम्हार याला ठार करून जलालाबाद त्यांनी आपल्या ताब्यात घेतले. हे समजताच काबूलला वेढा देऊन बसलेला सुलेमान मिर्झा वेढा उठवून हात हालवीत बदकशानला निघून गेला.

मिर्झा हकीमच्या पुनःस्थापनेने प्रश्न सुटला नाही. काबूलच्या कारभाराची घडी नीट बसली नाही. याला कारण मिर्झाची महत्त्वाकांक्षा, अननुभव आणि काबुली लोकांची कारस्थाने ही होती. खान–इ–कलन याच्याकडे दुर्लक्ष करून हकीम त्याच्याविरुद्ध असलेल्या मंडळींचा सल्ला घेऊ लागला. तेव्हा खान–इ–कलन हिंदुस्थानात परत आला.

## रोहटासचे दौत्य

शेरशहा अफगाण आणि त्याचा मुलगा इस्लामशहा यांच्या दरबारी असलेला प्रसिद्ध सरदार फाथखान याच्या ताब्यात या वेळी रोहटासचा किल्ला होता. हा किल्ला आपल्या अंमलाखाली असावा असे अकबराच्या फार मनात होते. हा किल्ला अभेद्य समजला जात असून आजपर्यंत शेरशहाशिवाय दुसऱ्या कोणीही तो जिंकून घेतला नव्हता. शेरशहाने पण कपटानेच तो मिळवला होता. फाथखान हा धूर्त राजकारणी असून आज ना उद्या अकबर रोहटासचा किल्ला जिंकून घेण्याचा प्रयत्न करील हे त्याने ओळखले होते. त्याने आपणहूनच अकबर बादशहाच्या दरबारी वाटाघाटीस सुरुवात केली आणि अकबराचे आधिपत्य मानण्यास कबुली दिली. एक बादशाही फर्मान देऊन अकबराने कुलीजखानला रोहटासला पाठविले आणि फाथखान स्वतः त्याला जौनपूर–जवळ सामोरा आला. कुलीजखानने फाथखानचा धाकटा भाऊ हसनखान बटानी याला दरबारात आणून दाखल केले.

हुमायूनची विधवा स्त्री आणि अकबराची सावत्र आई हाजी बेगम हिला मक्का आणि इतर धार्मिक स्थळांना भेट देण्याची परवानगी देण्यात आली. मक्केला जाण्यापूर्वी हुमायूनच्या थडग्यावर दिल्लीत एक मोठी कबर उभारण्याची तिने व्यवस्था केली. या प्रवासात पुष्कळ लोक तिच्या बरोबर गेले.

## आग्र्याच्या किल्ल्याचा पाया घातला

इ. स. १५६५ मध्ये आग्र्याला यमुनेच्या पश्चिम तीरावर असलेला सिकंदर लोदीचा जुना विटांचा किल्ला पाडून टाकण्याची आज्ञा अकबराने दिली. हा किल्ला मोडकळीस आलेला असून बादशहाच्या उपयोगी पडण्यासारखा नव्हता. त्याच्या जागी तांबड्या दगडाने तेथे एक नवा किल्ला उभा करण्याचा आदेश त्याने दिला. राज्याचा मुख्य अभियंता, नौसेनाधिपती आणि बांधकामाचा प्रमुख मीर–बर–वा–बहर कासीमखान याच्याकडे हे काम सोपवण्यात आले. इमारतींचे पाये फार खोल खणण्यात आले. बाहेरच्या तटाच्या भिंती ९ फूट रुंद आणि १८० फूट उंच ठेवण्यात आल्या. त्याला चार मुख्य दरवाजे ठेवून

बुरूज, मातीचे तट आणि झरोके उभारण्यात आले. तटाच्या भिंतीचे दगड "असे बेमालूम बसवले आहेत की त्यांमधून एक केससुद्धा जाणे शक्य नाही." किल्ल्यामध्ये ५०० इमारती बांधल्या गेल्या. या एकंदर कामावर रोज ३ ते ४ हजार गवंडी आणि ८००० मजूर नेमले होते. फत्तेपूर सिक्रीच्या खाणीतून तांबडा दगड आणण्यासाठी १००० बैलगाड्या आणि दिल्लीहून पांढरा दगड आणण्यासाठी १०० बोटी खपत होत्या. किल्ल्याभोवतीचा खंदक ६० फूट रुंद आणि ३० फूट खोल होता. हा किल्ला बांधून पुरा होण्यास १५ वर्षे* लागली आणि त्याला ३५ लाख रुपये खर्च आला. त्याप्रीत्यर्थ प्रत्येक शेतकऱ्याकडून दर बिघ्यामागे ३ शेर धान्याची, बहुधा गव्हाची, किंमत घेण्यात आली.

## शेख अब्दुल नबीची मुख्य सदर म्हणून नेमणूक

एका कर्तबगार, विद्याव्यासंगी, नि:पक्षपाती आणि कामसू माणसाची मुख्य सदर म्हणून नेमणूक करण्याची अकबराची फार इच्छा होती. असा माणूस धार्मिक आणि विद्वान माणसांची परिस्थिती जातीने तपासून त्यांना बिदागी आणि इतर सवलती देऊ शकला असता. धार्मिक आणि परोपकारी कार्यासाठी मोठमोठ्या रकमा आणि जमिनी वाटून देण्याचा अधिकार मुख्य सदरकडे असे. मुझफ्फर खान तर्बाटी याच्या शिफारसीवरून ख्वाजा महंमद सालीह याच्या ऐवजी या महत्त्वाच्या जागेवर शेख अब्दुल नबी याची नेमणूक करण्यात आली. या जागेवर तो १५७८ सालापर्यंत होता. तो प्रख्यात शेख अब्दुल कुदुस गंगोही (मृत्यू इ. स. १५३७) याचा नातू आणि शेख अहंमद याचा मुलगा होता. ही निवड चांगली नव्हती. कारण अब्दुल नबी धर्मवेडा सुन्नी तर होताच, पण अतिलोभी आणि नालायक ठरला.

## उझबेकांचे बंड

नरवार येथे रानटी हत्तींची शिकार करण्यात अकबर गुंतला असताना चार उच्च पदस्थ उझबेक सरदार म्हणजे जौनपूरचा सुभेदार अली कुली खान खान–इ–झमन, त्याचा भाऊ बहादूर खान, त्यांचा काका सुऱ्हापूरचा सुभेदार इब्राहिम खान आणि अयोध्येवर ताबा असलेला त्यांचा एक नातेवाईक इस्कंदर खान यांनी एकत्र येऊन बंडाचा झेंडा

---

* हे बांधकाम पुरे होण्याला ८ वर्षे लागली असे अबुल फझल म्हणतो. बदायुनी ५ वर्षे म्हणतो. निझामुद्दीन, फिरिश्ता आणि महमद अरिफ कंधारी ४ वर्षे लागली असे नमूद करतात. जहांगीर तुझुक–इ–जहांगीरमध्ये १५ वर्षे म्हणतो. किल्ला पुरा होण्यापूर्वीच सन १५६९ मध्ये म्हणजे पाया घातल्यानंतर २४ वर्षांनी अकबर तेथे राहावयास गेला.

उभारल्याची बातमी आली. हुमायूनला गादी परत मिळवून देण्यात आणि अकबराला गादीवर बसविण्यात बैरामखानच्या खालोखाल हे उझबेक सरदार जबाबदार होते. आपण केलेल्या नोकरीचे योग्य चीज होत नाही असे वाटून हे सरदार नाखूष होते. अनेक वर्षे पूर्वेकडील सुभ्यावर त्यांची नेमणूक करण्यात आली होती. मुघलांना हुसकून लावून स्वतःची सार्वभौम सत्ता परत मिळविण्याची सतत धडपड करणाऱ्या अफगाणांबरोबर त्यांनाच सतत लढा द्यावा लागला. याच्या उलट इतर सरदार आणि त्यातूनही मुख्यतः इराणी वंशाचे — ज्यांनी कुठलीही डोळ्यांत भरण्यासारखी कामगिरी केलेली नव्हती-अशांना दरबारात वरच्या जागा दिल्या होत्या. अकबराच्या मनात आपल्याबद्दल दूषित ग्रह आहेत असेही या सरदारांना वाटत असे. कारण आपल्या बापावर आलेली संकटे या उझबेकांनी केलेल्या कारस्थानांमुळे आणि दगाबाजीमुळे आली असे अकबराने काही वेळा अविचाराने म्हटले होते. पण अकबराविरुद्ध झालेल्या ह्या आणि तत्सम इतर बंडांचे महत्त्वाचे कारण असे होते की पूर्वापार चालत आलेल्या इस्लामी रिवाजाप्रमाणे लढाईत मिळालेल्या लुटीचा चारपंचमांश हिस्सा सैन्यास न देता अकबर तो स्वतःकडे ठेवू लागला आणि मोहिमेच्या नेत्यांना फक्त पाचवा हिस्सा मिळू लागला. या कारणामुळे कौटुंबिक नात्याने बांधले गेलेले हे उझबेक सरदार एकत्र जमले आणि त्यांनी अकबराविरुद्ध बंड करण्याचे ठरविले. ते मोठे महत्त्वाकांक्षी होते. * खान–इ–झमन हा विकृत संभोगाची आवड असणारा अत्यंत घमेंडखोर माणूस होता. त्याचा भाऊ बहादुरखान हा काही काळ मुख्य मंत्री होता आणि दरबारी गटबाजीमुळे त्याला त्या जागेवरून दूर करण्यात आले हे तो विसरला नव्हता. या सर्वांनी एकत्र मसलत करून असे ठरविले की, इस्कंदरखान आणि इब्राहिमखान या दोघांनी लखनौच्या मार्गे कनोजकडे जावे आणि अली कुली आणि त्याचा भाऊ बहादूर यांनी करा माणिकपूरवर ( अलाहाबाद सुभा ) स्वारी करावी. करा माणिकपूरचा सुभदार त्या वेळी मजनूनखान ककशाल होता. अयोध्येच्या आसपास असलेले बादशहाचे अधिकारी यांनी इस्कंदर आणि इब्राहिम यांचा प्रतिकार केला. पण हल्लीच्या सीतापूर जिल्ह्यातील नीमखार या गावाजवळ झालेल्या लढाईत त्यांचा पराभव होऊन त्यांचा पुढारी महंमद अमीन दिवाण याला कैद करण्यात आले. शत्रू सैन्य संख्येने मोठे आहे असे पाहून सहमखान आणि शहा बुदघ हे नीमखारच्या किल्ल्याचा आश्रय घेऊन राहिले. माणिकपूर–कडे कूच करीत असता वाटेत अली कुली आणि बहादूर यांनी यथेच्छ धुंडाई आणि लूटमार केली. माणिकपूरचा सुभेदार मजनून खान ककशाल

* तारीख-इ-अकबरशाहीचा समकालीन लेखक महंमद अरिफ कंधारी म्हणतो की उझबेकांना अकबराला पकडून कैद करून सर्व प्रदेश काबीज करावयाचा होता.

याला किल्ल्यात कोंडून राहणे भाग पडले. आसफखानला गढ कटांगाहून बोलावून घेऊन मजनून खानच्या मदतीला पाठविण्यात आले आणि नरवारहून परत येऊन अकबराने मुनीमखानच्या हाताखाली काही फौज देऊन नीमखारच्या किल्ल्यात आश्रय घेतलेल्या महंमद अमीन दिवाणाच्या मदतीस त्याला पाठविले. २४ मे १५६५ रोजी सर्व तयारी पुरी झाल्यावर २००० हत्तींसह एक प्रचंड सेना बरोबर घेऊन अकबर स्वत: निघाला. दिवस अति उन्हाचे असल्यामुळे रात्री कूच करीत तो काही दिवसांनी कनौजला जाऊन पोचला. गंगा पार करून जाण्याची तयारी चालू असतानाच इस्कंदर लखनौला परत फिरला आहे आणि तेथे त्याने शहराची मोर्चेबंदी केली आहे अशी बातमी आली. परिणामी नीमखारच्या किल्ल्यातील सैन्याला कुमक पोचविण्याऐवजी त्याने लखनौला जाण्याचे ठरविले. ख्वाजा जहान मुझफ्फरखान आणि मुनीमखान यांच्या हाताखाली थोडी फौज ठेवून कनौज व लखनौ यांमधील ७० मैलांचे अंतर दोन रात्री आणि १ दिवसात तोडून अकबर तिसऱ्या दिवशी सकाळी लखनौला येऊन पोहोचला. इस्कंदरखान लखनौहून पळून गेला आणि पाठलाग करणाऱ्या सैन्याच्या ताब्यात न सापडता माणिकपूरला बहादूरखान आणि खान–इ–झमन यांना जाऊन मिळाला. अकबराच्या विद्युत्‌गतीच्या हल्ल्याने खान–इ–झमन गोंधळून गेला आणि माणिकपूरचा वेढा उठवून प्रथम जौनपूरला आणि नंतर बिहारमधील पाटण्यासमोरच्या हाजीपूर या गावाकडे पळून गेला. लखनौला काही दिवस मुक्काम करून अकबर १३ जुलैला येऊन पोचला आणि माणिकपूरच्या वेढ्यातून मोकळा झालेला मजनूनखान जौनपूरच्या अलीकडे दोन टप्प्यावर त्याला येऊन मिळाला. बंडखोरांचा पाठलाग करण्यासाठी जौनपूरहून काही सैन्य अकबराने पाठवून दिले. बंगालचा सुलतान सुलेमान कर्राणी आणि रोहटासगडचा फाथखान यांचा पाठिंबा मिळवण्याच्या प्रयत्नात बंडखोर होते म्हणून त्या दोघांना पत्रे लिहून बंडखोरांना कोणत्याही तऱ्हेची मदत करू नये असे अकबराने कळविले. राजदूत हाजी महंमद खान सेइस्तानी याला बंडखोरांनी रोहाटासगडला अडकवून ठेवले. त्यामुळे अकबराने हसनखान खजांची आणि महापात्र (उडियाचा एक निष्णात कवी आणि संगीततज्ज्ञ )यांना ओरिसाचा राजा मुकुंद देव यांच्याकडे पाठविले. बंगालच्या अफगाण सुलतानांनी लागोपाठ अनेक स्वाऱ्या केल्या तरी राजा मुकुंद देवने एकाही मुस्लीम आक्रमणाला दाद दिली नव्हती. अकबराने त्याच्याकडे बंगाल्याविरुद्ध मदत मागितली. त्याने अकबराच्या दूतांचा आदराने सत्कार केला आणि उझबेक बंडखोरांना सुलेमान कर्राणी याने मदत केल्यास बंगालवर स्वारी करून हुलकावणी दाखविण्याचे कबूल केले.

दरम्यान गढकटांगावर विजय मिळविणारा अब्दुल मजीद आसफखान याने चौरागडला मिळालेले ८०० हत्ती आणि इतर लूट बादशहाकडे पाठविली नाही.

या गुन्ह्याबद्दल जाब विचारतील या भीतीने तो १६ सप्टेंबर १५६५ रोजी गढला पळून गेला. ही बातमी अकबराला मिळाली त्या वेळी तो जौनपूरजवळ शिकारीत गुंतला होता. त्याने सुजातखानला आसफखानचा पाठलाग करून दरबारात परत आणण्याचा आदेश दिला. गंगेच्या तीरावर आसफखान आणि सुजातखान यांच्यामध्ये एक निर्णायी चकमक उडाली. पण आसफखान रात्रीचा फायदा घेऊन पळून गेला.

खान–इ–झमनने आता इस्कंदर आणि बहादूर यांना फैजाबादजवळील सुऱ्हापूर परगण्यात लूटमार आणि विध्वंस करण्यासाठी पाठवून दिले. परगण्यात अंदाधुंदी माजवावी आणि बादशहाच्या फौजेचे लक्ष दुसरीकडे खेचून घ्यावे असा दुहेरी उद्देश यात होता. इस्कंदर आणि बहादूर यांच्या विरुद्ध मुईझ–उल–मुल्क याची रवानगी करून अकबर स्वत: अलाहाबादला जाऊन मोहिमेच्या परिणामाची वाट पाहात राहिला. आपले डावपेच फसले असे जाणून मुनीमखानच्या मध्यस्थीने खान–इ–झमनने शरणागती पत्करण्याचे कबूल केले. प्रदीर्घ वाटाघाटीनंतर असे ठरले की, खान–इ–झमनची आई आणि काका इब्राहिमखान या दोघांनी अकबराच्या भेटीला येऊन त्याची क्षमा मागावी आणि खान–इ–झमनने अकबर जौनपूरला असेपर्यंत गंगा ओलांडून बादशाही मुलखात येऊ नये. अकबर आग्र्याला परत गेल्यावर उझबेकांच्या जहागिऱ्या व अधिकार त्यांना परत द्यावेत असेही या वाटाघाटीत ठरले. राजा तोडरमल * आणि लष्करखाना या दोघांना इस्कंदर आणि बहादूर यांच्याविरुद्ध पाठवून देण्यात आले होते. येथे तहाची बोलणी चालू असतानाच सीतापूरच्या आग्नेयेस चार मैलांवर खैराबाद गावाजवळ त्यांची लढाई होऊन त्यात इस्कंदरचा पराभव होऊन त्याला पळ काढावा लागला. सरावलेल्या बंडखोराशी कोणत्याही तऱ्हेच्या वाटाघाटी करण्यास या दोघांचा विरोध होता. पण लपवून ठेवलेल्या काही सैन्याच्या साह्याने बहादूरने उझबेकांची बाजू सावरून धरली आणि बादशाही फौजेला माघार घ्यावी लागली. तोडरमलने आपल्या काही माणसांनिशी तोंड देण्याचा प्रयत्न केला, पण तो शत्रूला हुसकून लावू शकला नाही. अशा प्रकारे शत्रूच्या पराभवाचे विजयात रूपांतर झाले. ही बातमी ऐकून अकबराला फार राग आला व लष्करखान व तोडरमल काही दिवस त्याच्या मर्जीतून उतरले.

---

व्हिन्सेंट स्मिथ आपल्या अकबराच्या चरित्रात लिहितो की, तोडरमलचा पहिला उल्लेख १५६५ सालच्या वरील घटनेच्या वेळी येतो. पण त्याचा नामनिर्देश १५६२ सालीच आलेला असून त्या वेळीही तो बादशहाचा एक प्रमुख अधिकारी होता हे आधीच्या एका प्रकरणात दाखवून दिले आहे. इ. स. १५६२ व १५६५ या कालखंडात तोडरमलच्या नावाचा उल्लेख अनेक वेळा केलेला आढळतो.

अकबर चुनारगड आणि बनारसला जात आहे हे समजताच तहाविषयी विशेष आस्था न बाळगणाऱ्या खान–इ–झमनने तहाच्या अटी मोडल्या. अकबराचे बनारसला जाणे हा केवळ बहाणा असून त्याचा खरा उद्देश आपल्यावर हल्ला करण्याचा आहे असे त्यास बहुधा वाटले असावे. २४ जानेवारी १५६६ रोजी खान–इ–झमन महमुदाबादला परत आला आणि गाझीपूर व जौनपूरच्या रोखाने त्याने आपले सैन्य रवाना केले. या उझबेक सरदाराला चांगले शासन करावे म्हणून अकबर मोठ्या रागाने २ फेब्रुवारी रोजी बनारसहून निघाला. गाझीपूरला अकबराच्या आघाडीची फौज येताच खान–इ–झमनचे लोक तेथून पळून गेले. खान–इ–झमन पण गोंधळात पडला आणि तो घागरा नदी ओलांडून परत बिहारमध्ये निघून गेला. त्याच्या हालचालीकडे मुनीमखानने काणाडोळा केल्यामुळे त्याला असे करणे शक्य झाले. पण त्याची सर्व चीजवस्त बादशाही फौजेच्या हातात पडली. नदीच्या काठाने त्याचा पाठलाग करीत अकबर स्वत: महमुदाबादपासून १४ मैलांवर असलेल्या मौ नथंजा गावापर्यंत गेला. दरम्यान तोडरमलच्या हातून पराभूत झालेला इस्कंदर बहादूरखानला जाऊन मिळाला असून त्या दोघांनी जौनपूरवर हल्ला करून आपल्या आईला बादशहाच्या ताब्यातून सोडवून ते शहर लुटल्याची बातमी आली. दुसऱ्या दिवशी हे दोघे बनारसला जाऊन तेथून पुढे झमानीयाला गेले. तेथे त्यांना अकबर खान–इ–झमनचा पाठलाग करण्याचे सोडून परत येत आहे असे कळले. हे समजताच हे दोघे नऱ्हनच्या तीरावरून गंगा नदी ओलांडून पलीकडे गेले. मध्यंतरी इस्कंदर आणि बहादूर यांनी केलेल्या अचानक हल्ल्याची बातमी ऐकून अकबर जौनपूरला परत आला होता आणि खान–इ–झमनला पकडून त्याचे बंड मोडून काढेपर्यंत तेथेच मुक्काम करण्याचे त्याने ठरविले. पण येथे पोचल्यावर मखदुम उल मुल्क, अब्दुल नबी आणि मुर्तझा शरीफी यांच्या मध्यस्थीला मान देऊन त्याने खान–इ–झमनला पुन: एकदा माफी केली. कारण सतत मोहीम करण्याचा त्याला कंटाळा आला होता. ३ मार्च १५६६ रोजी जौनपूर सोडून तो आग्ऱ्याला आला.

उझबेकांनी केलेल्या बंडाच्या काळातील गोंधळाचा फायदा घेऊन शेर महंमद दिवाणाने सरहिंदला बंडाचे निशाण उभारले. त्याचा पूर्वीचा मालक बैरामखान याच्याशी त्याने निमकहरामी केली होती आणि आता सरहिंद जिल्ह्यातील सामाना गाव त्याने लुटले. नंतर मालेर कोटल्याचा परगणा हस्तगत करून तिथल्या शिखदरला त्याने मारून टाकले. शेवटी मुल्ला नुर-उद्दिन याने त्याचा पराभव करून त्याला ठार केले.

## अकबर आग्र्याला परत येतो : नवे शासकीय कायदे

२८ मार्चला आग्र्याला परत आल्यावर काही दिवस विश्रांती घेऊन अकबर नगरचैनला गेला. तेथील इमारतींचे बांधकाम आता पुरे झाले होते. जौनपूरहून परत आलेल्या मुझफ्फरखानने खान–इ–झमनबरोबर चाललेल्या वाटाघाटींच्या वेळी मुनीमखानच्या दुटप्पीपणाची हकीकत अकबराला सांगितली. इस्कंदरखान उझबेक याच्या हातून पराभव पावलेला लष्करखान याला मीर बक्षींच्या जागेवरून बडतर्फ करण्यात आले. ख्वाजा जहान पण बादशहाच्या मर्जीतून उतरला आणि त्याला मक्केला जाण्याची आज्ञा करण्यात आली. पण पुढे त्याचे गुन्हे माफ करण्यात आले.

जौनपूरहून परत आल्यावर थोड्याच दिवसांनी अकबराने जमाबंदीसंबंधीच्या नियमात काही नवे बदल केले. बैरामखानने स्वेच्छेनुसार वाढवलेला सारा (जमीरकमी) मुझफ्फरखानाने रद्द केला.* साम्राज्यातील सर्व परगण्यांतून जमिनींच्या प्रत्यक्ष उत्पन्नाची आणि महसुलाच्या अंदाजाची माहिती कानूंगोकडून मागविण्यात आली आणि त्या अंदाजाच्या आधारे नवी आकारणी करण्यात आली. हा शेतसारा प्रत्यक्ष शेतीच्या उत्पन्नावर (हाल हासील) आधारलेला नव्हता. तथापि, पूर्वीच्या आकारणीच्या मानाने पुष्कळ चांगला होता.

अकबराने या वेळी आपल्या अधिकाऱ्यांची तीन भागांत विभागणी करून प्रत्येकाने बादशहाच्या तैनातीसाठी किती लवाजमा ठेवावा ते ठरवून दिले. प्रथम श्रेणीतल्या अधिकाऱ्यांचा पगार सालीना ४८००० दाम, दुसऱ्या श्रेणीतल्या अधिकाऱ्यांचा ३२००० दाम आणि तिसऱ्या श्रेणीतल्या अधिकाऱ्यांचा २४००० दाम असा ठरवून दिला. या रकमेत अधिकाऱ्यांच्या हाताखालील सैन्याच्या पगाराचा समावेश होता. अंमलबजावणीची छाननी करणारे खाते अद्याप सुरू न झाल्यामुळे सरकारने नक्की केलेली फौज प्रत्येक अधिकारी आपल्याजवळ ठेवीत असे की नाही हे कळण्याची उपाययोजना अद्याप केली नव्हती.

माळव्याचा भूतपूर्व सुभेदार अब्दुल्लाखान उझबेक याला चिंगीझखानाने गुजराथमधून हाकून दिले होते. त्याने माळव्यावर स्वारी केली. पण तेथे माळव्याचा सुभेदार शिहाबुद्दिन अहमदखान याने त्याचा पराभव केला. तेथून

---

* बैरामखानने साऱ्यात वाढ केली याचे कारण जमिनी देऊन पगार भागविण्यात येत असे आणि शेतजमीन मर्यादित होती. पण अधिकाऱ्यांची संख्या मोठी होती.

पळून जाऊन जौनपूरला खान–इ–झमन या कडव्या बंडखोराला तो जाऊन मिळाला.

महादी कासीम खान याला आसफखानच्या जागी गोंडवनाचा सुभेदार नेमण्यात आले होते. त्याने आसफखानाला गोंडवनातून हाकून दिले. पण तेथला कारभार नीट न चालवता आल्यामुळे तो मक्केला निघून गेला. आसफखान पळून गेला आणि जौनपूरला खान–इ झमनः याला जाऊन मिळाला. पण तिथल्या गर्विष्ठ उझबेक लोकांशी त्याचे जमेना. त्यांनी आसफखानाला नावडत्या कामाला जुंपले आणि त्याच्या भावाला ओलीस ठेवून घेतले. काही महिन्यांनी आसफ-खान आणि त्याचा भाऊ वजीर हे बादशहाला शरण गेले आणि बादशहाने त्यांना माफी केली. १५६७ च्या मार्च महिन्यात लाहोर येथे अकबराने त्यांची भेट घेतली.

## मिर्झा हकीमची पंजाबवर स्वारी

काबूलमधल्या अंदाधुंदीचा फायदा घेऊन बदकशानचा मिर्झा सुलेमान याने काबूलवर चौथ्यांदा स्वारी करून काबूलच्या किल्ल्याला वेढा दिला. मिर्झा हकीम घोडबंदला पळून गेला; तरीसुद्धा सुलेमानला किल्ला घेता आला नाही. स्वतःस धोका आहे असे वाटून हकीम सिंधु नदीपर्यंत माघारी आला आणि झालेली हकिगत त्याने अकबराला कळवली. अकबराने फरीदुनला त्याच्या मदतीला पाठवून दिले. पण या माणसाने मिर्झा हकीमला पंजाबवर स्वारी करण्यास चिथावणी दिली. तेथील अधिकारी आणि प्रजा तुझे स्वागत करण्यास उत्सुक आहेत अशी त्याने हमी दिली. त्याच्या सांगण्यावरून सिंधु नदी ओलांडून मिर्झा हकीमने झेलमच्या तीरावरील भेरा शहर लुटले आणि लाहोरकडे कूच करून शहराबाहेरच्या एका बागेत तो तळ देऊन राहिला. महंमदखान, कुतुबुद्दिन-खान आणि शरीफखान इत्यादी लाहोरच्या अधिकाऱ्यांनी त्याच्या प्रतिकाराची तयारी केली. मध्यंतरी ही हकीकत अकबरला समजताच तो १७ नोव्हेंबर १५६५ रोजी आग्र्याहून निघाला आणि १५६६ मध्ये फेब्रुवारीच्या अखेरीस लाहोरला जाऊन पोचला. मिर्झा हकीम पळून गेला. सिंधूच्या पलीकडे त्याचा पाठलाग करण्याचा हुकुम अकबराने दिला नाही. पण कुतुबुद्दिनखान आणि कमालखान गख्खर यांना सरहद्दीचा बंदोबस्त ठेवण्याकरिता त्याने प्रधान नेमले. मिर्झा हकीम काबूलला निघून गेला असे समजताच अकबराचे सैन्य माघारी फिरले. काबूलच्या आसपास मिर्झा सुलेमान अजून होताच. मिर्झा हकीमबरोबर समझोता करून तो बदकशानला निघून गेला.

## मिर्झाचे बंड

मिर्झा हकीमने पंजाबवर स्वारी केली त्याच वेळी संभळ प्रांतात कारभारी असलेले महंमद सुलतान मिर्झा आणि उलुघ मिर्झा यांनी बंड करून दिल्ली-पर्यंतची अनेक गावे उध्वस्त करून टाकली. तैमूरचा दुसरा मुलगा उमर शेख याचा सुलतान मिर्झा हा भातू असल्याने अकबराचा तो नातेवाईक होता. या बंडात त्याचे मुलगे इब्राहिम हुसेन, महम्मद हुसेन, मसूद हुसेन आणि अकिल हुसेन यांनी पण भाग घेतला होता. मिर्झा हकीमच्या बंडाचा बंदोबस्त करण्यात अकबर पंजाबमध्ये गुंतलेला असताना उलुघ मिर्झा आणि शहा मिर्झा यांनी इब्राहिम हुसेन मिर्झा आणि महम्मद हुसेन मिर्झा यांच्या साहाय्याने संभळ आणि त्याच्या आसपासचा भाग लुटला. त्या प्रांतावरच्या अधिकाऱ्यांनी त्यांचा प्रतिकार करून पराभव करताच खान–इ–झमन आणि इस्कंदर यांच्याशी हातमिळवणी करण्यासाठी ते जौनपूरला पळून गेले. पण उझबेकांशी न पटल्या-मुळे ते तेथून परत फिरले आणि सीतापूर जिल्ह्यातील निमखारवर यांनी चढाई केली. तिथल्या परगण्याचा फौजदार यारशाही याचा पराभव करून मिर्झा बंधू लूटमार करीत दिल्लीजवळ येऊन पोचले. दिल्लीचा सुभेदार तातरखान हा लढाईच्या तयारीत आहे असे पाहून ते माळव्याकडे वळले. तेथे संपतजवळ मीर मुईझ–उल–मुल्क याचा पराभव करून व इतर अधिकाऱ्यांवर मात करून त्यांनी माळवा ताब्यात घेतला. त्यांच्याविरुद्ध चालून जाण्यापूर्वी बंडखोराचा बाप महम्मद सुलतान मिर्झा याला संभळमधील आझमपूर येथून हलवून बयानाच्या किल्ल्यात कैद करून ठेवण्याचा हुकूम अकबराने दिला.

## कमरघा शिकार

मार्च १५६७ मध्ये अकबर पंजाबमध्ये फार मोठ्या शिकारीच्या मोहिमे-वर निघाला आणि तेथे त्याने अबुल फझलने वर्णिलेल्या 'कमरघाची' तयारी केली, एका बाजूने डोंगराकडून आणि दुसऱ्या बाजूने झेलम नदीकडून शिकार हुस-कावून लावून सर्व प्राण्यांना १० मैलांच्या परिसरात आणण्यासाठी हजारो हाकारे नेमण्यात आले. नंतर अकबराने त्याच्या दरबारातील मंडळी आणि शिपाई यांच्यासह बाण, तलवार, भाले आणि बंदुका यांच्या साहाय्याने मोठ्या मजेत शिकार केली. पाच दिवसांनंतर दरबारी मंडळींना आणि त्यानंतर इतरेजनांना शिकर करण्याची परवानगी देण्यात आली.

## संन्याशांचे भांडण; उझबेकांचा बीमोड

'कमरघा' संपल्यावर अकबर घोड्यावरून दुथडी भरलेली रावी ओलांडून लाहो-रला परतला. सर्व घोडेस्वार नदी पार करून सुखरूप गेले; पण दोन माणसे पाण्यात

बुडून मेली. याच वेळी महम्मद अमीन दिवाणा या एका प्रमुख अधिकाऱ्याने एका फौजदाराला बाणाने ठार मारले. म्हणून त्याला मृत्यूची शिक्षा फर्मावण्यात आली. काही दरबारी मंडळींच्या मध्यस्थीने मृत्यूची सजा रद्द करून त्याला ठोकून काढण्याची शिक्षा देण्यात आली. म्हणून तो तेथून पळाला आणि जौनपूरला खाना–इ–झमनला जाऊन मिळाला. जुनैद कर्रानी नावाचा दुसरा एक अधिकारी हिंदौनचे आपले नेमणुकीचे ठाणे सोडून गुजराथला पळून गेला. अकबर परत येण्याच्या तयारीत असतानाच मिर्झा हकीम लाहोरवर चाल करून येत आहे असे कळल्यावरून खान–इ–झमनने पुन्हा बंडाचा झेंडा उभारून मिर्झाच्या नावाने खुत्बा म्हटल्याचीं बातमी आली. तेव्हा उझबेकांवर चाल करून जाण्याचे ठरवून २३ मार्च १५६७ रोजी अकबर लाहोरहून निघाला. ठाणेश्वरच्या वाटेवर दोन संन्याशांच्या गटात चाललेले भांडण त्याच्या आढळात आले. प्रसिद्ध कुंभमेळ्याच्या वेळी तिथल्या पवित्र तलावाकाठची एक विवक्षित जागा आपली आहे असा दावा दोन्ही गट करीत होते; लबाडीने जागा पटकावल्याचा परस्परांवर आरोप करून त्यांनी अकबराकडे तक्रार गुदरली. अकबराने निवाडा देण्याचा प्रयत्न केला. पण त्याचा सल्ला न मानता लढून तंट्याचा निकाल लावून घेण्याला ते सज्ज झाले. बाण आणि तलवारींच्या साहाय्याने घनघोर लढाई जुंपली. एका बाजूच्या गटात लोक कमी आहेत असे पाहताच अकबराने आपले काही सैनिक त्या गटाच्या मदतीस दिले. या मारामारीत दोन्ही बाजूंचे पुष्कळ लोक मेले. आश्चर्याची गोष्ट म्हणजे दोन्ही बाजूंस आपला निकाल मान्य करण्यास भाग न पाडता अकबराने त्यांच्यातल्या मारामारीस प्रोत्साहन दिले, इतकेच नव्हे तर ते भीषण दृश्य तो मजेत पाहात राहिला. लाहोरहून फरारी झालेला महम्मद अमीन दिवाणा याला पालवालला पकडून फाशी देण्यात आले. मजल दरमजल करीत अकबर नंतर आग्र्याला येऊन पोचला.

दरम्यान उझबेक सरदार सुल्हापूरला जमले आणि पुढील मोहिमेचा आराखडा त्यांनी नक्की केला. खान–इ–झमनने लखनौकडे चाल करून गंगेच्या तीरापर्यंत सर्व मुलूख काबीज करायचा, बहादूरने करा आणि माणिकपूरवर स्वारी करायची आणि इस्कंदर आणि इब्राहिम यांनी अयोध्या आणि आसपासचा मुलुख ताब्यात घ्यायचा असे ठरविण्यात आले. त्याप्रमाणे खान–इ–झमन कनौजवर चालून गेला आणि तिथला फौजदार मिर्झा युसफखान कनौजपासून आठ मैलावर असलेल्या शेरगढ किल्ल्याच्या आश्रयाला जाऊन राहिला.

मुनीमखानवर आग्र्याचा कारभार सोपवून अकबर ५ मे १५६७ रोजी आग्र्याहून खान–इ–झमनबरोबर सामना देण्यास निघाला आणि किया खान,

मुझफर मुघल आणि इतर अधिकाऱ्यांना कनौजच्या किल्ल्यात अडकलेल्या युसूफ खानच्या मदतीस त्याने पुढे पाठवून दिले. हे उझबेक सरदार म्हणजे राज्यातल्या सर्व असंतोषाचे आणि कटकटीचे केंद्र झाले होते आणि इतर पुष्कळ बंडखोर आणि असंतुष्ट अधिकारी त्यांना जाऊन मिळाले होते. प्रसंग इतका बाका होता की ग्वाल्हेरच्या किल्ल्यात कैदेत असलेला आपला चुलत भाऊ आणि कामरानचा मुलगा अबुल कासीम याला ठार करण्याचा हुकूम देणे अकबराला सावधगिरीचे वाटले. बादशहाचा हुकूम राजा भारमलचा मुलगा भगवंत दास याने अंमलात आणला.

अकबर एटाह जिल्ह्यातील साकितला पोचल्यावर खान–इ–झमन कनौजचा वेढा उठवून माणिकपूरला आसफ आणि मजनून खानला वेढा देऊन बसलेल्या बहादूरला जाऊन मिळाला. मोहानला पोचल्यावर अकबराने २ जानेवारीस महम्मद कुलीखान बारलास याच्या हाताखाली थोडे सैन्य देऊन त्याची अयोध्येला इस्कंदरखानविरुद्ध रवानगी करून दिली आणि स्वतः करा माणिकपूरकडे निघाला. कालपीवर (ग्वाल्हेरवर असे अबुल फझल म्हणतो) हल्ला करण्याचा खान–इ–झमनचा बेत आहे अशी बातमी रायबरेलीच्या मुक्कामावर आली. तथापि अकबर आपल्या निश्चयापासून परावृत्त झाला नाही आणि आपल्या अधिकाऱ्यांच्या सल्ल्यास न जुमानता ६ जूनच्या रात्री अकबराने रायबरेली सोडली आणि जवळच्या एका आडरस्त्याने झपाट्याने कूच करून खान–इ–झमनला माणिकपूरला गाठण्याचे त्याने ठरवले. एक सबंध रात्र आणि अर्धा दिवस कूच करून माणिकपूरजवळ आल्यावर टेहळणीवरच्या जासुदांनी खान–इ–झमन सिंगरौरजवळ (हल्लीचे नवाबगंज) अलाहाबादपासून वर थोड्या मैलांवर गंगा पार करून गेला आहे अशी बातमी आणली. त्यानुसार आपली पुष्कळशी फौज राजा भगवंतदास आणि ख्वाजा जहान यांच्या ताब्यात देऊन त्यांना कराला जाऊन तेथे पुढील हुकमाची वाट पाहण्यास सांगितले आणि बरोबर ११ लोक * (बदायुनीच्या म्हणण्याप्रमाणे १५ किंवा १६) आणि थोडे हत्ती घेऊन त्वरेने वाट काढीत ८ जून रोजी दुपारी ( रविवारी ३० झिया कादा ) माणिकपूरजवळील शेखान या गावाजवळ हिमालयातील बर्फ वितळल्याने नदीला पूर आला असतानासुद्धा हत्तीवरून ती पार करण्याचा विक्रम अकबराने केला. ती रात्र त्याने नदीच्या तीरावर काढली. तेथून खान–इ–झमनची छावणी दोन मैल दूर होती. संध्याकाळी मजनून खान आणि आसफखान आपल्या सैन्यासह अकबराला येऊन मिळाले आणि दुसऱ्या दिवशी अगदी सकाळी अकबराने

* वुलसले हेग म्हणतो की अकबराने १००० ते १५०० माणसे घेऊन नदी पार केली. कोणत्या आधारावर असे तो म्हणतो हे समजत नाही.

बंडखोरांच्या सैन्यावर हल्ला केला. अकबर इतक्या जवळ आल्याचा खान-इ-झमन आणि बहादूर यांना पत्ता पण नव्हता. कराच्या आग्नेयेस सात मैलांवर असलेल्या फाथपूर पारसकी गावाजवळच्या आपल्या छावणीत मद्यपान अणि इष्कबाजी करण्यात त्यांनी सारी रात्र घालविली. एका दरबारी माणसाने अकबर गंगेच्या तीरावर येऊन ठेपला आहे ही माहिती दिली असूनसुद्धा तीवर विश्वास न ठेवता आसफखान आणि मजनून खान यांचा हा डाव असावा अशा भरंवशावर ते राहिले. ९ जून १५६७ (सोमवार १ जिलहिज्जा हिजरी) रोजी दोन्ही सैन्यांत जोराची लढाई झाली. बंडखोरां-जवळ या वेळी तीन चार हजार कसलेले घोडेस्वार होते आणि अकबराजवळ फक्त ५०० सैन्य आणि तेवढेच हत्ती होते. तरी त्याने बंडखोरांचा पूर्ण पाडाव करून त्यांची कत्तल केली. अकबर स्वत: आपल्या सैन्याचे नेतृत्व करतो आहे असे पाहून उझबेकांनी निकराने लढून शौर्याने धारातीर्थी पडण्याचा निश्चय केला. त्यांचा पराभव करून अकबराने त्यांना हुसकून लावले आणि त्यांचा जोराने पाठलाग केला. बहादूरखानला पकडून ठार मारण्यात आले. चित्रानंद नावाच्या बादशहाच्या हत्तीने पळणाऱ्या सैन्याला धडक दिली आणि नयनसुख नावाच्या दुसऱ्या हत्तीच्या सोमनाथ नावाच्या माहुताने खान-इ-झमनला आपल्या हत्तीच्या पायाखाली तुडवून ठार मारले. त्याचे मुंडके बादशहाला नजर करण्यात आल्यावर त्याची ओळखही पटली. खान-इ-झमन, बहादूर आणि इतर उझबेकी हे मोठे हट्टी, उच्छाद मांडणारे, शूर आणि निधड्या छातीचे बंडखोर होते. त्यांच्यावर मिळालेला विजय हा मोठा पराक्रम होता. म्हणून सर्वत्र आनंदीआनंद पसरला. राज्यातल्या प्रमुख शहरातून उझबेक सरदारांची मुंडकी सर्वांना पाहण्यासाठी ठेवण्यात आली.

या महत्त्वपूर्ण विजयानंतर अकबराने अलाहाबादला भेट दिली आणि तेथून तो बनारसला गेला. गावातल्या लोकांनी उद्धटपणे वेशीची दारे बंद करून बादशहाला शहरात येण्यास मज्जाव केल्यामुळे ते शहर लुटण्यात आले. बनारस-हून तो जौनपूरला आणि तेथून करा माणिकपूरला गेला. वाटेत उझबेकांना मिळालेल्या प्रमुख व्यक्तींचे निर्मूलन करून साध्या सैनिकांना त्याने माफी केली. आग्र्याहून येऊन मुनीमखान बादशहासमोर हजर झाला. खान-इ-झमन आणि बहादूर यांच्या हाताखाली असलेल्या सर्व प्रांतांची सुभेदारी अकबराने त्याला दिली. त्यांमध्ये जौनपूर, बनारस, गाझीपूर आणि पूर्वेकडील चौसापर्यंतचा मुलूख समाविष्ट होता. त्या प्रदेशाची सर्व व्यवस्था लावून २८ जून १५६७ रोजी ऐन पावसाळ्यात अकबर आग्र्याकडे जाण्यास निघाला आणि १८ जुलै रोजी तेथे पोचला.

इस्कंदर उझबेकच्या विरुद्ध पाठवलेली बादशाही फौज अवधला (हल्लीचे फैजाबाद) १६ जून रोजी पोचली आणि तिने किल्ल्याला वेढा घातला. किल्ल्याच्या पायथ्याशी येऊन शत्रूला किल्ल्यावर चढाई करता येऊ नये म्हणून इस्कंदरने जवळच्या टेकडीवर बंदुकधारी फौज ठेवली होती. महमंद कुली खानने ती टेकडी आणि शहर ताब्यात घेण्याची व्यवस्था केली. वेढा असतानाच तहाच्या वाटाघाटीही चालू होत्या. खान–इ–झमन आणि बहादूर यांच्या मृत्यूची बातमी मिळाल्यामुळे निराश होऊन इस्कंदर एके रात्री मागच्या दरवाज्याने किल्ल्यातून पळून गेला. किल्ला अनायासेच बादशाही सेनेच्या हातात पडला. इस्कंदरखान पळाला तो प्रथम गोरखपूरला जाऊन नंतर बिहारमध्ये अफगाणांच्या आश्रयाला जाऊन राहिला. अकबराने त्याचा पाठलाग करण्याचे सोडन दिले. इस्कंदरचा सुभा असलेला अवधचा मुलूख अली कुली खान बारलासच्या ताब्यात दिला. बंगालच्या सुलेमानाबरोबर न पटल्यामुळे १५७२ साली मार्च महिन्यात बहादूर अकबराला शरण आला. त्याला माफी देऊन लखनौची फौजदारी त्याला देण्यात आली. नंतर थोड्याच दिवसानी तो मरण पावला.

उझबेकचे बंड दोन वर्षांपेक्षा अधिक काळ चालू होते आणि देशाचा फार मोठा भाग त्यात गुंतला होता. अनेक मोठे अधिकारी त्यात सामील असल्यामुळे अकबर आणि त्याचे साम्राज्य यावर या बंडामुळे फार मोठे संकट आले होते. त्यात अकबराचा फार वेळ आणि लक्ष खर्ची पडून साम्राज्याच्या विस्ताराचे त्याचे बेत अडून राहिले. गोंडवन जिंकल्यानंतर खान–इ–झमन आणि त्याचे नातलग व अनुयायी याचा नि:पात होईपर्यंत अकबर किंवा त्याचे सरदार यांना देशातील अनेक स्वतंत्र राज्ये जिंकून घेण्याला उसंत मिळत नव्हती.

— ० —

# प्रकरण सातवे

## राजस्थानचा पाडाव

### राजस्थानात पाय रोवले

अकबराच्या साम्राज्य वाढवण्याच्या योजनेत राजस्थानला प्रमुख स्थान होते. हिंदुस्थानात सार्वभौम सत्ता स्थापन करण्याची त्याची महत्त्वाकांक्षा राजस्थानातील अनेक प्राचीन राज्यांनी त्याचे आधिपत्य मान्य केल्याखेरीज सफल होणार नव्हती. या सर्व राज्यांनी दिल्लीच्या पूर्वीच्या सुलतानांपासून दूर राहून आपले स्वातंत्र्य शाबूत ठेवले होते. रजपूतांचे शौर्य आणि प्रामाणिकपणा आणि त्यांच्या मैत्रीचे मूल्य यांची जाणीव अकबराला हुमायून आणि बाबर यांच्यापेक्षा खूपच चांगली होती. म्हणून त्यांना मांडलिक करून आपल्या सत्तेचे मुख्य आधारस्तंभ बनवावे असा त्याचा मानस होता. इ. स. ११२० मध्ये मुसलमानी अंमलाखाली आलेले राजस्थानातील बहुधा पहिलेच ठिकाण नागोर यावर अकबराची सत्ता आधी होतीच. १५५६ च्या अखेरीस अलवार जिल्ह्यातल्या मेवातचा काही भाग आणि १५५७ च्या शेवटी जोधपूर राज्यातील जयतरण आणि अजमेर ही त्याने काबीज केली. पण हे सर्व विखुरलेले भाग असून एकसंध राज्याचे भाग नव्हते. १५६२ च्या सुरुवातीस अम्बरचा ( हल्लीचे जयपूर ) राजा भारमल याने अकबराचे मांडलिकत्व पत्करले आणि त्यांनंतर थोड्याच महिन्यांनी कछवा घराण्याच्या मदतीने मेरटा शहर त्याने जिंकले. हे दोन मुलूख राजकीय दृष्टीने खरे महत्त्वाचे ठरले. कारण त्यामुळेच जवळजवळ संपूर्ण राजस्थानावर आपले आधिपत्य स्थापन करण्याचा अकबराचा मार्ग मोकळा झाला. १५६३ मध्ये मुघल सैन्याने जोधपूरचा किल्ला जिंकला; पण तो तात्पुरताच. त्यानंतर जवळ जवळ पांच वर्षे अकबर इतर घरगुती उलाढालीत इतका गुंतला होता की, राजस्थानाकडे लक्ष देण्यास त्याला बिलकुल फुरसत झाली नाही. उझबेकांच्या बंडाचा बीमोड केल्यानंतर लगेच अकबराने आपले लक्ष राजस्थानाकडे वळविले.

## राणाशी बेबनाव

राजस्थान काबीज करायचे झाल्यास तेथील प्रमुख रजपूत राज्य मेवाड हे प्रथम आपल्या सत्तेखाली आणले पाहिजे हे अकबर जाणून होता. म्हणून या प्रश्नाला त्याने अग्रक्रम दिला. राजस्थानातील दुसरे कोणतेच राज्य मेवाडच्या शिसोदिया इतके प्रबळ व मुसलमानी सत्तेला विरुद्ध नव्हते. या प्राचीन वंशाने फार मोठ्या प्रदेशावर राज्य केले होते आणि त्याची राजधानी चितोड येथे होती. ६ व्या शतकापासून हे राज्य अस्तित्वात असून काही काळ तर सर्व राजस्थानावर त्याची सार्वभौम सत्ता होती. तेथला राजा उदयसिंग याचा पिता राणा संग याने रणांगणात अकबराचा आजा बाबर याजबरोबर सामना दिला होता. त्या वेळी आशियातल्या या विजेत्याला जिंकण्याचा मान थोडक्यात हुकला होता. मुस्लीम राज्यकर्त्यांपुढे मान तुकवून या घराण्यातल्या कुठल्याच राजाने आपल्या कीर्तीला कलंक लावून घेतला नव्हता किंवा कुठल्याही मुसलमान राजाशी, मग तो कितीही मोठा किंवा प्रबळ असो, शरीरसंबंध करून आपल्या घराण्याच्या अभिमानाला गालबोट लावले नव्हते. राजा उदयसिंग आपल्या पूर्वजांइतका धाडसी आणि लढाऊ नसला तरी अकबराचे वर्चस्व मान्य न करण्याचा त्याने निर्धार केला होता. अकबराला आपली मुलगी देऊन अम्बरच्या कछवा राजाने आपली प्रतिष्ठा गमावल्याबद्दल तो आणि त्याचे लोक त्याच्याकडे तिरस्काराने पाहत.* राण्याच्या अशा वागणुकीने तरुण बादशहाचा अभिमान दुखावला गेला. चितोडच्या राणाविरुद्ध कारवाई करण्यास हे एक पुरेसे कारण होते. खरे पाहता अकबरचे ठरलेले धोरण आणि महत्त्वाकांक्षा पाहता त्याला कारण किंवा सबब शोधण्याची जरूर नव्हती. तसेच बाजबहादूरला आश्रय देऊन राणाने बादशहाच्या रोषात आणखीनच भर घातली होती.

## अकबरची चितोडवर स्वारी

३० ऑगस्ट १५६७ रोजी अकबर शिकारीच्या मोहिमेवर बाहेर पडला. या वेळी माळव्यातले मिर्झाचे बंड मोडून काढावयाचे व चितोड जिंकून घ्यावयाचे हे दोन हेतू त्याच्या मनात होते. राणा उदयसिंगचा दुसरा मुलगा राजा शक्तिसिंग बापावर रागावून अकबराला येऊन मिळाला होता. धोलपूरला पोचल्यावर 'माझ्या बाजूने तू आपल्या बापाविरुद्ध लढशील काय ? ' असे अकबराने

*मध्ययुगात कुठलाही हिंदू, मग तो कितीही खालच्या दर्जाचा असो, मुसलमानी राजाबरोबर शरीरसंबंध ठेवण्यास तयार होत नसे. मुसलमानाचा नुसता स्पर्शदेखील हिंदू लोक अपवित्र आणि विटाळासारखा मानीत असत.

शक्तिसिंगाला विचारले. 'हिंदुस्थानातले बहुतेक सर्व मोठे राजे मला शरण आले असून फक्त चितोडचा राणा माझे वर्चस्व कबूल करीत नाही म्हणून त्याच्यावर स्वारी करून त्याचा नक्षा उतरविण्याचा माझा विचार आहे' असे अकबर या वेळी म्हणाल्याचे सांगण्यात येते. आपल्या कुळीच्या इतर लोकांप्रमाणेच शक्तिसिंगाचे आपल्या मातृभूमीवर फार प्रेम होते. म्हणून त्याने सरळपणे बादशहाची छावणी सोडली आणि चितोडला घाईघाईने जाऊन त्याने आपल्या बापाला अकबराचा मोहिमेचा बेत सांगितला. दरम्यान आगेकूच करून अकबराने शिवीसुपारचा किल्ला ( शिवापूर ) आणि कोटा जिंकून घेतले आणि शहा महमंद कंधारीला त्याचा ताबा दिला.

## मिर्झांच्या बंडाचा बीमोड

अकबराची छावणी गग्रौनला असताना सप्टेंबरच्या अखेरीस अबुल फझलचा थोरला भाऊ फैझी याची प्रथमच दरबारात बादशहाने भेट घेतली. एक पंडित आणि कवी म्हणून फैझीची कीर्ती अकबराच्या कानावर आली होती आणि म्हणून याने त्याला दरबारात बोलावून घेतले होते.

अनेक वेळा शत्रूला खडे चारलेले चितोड जिंकण्याची मोहीम स्वत: हातात घेण्याचे ठरवून माळव्यातल्या मिर्झांचे बंड मोडून काढण्याचे काम अकबराने आपले माळव्यातले अधिकारी शिहाबुद्दिन अहमद खान आणि त्याचे साथीदार शहा बुदघ खान, मुराद खान, हाजी महंमद खान सिस्तानी आणि माळव्यावर नेमलेल्या इतर अधिकाऱ्यांवर सोपवून त्यांची रवानगी केली. बादशाही फौज उज्जैनेला दाखल होताच मिर्झामंडळी घाबरून जाऊन मांडूच्या किल्ल्यात एकत्र जमली. याच सुमारास उलुध मिर्झा मरण पावला आणि त्याचे भाऊ युद्ध न करताच गुजराथकडे पळून गेले. त्यांनी चिंगीझ खानाच्या दरबारात आश्रय घेतला. माळव्यातून बंडखोरांना हुसकून लावल्यामुळे त्या प्रांतात शांतता प्रस्थापित करण्यात आली.

## अकबर चितोडकडे निघतो

अकबराने टाकलेले पहिले पाऊल म्हणजे चितोडच्या वाटेवर पण चाळीस मैल अलीकडे असलेला मांडलचा किल्ला काबीज करण्यासाठी आसफखानला अकबराने थोडया सैन्यानिशी गग्रौनहून पुढे पाठवून दिले. चितोडला पोचल्यावर चितोडच्या रक्षणाची जबाबदारी मेरटाचा किल्ला लढवणारा जयमल राठोड याच्यावर सोपवून राणा उदयसिंग स्वत: उदेपूर आणि कुम्भलगडच्या टेकडयांच्या आश्रयास निघून गेला आहे असे कळताच अकबराने हुसेन कुली खानला थोडया सैन्या-निशी त्याचा पाठलाग करण्यास पाठवून दिले. आसफखानने त्याच्यावर सोपविलेले

काम फत्ते करून रावत बल्लू सोळंकीचा पराभव केला आणि मांडल आणि रामपुरा काबीज करून तो चितोडला अकबराला येऊन मिळाला. तथापि हुसेन कुली खानने फक्त उदेपूरपर्यंतच्या मुलखावर हल्ला करून पुष्कळ लूट आणली. परंतु राण्याचा ठावठिकाणा त्याला लागला नाही. २३ ऑक्टोबरला अकबर चितोडच्या परिसरात येऊन पोचला आणि दुसऱ्या दिवशी किल्ल्याच्या पायथ्या-पर्यंत येऊन त्याच्या ईशान्येच्या विस्तृत मैदानात तळ देऊन राहिला. त्या प्रचंड किल्ल्याभोवती त्याने एक फेरी मारली आणि त्याच्या पायथ्याची पाहणी आपल्या इंजिनियरांकडून करवून घेऊन किल्ल्याच्या संरक्षणाचा आणि कमकुवत ठिकाणांचा अंदाज घेतला. किल्ल्याला संपूर्णपणे वेढा देण्यास एक महिना लागला. किल्ल्यामध्ये भरपूर रसद असून त्याच्या रक्षणाची व्यवस्था उत्तम होती. भोवतालच्या सपाट मुलखात सरळ उभ्या असलेल्या चारशेपाचशे फूट उंचीच्या डोंगरावर हा किल्ला एकाएकी वसलेला असून त्याची दक्षिणोत्तर लांबी सव्वातीन मैल असून मध्यभागी त्याची पश्चिमोत्तर रुंदी ३६०० फूट आहे. पायथ्याशी त्याचा घेर ८ मैलांहून थोडा अधिक आहे. सभोवताली अनेक मैल पसरलेल्या सपाट मैदानामुळे किल्ल्याचे रक्षण करणे अवघड होत होते आणि शेजारीच पूर्वेला थोड्या अंतरावर असलेली चितोडची छोटीशी टेकडी वेढा देणाऱ्या सैन्याला फार सोयीची होती. राण्याचे राजवाडे, इतर राहती घरे आणि बाजारपेठ हीं सर्व किल्ल्याच्या आत असून किल्ल्याच्या पायथ्याखाली पश्चिमेस असलेले गाव अकबराच्या वेळे-नंतर अनेक वर्षांनी अस्तित्वात आले. किल्ल्याच्या वाकड्या वळणात सात दरवाजे असून त्यांतले पश्चिमेला रामपोळ, पूर्वेला सूरजपोळ आणि उत्तरेला लखोटा बारी हे सर्वांत महत्त्वाचे होते. अकबराची स्वारी होण्याच्या आधीच राणा उदयसिंग आपल्या सरदारांच्या सल्ल्याला मान देऊन आपल्या कुटुंबासकट गिरव्याच्या डोंगरात (हल्लीचा उदेपूर प्रांत) जाऊन राहिला होता. अकबराची प्रचंड शक्ती आणि मेवाडचा पाडाव करण्याचा त्याचा दृढनिश्चय याची उदयसिंगच्या सर्व सरदारांना पूर्ण खात्री असून राजघराण्याच्या संरक्षणासाठी त्यांनी उदयसिंगला किल्ला सोडून जाण्याचा सल्ला दिला होता. किल्ल्यावर उदयसिंगाने अनेक वर्षे पुरेल इतका धान्यसाठा करून ठेवला होता आणि किल्ल्याच्या रक्षणा-साठी जयमल राठोडच्या हाताखाली ८००० शूर रजपूत शिपाई आणि काल्पीचे १००० बरकन्दाज ठेवले होते. शत्रूच्या फौजेला आणि त्यांच्या जनावरांना दाणा-पाणी मिळू नये यासाठी किल्ल्याभोवतालचा अनेक मैलांचा प्रदेश त्याने उजाड करून सोडला होता.*

---

* कविराज श्यामलदास आपल्या मेवाडच्या इतिहासात असे नमूद करतो की, तहाचा निरोप घेऊन आलेल्या दूताविरुद्ध अम्बरच्या भगवंतदासाने अक-बराचे मन कलुषित करण्याचा प्रयत्न केला; पण त्याने ते ऐकले नाही.

## चितोडचा वेढा

हा प्रचंड किल्ला जिंकण्यासाठी अकबराने एकामागून एक तीन योजना आखल्या. किल्ल्याला पूर्ण वेढा देण्यापूर्वीच मुघल सैन्य त्यावर दररोज जोरदार हल्ले चढवीत होते. पण ते सर्व परतून लावण्यात आले आणि त्यात मुघलांची कत्तल खूप झाली. इतक्या सुरक्षित आणि समर्थपणे लढविल्या जाणाऱ्या किल्ल्यावर बेफाम हल्ले चढविल्याने निरर्थक प्राणहानी मात्र होते हे समजून येताच अकबराने किल्ल्याच्या तटाचे काही भाग आणि बुरुज निवडून त्यांच्या खाली सुरुंग पेरून आणि दारू भरून ते उडवून देण्याचा हुकूम दिला. तीच वेळ हल्ला चढविण्याला योग्य होती. त्यानुसार तीन प्रमुख तोफखान्यांच्या रक्षणाखाली तीन सुरुंग पेरण्यात आले. एक हसनखान छकताई, राय टिपूरदास आणि इतर अधिकाऱ्यांच्या हाताखालच्या अकबराच्या खास तोफखान्याने उत्तरेकडे लाखोटा गेटपाशी, दुसरा सुजात खान, तोडरमल आणि मुख्य अभियंता कासीखान यांच्या हाताखालच्या तोफखान्याने पूर्वेकडे सुरजपोळ गेटपाशी, तिसरा आसफखानच्या हाताखालच्या तोफखान्याने दक्षिणेकडे रामपोळ गेटसमोरील चितोडी टेकडीपाशी, असे सुरुंग लावण्यात आले. त्याचबरोबर लखोटा गेटच्या पायथ्याशी एका बाणाच्या टप्प्याइतक्या लांबीचा साबात म्हणजे दोन समांतर भिंतींमधून जाणारा आच्छादित मार्ग उभारण्यात यावयाचा होता. अर्धा मण वजनाचा जड लोखंडी गोळा फेकता येईल इतकी मोठी उखळी तोफ अकबराने स्वतःच्या देखरेखीखाली तिथल्या तिथेच ओतून घेतली. किल्ल्यावर तोफा डागण्याची सज्जता पाहून किल्ल्यावरील लष्कर घाबरून गेले आणि त्यांनी तहाची बोलणी सुरू करून अकबराचे आधिपत्य मान्य करण्याची आणि सालीना खंडणी देण्याची तयारी दर्शविली. पण राणाने स्वतः येऊन हजर झाले पाहिजे असा अकबराने हट्ट धरला. तो त्यांनी मान्य न केल्यामुळे तहाच्या वाटाघाटी फिसकटल्या. त्यामुळे अगदी शेवटपर्यंत लढण्याचा निर्धार करून किल्ल्यावरच्या सैन्याने तटावरून आणि बुरुजावरून शत्रूच्या खंदकावर बाण, दगड आणि गोळे यांचा वर्षाव चालू केला. रोज मुघलांचे १०० सैनिक मारले जात होते. कच्च्या कातड्याच्या ढाली करून स्वतःचे रक्षण करीत बांधलेल्या साबातच्या मार्गाने ते पुढे घुसले. स्वतःचे सैनिक तसेच सुरुंग लावण्याच्या आणि साबात तयार करण्याच्या कामावर लावलेले मजूर यांना प्रोत्साहन देण्याकरिता अकबराने सढळ हाताने पैसा ओतला. १७ डिसेंबर रोजी किल्ल्याच्या उत्तरेस लावलेल्या एका सुरुंगाचा प्रचंड स्फोट होऊन त्या बाजूचा बुरूज पायापासून ढासळला आणि तेथे जमलेले अनेक रजपूत शिपाई मारले गेले. हल्ल्याकरिता टपून बसलेले मुघल सैन्य पडलेल्या खिंडारांतून किल्ल्यात शिरकाव करून घेण्यासाठी पुढे घुसले. याच वेळी दुसऱ्या

सुरुंगाचा एकाएकी स्फोट होऊन त्यामध्ये २०० मुघल आणि ४० रजपूत ठार झाले. या दोनशे मुघलांपैकी १०० नावाजलेले असून त्यातील वीस तर इतके प्रख्यात होते की, अकबर स्वत: त्यांना ओळखत असे. रजपूतांनी ताबडतोब पहिल्याइतकीच उंच भिंत उभारून खिंडार बुजवून घेतले. आसफखानच्या तोफखान्याजवळ लावलेला दक्षिणेकडच्या तिसऱ्या सुरुंगाचा स्फोट होऊन ३० रजपूत मारले गेले. पण किल्ल्याच्या तटबंदीला काहीही इजा झाली नाही. नुसते सुरुंग लावून किल्ला जिंकता येण्याचा संभव नाही हे अकबराने जाणले. किल्ल्याच्या आतल्या लोकांवर तोफांचा मारा करून त्यांचे जिवित, घरे आणि मालमत्ता नष्ट केल्याशिवाय त्यांना शरण आणण्याची आशा नाही हे अकबराला कळून चुकले. तेव्हा साबात पुरा करण्यावर सर्व लक्ष केंद्रीत करून तो स्वतः कामावर उभा राहून तेथे काम करणारे गवंडी आणि शिपाई यांना धीर देऊ लागला. मधून मधून तो साबातमधून स्वत:च्या बंदुकीचे बार उडवीत असे. साबातच्या छपराखाली बांधलेल्या खोल्यांत अकबराने एक दिवस आणि दोन रात्री स्वत: घालविल्या. तोडरमल आणि कासीमखान यांच्या देखरेखीखाली साबात पुरा झाला आणि त्याच्या खालून मुघल सैन्याने मोठ्या बंदुका आणि उखळीतोफा यांनी सतत मारा चालू केल्याने गोळे किल्ल्याच्या आत पडून रजपूत सैनिकांचा वेध घेऊ लागले. साबातमध्ये सोईस्कर जागी बसून अकबर स्वत: गोलंदाजांना हुकूम देऊ लागला. इतकेच नव्हे तर स्वत:ही गोलंदाजी करू लागला. रजपुतांनी तितक्याच चोखपणे प्रत्युत्तर देऊन अनेक निष्णात मोगल लढवय्ये ठार केले. अकबराचाही जीवही दोन-तीन वेळा धोक्यात आला होता. पण त्यातून तो थोडक्यात निसटला. तथापि शाही तोफखान्याच्या सतत माऱ्यांमुळे उत्तरेकडच्या तटाच्या भिंतीत काही ठिकाणी भगदाडे पडली. शत्रूला आत येण्याला मज्जाव करण्यासाठी २३ फेब्रुवारीच्या मध्यरात्री भगदाडे बुजविण्यासाठी जयमलच्या देखरेखीखाली रजपूत लोक जमा झाले. सेनापतीचे चिलखत चढवलेला जयमल अकबराच्या नजरेस पडला आणि तो कोण आहे हे न ओळखताच अकबराने आपल्या प्रसिद्ध संग्राम बंदुकीतून त्याच्यावर गोळी झाडली आणि जयमल ताबडतोब ठार झाला.* रजपूत सैन्याचा धीर सुटला आणि त्याने रात्रभर शत्रूबरोबर शेवटचा निकराचा लढा देण्याची तयारी केली. किल्ला शत्रूच्या हातात पडल्यास आपली अब्रू जाईल हे जाणून ३०० रजपूत स्त्रियांनी निरनिराळ्या ठिकाणी जोहार केला. जयमलच्या मृत्यूनंतर रजपूत सेनेचे आधिपत्य पत्ता या सिसोदिया घराण्यातल्या दुसऱ्या पुरुषाकडे आले. शूर रजपूत केशरी वस्त्रे परिधान करून कडव्या निर्धाराने लढत गौरवास्पद मृत्यूला कवटाळण्याला सिद्ध झाले. किल्ल्याच्या रक्षणाचा येथे प्रश्न नव्हता. ते आत्मसमर्पण होते. २४ फेब्रुवारी

---

* श्री. जी. एन. शर्मालिखित Mewar and the Mughal Emperor (१९५४) पृ. ७६ वरील तळटीप: वीर विनोद (मेवाडचा इतिहास भाग २, पान ८०) आणि जी. एच. ओझा (रजपुताना का इतिहास, भाग २, पृ. ७२७–७२८) यांच्या मते जयमलच्या पायालाच तेवढी जखम झाली होती आणि दुसऱ्या दिवशी लढताना तो मारला गेला. पण याला अधिकृत आधार सापडत नाही.

रोजी पहाटे त्यांनी किल्ल्याचे दरवाजे उघडले आणि नागव्या तलवारी हातात घेऊन पुढे येणाऱ्या मुघली सैन्याला तोंड देण्याला पुढे सरसावले.

## अखेरचा सामना : चितोडचा पाडाव

किल्ल्याच्या तटाला पडलेली भगदाडे बुजविण्याचे काम रजपुतांनी मध्यरात्रीनंतर सोडून दिले होते. तरी बुचकळ्यात पडलेले मुघल सैन्य एकत्र जमून रात्रभर लढाईस सज्ज होऊन राहिले होते. भल्या सकाळी सोंडेत तलवारी दिलेले मुघलांचे नावाजलेले ३०० हत्ती साबातच्या आघाडीवरून किल्ल्याच्या दरवाज्याच्या रोखाने सोडण्यात आले. त्यांच्यावर निकराने तुटून पडून रजपूत सैन्याने त्यांचे सुळे हातात पकडून त्यांतील अनेकांच्या सोंडा कापून काढल्या. तेथे 'न भूतो न भविष्यति' असा संग्राम झाला. मधुकर या उन्मत्त हत्तीचे सुळे एका हाताने पकडून ईश्वरदास चौहान याने अचाट धाडसाने दुसऱ्या हाताने त्याच्यावर खंजिराने वार केला. अनेक रजपूत वीरांनी अशी पराक्रमाची शर्थ केली. पण पर्वतप्राय हत्तीपुढे त्यांचा किती वेळ टिकाव लागणार ! अनेक सैनिक त्यांच्या पायाखाली तुडवले गेले आणि बहुतेक सर्वांना त्यांनी ठार केले. गोविंद श्यामच्या देवळाजवळ शूर वीर पट्टा हत्तीच्या पायाखाली चिरडून मेला. रस्त्यारस्त्यावरून लोक लढत राहिले आणि मध्यान्हीपर्यंत कापाकापी चालू होती. प्रत्येक घरात आणि गल्लीत प्रेतांचे ढीग पडले होते. पण राजवाड्यासमोर, महादेवाच्या देवळाबाहेर आणि रामपुरा गेटजवळ मृतांची संख्या सर्वांत जास्त होती. राण्याच्या राजधानीकडे नजर टाकावी म्हणून अकबर आपल्या मुख्य अधिकाऱ्यासमवेत किल्ल्यात गेला. त्या वेळी रजपूत सैन्याने केलल्या तीव्र प्रतिकारामुळे आणि विशेषत: त्याच्यावर आणि त्याला साथ देणाऱ्या अम्बरच्या घराण्यावर सिसोदिया लोकांनी केलेल्या तुच्छतादर्शक वाक्प्रहारांनी त्याचा राग इतका भडकला की, गडावरच्या लोकांची सरसकट कत्तल करण्याचा हुकूम त्याने दिला. तीस हजार माणसांची निघृणपणे कत्तल करण्यात आली. किल्ल्यावर ८००० रजपूत शिपाई, १००० बरकंदाज आणि ४०,००० शेतकरी होते. ह्यांतले बहुतेक सर्व अकबराच्या अनाठायी क्रोधाला बळी पडले. या असमर्थनीय कृत्याचे समर्थन करण्याचा अबुल फझलचा प्रयत्न व्यर्थ होता. राणाच्या पदरी असलेल्या काल्पीच्या १००० बरकंदाजांवर त्याचा विशेष रोष होता. आपल्या अचूक गोळीबाराने त्यांनी बादशहाचे अगणित शिपाई यमसदनास पाठवले होते. अकबराच्या तावडीतून हे लोक मोठ्या हिकमतीने सुटले. मुघलासारखा वेष घेवून जणू काही आपल्या बायकामुलांसह कैदेतून सुटलो अशी बतावणी करून ते किल्ल्यांतून बाहेर पडले व सुखरूप स्थळी जाऊन पोचले.

किल्ल्याच्या आणि आजूबाजूच्या प्रांताची व्यवस्था लावण्यासाठी अकबर तीन दिवस चितोडला राहिला. चितोड हा साम्राज्याचा एक सुभा करून आसफ-

खानला तिथला सुभेदार नेमण्यात आले. २८ फेब्रुवारीला त्याने अजमेरला जाण्यासाठी चितोड सोडले. जाताना विजयाचे चिन्ह म्हणून "आपल्या निनादाने राजाच्या आगमन-निर्गमनाची ललकारी देणारा" चितोडचा प्रचंड नगारा, महामातेच्या देवळातील झुंबरे आणि सिंहद्वार ही आग्र्याचा किल्ला सजविण्यासाठी त्याने आपल्याबरोबर नेली. चितोडवर जय मिळाला तर आभारप्रदर्शनार्थ अजमेरला चालत जाऊन मुइनुद्दीन चिस्तीच्या मंदिराचे दर्शन घेऊ असा नवस त्याने केला होता. तो पुरा करण्याकरिता तो उन्हाळ्याच्या सुरवातीस चितोडपासून काही टप्पे मांडलला चालत गेला. तेथे ख्वाजाच्या कबरीतल्या पुजाऱ्यांकडून त्याला गळ घातली गेली की, ख्वाजासाहेबानी पुजाऱ्यांना स्वप्नात दर्शन देऊन बादशहाने अजमेरला वाहानात बसून यावे, अशी इच्छा व्यक्त केली असल्याने त्याने घोड्यावरून यावे. म्हणून अकबराने पुढील प्रवास घोड्यावरून केला. पण शेवटचा टप्पा पुन्हा पायी चालत जाऊन ६ मार्चला तो अजमेरला पोचला. तेथे ९ दिवस मुक्काम केल्यावर तो अलवार आणि नरनौलच्या मार्गाने आग्र्यास जाण्यास निघाला आणि तेथे १३ एप्रिल १५६८ रोजी येऊन पोचला.

शिसोदियांच्या पराक्रमाने प्रभावित होऊन चितोडचे लढवय्ये शूर जयमल आणि पट्टा यांचे हत्तीवरचे पुतळे दगडात कोरून घेऊन अकबराने ते आग्रा किल्ल्याच्या दिल्ली दरवाजाच्या आतल्या प्रवेशद्वाराच्या दोन्ही बाजूंना उभे केले. अकबराचे हे कृत्य त्यांच्या शौर्याचा गौरव करावा म्हणून होते का या थोर सेनापतींना ते मेल्यानंतरही कैद करून आणल्याचा दिमाख मिरवण्याचा हेतू त्याच्या मुळाशी होता हे सांगणे कठीण आहे. बहुतकरून दोन्ही त्यात असावेत.

## सुलेमान कराणीची तात्पुरती शरणागती

चितोडचा वेढा सुरू असतानाच सुलेमान कराणी शरण आल्याची बातमी आली. हा ताजखानचा धाकटा भाऊ असून त्याच्यामागून बंगाल आणि बिहारच्या गादीवर आला होता. स्वामीनिष्ठ अफगाणांची मोठी फौज त्याच्या तैनातीत होती आणि असदुल्लाच्या ताब्यात असलेल्या झमानियावर त्याचा डोळा होता. हा अब्दुल्लाखान प्रथम खान-इ-झमनच्या नोकरीत असून त्याच्या मृत्यूनंतर झमानियाचा किल्ला आणि आजूबाजूचा प्रांत सुलेमानच्या ताब्यात देण्याबद्दल त्याच्या वाटाघाटी सुरू होत्या. जौनपूरचा सुभेदार मुनिमखान याला ही बातमी मिळताच त्याने असदुल्लाखानशी बोलणी करून झमानियाचा किल्ला आपल्या ताब्यात देण्याबद्दल असदुल्लाखानचे मन वळवले. अशा रीतीने फसगत झाल्यावर सुलेमानने मुनिमखानशी मैत्रीचा सलोखा केला आणि असे ठरविले की, मुनिमखानने सुलेमानची भेट घ्यावी आणि सुलेमानने अकबराचे सार्वभौमत्व मान्य

करून त्याच्या नावाने खुत्बा वाचण्याची व्यवस्था करावी. पाटण्याजवळ मुनिमखानचे मोठे स्वागत करून सुलेमानने त्याच्या सन्मानार्थ खाना दिला आणि अकबराच्या नावाने खुत्बा वाचण्याची व्यवस्था करून त्याच्या नावाची नाणी पाडण्याची तरतूद केली. पण अफगाणांनी दगाबाजी केली आणि मुनिमखानला कैद करून ठार मारण्याचा बेत रचला. पण मुनिमखानला या दगलबाजीच्या बेताचा सुगावा लागून तो घाईने जौनपूरला माघारी परतला. सुलेमानचा मुलगा बायाझिद आणि त्याचा वजीर लोदी यांनी मुनिमखानची समजूत घालण्याचा प्रयत्न केला. मुनिमखान जौनपूरला पोचण्याच्या आतच चितोडचा वेढा यशस्वीरीत्या पार पडल्याची वार्ता आली. पण सुलेमानची शरणागती तात्पुरती ठरली. तो मोठा महत्त्वाकांक्षी असून ओरिसावर अनेक वेळा स्वारी करून चुकला होता. पुन: एकदा तो ओरिसावर चाल करून गेला आणि कपटाने तो मुलुख त्याने आपल्या ताब्याखाली आणला आणि तिथल्या राजाला ठार मारले. ओरिसाच्या राजाच्या आश्रयाला जाऊन राहिलेला त्याचा प्रतिस्पर्धी इब्राहिम याला कैद करून ठार मारण्यात आले. आता सुलेमानच्या हाताखालचा मुलुख आणि त्याचे सामर्थ्य खूपच वाढले होते आणि अकबराचा मांडलिक म्हणून राहण्यास तो तयार नव्हता.

**मिर्झांचे दुसरे बंड**

आक्टोबर १५६७ मध्ये मिर्झामंडळी माळव्यातून पळ काढून गुजराथमध्ये चिंगीझखानच्या दरबारात आश्रयास गेली, याचा उल्लेख पूर्वी आलेलाच आहे. गुजरातचा सुलतान महम्मदच्या मृत्यूनंतर चिंगीझखानने चांपानेर, सुरत आणि भडोच हीं आपल्या ताब्यात घेतली. त्या वेळी ऐतिमदखानच्या ताब्यात असलेले अहमदाबाद जिंकून घेण्याच्या आता विचारात तो होता. म्हणून मिर्झांचे स्वागत करून त्यांच्याबरोबर तो ऐतिमदखानवर चालून गेला. लढाईत ऐतिदखानचा पराभव होऊन अहमदाबाद चिंगीझखानच्या हातात पडले. या कामाबद्दल बक्षीस म्हणून त्याने मिर्झांना भडोचच्या आसपासचा मुलूख तोडून दिला. पण जात्याच दंगेखोर असल्यामुळे त्यांनी फार मोठ्या जादा मुलखावर आक्रमण करून तंटयास सुरुवात केली. म्हणून चिंगीझखानने त्यांना खानदेशकडे पिटाळून लावले. खानदेशमधून मिर्झांनी माळव्यावर हल्ला केला. रंथंभोरचा किल्ला जिंकण्यासाठी नेमलेल्या सादिकखान आणि इतर सरदारांना अकबराने सैन्य देऊन माळव्यात पाठवून दिले आणि कुलीजखान आणि इतर काही सेनापती यांच्या हाताखाली दुसरे सैन्य देऊन सादिकखानाच्या मदतीला पाठविले. ही फौज सिरोंजला पोचल्यावर शिहाबुद्दिन अहमदखान त्यांना येऊन मिळाला आणि पुढे सारंगपूरला शहाबुदकखान आपल्या सैन्यासह येऊन मिळाला. उज्जैनपर्यंत येऊन पोचलेले मिर्झा गोंधळून मंडूला पळून

गेले. त्यांचा पाठलाग करून त्यांना नर्मदेच्या पलीकडे हाकून देण्यात आले. त्यांचे अनेक लोक मारले गेले. त्यांच्याविरुद्ध असलेल्या चिंगीझखानाचा खून झाला असल्यामुळे गुजराथ ही लगा साधण्याला योग्य जागा आहे असे समजून मिर्झामिंडळी पुन: गुजराथमध्ये शिरली. म्हणून बादशहाचे सैन्य पुन: माळव्यात परत आले. मिर्झांनी चंपानेर आणि सुरत यासारखे महत्त्वाचे किल्ले कबजात घेऊन गुजराथमधील बऱ्याच मोठ्या भागावर ताबा मिळविला.

## अत्काकुळीचे पंजाबमधून स्थलांतर

कोणत्याही महत्त्वाच्या गटाला किंवा घराण्याला राज्याच्या कुठल्याही भागात कायमचे स्थान न देण्याच्या धोरणास अनुसरून अकबराने बराच काळ पंजाबात अधिकारावर असलेली मरहूम शम्सुद्दिन अत्काखान याची मुले आणि नातेवाईक यांना पंजाबमधून हलविण्याचे ठरविले. तेथील जहागिरदार आणि इतर अधिकारी यांना सप्टेंबर १५६८ मध्ये राजधानीस बोलावून घेतले. खान कलान ही पदवी धारण करणारा पंजाबचा सुभेदार मीर महंमद खान याची त्याने संभल प्रांतावर नेमणूक केली. कुतुबुद्दिन खान याला माळव्याला व शरीफखानला कनोजला पाठविले. पण खान कलानचा मुलगा कोका मिर्झा अझीझ, ज्याला पुढे खान-इ-आझम ही पदवी मिळाली, त्याची पंजाबमध्ये दीपालपूरवरच (हल्लीच्या मॉंटगॉमेरी जिल्ह्यात ) नेमणूक करून दिली. खान जहान ही पदवी देऊन हुसेन कुली खानला नागोरहून बदलून पंजाबचा सुभेदार नेमण्यात आले.

## शहाबुद्दिन अहमद याला खलिसाचे दिवाण नेमण्यात येते

याच वेळी शहाबुद्दिन अहमदखान याला माळव्याहून बोलावून आणून खलिसाचा ( राखीव जमीनीचा ) दिवाण नेमण्यात आले. वजीरकीचे काम प्रचंड प्रमाणात वाढल्यामुळे एकट्या मुझफ्फर खानला ते संभाळता येईना. म्हणून जहागिरी जमिनीचा दिवाण आणि खलिसा जमिनीचा दिवाण नेमून दोन खाती करून ते विभागण्यात आले. महसुलाच्या कारभारात शहाबुद्दिन खानने काही सुधारणा केल्या. वार्षिक जमाबंदीमुळे खर्च फार होत असे आणि अफरातफरीस पुष्कळ वाव मिळत असे. ती पद्धत त्याने बंद करून ठराविक प्रमाण (नस्क) अंमलात आणले आणि चाणाक्षपणाने अफरातफरीस आळा घातला.

## अकबर रंथंभोरचा किल्ला सर करतो

चितोडच्या पाडावानंतर लगेच चितोड गडाच्या खालोखाल अभेद्य असलेला रंथंभोराचा किल्ला जिंकून घेण्याचा बेत अकबराने रचला. त्याचप्रमाणे

आश्रफखानच्या नेतृत्वाखाली सादिकखान, बाबाखान, काकशाल, समंजीखान, सफदरखान, बहादूर खान, दोस्तखान सहारी आणि इतर अधिकारी यांना त्या किल्ल्याची नाकेबंदी करण्यासाठी पाठवून दिले. पण मिर्झांच्या माळव्यातील दुसऱ्या बंडामुळे या सैन्याला परत बोलावणे भाग पडले. या बंडाचा बीमोड केल्यावर अकबराने रंथंभोरवर चढाई करण्याचे ठरविले. २१ डिसेंबर १५६८ रोजी बरोबर मोठे सैन्य घेऊन तो आग्र्याहून निघाला आणि दिल्लीला आपल्या वडिलांच्या कबरीचे दर्शन घेऊन अलवार आणि जयपूरच्या दक्षिणेस ४० मैलांवर असलेल्या लालसोट या मार्गाने तो रंथभोरला १० फेब्रुवारी १५६९ रोजी जाऊन पोचला.

रंथभोरचा प्रसिद्ध किल्ला डोंगराळ प्रदेशाच्या मध्यभागी असून त्या वेळी सुर्जन हारा याच्या ताब्यात होता. त्याने किल्ल्याची तटबंदी मजबूत करून आत भरपूर धान्यसाठा करून ठेवला होता. किल्ल्याभोवती प्रदक्षिणा करून अकबराने त्याच्या पायाची पाहणी केली. नंतर शेजारच्या एका टेकडीवर चढून मोंगलांनी मजबूत वेढा दिलेल्या किल्ल्याची त्याने टेहळणी केली. टेकडीच्या सभोवार तोफखाना सज्ज ठेवण्यात आला. पण किल्ल्याच्या प्रचंड भिंतीवर मोंगलांच्या तोफांच्या माऱ्याचा काहीच परिणाम होईना. म्हणून अकबराने साबात बांधण्याचा हुकूम दिला. बादशहाचा मुख्य अभियंता कासीमखान आणि वजीर राजा तोडरमल हे या बांधकामाच्या कलेत अनुभवी होते. त्यांच्यावर हे काम सोपविण्यात आले. थोड्याच दिवसांनी रण गेटाच्या समोर जवळ जवळ किल्ल्याइतक्याच उंचीचा साबात बांधून पुरा झाला. मोठमोठ्या जड तोफा, दोनशे बैलजोड्यांचे ताफे जुंपून सपाट जमिनीवरून खेचून नेण्यात आल्या आणि चिलखत घातलेल्या कहार लोकांच्या जमावाच्या साह्याने रणच्या टेकडीवर चढविण्यात आल्या. या तोफा ३० मण वजनाचे लोखंडी आणि ६० मण वजनाचे दगडी गोळे फेकू शकत असत. किल्याच्या तटावर गोळ्यांचा मारा सुरू झाला. थोड्याच अवधीत तटबंदीस मोठे खिंडार पडले आणि आतील घरे कोसळून पडली. किल्ल्यावर सर्व बाजूंनी हल्ला चढवून तो हस्तगत करण्यासाठी १९ मार्च हा दिवस अकबराने नक्की केला होता. त्यामुळे सुर्जन हारा हादरला आणि त्याने भगवन्तदास, मानसिंग आणि इतर अधिकाऱ्यांच्या मध्यस्तीने तहाची बोलणी सुरू करून दुदा आणि भोज या आपल्या दोघा राजपुत्रांना १८ मार्च रोजी अकबराकडे पाठवून शरणागती पत्करली. अकबराने ती मान्य केली. पण नंतर दुदा आणि भोज यांना मानाची वस्त्रें देण्यासाठी अकबरासमोरून घेऊन जात असताना त्यांच्या बरोबरच्या एका सेवकाला दग्याफटक्याचा संशय येऊन त्याने बादशाही रक्षकावर हल्ला केला. पण ताबडतोब त्याला पकडून ठार मारून त्याचे तुकडेतुकडे करण्यात आले. या अनिष्ट गोष्टीचा आपल्या उदार

धोरणावर काहीही परिणाम होऊ न देता अकबराने दोन्ही राजपुत्रांना किल्ल्यावर त्यांच्या पित्याकडे पाठवून दिले. २२ तारखेला सुर्जन स्वत: अकबराच्या भेटीला आला. तेव्हा त्याचे आदराने स्वागत करण्यात आले. किल्ला खाली करून देण्यासाठी त्याने मागितलेली तीन दिवसांची मुदत अकबराने मान्य केली आणि ठरलेल्या दिवशी आपले कुटुंब आणि मालमत्ता यासकट सुर्जनने किल्ला खाली केला आणि चाव्या अकबराच्या स्वाधीन केल्या. अशा तऱ्हेने रंथंभोरचा किल्ला एका महिन्याच्या आत अकबराच्या हातात पडला. टॉडने आपल्या राजस्थानच्या इतिहासात ( Annals of Rajasthan ) असे लिहिले आहे की अकबर एका सेवकाचा वेष घेऊन अंबरचा राजा भगवन्तदास याच्या बरोबर किल्ल्यावर गेला आणि तेथे त्याने सुर्जन हाराशी तहाची बोलणी केली. ही हकीकत खरी आहे असे व्हिन्सेंट स्मिथ मानतो. पण याला त्या वेळच्या कुठल्याही पर्शियन इतिहासात दुजोरा मिळत नाही आणि ही गोष्ट अविश्वासार्ह वाटते. अनिसुद्दिन मिहतरखान याला रंथंभोरचा किल्लेदार नेमून अकबर अजमेरच्या यात्रेला निघून गेला. तेथून परत येताना वाटेत अंबरचा राजा भगवन्तदास याचा पाहुणचार स्वीकारून १० मे रोजी तो आग्र्याला परत आला. आग्र्याच्या किल्ल्यात नव्यानेच बांधून पुऱ्या झालेल्या बंगाली महालात तो आता राहू लागला.

## कलिंजरचा किल्ला सर होतो

मध्य हिंदुस्थानातील कलिंजरचा तिसरा मोठा किल्ला सर करण्याचे अकबराने ठरविले. हा किल्ला भाठ्याचा राजा रामचंद्र याच्या सत्तेखाली असून तो त्याने बिजलीखानकडून पुष्कळ खंडणी देऊन मिळविला होता. इस्लामशहा सूर या प्रसिद्ध अधिकाऱ्याच्या पदरी असलेल्या आझम हुमायून या नावाने ओळखल्या जाणाऱ्या बहरखानचा बिजलीखान हा दत्तकपुत्र होता. मजनून खान काकशाल याच्या हाताखाली शहमखान जलेर आणि इतर नाणावलेले अधिकारी देऊन अकबराने मोठी फौज पाठवून दिली. तिने कलिंजर किल्ल्याला वेढा दिला. राजा रामचंद्र याने भाठ्याच्या आपल्या वडिलार्जित राज्यावर अकबराचे सार्वभौमत्व १५६३ सालीच मान्य केले होते. त्यातच चितोड आणि रंथंभोर यासारखे अभेद्य म्हणून प्रसिद्ध असलेले किल्ले अकबराच्या हाती पडल्याच्या बातमीने तो दिङमूढ होऊन गेला होता. अकबराच्या प्रचंड सैन्याविरुद्ध लढा देणे व्यर्थ आहे असे वाटून अकबराकडे रामचंद्राने शरणागतीची याचना केली. तेव्हा अकबराने वेढा उठविण्याची आज्ञा देऊन किल्ल्याचा ताबा घेण्यासाठी मजनून खानची नेमणूक केली. अशा तऱ्हेने कलिंजरचा किल्ला लढाईचा प्रसंग न येताच अकबराच्या हातात पडला (ऑगस्ट १५६९). राजा रामचंद्र याचा खजिना आणि मालमत्ता

ही त्याच्याच हातात ठेवून अकबराने अलाहाबादजवळील अरैल परगण्यावर त्याची नेमणूक केली.

याच सुमारास दक्षिणेतील कोचीनच्या राजाचा दूत अकबराच्या दरबारात येऊन त्याने त्याला एक विलक्षण सुरा नजर केला. त्याच्या केवळ स्पर्शाने रोग बरे होतात असा समज होता.

## राजपुत्र सलीमचा जन्म

अकबराला आता २७ वर्षे होऊन गेली होती. तेव्हा आपल्या विशाल राज्याला शोभेल असा वारसपुत्र आपल्याला व्हावा असे त्याला वाटू लागले. त्याची पहिली दोन मुले बालपणीच मरून गेली होती. म्हणून पुत्र-प्राप्तीसाठी साधू लोकांना भेटून त्यांचे आशीर्वाद अकबर मागत असे. देवाच्या कृपेने जर आपल्याला मुलगा झाला तर अजमेरच्या शेख मोईनुद्दिनच्या कबरीचे दर्शन आपण चालत जाऊन घेऊ असा नवस त्याने केला होता. आग्र्याच्या पश्चिमेस २३ मैलांवर असलेल्या सिक्रीच्या डोंगरातील गुहेत निवास करणारा शेख सलीम चिस्ती याच्या भेटीला अकबर जात असे. अशाच एका भेटीत आपल्याला किती मुलगे होतील असे विमनस्क अवस्थेत अकबराने शेखसाहेबांना विचारले. 'तुला तीन मुलगे होतील' असे शेखसाहेबांनी उत्तर दिले. तेव्हा अकबर म्हणाला, 'मी अशी शपथ घेतली आहे की, माझा पहिला मुलगा आपल्या पदरात घालीन आणि आपला स्नेह आणि कृपा हीच त्याचे संरक्षणसंवर्धन करतील.' ही कल्पना शेखसाहेबाला पसंत पडली व त्याने बादशहाचे अभिनंदन केले. अकबराची रजपूत राणी अंबरची राजकन्या हिचे दिवस भरत आले. तेव्हा बरोबर स्त्रीपुरुष सेवक आणि इतर परिवार देऊन तिला शेखसाहेबांच्या आश्रमात पाठविण्यात आले. तेथे ३० ऑगस्ट १५६९ रोजी भावी जहांगीर, राजपुत्र सलीम, याचा जन्म झाला. हे आनंदाचे वृत्त अकबराला आग्र्यास कळविण्यात आले. पुष्कळ वर्षांनंतर मुलगा झाला तर बापाने लगेच त्याचे तोंड पाहू नये या लोकसमजुतीला अनुसरून त्या बालकाला सिक्रीलाच विश्वासू नोकरांच्या तैनातीत ठेवण्यात आले आणि त्याचे नाव सुलतान सलीम असे ठेवले. याबद्दल जहांगीर आपल्या आत्मचरित्रात लिहितो, "माझ्या जन्मानंतर माझे नाव सुलतान सलीम हे ठवले खरे; पण वडिलांनी मद्यप्राशनाच्या वेळी किंवा सावध अवस्थेतही मला महंमद सलीम म्हणून कधीही हाक मारली नाही. ते मला नेहमी शेखो बाबाच म्हणत असत." पुत्रजन्माबद्दल अकबराने सात दिवस मोठा भव्य समारंभ केला राज्यातल्या सर्व कैद्यांची सुटका करण्यात आली आणि कवींना मुक्तहस्ते बक्षिसे देण्यात आली. या प्रसंगी केलेल्या कवितेबद्दल ख्वाजा हुसेन मरुइ या एकट्या कवीला दोन लाख टंक देण्यात आले. आपला नवस फेडण्यासाठी

अकबर मोठ्या भक्तिभावाने अजमेरच्या पदयात्रेला निघाला. २० जानेवारी १५७० रोजी आग्र्याहून निघून वाटेत १६ वेळा मुक्काम करून तो ख्वाजाच्या दर्ग्या-कडे पोचला. तेथे प्रार्थना आणि दानधर्म करण्यात त्याने कित्येक दिवस घालविले. २ मे रोजी तो दिल्लीच्या वाटेने आग्र्यास परत आला. दिल्लीस त्याने आपल्या पित्याच्या कबरीचे दर्शन घेतले आणि इतर मशिदिंनाही भेटी दिल्या.

## मुरादचा जन्म

७ जून १५७० रोजी अकबराचा दुसरा मुलगा मुराद याचा जन्म फत्ते-पूर सिक्री येथे झाला. त्याबद्दल ईश्वराचे उतराई होण्यासाठी २३ सप्टेंबर रोजी अकबर पुन: एकदा आग्र्याहून अजमेरला ख्वाजा चिस्तीच्या कबरीचे दर्शन घेण्यासाठी गेला. अजमेरला असताना तिथल्या किल्ल्याची डागडुजी करून त्याने शहराभोवतालच्या तटबंदीची वाढ केली. किल्ल्याच्या आत नवीन इमारती, राजवाडे आणि दिवाणखाने बांधण्यात आले. हे बांधून पुरे होण्यास तीन वर्षे लागली. सरदार आणि अधिकारी यांना राहण्यासाठी स्वत:ची घरे बांधावी लागली आणि बागा तयार कराव्या लागल्या. ३ नोव्हेंबर १५७० रोजी अजमेर सोडून ५ तारखेस अकबर नागोरला येऊन पोचला. नागौरला त्याचा मुक्काम ५० दिवस होता. तेथल्या तीन तळ्यांपैकी एकाचा जीर्णोद्धार करून अकबराने त्याला शुक्र-तलाव असे नांव दिले.

## राजस्थानची शरणागती

अकबराचे वर्चस्व मान्य न करणारे अनेक रजपूत राजे नागोरला अकबराच्या भेटीस आले आणि त्यांनी अकबराबरोबर मित्रत्वाचे तह केले. जोधपूरचा राजा मालदेव याचा मुलगा चंद्रसेन अकबराच्या भेटीसाठी आला आणि अकबराने शाही इतमामाने त्याचे स्वागत केले. बिकानेरचा राजा रायकल्याणमल आपला मुलगा रायसिंग याच्या समवेत अकबराच्या भेटीस आला आणि दोघांमध्ये मैत्रीचा तह झाला. कल्याणमलचा भाऊ कहन याच्या मुलीशी अकबराने लग्न लावले. रायसिंगला आपल्या पदरी ठेऊन घेतले आणि तुंदिलतनु कल्याणमल – ज्याला घोड्यावर बसणे फार कठीण होत असे – याला बिकानेरला परत जाण्याची परवानगी दिली. जयसलमेरचा राजा रावळ हरराय याने पण अकबराचे मांडलिकत्व स्वीकारून आपल्या मुलीचे त्याच्याशी लग्न लावून दिले. राजकन्येला बादशहाच्या छावणीवर घेऊन येण्यासाठी राजा भगवंतदासाला जयसलमेरला पाठविण्यात आले. अशा तऱ्हेने १५७० च्या अखेरपर्यंत उदेपूरचा राणा सोडल्यास बाकी सर्व प्रमुख रजपूत राजे अकबराला शरण आले आणि त्याचे आधिपत्य त्यांनी मान्य केले. ते मांड-लिक या नात्याने अकबराच्या नोकरीत दाखल झाले आणि त्यांना वरच्या हुद्याच्या

मनसबदाऱ्या देण्यात आल्या. हे त्याचे यश म्हणजे त्याच्या सर्वंकष मुत्सद्देगिरीचा आणि अचूक चातुर्याचा जसा परिणाम होता, तसाच त्याच्या खंबीरपणाच्या धोरणाचा, उदार धर्मसहिष्णुतेचा आणि रजपूत राजांच्या अंतर्गत कारभारात हस्तक्षेप न करण्याचा परिणाम असला पाहिजे असे अनुमान करता येईल. अकबराच्या विजयामध्ये अंबरच्या राजघराण्याचाही भाग आहे. त्याचा खंबीर पाठिंबा तर होताच, शिवाय त्याच्या मध्यस्थीने आणि मने वळवून घेण्याच्या पद्धतीमुळे बहुतेक सर्व रजपूत राजे अंबर घराण्याप्रमाणेच बादशहाचे मांडलिक होण्यास तयार झाले. फक्त उदेपूरचा राणा या सर्वांपासून अलग राहिला. उदेपूरची राजधानी चितोड आणि त्या राजाचा जवळ जवळ तिसरा हिस्सा त्याने गमावला होता. आता त्याने आपली राजधानी उदेपूरला हलविली आणि डोंगराळ भागाच्या आश्रयाने त्याने आपला प्रतिकार चालू ठेवला.

अकबराचा मुक्काम नागोरला असताना माळव्याचा पदच्युत राजा बाज बहादूर हा आपल्या भ्रमंतीला कंटाळून अकबराला शरण आला. त्याला एक हजाराची मनसबदारी देण्यात आली.

## पाकपाटणमध्ये अकबर

नागोर सोडल्यावर पंजाबमधील पाकपाटण (अजोधन) येथे शेख फरीद याच्या कबरीचे दर्शन घेण्यासाठी अकबर काही दिवस जाऊन राहिला. तेथे त्याने बाबरचा मुख्य मंत्री वीर खलीफा याचा पुत्र मुहीब अलीखान याला ठठ्ठा जिंकून घेण्याची परवानगी दिली. ही परवानगी नाहीद बेगमच्या खास विनंतीवरून देण्यात आली. हुमायूनचा एक स्वामीभक्त सरदार कासीमखान कोका याची नाहीद बेगम ही मुलगी असून मुहीब अलीखानची बायको होती. भक्करच्या सुलतान महबूबने मुहीब अली खानला आपल्या राज्यामधून जाण्याची परवानगी नाकारल्यावरून त्याच्यावर चढाई करून मोहीब खानने त्याला पराभूत केले. त्यानंतर सुलतान महमूदने भक्करच्या किल्ल्याचा आश्रय घेतला म्हणून मुहीब अलीने त्या किल्ल्यास वेढा दिला. तो किल्ला घेतल्यावर मुघल सैन्याने ठठ्ठाच्या किल्ल्याला वेढा देऊन तो पण काबीज केला. राजपुत्र मुराद आजारी पडल्यामुळे अकबराचा पाकपाटण येथील मुक्काम लांबला. तो बरा झाल्यावर दीपाळपूरच्या मार्गे अकबर लाहोरला गेला. तेथे मिर्झा अझीज कोका याने बादशहाचे आदरातिथ्य केले. १७ मे १५७१ रोजी अकबर लाहोरला आला. तेथून परत येताना तो हिसारला थांबला. तेथे असतांना ५ जुलै रोजी मीर बक्षी, मीर अर्झी, आणि तवाजी बेगी या मोठ्या हुद्यावर असलेल्या लष्करखानला दारू पिऊन दरबारात आल्याबद्दल त्याने शिक्षा केली. दारू पिऊन दरबारात येणे हा फार मोठा गुन्हा

आहे. असे अकबर मानीत असे. एका घोड्याच्या शेपटीला बांधून लष्करखानची धिंड काढण्यात आली व नंतर त्याला कैदेत टाकण्यात आले. १५७१ सालच्या सप्टेंबर महिन्याच्या अखेरीस ५०,००० रुपयांचा दंड दिल्यावर त्याची सुटका झाली. मीर बक्षीच्या जागेवर शहाबाझखान याला नेमण्यात आले. हिसारहून २१ जुलैला अकबर अजमेरच्या यात्रेला गेला आणि १७ नोव्हेंबर १५७१ रोजी फत्तेपूर सिक्रीला येऊन पोचला.

**फत्तेपूर सिक्रीचा पाया घातला** (नोव्हेंबर १५७१)

अजमेरहून परत आल्यावर अकबराने फत्तेपूर सिक्रीला एक राजवाडा आणि राहण्यासाठी इतर इमले आणि कचेऱ्या बांधण्याचे ठरविले. फत्तेपूर सिक्री ही सुदैवी जागा आहे असे समजून अकबराने तेथे राहण्याचे पसंत केले. याबद्दल अबुल फझल लिहितो, "त्याचे दोन सुपुत्र सलीम आणि मुराद यांचा जन्म सिक्री येथे झाला होता आणि जेथे ईश्वरी साक्षात्कार झालेल्या शेख सलीमच्या आत्म्याचे वास्तव्य होते, अशा आध्यात्मिक उच्चपद प्राप्त झालेल्या स्थानाला बाह्यात्कारी भव्यपणा देण्याची त्याच्या पवित्र अंतःकरणाला इच्छा झाली." फत्तेपूर सिक्रीचे एका मोठ्या शहरात रूपांतर करण्याचा बेत अकबराने राजपुत्र सलीम जन्माला आला तेव्हाच केला होता आणि आता म्हणजे १५७१ च्या नोव्हेंबरमध्ये या योजनेकडे लक्ष देण्याला त्याला फुरसद मिळाली. त्याप्रमाणे आपले अभियंते आणि वास्तुशास्त्रज्ञ यांना शहराची आखणी करण्यास लावून स्वतःसाठी एक राजवाडा बांधण्यास सांगितले. दरबारातले सरदार आणि इतर अधिकारी यांना आपापले वाडे बांधून घेण्यास सांगण्यात आले. शहराच्या तिन्ही बाजूंस तटबंदी बांधून त्यांत नऊ दरवाजे ठेवण्यात आले. पश्चिमेच्या चौथ्या बाजूला अनेक मैलपर्यंत पसरलेल्या विस्तीर्ण तलावाचे संरक्षण होते. डोंगराच्या कडा भुईसपाट करून त्यावर सुंदर राजवाडे आणि बागा उभारण्यात आल्या. या टेकडीच्या उतरणीवर कचेऱ्या, खानका, शाळा, स्नानगृहे आणि व्यापारी पेठा वसविण्यात आल्या आणि डोंगरसपाटीवर आणि खाली शहरातील खुल्या मैदानात सुंदर बगीचे तयार करण्यात आले. थोड्याच दिवसांत फत्तेपूर सिक्री हे एक सुंदर आणि माणसांनी गजबलेले, भरभराटीचे शहर झाले. अकबराने या शहराचे नाव फतेहबाद असे ठेवले पण फत्तेपूर सिक्री हेच लौकिक नाव रूढ झाले.

शहरबांधणीचे काम जेजुइट धर्मगुरू ॲन्टनी मॉनसेराट याने प्रत्यक्ष पाहिले होते आणि त्याचे संक्षिप्त वर्णन त्याने लिहून ठेवले आहे. "तयार केलेले आणि आखणीबरहुकूम घडवलेले दगड बाहेरून आणून ते जागच्या जागी बसवून दिले आणि एखादी जादूची कांडी फिरावी तसे फत्तेपूरसिक्रीचे शहर

थोड्याच अवधीत उभे राहिले. एके काळी वाघ आणि तत्सम हिंस्र पशूंनी व्यापलेल्या जंगलाची जागा आता १६ व्या शतकातल्या लंडनपेक्षाही विस्तीर्ण आणि दाट लोकवस्तीच्या वैभवशाली शहराने घेतली."

४ जानेवारी १५७२ रोजी अकबराने आपला वजीर मुझफ्फरखान याने आग्र्याला नव्यानेच बांधलेल्या सुशोभित वाड्यामध्ये भव्य पाहुणचार स्वीकारून वजिरास मोठा मान दिला. पण आश्चर्याची गोष्ट अशी की, थोड्याच महिन्यांत अकबराने आपल्या या आवडत्या वजिरास बडतर्फ करून मक्केस धाडून दिले. याचे कारण असे सांगतात की, एकदा सोंगट्यांचा खेळ चालला असताना मुझफ्फरखान खूप रागवला. सोंगट्यांचा हा खेळ चालू असताना सर्व सरदारांना हजर राहणे सक्तीचे होते आणि या खेळात मुझफ्फरखान खूपच पैसे हरला होता. मुझफ्फरखान हा स्वतंत्र वृत्तीचा माणूस असून अकबराचे धोरण अंमलात न आणल्यामुळे यानंतर पुन: एकदा वजीरकीची वस्त्रे सोडण्याची पाळी त्याच्यावर आली. त्याचा उल्लेख पुढे येईलच.

— ० —

# प्रकरण आठवे

## गुजराथवर विजय : राज्यकारभाराच्या नव्या योजना :

### गुजराथच्या स्वारीची कारणे

इ. स. १५७२ च्या मध्याच्या सुमारास अकबराने गुजराथ जिंकून घेण्याचा निश्चय केला. कारण त्याच्या दरबारातील अबदुल्लाखान उझबेक, आसफखान अशा बलाढ्य बंडखोर सरदारांना आणि मिर्झासारख्या त्याच्या महत्त्वाकांक्षी आणि दंगेखोर नातेवाईकांना अनुक्रमे १५६४, १५६५ व १५६७ साली गुजराथमध्ये आश्रय मिळाला होता. पण त्या वेळी गुजराथ जिंकण्याइतके सामर्थ्य आपल्यापाशी आहे असे त्याला वाटत नव्हते. तसेच इतर गोष्टींत व्यग्र असल्यामुळे तो तसे करूही शकत नव्हता. शिवाय मधल्या मुलखावर ताबा मिळविल्याशिवाय आणि आग्रा आणि अहमदाबाद यांच्या दरम्यान दळणवळणाचा अखंड मार्ग प्रस्थापित केल्याशिवाय अशी योजना हाती घेणे शहाणपणाचे नव्हते. हे सर्व १५७० च्या अखेरीस साध्य झाले. सुदैवाने मोठ्या अंतर्गत कलहामुळे गुजराथमध्ये यावेळी गोंधळ माजला होता. फेब्रुवारी १५३७ मध्ये बहादूरशहा मरण पावल्यानंतर विशेष कर्तृत्ववान असा एकही राजा गुजराथमध्ये झाला नाही. बहादूरशहानंतर गादीवर आलेला राजा गादी मिळाल्यानंतर सतराव्या दिवशीच मरण पावला. त्याच्यानंतर राज्यावर आलेला तिसरा महमूद हा अत्यंत नालायक राजा १५५४ मध्ये मरण पावल्यानंतर सय्यद मुबारक, ऐतीमदखान आणि इमाद उलमुल्क यांसारख्या सरदार मंडळींनी निरनिराळे राजे गादीवर बसवले आणि त्यांना पदच्युत पण केले आणि सर्व प्रदेश स्वतःमध्ये वाटून घेतला. साबरमती आणि माही नद्यांमधला सर्व प्रांत आणि अहमदाबाद शहर यांवर ताबा मिळवून ऐतीमदखानने हलक्या कुळात जन्मलेला तिसरा सुलतान मुझफ्फर शहा याला आपल्या हातातले कळसूत्री बाहुले बनवून टाकले. इमाद-उलमुल्कचा मुलगा चिंगीझखान याने चंपानेर, सुरत, भडोच आणि बडोदा येथे आपली सत्ता प्रस्थापित केली. मुसाखान आणि शेरखान फौलादी यांनी पट्टण (अनहिलवाडा) वर कबजा करून कडीच्या प्रदेशापर्यन्त आपली सत्ता प्रस्थापित केली. जुनागड आणि सौराष्ट्र अमीनखान घुरीच्या हातात पडले आणि धंढुका, धोलका

आणि त्याच्या आसपासचा प्रदेश सय्यद मुबारकचा नातू सय्यद अहमद याच्या ताब्यात गेला. १५६७ मध्ये चिंगीझखानच्या मृत्यूनंतर सुलतान मुझफ्फर शेरखान वेलादीच्या चिथावणीने पट्टणला पळून गेला. फौलादीने अहमदाबादच्या किल्ल्याला वेढा देऊन ऐतीमदखानला किल्ल्यात डांबून ठेवले. अशा तऱ्हेने गुजराथमध्ये यादवीला सुरुवात झाली आणि ऐतीमदखानने अकबराकडे मदतीची याचना केली. ही संधी साधून अकबराने ताबडतोब गुजराथवर स्वारी करण्याची तयारी करण्याचा हुकूम दिला. लोकांना चांगल्या कारभाराचा लाभ मिळवून द्यावा या हेतूने प्रवृत्त होऊन प्रदेश जिंकून घेणे हे अकबराचे धोरण होते हे अबुल फझलचे म्हणणे निदान या बाबतीत तरी समर्थनीय होते. गुजराथ हा देशातला एक अत्यंत समृद्ध प्रांत असून वायव्य दिशेकडील आशियायी देश आणि युरोपखंड याबरोबर गुजराथमधील बंदरातून मोठा व्यापार चाले आणि त्या भागात अनेक देशी आणि परदेशी श्रीमंत व्यापाऱ्यांचे वास्तव्य होते. मक्केला आणि अरबस्तानातील इतर पवित्र स्थळांना जाणारे मुसलमान यात्रेकरू गुजराथमधल्याच बंदरावरून प्रवासास निघत असत, या गोष्टीकडेही प्रामुख्याने अकबराचे लक्ष होते. सर्वांत महत्त्वाची गोष्ट म्हणजे एके काळी त्याचा पिता हुमायून याने गुजरात जिंकून घेतला होता आणि पुन्हा तो परत मिळविणे हे एक पवित्र कर्तव्य होते.

## अकबराच्या सावधगिरीच्या योजना

गुजराथच्या स्वारीवर निघण्यापूर्वी मिर्झा हकीमने पंजाबवर पुन्हा स्वारी करू नये म्हणून अकबराने पावले टाकली. मिर्झा यूसुफ, बिरबल आणि फत्तू यांना मोठ्या सैन्यानिशी पंजाबचा सुभेदार हुसेन कुली खान याच्या मदतीस पाठवून दिले आणि हुसेन कुली खानला कांग्रा जिल्ह्यातील नागरकोट काबीज करून ते बिरबलाच्या हाती सोपविण्याचा आदेश देण्यात आला. नागरकोटचा राजा जयचंद यावर बादशहाची गैरमर्जी झाल्यामुळे त्याला आग्र्याला कैदेत ठेवले होते. पण आपल्या बापास ठार मारले असे समजून जयचंदचा मुलगा बिधीचंद हा बंड करून उठला होता. साम्राज्याच्या इतर भागातही अशीच सावधगिरी घेण्यात आली. त्याने ठरवलेल्या बेतातील सर्व अडथळे दूर सारून २ जुलै, १५७२ रोजी तो फत्तेपूरसिक्रीहून निघाला. मीरबक्षी शहाबाझखान याच्याकडे मोहिमेची सर्व तयारी करण्याचे काम होते. त्याच्याशी उद्धटपणे वागल्याबद्दल बाबाखान काकशाल याला जबर शिक्षा करण्यात आली. संगनेरच्या-मार्गे कूच करून तो अजमेरला पोचला आणि तेथून १२ ऑगस्ट रोजी खान–इ–कलन (मीर महम्मदखान) याच्या हाताखाली १०,००० घोडेस्वार देऊन आघाडीचे सैन्य म्हणून अहमदाबादकडे त्याची रवानगी करण्यात आली. १ सप्टेंबरला

अकबराने पुनः प्रवास सुरू केला. मेवाडच्या मांडलिकीतील पहिल्या दर्जाची जहागीर बागोर. तिच्यानजीक तिसऱ्या पुत्रजन्माची खबर अकबराला मिळाली.

## दानियलचा जन्म

अजमेरहून निघण्याच्या सुमारास आपली एक राणी आसन्नप्रसवा असून पुढील प्रवास करण्यास असमर्थ आहे असे दिसून येताच अकबराने तिला अजमेरचा प्रसिद्ध चिस्ती साधू शेख दानियल याच्या आश्रमात पाठवून दिले. तेथे तारीख ९ सप्टेंबर १५७२ रोजी रात्री राजपुत्र दानियलचा जन्म झाला. हा अकबराचा तिसरा व शेवटला मुलगा असून शेख दानियलच्या आश्रमात त्याचा जन्म झाला म्हणून त्याचे नाव दानियल ठेवण्यात आले. राजपुत्र एक महिन्याचा झाल्यावर त्याला अम्बरला पाठवून द्यावे आणि तेथे भारमलची बायको राणी हिने त्याचे संगोपन करावे अशी सूचना अकबराने देऊन ठेवली. गुजराथची मोहीम बरेच दिवस लांबण्याचा संभव होता आणि राजपुत्राचे संगोपन करण्यास अम्बरची राणी योग्य स्त्री होती म्हणून ही सूचना अकबराने दिली. तारीख १० सप्टेंबर रोजी शाही छावणी बागोरला पोचली.

## सुलेमान कराणीचा मृत्यू

बागोरहून पुढे कूच करीत असताना बंगाल, बिहार आणि ओरिसाचा राजा सुलेमान कराणी हा ११ ऑक्टोबर १५७२ रोजी मरण पावल्याची बातमी बादशहाला मिळाली. कटक आणि जगन्नाथपुरी जिंकून ताब्यात घेऊन सुलेमानने कामरूपपासून ओरिसापर्यंत सर्व मुलखावर आपली सत्ता प्रस्थापित केली होती. ते प्रांत आपल्या ताब्यात घ्यावे अशी सूचना जौनपूरचा सुभेदार मुनीमखान याला अकबराने दिली.

## सुलतान मुझफ्फरची शरणागती

मध्यंतरी एक दुःखद घटना घडली. खान–ई–कलनच्या हाताखालील आत्राडोचया फौजेने सिरोहीजवळ भद्रजन येथे तळ दिला असताना सिरोहीचा राजा राय मानसिंग देवरा याच्यातर्फे खान–ई–कलनला भेटण्यास आलेल्या एका रजपूताने त्याच्या छातीवर वार करून दोन इंचाची खोल जखम केली. खान–ई–कलनच्या रक्षकांनी या रजपूत शिपायाला जागच्या जागीच पकडून ठार केले. ही घटना १७ ऑक्टोबर रोजी घडली. १९ तारखेला त्या ठिकाणी पोचताच, अकबराने या कृत्याचा बदला घेण्याचा हुकूम दिला. गावापासून दोन मैलांवर सारणेश्वर महादेवाच्या देवळात जमलेले ८० रजपूत लढता लढता धारातीर्थी पडले आणि दुसरे ७० राजवाड्यांचे रक्षण करण्यात कामी

आले. बिकानेरच्या रायसिंगला जोधपूर आणि सिरोही या दोन राज्यांच्या सरहद्दीवर ठेवण्यात आले आणि तेथील दोन्ही राजांवर आणि तसेच (सीरोहीशी मैत्री असलेल्या ) उदेपूरच्या राणा प्रतापवर नजर ठेवण्याचे आणि गुजराथ-हून पळून आलेल्या बंडखोरांना बादशाही हद्दीत घुसून दंगल माजविण्याला प्रतिबंध करण्याचे काम त्याच्याकडे सोपविण्यात आले. मुख्य बादशाही फौज पट्टणला पोचल्यावर अकबराने शहा फख्रुद्दिनला ऐतीमदखानचा अंदाज घेऊन त्याला दरबारात घेऊन येण्यासाठी अहमदाबादला पाठविले. शेरखान फौलादी हा अहमदाबादचा वेढा उठवून जुनागड आणि सुरतच्या दिशेने मागे सरकला असून ऐतीमदखानच्या मदतीला निघालेला इब्राहिम हुसेन मिर्झा परत आपल्या मुक्कामाला गेला आहे अशी बातमी आली. इदारपर्यंत चाल करून फौलादीच्या मुलांना पकडून आणण्यासाठी अकबराने मानसिंगाला पाठविले, पण ते त्याच्या हातातून निसटले. ७ नोव्हेंबर १५७२ रोजी अकबर पट्टणला पोचला आणि तेथे मक्केच्या यात्रेला जाण्याची तयारी करीत असलेला त्याचा पूर्वीचा वजीर मुझफ्फरखान याला त्याने क्षमा केली. ८ तारखेला अकबर अहमदाबादकडे जाण्यास निघाला. शेरखान फौलादीपासून फुटून निघालेला सुलतान मुझफ्फर हा एका शेतात लपून बसला होता. जोटण्याला त्याची छत्रचामरे आणि परिवार यांच्यासहित त्याला अकबरासमोर आणून उभे करण्यात आले. याचवेळी गुजराथमधील काही नामवंत मंडळी अकबराला येऊन मिळाली (१६ नोव्हेंबर).

## अकबर गुजराथचा राजा झाल्याची ग्वाही

दुसऱ्या दिवशी बादशहाच्या भेटीस येऊन ऐतीमदखानने अहमदाबादच्या किल्ल्या त्याच्या स्वाधीन केल्या. अकबराने गुजराथवर त्याची नेमणूक करण्याचे वचन देऊन गुजराथमधील सर्व थरातील लोक चांगल्या रीतीने वागतील याची हमी पत्करण्यास त्याला सांगितले. हबशांखेरीज करून बाकी सर्व लोकांबद्दल तशी जबाबदा ी ऐतीमदखानने स्वीकारली. अकबर आणि ऐतीमदखान यांच्या-मध्ये मध्यस्थी करणारा आणि तारीख–ई–गुजराथ लिहिणारा गुजराथचा लेखक अबु तरब हा स्वत: ऐतीमदखानला जामीन राहिला. यानंतर साबरमतीच्या तीरावर सांतज या गावी जाऊन तेथे २० तारखेला अकबराच्या सैन्याने तळ दिला, येथे अकबराच्या नावाने खुतबा वाचून त्याच्या शिक्क्याची नाणी पाडण्यात आली (२१ नोव्हेंबर).

## अकबराची अहमदाबादला भेट

अकबराने गुजराथी लोकांवर हल्ला करण्याचा हुकूम दिला आहे अशी अफवा उठवन काही गुंड अकबराला येऊन मिळणाऱ्या लोकांचे सामान लुटू लागले.

अकबराने परिस्थिती लगेच आटोक्यात आणली आणि गुंडांचा बदोबस्त करून त्यांना हत्तीच्या पायाखाली दिले. त्यांनी चोरून आणलेली मालमत्ता ज्याची त्यास परत दिली. अकबराने तेथल्या लोकांची मने आपल्या बाजूस वळविण्याचा प्रयत्न केला. अहमदाबादच्या समृद्ध शहराला त्याने भेट दिली. अबुल फझल म्हणतो की, यावेळी अहमदाबादमध्ये एकेका नगराएवढे मोठे असे ३८० मोहल्ले होते. २१ तारखेला अकबराचा वार्षिक तुला–दान समारंभ मोठ्या थाटामाटात पार पडला. अमीन खान धुरी आणि इब्राहिम हुसेन मिर्झा या दोघांकडून बादशहाला नजराणे आले. त्यांपैकी इब्राहिम हुसेन मिर्झाचा नजराणा अकबराने स्वीकारला नाही.

## अकबर खंबायतला जातो

अकबराने आता गुजराथच्या कारभाराची नवी घडी बसवून दिली. गुजराथचे दोन भाग करण्यात आले. अहमदाबादसकट पूर्वेच्या भागावर मिर्झा अझीझ कोका याला सुभेदार नेमण्यात आले आणि राहिलेला भाग म्हणजे बडोदा, चंपानेर, सुरत आणि बंडखोर मिर्झाच्या ताब्यातील प्रदेश ऐतीमद-खानकडे सोपविण्यात आला. नंतर हकीम ऐन–उल–मुल्क याला गुजराथमधील सरदारांवर नजर ठेवण्यासाठी मागे ठेवून २ डिसेंबर रोजी अकबर खंबायतला जाण्यास निघाला. गुजराथमधील सरदारांच्या स्वामीनिष्ठेबद्दल शंका असल्यामुळे अशी व्यवस्था करणे आवश्यक समजले गेले. अकबराने जहाजातून समुद्रावर सफर करून तुर्कस्तान, सिरिया, इराण, ट्रान्स ऑक्सियाना आणि पोर्तुगाल या देशांतील व्यापाऱ्यांना भेटी दिल्या. अकबर खंबायतच्या मार्गावर असताना इख्तियार उल्–मुल्क हा फरारी झाला आहे आणि ऐतीमदखान आणि इतर गुजराथमधले सरदार त्याच विचारात आहेत अशी बातमी आली. या सरदारांना पकडून आपल्यासमोर घेऊन येण्यासाठी अकबराने शहाबाजखानला तातडतोब अहमदाबादला परत पाठवून दिले. गुजराथ आपल्या ताब्यात सोडून बादशहा आग्र्याला परत जाईल हा ऐतीमदखान आणि इतर गुजराथी सरदारांचा अंदाज चुकीचा ठरला. त्यांना खंबायतला बादशहाच्या छावणीत आणून त्यांच्यावर सक्त नजर ठेवण्यात आली.

## मिर्झा विरुद्ध मोहीम

गुजराथचा पुष्कळ भाग बळकावून बसलेल्या मिर्झाचा नायनाट करण्याचा अकबराने आता निश्चय केला. बडोदा इब्राहिम हुसेन मिर्झाच्या ताब्यात होते, सुरत आणि भोवतालचा प्रदेश महंमद हुसेन मिर्झाकडे होता; आणि चंपानेर व त्या भोवतालचा प्रदेश शहा मिर्झाच्या मालकीचा होता. हसन खान खजान्चीच्या

ताब्यात खंबायत देऊन अकबर बडोद्याकडे निघाला. वाटेत शहाबाझखान आणि इतर काही अधिकारी यांच्या हाताखाली काही फौज देऊन त्यांना चंपानेरकडे आणि मिर्झा अझीझ कोकाला अहमदाबादकडे पाठविले. अकबर बडोद्याजवळ येताच मिर्झा लोकांनी सुरतच्या किल्ल्याची नाकेबंदी केली असून ते चंपानेरजवळ एकत्र जमले आहेत अशी बातमी त्याला मिळाली. तेव्हा अकबराने आपले भगवंतदास, मानसिंग आदि कसलेले सेनानी फौजेसह सुरत काबीज करण्याकरिता दिले. इब्राहिम मिर्झा भडोचचा किल्ला सोडून बादशहाच्या छावणीपासून १६ मैलांवर आला आहे अशी बातमी २४ डिसेंबरच्या मध्यरात्री मिळाली. हे कळताच अकबराने सुरतेला पाठविलेले सैन्य परत बोलावून घेतले आणि उत्तरेकडील प्रांतात बंडाळी माजविण्यासाठी त्वरेने निघालेल्या इब्राहिमला अचानक गाठण्यासाठी हलके सैन्य घेऊन त्याने ताबडतोब निघण्याचे ठरविले.

## सरनालची लढाई

पहाटेपूर्वी दोन तास चाळीस लोक बरोबर घेऊन अकबर निघाला. पण वाटाड्याचा रस्ता चुकला आणि दिवस उजाडेतो इब्राहिम मिर्झा कित्येक मैल दूर पळून गेला होता. राहिलेली सर्व रात्र आणि दुसरा सबंध दिवस कूच केल्यानंतर सूर्यास्तापूर्वी दोन तास अकबराला अशी खबर मिळाली की इब्राहिम माही नदी ओलांडून थसऱ्यापासून पूर्वेस पाच मैलांवर आणि त्याच्या मुक्कामापासून आठ मैल दूर असलेल्या सरनाल गावी तळ देऊन राहिला आहे. अकबर त्वरित पुढे निघाला. वाटेत त्याला अझीझ कोका, भगवंतदास, मानसिंग, भूपत, भोज, सय्यद महंमद खान बऱ्हा आणि इतर काही अधिकारी येऊन मिळाले. आता त्याच्या शिपायांची संख्या २०० झाली. माही ओलांडून जाताना मानसिंगच्या सांगण्यावरून त्याला आघाडीवर ठेवण्यात आले. नदी ओलांडताच पैलतीरावरील सरनाल गावाच्या वेशीजवळ अकबराला प्रतिकार झाला. पण त्यास तोंड देऊन अकबराचे सैन्य गावात घुसले. इब्राहिम दुसऱ्या वाटेने निघून गेला होता. वेशीवरच्या या हातघाईच्या लढाईत भगवंतदासचा भाऊ भूपत हा शत्रूवर जोराची चढाई करीत असता मारला गेला. सरनालला जाण्याचा मार्ग अरुंद असून दोन्ही बाजूंस काटेरी झुडपे असल्यामुळे त्यातून घोडेस्वार जोडीने जाऊ शकत नव्हते. आणि म्हणूनच अकबराचे रक्षण करण्यासाठी भगवंतदास त्याच्या मागोमाग चालला होता. शत्रूकडल्या तीन सैनिकांनी त्यांच्यावर हल्ला केला. एकाने राजा भगवंतदासवर बर्ची फेकली. तो चुकवून आपल्या भाल्याचा वार करून भगवंतदासने त्याला खाली लोळविले. दुसरे दोघे अकबरावर चालून आले तेव्हा आपला घोडा काटेरी झुडपावरून फेकून देऊन अकबर त्या दोघांच्या समोर ठाकला. हे पाहताच ते दोघेजण घाबरले आणि गोंधळून पळून गेले. गावाबाहेरच्या उंचवट्यावर तळ देऊन राहिलेल्या शत्रूवर

हल्ला करण्याचा हुकूम बादशहाने दिला. त्यांचा पराभव करून पळवून लावण्यात आले. अत्यंत जोराचा पाठलाग करूनसुद्धा रात्रीच्या अंधारात इब्राहिम हुसेन मिर्झाला पकडता आले नाही. बंडखोर मिर्झाची सर्व चीज वस्त सरनाललाच होती. तेथेच रात्री मुक्काम करून २४ डिसेंबरला अकबर बडोद्याला परत आला. सरनालच्या युद्धात केलेल्या पराक्रमाबद्दल भगवंतदासला निशाण आणि नगारा देऊन त्याचा सन्मान करण्यात आला. आजपर्यंत कुठल्याही हिंदूला ही मानचिन्हे मिळाली नव्हती.

शहाबाझखान मीर बक्षी याच्या ताब्यात ठेवलेला सिकंदरसूरचा मुलगा महमूद हा दख्खनला पळून गेला म्हणून शहाबाजखानला त्याच्या हलगर्जीपणाबद्दल शिक्षा करण्यात आली.

## सुरतेचा वेढा

अकबराने आता सुरतेचा प्रसिद्ध किल्ला जिंकून घेण्याचे ठरविले. तोडरमलला किल्ल्याची व आसपासच्या मुलखाची पाहणी करण्यास पाठवून साबात बांधण्यात तरबेज असलेल्या कासीमखान या अभियंत्याला अकबराने सैन्यात दाखल होण्याचा आदेश दिला. बंडखोर मिर्झांनी दंगा करू नये म्हणून खान-इ-आझम अझीझ कोका याला त्याच्यावर लक्ष ठेवण्यास सांगून कुतुबुद्दिन महंमदखानला आणि इतर अधिकाऱ्यांना माळव्यातून बोलावून घेतले. शहमखान जलेर याला चंपानेर काबीज करण्याचा हुकूम देऊन देशात कुठेही बंडाळी होणार नाही याबद्दल दक्ष राहण्यास सांगण्यात आले. अशी सर्व व्यवस्था करून अकबर ३१ डिसेंबरला बडोद्याहून निघाला आणि ११ जानेवारी १५७३ रोजी सुरतेजवळ पोचला आणि त्याने किल्ल्याला वेढा दिला. इब्राहिम हुसेन मिर्झाची बायको गुलरूख बेगम (कामरानची मुलगी) ही आपला लहान मुलगा मुझफ्फर हुसेन याला घेऊन बादशाही सैन्य जवळ येताच सुरतेहून दख्खनकडे पळून गेल्यामुळे हुमायूनचा एके काळचा हुजऱ्या हमझबान याच्या ताब्यात सुरतेचा किल्ला होता. सुरतेचा वेढा एकंदर एक महिना आणि सतरा दिवस चालला. या काळात किल्ल्यातल्या शिबंदीने बादशाही फौजेशी निकराचा सामना दिला. आपल्या मदतीसाठी त्याने एक पोर्तुगीज गोलंदाजांची तुकडी बोलावून घेतली होती. पण किल्ल्याच्या पायथ्याशी खंदक तयार होऊन किल्ल्याच्या तटबंदीवर जेव्हा तोफांच्या गोळ्यांचा मारा सुरू झाला तेव्हा वाटाघाटीस सुरुवात करून २६ फेब्रुवारी रोजी हमझबानने सौम्य अटींवर किल्ला बादशहाच्या स्वाधीन केला. पण उद्धटपणाच्या वर्तणुकीबद्दल बादशहाने हमझबानची जीभ छाटून टाकण्याचा हुकूम दिला. अकबरासारख्या बलाढ्य राजाची गैरमर्जी ओढवून घेणे मूर्खपणाचे आहे असे

पाहून पोर्तुगीज शिपाई दूताची भूमिका वठवून भेटी घेऊन अकबरापुढे दाखल झाले. त्यांचा प्रेमाने सत्कार करून पोर्तुगाल आणि युरोपातील इतर देशांबद्दल अकबराने त्यांच्याजवळ चौकशी केली आणि त्यांच्या वरिष्ठाशी मैत्रीचे संबंध जोडले. कारण हिंदुस्थानच्या पश्चिम किनाऱ्यावर पोर्तुगीज लोकांची सत्ता होती आणि हेदजाजला जाणारे मुसलमान यात्रेकरू त्यांच्या मर्जीवर अवलंबून होते.

कुलीजखानला सुरतेच्या किल्ल्याचा सुभेदार नेमून ८ मार्च १५७३ रोजी अकबर अहमदाबादला जाण्यास निघाला.

## आग्र्यावर अकस्मात हल्ला

सुरतेचा वेढा चालू असताना महंमद हुसेन मिर्झा आणि शहा मिर्झा यांनी पट्टणजवळ दंगलीस सुरुवात केली. सरनालला पराभूत झालेला इब्राहिम हुसेन मिर्झाही इदारला आपल्या नातेवाईकांस येऊन मिळाला. पुढील हालचालींबद्दल त्यांच्यात एकमत न झाल्यामुळे इब्राहिम हुसेन एकटाच आग्र्यावर अचानक हल्ला करण्यासाठी दौडीने निघाला. म्हणून त्याला वाटेतच रोखून धरण्यासाठी अकबराने सय्यद महमूदखान बऱ्हा, शहा कुलीखान महरम आणि राजा भग-वंतदास यांना पाठवून दिले. इब्राहिम काल्पीकडे वळण्याची शक्यता आहे असे समजताच शहमखानला चंपानेरचा वेढा उठवून ताबडतोब काल्पीला पाठविण्यात आले. या सर्व हालचाली फार झपाट्याने केल्यामुळे इब्राहिम मिर्झाला राजधानी-मध्ये गडबड करण्यास फावले नाही. पूर्वेकडच्या अफगाणांनी केलेला तसाच प्रयत्न अकबराच्या गैरहजेरीत आग्र्यावर देखरेख करणाऱ्या राजा बहारमलने तातडीने हाणून पाडला. सुदैवाने आपापसातल्या भांडणामुळे अफगाण लोक परत बंगालला निघून गेले.

## पट्टणची लढाई

इब्राहिम हुसेन मिर्झा गुजराथमधून पळून गेल्यावर त्याचे भाऊ महंमद हुसेन मिर्झा आणि शहा मिर्झा यांनी फौलादी अफगाणांच्या साह्याने पट्टणवर स्वारी करून सय्यद महंमदखान याला घेरले. त्याच्या मदतीस मोठे सैन्य घेऊन निघालेले खान–इ–आझम, मिर्झा अझीझ कोका २२ जानेवारी १५७३ रोजी पट्टणला येऊन पोचले. तेव्हा पट्टणचा वेढा उठवून बादशहाच्या फौजेशी दोन हात करण्यासाठी मिर्झा परत फिरला. लढाई एक दिवस पुढे ढकलून वेळ काढून अझीझ कोकाला बेसावध स्थितीत गाठण्यासाठी त्यांनी तहाची बोलणी सुरू केली. ती फिसकटल्यामुळे दोन्ही सैन्ये लढाईस सज्ज झाली (१६ जानेवारी १५७३). बादशहाची आघाडीवरील आणि उजव्या बाजूकडील फौज पराभूत

झाली. त्यांच्या राखीव सैन्याचाही शत्रूपुढे निभाव लागला नाही आणि सर्व मुघल सैन्यात भीतीचे वातावरण पसरले. आपला विजय झाला असे समजून मिर्झाच्या आघाडीवरचे ५०० अफगाण घोडेस्वार लढाई करण्याचे सोडून मिळेल ती लूट गोळा करू लागले. त्यांचा हा उद्योग चालू असताना बादशहाच्या उजवीकडील तुकडीचा सेनानी कुतुबुद्दिनखान याने मागून येऊन त्यांच्यावर हल्ला चढविला. अशा तऱ्हेने पराजयातून विजय प्राप्त करून घेऊन मुघल सैन्याने अफगाणांना रणांगणातून हाकून दिले. फौलादीच्या मागोमाग येणारे मिर्झा घाबरून जाऊन लढाई न करताच मागे फिरले. शेरखान फौलादी जुनागडच्या मार्गाने आणि महंमद हुसेन मिर्झा व शहा मिर्झा हे दोघे दख्खनच्या मार्गाने पळून गेले (फेब्रुवारी १५७३).

## पूर्वेकडील प्रदेशांत अफगाणांची परस्परांतली बंडाळी

सुलेमानच्या मृत्यूनंतर त्याचा थोरला मुलगा बायाझिद हा बंगाल, बिहार आणि ओरिसाचा राजा झाला. तो फार जुलमी असल्यामुळे त्याच्या सरदारांत तो अप्रिय झाला आणि त्याचा जावई हान्सू याने त्याचा खून केला. बायाझिदचा प्रधानमंत्री लोदी याने इतर सरदारांच्या साह्याने सुलेमानचा धाकटा मुलगा दाऊद याला गादीवर बसवून हान्सूला ठार मारले. बायाझिदच्या मुलाने दाऊदचा गादीवरचा हक्क नाकारला आणि बंगालचा खड्गहस्त गुजर कर्राणी याने त्याला बिहारचा राजा म्हणून गादीवर बसविले, दोन्ही राजे भ्रातृहत्येच्या युद्धाला सिद्ध झाले.

जौनपूरचा मुघल सुभेदार मुनीमखानने सुलेमानच्या मृत्यूनंतर पूर्वप्रांतात माजलेल्या यादवीचा फायदा करून घेण्याचे ठरविले. आपली एक फौज त्याने हाजीपूर काबीज करण्याला आणि दुसरी पाटणा जिंकण्याकरिता पाठवून दिली. मोगलांच्या पुढे आपला निभाव लागणार नाही हे जाणून गुजरने मुनीमखानबरोबर समेट केला आणि आपल्याला गोरखपूरची नेमणूक दिल्यास अकबराच्या नोकरीत येण्याचे कबूल केले. पण मध्यंतरी लोदी गुजरवर आपली सत्ता लादण्यात यशस्वी ठरल्यामुळे वाटाघाटी फिसकटल्या आणि मुनीमखानला हात हलवीत जौनपूरला परत यावे लागले. यानंतर थोड्याच दिवसांनी सुलेमान उझबेगचा मुलगा, युसफ महंमद उझबेग याने आग्र्याच्या कैदेतून निसटून जाऊन गोरखपूर घेतले अशी बातमी आली. मुनीमखानने गोरखपूर लौकरच परत जिंकून घेतले आणि झमानियावर कब्जा करून व गंगापार होऊन गाझीपूरवर स्वारी करण्याच्या तयारीत असलेल्या लोदीच्या फौजेचा पराभव केला. अफगाणांना तात्पुरता तह करायला भाग पाडून मुनीमखान जौनपूरला परत गेला. एवढ्यात अकबराच्या

गुजराथमधल्या विजयाचा सर्वत्र गाजावाजा झाला आणि त्यामुळे लोदी बिहारला परत गेला. बंगालचा राजा दाऊद आणि लोदी यांच्यातले भांडण सुरू असल्यामळे त्या बाजूने काही धोका नाही हे पाहून मुनीमखानने साहाजिकच रोहटासच्या किल्ल्यात आश्रयाला गेलेल्या लोदीच्या साह्यासाठी थोडी फौज पाठवून दिली.

## मिर्झा शरफुद्दीनला अटक

नागोर आणि अजमेरचा पूर्वीचा सुभेदार मिर्झा शरफुद्दीन हुसेन हा पक्का दंगेखोर १५६२ साली अकबराच्या दरबारातून पळून जाऊन बंडखोर मिर्झांना मिळाला होता. बागलाणच्या राजाने त्याला पकडून अकबराच्या स्वाधीन केले. ४ मार्च १५७३ रोजी खानदेशच्या दुसऱ्या महंमदचा भाऊ राजा अलिखान त्याला घेऊन सुरतेला अकबराच्या दरबारात आला. एका निरुपद्रवी हत्तीच्या पुढे त्याला टाकण्यात आले. पण नंतर त्याला जीवदान देऊन कैदेत ठेवले. त्याच्या बंडखोरीच्या वर्तनामुळे अकबर इतका भडकला होता की ख्वाजा अब्दुस शहीद याच्यासारख्या साधुपुरुषाने त्याला सोडून देण्यासाठी केलेली विनंतीसुद्धा त्याने नाकारली.

## मद्यपान समारंभात अकबराची फुशारकी

सुरतेच्या किल्ल्यासमोर अकबराची छावणी असताना एका रात्री विचित्र प्रसंग घडला. दमणच्या किनाऱ्यावरच्या काही पोर्तुगीज लोकांनी काही जहाजे भरून विलायती दारू आणली होती. आपल्या निवडक सहचाऱ्यांच्या एका मौजेच्या उपाहार प्रसंगी अकबराने काव्यगायन ऐकता ऐकता त्या मद्याचा येथेच्छ आस्वाद घेतला. खान–इ–आझम मुजफ्फरखान व लष्करखान इत्यादी मंडळी दारू पिऊन बेहोश झाली. हिंदुस्थानातले योद्धे मृत्यूला कशी भीक घालीत नाहीत या विषयावर बोलणी सुरू झाली. असे सांगण्यात आले की काही रजपूत दुहेरी टोकाचा भाला हातात धरून ठेवतात आणि तुल्यबल अशी दोन माणसे विरुद्ध दिशेने धावत येऊन भाल्याच्या टोकावर आदळतात आणि ती टोके आरपार जाऊन त्यांच्या पाठीतून बाहेर पडतात. कुठलाही रजपूत वीर आपल्यापेक्षा अधिक शूर असणे हे मान्य करायला अकबर तयार नव्हता. त्याने आपल्या तलवारीची मूठ एका भिंतीत घट्ट बसविली आणि आपली छाती तलवारीच्या पात्यावर आदळण्याच्या तो बेतात होता. त्याचे साथीदार घाबरून गेले आणि मानसिंगाने केवळ राजनिष्ठेने हाताचा एक ठोसा देऊन तलवार खाली पडली. अकबराच्या बोटांना इजा झाली. त्यामुळे रागाने अकबराने मानसिंगाला खाली पाडून त्याचा गळा जोराने दाबला. सय्यद मुझफ्फरने जोर करून अकबराचा हात मानसिंगाच्या गळ्यापासून खेचून घेतला

आणि त्यामुळे अकबराच्या बोटांच्या जखमेतून रक्त वाहू लागले. अकबराचा राग लवकरच नाहीसा झाला आणि त्याने आपल्या राजनिष्ठ सहकाऱ्यांवर सूड घेतला नाही.

## अकबर गुजराथहून परत फिरतो

सुरतेहून परत येताना नव्याने जिंकलेल्या गुजराथ प्रांताची व्यवस्था लावण्यासाठी अकबराने अहमदाबादला दहा दिवस मुक्काम केला. खान–इ–आझम याची सुभेदार म्हणून गुजराथवरची नेमणूक कायम करून १३ एप्रिल १५७३ रोजी अकबर आग्र्याला जायला निघाला. अहमदाबादच्या उत्तरेस ६४ मैलांवर सिधपूर या गावी पोचल्यावर त्याने खान–इ–आझमला अहमदाबादला परत जाण्याची परवानगी दिली आणि गुजराथमधील लोकांशी उदार धोरण ठेवून शत्रू आणि मित्र या दोघांनाही सारख्याच न्यायाने वागविण्याविषयी बजावले. मुझफ्फरखान तुर्बाती याला माळव्याचा सुभेदार नेमले आणि उदेपूरचा राणा प्रताप आणि इतर रजपूत राजे यांच्याशी समेट करण्यासाठी मानसिंगाची पुढे रवानगी केली. सिरोहीला पोचल्यावर भगवंतदासचा मुलगा माधोसिंग याला अंबरहून राजपुत्र दानियलला घेऊन येण्यासाठी पाठवून दिले आणि त्याने अजमेरला बादशहाला येऊन मिळावे असे ठरले. आपली हिंदू पट्टराणी, अंबरची राजकन्या हिला आपला भाऊ भूपत याच्या और्ध्वदेहिकासाठी अंबरला तिच्या आईवडिलांकडे जाण्याची परवानगी अकबराने दिली. हे सौजन्य अपूर्व होते आणि त्यावरून भारमल आणि त्याचे कुटुंब यांना आपले नातेवाईक मानून अकबर त्यांच्या भावनांची कदर करीत असे, असे दिसून येते.

## इब्राहिम हुसेन मिर्झाचा अंत

सारनालला पराभूत झाल्यानंतर चळवळ्या इब्राहिम हुसेन मिर्झा आपला भाऊ मसौद मिर्झा याला घेऊन नागोरला गेला आणि तिथल्या किल्ल्याला त्याने वेढा दिला, याचा उल्लेख पूर्वी आलेलाच आहे. पण बिकानेरचा रायसिंग, जोधपूरचा रामसिंग, मीरक कोलाबी इत्यादी सरदार आपल्यावर चाल करून येत आहेत असे दिसताच मिर्झाने नागोरचा वेढा उठविला. इ. स. १५७३ च्या जानेवारी महिन्यात नागोरजवळच कोठाळी येथे झालेल्या भीषण चकमकीत पराभूत होऊन त्याने घाईघाईने दिल्लीकडे पळ काढला. आग्र्याची देखरेख करणारा राजा भारमल याने आपला नातेवाईक खानगार याच्या हाताखाली सैन्य देऊन त्याला दिल्लीच्या रक्षणासाठी पाठवले. तेव्हा संबळकडे माघार घेऊन इब्राहिम हुसेन मिर्झा पंजाबमध्ये शिरला. पंजाबचा सुभेदार हुसेन कुलीखान यावेळी

नागरकोटच्या वेढ्यात गुंतला असल्यामुळे पंजाबमध्ये फारसे मुघल सैन्य नव्हते. पंजाबचा प्रांत निर्दयपणे उध्वस्त करणाऱ्या इब्राहिम हुसेन मिर्झाचे पारिपत्य करणे अधिक अगत्याचे आहे असे ठरवून कुलीखानने कांग्राचा राजा विधीचंद याच्याबरोबर तह करून वेढा उठविला आणि बंडखोर मिर्झाचा समाचार घेण्यासाठी तो दीपालपूरकडे वळला, * म्हणून नागरकोटचा किल्ला अकबराच्या हयातीत मुघलांच्या ताब्यात आला नाही. मुलतानकडे पळून जात असलेल्या इब्राहिम हुसेन मिर्झाला तालुंबाजवळ त्याने गाठले. तेथे झालेल्या लढाईत मसौद हुसेन मिर्झा मुघलांच्या हातात सापडला आणि त्याचे अनेक अनुयायी मारले गेले. युद्धात जखमी झालेला इब्राहिम पळून जाऊन एका बलुचीच्या घरात जाऊन लपून राहिला, पण त्या बलुचीने विश्वासघात करून त्याला सईदखानच्या ताब्यात दिले. दरबारात धाडला जाण्यापूर्वी इब्राहिम हुसेन मिर्झा झालेल्या जखमांमुळे मेला असावा किंवा त्याला ठार मारण्यात आले असावे.

## अकबर फत्तेपूरसिक्रीला परत जातो

१३ मे रोजी अकबर अजमेरला पोचला. तेथे त्याने ख्वाजाच्या कबरीचे दर्शन घेतले आणि तेथेच त्याने अंबरहून आलेला आपला आठ महिन्यांचा पुत्र दानियल याला पहिल्यांदाच पाहिले. अजमेरला एक आठवडा मुक्काम करून ३ जून १५७३ रोजी तो फत्तेपूरसिक्रीला जाऊन पोचला. अबुल फझलचा बाप शेख मुबारक याने खास अकबराच्या भेटीला येऊन त्याच्या विजयाबद्दल अभिनंदन केले. त्याच वेळी राज्यकारभाराबरोबरच धार्मिक बाबीही स्वतःकडे घेऊन सार्वभौम सत्ता आणि धार्मिक प्रमुखपद ही एकत्रित करावीत असे त्याने सुचविले. या सूचनेचा अकबराला कधीच विसर पडला नाही आणि ६ वर्षांनंतर ( सप्टेंबर १५७९ )

---

* 'अकबर नामा' भाग ३, पाने ३४–३८, मुन्तखाब–उत–तवारीख भाग २ पान १४९–१५० (मिर्झाने केलेल्या लुटीचा सविस्तर वृत्तांत); तारीख –ई–अकबरशाही पान २५९. तबकत–ई–अकबरी भाग २ पाने २५३–२५५. बदायुनी असे म्हणतो की, ज्वालामुखी देवीच्या सोनेरी छत्रावर मुघलांनी बाणांचा वर्षाव करून पूजेसाठी ठेवलेल्या देवळातल्या २०० काळ्या गाईंना ठार मारून त्यांच्या रक्तांनी भरलेले जोडे देवळाच्या भिंतीवर आणि जमिनीवर टाकले. ( मुन्तखाब–उत–तवारीख, पान १६२ आणि तबकत–ई–अकबरी भाग २ पाने २४६–२५९). इतर मौल्यवान वस्तूंबरोबर बिधीचंदने पाच मण सोने दिले पण मुघलांची मांडलिकी मान्य करणे आणि अकबराच्या जनानखान्याकडे डोला पाठवणे इत्यादी इतर अटी त्याने पाळल्या नाहीत.

त्याने ती सूचना अंमलात आणली. याचा उल्लेख पुढे योग्य ठिकाणी केला जाईलच.

२० जून १५७३ रोजी पंजाबचा सुभेदार हुसेन कुलीखान याने मसौद मिर्झा आणि इतर ३०० कैद्यांना मुलतानहून फत्तेपूरसिक्रीला आणले. त्यांच्या अंगाभोवती शिंगासकट गाईची कातडी लपेटली होती. त्या अवस्थेतून सोडवून त्यांना कैदेत ठेवण्याचा हुकूम अकबराने दिला. त्यातल्या काहींना सोडून देण्यात आले आणि काहींना ठार करण्यात आले. मसौदचे डोळे शिवून त्याला अकबरापुढे आणण्यात आले. अकबराला दया येऊन त्याच्या डोळ्यांवर घातलेले टोके काढून टाकण्याचा हुकूम त्याने दिला आणि त्याला ग्वाल्हेरच्या किल्ल्यात इतर बंडखोरांबरोबर ठेवले. हुसेन कुली खानला या कामाबद्दल खान–इ–जहन ही पदवी देण्यात आली.

## राणा प्रतापकडे मानसिंगाची वकिली अयशस्वी ठरते

२८ फेब्रुवारी १५७२ रोजी उदयसिंगच्या मृत्यूनंतर राणा प्रताप उदेपूरच्या गादीवर आला. त्याच्याशी बोलणी करून त्याला बादशहाचे सार्वभौमत्व मान्य करण्यासाठी त्याचे मन वळवून त्याला दरबारात घेऊन येण्यासाठी मानसिंगला सिंधपूरहून उदेपूरला पाठविण्यात आले होते. त्या भागातल्या इतर राजेरजवाड्यांशी सलोख्याचे संबंध प्रस्थापित करावे असाही या भेटीचा उद्देश होता. या कार्यात यश न येताच मानसिंग आग्र्याला परत आला. उदेपूर आणि डुंगरपूर या दोन राज्यांमधील मैत्री फोडण्याचा प्रयत्न मानसिंगाने प्रथम केला. सिसोदिया कुलातला डुंगरपूरचा राजा रावळ आस्करन याने मुघलांचा दावा मान्य केला नाही. त्याच्याबरोबर युद्ध करणे मानसिंगाला भाग पडले आणि लढाईत जरी तो पराभूत झाला तरी त्याने मुघलांचे वर्चस्व मान्य केले नाही. मुघल सैन्याने मग त्याच्या प्रांतात लुटालूट केली. राणा प्रतापसिंहाला एकाकी पाडता येत नाही असे पाहून त्याच्याशी वाटाघाटी करून काही निष्पन्न होते काय ते पाहण्यासाठी मानसिंग उदेपूरला गेला. राणा प्रतापने त्याचे सौजन्यपूर्वक स्वागत करून अतिथी म्हणून सत्कार केला पण बादशहाचे सर्वाधिपत्य मान्य करण्याच्या अटीवर बादशहाशी मैत्रीचा तह करण्यास त्याने नकार दिला. त्याचप्रमाणे बादशहाच्या दरबारात हजर होण्याचेही त्याने नाकबूल केले (जून १५७३). आपल्या रजपूत बांधवांना अकबराचे मांडलिकत्व पत्करण्याला लावण्याच्या कामी अंबरच्या राजघराण्याला प्रथमच मोठे अपयश आले. राणा प्रतापने मानसिंगाची सूचना अव्हेरली याचा दोष "त्याच्या दुष्ट स्वभावा"ला देऊन अबुल

फझलने कडक शब्दांत त्याची हजेरी घेतली. यावरून बादशहा किती अस्वस्थ झाला होता हे दिसून येते. उदयसागराच्या सुंदर तळ्याकाठी मानसिंगाला दिलेल्या मेजवानीच्या वेळी राणा प्रताप हजर राहिला नाही आणि मानसिंगाच्या युद्धाच्या धमकावणीला "आपण एकटे आलात किंवा आपल्या आतोबाला म्हणजेच अकबराला बरोबर घेऊन आलात तरी दोघांचेही त्यांना साजेसेच स्वागत होईल" असा टोमणा अविचाराने प्रतापने दिला आणि त्यामुळे मानसिंगाचा रोष त्याने ओढवून घेतला, अशी जी मेवाडी आख्यायिका प्रचलित आहे ती नंतरच्या भाटांची शक्कल आहे आणि म्हणून तिला अधिक महत्त्व देता येत नाही. कारण प्रतापने अंबरच्या राजघराण्याचा किंवा स्वत: अकबराचा अशा तऱ्हेने घोर अपमान केला असता तर अकबर अपमान गिळून तीन वर्षे स्वस्थ बसला नसता आणि राणा प्रताप याच्याबरोबर ताबडतोब युद्धालाच सुरुवात झाली असती. *सर्वांनी आपल्याला योग्य तो मान दिला पाहिजे याबद्दल अकबर फार दक्ष असे. फेब्रुवारी १५६८ मध्ये त्याच्या नेहमीच्या वागणुकीला सोडून चितोडच्या ३० हजार लोकांची केलेली कत्तल ही त्याच्या या मानी स्वभावाची द्योतक होती. निदान मानसिंग परत आल्यावर थोड्याच महिन्यांनी भगवंतदास तशाच कामासाठी राणा प्रतापच्या भेटीस गेला नसता. मानसिंगाची वकिली म्हणजे अकबराने शांततेच्या आणि राजनैतिक मार्गांनी प्रतापला शरण आणण्याकरिता केलेला दुसरा प्रयत्न होय. तत्पूर्वी म्हणजे सप्टेंबर १५७२ मध्ये गुजराथच्या स्वारीवर निघण्यापूर्वी अकबराने याच कामासाठी जलालखान कोर्ची याला उदेपूरला पाठविले होते. ही पहिली वकिली होती. तेथून नोव्हेंबर २७, १५७२ रोजी जलालखान अहमदाबादला अकबराच्या दरबारात परत आला. त्याला या कामात यश आले नाही हे उघड आहे. त्यानंतर राजा मानसिंगासारख्या उच्चपदस्थ आणि वजनदार वकिलाची या नाजूक कामगिरीवर नेमणूक करण्यात आली.

---

*पाहा "रावळ राणाजी की बात" (१०३–१०६) तसेच 'वीर विनोद' भाग २, पाने १४७–१४८. हा ग्रंथ अलीकडला आहे आणि या आधीच्या अधिक विश्वसनीय समजल्या जाणाऱ्या मेवाडच्या बखरीत या गोष्टीचा उल्लेख नाही.

डॉ. जी. एन. शर्मा (Mewar and the Mughal Emperors पान ९०) यांनी ही गोष्ट खरी नाही असे मत दिले आहे. कारण त्यांच्या मते भेटीची जागा उदेपूर नसून गोगुंडा ही होती. पण मानसिंग आणि राणा प्रताप यांची भेट उदेपूर येथे झाली असे अबुल फझलने स्पष्ट लिहून ठेवले आहे (ऐने अकबरी भाग ३, पान ४०). भगवंतदास आणि राणा तोडरमल यांनी राण्याची भेट गोगुंड्याला घेतली.

**बंगाल जिंकून घेण्यासाठी मुनिमखानची रवानगी**

गुजरात जिंकून परत आल्यावर अकबराने पहिली गोष्ट केली म्हणजे खान–इ–अलम, अश्रफ़खान, मुनिन–उद–दिन अहमदखान, रसुलअलिखान, मिर्झाअल्ली इत्यादी मातबर सेनानींच्या हाताखाली जय्यत फ़ौज देऊन त्यांना बंगाल आणि बिहार जिंकून घेण्यासाठी पाठविणे. सुलेमान करांणीच्या मृत्यूनंतर हे दोन प्रांत बंडाच्या तडाख्यात सापडले होते. जौनपूरचा सरदार मुनिमखान याला सैन्याचा ताबा घेऊन तावडतोब बंगालकडे जाण्याचा आदेश देण्यात आला. पुरेसे सैन्य आहे की नाही, आणी ते कोणत्या स्थितीत आहे ते पाहून त्यावरचा अहवाल सादर करण्यासाठी तोडरमलची रवानगी करण्यात आली. तोडरमलने परत येऊन असा हवाला दिला की प्रस्तुत कामगिरी पार पाडण्यास सैन्यबल पुरेसे आहे आणि बादशहाला स्वतःला बंगालच्या स्वारीवर जाण्याची जरुरी नाही. *

**गुजरातमध्ये बंड**

एप्रिल, १५७३ मध्ये अकबर गुजरातेतून परत आला तेव्हा गुजरात पूर्णपणे ताब्यात आला नव्हता. इदारचा राजा नारायणदास (राणा प्रतापचा सासरा) आणि शेरखान फ़ौलादीचे पुत्र यांच्या सहाय्याने इखतियार–उल–मुल्क याची छुपी बंडाळी चालूच होती. त्यामुळे अकबरची रजा घेतल्यावर सरदार खान–इ– आझम याला सरळ इदारला जावे लागले. पण बंडखोर त्यांच्या मानाने फ़ार मातबर असल्याने त्याने एका सुरक्षित जागेचा आसरा घेऊन अहमदाबादकडे माघार घेतली. कारण अहमदाबाद जिंकून घेण्याचे इखतियार–उल–मुल्कचे बेत चालले होते. खान–इ–आझमने किल्ल्याची तटबंदी मजबूत केली आणि संरक्षणाची इतर साधने पण जमवली. इथे इखतियार–उल–मुल्क आणि त्याचे साथीदार यानी त्याला वेढा दिला. थोड्याशा अंतराने महम्मद हुसेन मिर्झा पण त्यांना येऊन मिळाला. अहमदाबादकडे अकबराची पाठ फिरल्यावरोबर हा पुंडाई माजवणारा बंडखोर दौलताबादहून परत आला होता. सुरत जिकण्याचा त्याचा बेत जरी फसला तरी त्यान भडोच आणि खंबायत जिंकले पण मोगलांच्या एका सैन्याने त्याचा पराभव केला आणि त्याला पलायन करणे भाग पडले. अहमदाबादला जाऊन तिथल्या किल्ल्यात खान–आझमला वेढा देण्यासाठी त्याने इखतियार–उल–मुल्कला तयार केले. इतक्या प्रबळ शत्रूचा पराभव करणे आपल्याला शक्य नाही असे वाटून खान–इ–आझमने अकबराकडे मदतीची याचना केली. †

**अकबराचे विजेच्या वेगाने अहमदाबादकडे कूच**

मदतीची याचना आल्याबरोबर तावडतोब स्वतःच चालून जाऊन बंडाचा

* ऐने-अकबरी लेखक अबुल फ़झल भाग ३ पाने ४०–४१.

बिमोड करण्याचे अकबराने ठरवले. गुजराथसारखा संपन्न प्रदेश हातातून जाऊ द्यायचा नाही असा त्याचा निश्चय होता आणि आपला दूधभाऊ खान–इ–आझम याला शक्य तितक्या लवकर मदत पोचवावी, असाही त्याचा हेतू होता. बादशहाने खर्चात मागे पुढे केले नाही आणि सैन्याची सर्व सिद्धता अगदी सढळ हाताने ( आठ महिन्याच्या मुलुखगिरीनंतर सैन्य अगदी थकुन गेले होते ) बाशहाच्या खजिन्यातून केली. शुज्जातखान, भगवानदास, रायसिंग आणि सय्यद महम्मुद बऱ्हा यांच्या हाताखाली एक सैन्य पुढे पाठवण्यात आले, तसेच खान–इ–जहानला त्याचा पंजाबचा प्रांत दंग्याधोप्यापासून सुरक्षित ठेवण्यासाठी पंजाबला परत जाण्याची परवानगी दिली. माळव्याचा सुभेदार, मुझफ्फकर खान याला पण आपल्या सैन्यानिशी गुजरायकडे जाण्याचा आदेश देण्यात आला. सर्व तयारी पूर्ण झाल्यावर अकबर ता. २३ ऑगस्ट, १५७३ रोजी फत्तेपूर सिक्रीहून निघाला. ते पावसाळ्याचे दिवस असून हवा दमट होती. भारमल याला तोडरमल, शेख इब्राहिम आणि इतर थोडे विश्वासू नोकर यांच्याकडे राजधानीचा बंदोबस्त सोपवून अकबर एका जलद गतीच्या उंटीणीवर बसून निघाला. त्याच्याबरोबरचे बहुतेक अधिकारी आणि तीन हजाराचे सुसज्ज सैन्य काही उंटावर व काही घोड्यावर स्वार झाले होते. कधी कधी राजस्थानाच्या वाळवंटातून जाताना अकबर वेगवान उंट जोडलेल्या हलक्या रथातून प्रवास करीत असे. हेतू हा की शरीराला थोडी विश्रांती मिळावी. वाटेत तो फक्त जेवणखाण करण्यासाठी आणि शरीर व आत्मा ह्यांची ताटातूट होऊ नये इतक्याच विश्रांतीसाठी थांबत असे. तोडाभोन, अजमेर, मेरटा, चयतरण, सोजात, जलोर, पाटण आणि बालीसाना यामार्गे फत्तेपूर सिक्री सोडल्यापासून ११ व्या दिवशी तो अहमदाबादपासून ६ मैलांवर येऊन पोहोचला. यावेळी त्या बरोबर एकंदरच २७ सेवक होते आणि त्यातले १२ हिंदू होत. त्याची इतर सेना त्याच्याबरोबर चाल करू न शकल्याने पुष्कळ मागे राहिली होती. साडेचारशे मैलांचा हा जिकिरीचा प्रवास अकबराने ९ दिवसांत संपवला.

बालीसान्याहुन अहमदाबादला खास जासूद पाठवून अकबराने आपण आल्याची खबर खान–इ आझमला दिली आणि आपल्या शिबिदीसह किल्ल्याच्या बाहेर येऊन ‡बादशाही फौजेस अहमदाबादजवळ पोचताच येऊन मिळण्याचा त्याला आदेश दिला. अहमदाबादपासून अलिकडे ४० मैलांवर कडी येथे अकबराच्या सैन्याची शत्रूबरोबर थोडीशी चकमक उडाली पण तिथल्या किल्ल्याला वेढा

‡ अकबरनामा भाग ३, पान ४१, तारिख–इ–गुजरात भाग २, पाने ७७–८३, मुन्तखाब–उद–तवारीख भाग २, पाने १६४–६५, तारिख–इ–अकबरशाही, पान २७९, तबकत–इ–अकबरी, भाग २ पाने २६१–२६२.

घालून जिंकून घेण्याच्या खटपटीत लक्ष न गुंतविता अकबर तसाच पुढे निघाला. शत्रूवर अचानक हल्ला करण्याचा सल्ला बाजूला सारून रणदुमदुमीच्या आवाजात अकबराने पूर आलेल्या साबरमतीच्या पात्रात प्रथम स्वत:चा घोडा घातला आणी मागून त्याचे सैन्य नदी ओलांडून गेले. अकबराचे खास सेवक त्यांच्या मागेच होते. मिळालेले इतर सैन्यही सुखरूपपणे नदी पार करून गेले. अकबर अहमदाबादला इतक्या झपाट्याने आला होता की, मोठा बंडखोर महंमद हुसेन मिर्झाचा त्यावर विश्वास बसेना. १४ दिवसांपूर्वीच त्याच्या एका हेराने अकबराला फत्तेपूर सिक्रीमध्ये पाहीले होते. तेंव्हा अकबर आला आहे असे समजताच बादशहाचे हत्ती आणि इतर लवाजमा कुठे आहे अशी चौकशी त्याने केली. पण अकबर ९ दिवसात सिक्रीहून आपल्या निष्ठावंत अनुयायांसह लांबवर अहमदाबादला आला आहे अशी खातरजमा होताच तो भांबावून गेला. इतक्या थोड्या अवधीत इतक्या दूरचे अंतर तोडून बादशहा आला आहे यावर खान–इ–आझमचासुद्धा विश्वास बसेना. आपल्याला फसविण्यासाठी किंवा केवळ चेष्टेखातर ही हुल कुणीतरी उठवली आहे असे त्याला वाटले.

## अहमदाबादची लढाई : महंमद हुसेन मिर्झाचा पराभव व मृत्यू

नदी ओलांडल्यावर, शत्रूच्या सैन्यात २०,००० लोक आहेत असे अकबराला कळले. त्याच्यापाशी लहानशी ३,००० फौज होती. तिला धीर देण्यासाठी त्याने राजा भगवन्तदास करवी खालील संदेश पाठविला : "मित्रहो, ईश्वरी कृपेवर भरवसा ठेवा आणि गोंधळ किंवा घबराट याला थारा देऊ नका. एक दिलाने, एक मुखाने, विचलत न होता आणि न पांगता लाल निशाणे घेऊन येणाऱ्या सैन्यावर तुटून पडा. त्याचा पराभव अटळ आहे." नदीच्या तीरापासून दोन मैल पुढे जाऊन अकबराने एका उंचवट्यावर आपला तळ दिला. इख्त्यार उल मुल्क याच्या हाताखाली ५,००० सैन्य अहमदाबादच्या वेढ्यासाठी मागे ठेवून आणि खान–इ–अझम बादशहाला येऊन मिळू नये याकरिता बंदोबस्त करून महंमद हुसेन मिर्झा बादशाही फौजेशी सामना देण्यासाठी पुढे सरकला. सैन्यास धीमेपणाने पुढे सरकण्याचा आदेश देऊन अकबर स्वत: शत्रूवर चालून गेला. २ सप्टेंबर १५७३ रोजी घनघोर लढाई झाली. बादशहाच्या उजव्या बाजूच्या तुकडीने मिर्झाच्या डाव्या बाजूवर हल्ला करून त्यांना पळवून लावले. पण महंमद हुसेन मिर्झाने बादशहाची डावी बगल उधळून लावली. या, आणीबाणीच्या प्रसंगी मानसिंग दरबारी, महंमद वफा, मालदेवाचा नातू करण आणि राघवदास कछवा या बादशहाच्या जवळच असलेल्या सरदारांनी मोठा पराक्रम केला. राघवदास लढता लढता धारातीर्थी पडला. युद्धाच्या धमश्चक्रीत एकटाच पुढे गेलेल्या अकबराचा जीव फार धोक्यात होता. यावेळी

ताराचंद आणि अलमखान हे दोनच शरीररक्षक त्याच्या बरोबर होते. एका पाठोपाठ तीन शत्रु सैनिकांनी त्याच्यावर हल्ला केला आणि अकबर ठार झाला अशी अफवा पण उठली. शत्रूकडच्या एका शिपायाने अकबराच्या घोड्याच्या मस्तकावर तलवारीने मार करताच घोडा मागील दोन पायावर उभा राहिला. जखमी घोड्याला डाव्या हाताने सावरून दुसऱ्या हाताने अकबराने हल्ला करणाऱ्या शिपायावर भाला फेकून त्याला जखमी करून पळवून लावले. दुसऱ्या शिपायाने अकबराच्या मांडीवर तलवारीने केलेला वार अकबराने आपल्या तलवारीने उडवून लावला. तिसरा शिपाई आपला भाला सरसावून अकबरावर चालून गेला पण अकबराचा चेला गुजर याने त्याला भाल्याने जखमी केले. सुदैवाने मध्यभागी असलेली बादशाही फौज वेळेवरच त्याच्या मदतीला आली आणि मिर्झाचा पराभव करून त्याला मोगल सैन्याने रणांगणांतून पळवून लावले. या चकमकीत सय्यद महंमुद बऱ्हा, बिकानेरचा रायसिंग आणि फरहात खान यांनी खूप पराक्रम गाजवला. हा विजय खचितच मोठा होता. पण या लढाईत झैनखान कोकाचा थोरला भाऊ आणि अकबराचा दूधभाऊ सईफखान कोका हा कामास आला. याचे अकबराला फार दुःख झाले. पळून जात असलेल्या महंमद हुसेन मिर्झाला कैद करून रायसिंगच्या ताब्यात दिले. पण दुसरा एक कैदी, महंमद हुसेन मिर्झाचा दूधभाऊ, शहा मदाद यावर अकबर इतका रागावला होता की त्याने आपल्या जवळ असलेला भाला त्याच्या शरीरात खुपसून जवळजवळ मृतप्राय अवस्थेत त्याला खाली पाडले. नंतर बादशहाच्या शरीररक्षकांनी त्याचे तुकडे तुकडे केले. सारनालच्या लढाईत राजा भगवन्तदासचा भाऊ भूपत याच्या मृत्यूला शहा मदादच कारण झाला होता.

## इख्त्यार–उल–मुल्कचा पराभव आणि मृत्यू

महंमद हुसेनच्या पराभवाची बातमी कळताच इख्त्यार–उल–मुल्क अहमदाबादचा वेढा उठवून आपले ५००० सैन्य आणि हत्तीखाना घेऊन मोगल सैन्यावर चाल करून येत आहे असे दिसले. अकबराने तावडतोब त्याच्यावर हल्ला करण्याचा हुकूम दिला. लढाई ऐन जोरात असताना भगवन्तदास आणि रायसिंग यांच्या सुचनेनूसार महंमद हुसेन मिर्झाला ठार करण्यात आले. इख्त्यार–उल–मुल्क पराभव पावून मारला गेला. या दोन्ही लढायांत मिळून शत्रूकडले २००० लोक कामास आले, १२०० लोक मारले गेले आणि सुमारे १००० जखमी झाले. मोगलांकडले १०० लोक मृत्युमुखी पडले. त्यात सैफखान कोका, सोंहराब, राघवदास आणि तिमीर अली जैलेर हे प्रमुख अधिकारी होते. शत्रूच्या मुंडक्यांचा मनोरा रचण्याचा अकबराने हुकूम दिला. महंमद हुसेन मिर्झा आणि इख्त्यार–उल–मुल्क यांची मुंडकी राज्याच्या मुख्य शहरातून फिरवण्यात आली.

## अकबर फत्तेपूर सिक्रीला परत जातो

दुपार टळल्यानंतर खान–इ–आझम, मिर्झा अझीझ कोका आणि कुतुबुद्दिनखान अहमदाबादच्या किल्ल्यातून बाहेर पडले. अकबराने त्यांचे प्रेमाने स्वागत केले. संध्याकाळीं अकबराने अहमदाबाद शहाराला भेट दिली आणि विजयोत्सव साजरा करण्याचा हुकूम दिला. सय्यद वजीउद्दिन आणि मीर घियासुद्दिन कादरी यांचे मुलगे हे मुसलमानाचे धर्मगुरू असून त्यांनी आपल्या घरात बंडखोरांना मालमत्ता ठेवू दिली होती. खान–इ–आझमचा सल्ला न मानता अकबराने त्यांना माफी केली. आतापर्यंतच्या बंडाळीमुळे गुजराथची राज्य-व्यवस्था पार बिघडून गेली होती. त्याची नीट व्यवस्था लावण्याकडे अकबर आता वळला. महंमद हुसेन मिर्झाच्या पराभवानंतर भडोचकडे पळून गेलेला शहा मिर्झाला पकडून आणण्यासाठी अकबराने सैन्याची एक छोटीशी तुकडी तिकडे रवाना केली. पण पळपुट्या शहा मिर्झाचा या नंतर काहीच पत्ता लागला नाही. राजा भगवन्तदासला इदारच्या मार्गाने राजधानीला परत पाठवून वाटेत राणा / प्रतापची भेट घेऊन त्याचे मन वळवण्यास सांगण्यात आले. अहमदाबादमध्ये ११ दिवस मुक्काम करून १३ सप्टेंबर १५७३ रोजी अकबर फत्तेपूर सिक्रीला जाण्यास निघाला. वाटेत अजमेरला ख्वाजाच्या कबरीचे दर्शन घेऊन ५ ऑक्टोबर रोजी भाले उंच धरलेल्या सैनिकासमवेत त्याने फत्तेपूर सिक्रीमध्ये थाटाने प्रवेश केला. ही सर्व मोहीम अहमदाबादमधील ११ दिवसांचे वास्तव्य धरून, अकबराने ४३ दिवसात संपवली. यावरून अकबराची असामान्य चपळाई, सोशिकपणा आणि लष्करी चातुर्य दिसून येते. ऐन पावसाळ्यात राजस्थानच्या वाळवंटातून ११ दिवसाची मजल मारून अकबराने एका दिवसात दोन बलाढ्य सैन्याशी सामना दिला. परतीचा प्रवास त्याने २१ दिवसात पुरा केला. इतक्या थोड्या दिवसात इतकी मोठी मोहीम पुरी केल्याचा दुसरा दाखला नाही, असे व्हिन्सेंट स्मिथ म्हणतो.

## गुजराथची नवी राज्यव्यवस्था

गुजराथमध्ये शांतता प्रस्थापित करणे अत्यंत अवश्य असल्यामुळे तिथल्या कारभाराची घडी नीट घालून देण्याकडे अकबराने जातीने लक्ष दिले. खान–इ–आझमला त्याने पुन: अहमदाबादचा सुभेदार नेमले. आणि त्याच्या मदतीसाठी ख्वाजा घियासुद्दिन अल्ली कझवीनी या हुशार माणसाची, त्याला दुसरा आसफखान ही पदवी देऊन बक्षीच्या जागेवर नेमणूक केली. थोड्याच दिवसानंतर अकबराचा कुशल अर्थसचिव राजा तोडरमल याला गुजराथचा दिवाण नेमून जमीन महसुलाची नवीन व्यवस्था करण्याचे काम त्यांच्याकडे सोपविण्यात आले. या बंडाळीमुळे गुजराथचा कारभार अगदी मोडकळीस आला होता. त्याची पुनर्रचना करण्यासाठी

अकबराने उपाय योजले. तोडरमलने जमिनीची पहाणी करून जमिनीच्या उत्पादनाच्या आधारावर जमाबंदीची तत्त्वे ठरवून दिली. आणि एकंदर जमाबंदीचा अंदाज अकबराकडे पाठवून त्यावर बादशहाची संमती मिळविली. थोड्याच दिवसात गुजराथ हा मोगल साम्राज्यातला एक अत्यंत भरभराटीचा प्रांत झाला.

## राणा प्रतापकडे भगवंतदासाची शिष्टाई

अहमदाबादच्या विजयानंतर अकबरच भगवंतदासच्या हाताखाली सैन्य देऊन इदारच्या मार्गे राणा प्रतापची तात्पुरती राजधानी गोगुंडा येथे त्याला अकबराने पाठवून दिले. राणा प्रतापशी पुन: एकदा बोलणी करून त्याची समजूत करण्याचा हा प्रयत्न होता. बडनगरचा मजबूत किल्ला जिंकून तिथला किल्लेदार शेरखान फौलादीया गुलाम रावळीयाला भगवंतदासने कैद केले. तो इदारला पोचल्यावर तिथला राजा नारायणदास राठोड याने त्याचे मित्रत्वाने स्वागत केले. याच नारायणदासने १५७३ मध्ये मानसिंगबरोबर लढाई केली होती. गोगुंडाला पोचल्यावर राणा प्रतापने त्याचे स्वागत करून आपल्या घरी त्याचे यथोचित आदरातिथ्य केले. पण अकबराला शरण जाऊन त्याच्या दरबारी जाण्याचे प्रतापने मान्य केले नाही. तथापि आपला मुलगा आणि राज्याचा वारस अमरसिंग याला भगवंतदासबरोबर अकबराच्या राजधानीस पाठविण्यास त्याने संमती दिली. भगवंतदासच्या मुत्सद्देगिरीचा हा मोठाच विजय मानून अकबराने त्याच्यावर देणग्यांची खैरात केली. थोड्याच दिवसानंतर आपल्या एका उच्च अधिकाऱ्याला बादशहाने पुन्हा एकदा राणा प्रतापकडे पाठवले. प्रसिद्ध राजा तोडरमलने गुजराथहून परत येताना गोगुंडाला जाऊन राणा प्रतापची भेट घेतली· त्याचे पण राण्याने यथोचित स्वागत केले. राणा प्रतापने तोंडपुजेपणा केला आणि नरमाई दाखविली असे जरी अबुलफझल म्हणतो तरी सुद्धा भगवंतदास किंवा मानसिंग यांच्यापेक्षा अधिक फलनिष्पत्ती तोडरमलच्या या भेटीत झाली नाही.*

---

* ऐने अकबरी भाग ३, पाने ६६–६७. मुन्तखान उत तवारीख भाग ३, पाने १७०, वीर विनोद ( भाग २, पान १४९ ) यात म्हटले आहे की राण्याने बादशाही खिलात धारण केली नाही आणि अमरसिंगला पण फत्तेपूर सिक्रीला पाठवले नाही, "मला जातीने मुघल दरबारात हजर राहण्यास सांगू नये" अशी विनंती प्रतापने केल्याचा उल्लेख अबुल फजल करतो असे डॉ. जी. एन. शर्मा ( पहा Mewar and the Mughal Emperors, पान ९० ) मानतात ते बरोबर नाही. पुढे केव्हातरी बादशहाच्या दरबारात हजर होईन असे राणा म्हणाला इतकाच अर्थ फार तर अबुल फझलच्या लिखाणातून काढता येईल. वस्तुतः राणाने टाळाटाळच केली. शिवाय दरबारात हजर न राहाण्याची सवलत

बादशहाला देणे शक्यच नव्हते हे पण लक्षात ठेवले पाहिजे. (वुल्सलेहेग केंब्रिज हिस्टरी भाग ४, पान १०९) याने अमरसिंगचा उमरावसिंग आणि प्रतापसिंगचा परताबसिंग असा चुकीचा उल्लेख केला आहे.

**मुझफ्फरखानची पंतप्रधानकी**

मुनीमखानची जौनपूरवर नेमणूक झाल्यानंतर बरेच दिवस अकबराच्या मुख्य वजीराची जागा रिकामी होती असे दिसते. पण आता साम्राज्याचा विस्तार फार झाला होता. तेव्हा गुजराथची बंडाळी मोडून परत आल्यावर १९ नोव्हेंबर १५७३ रोजी मुझफ्फरखानला फत्तेपूरसिक्रीला अकबराने बोलावून घेतले आणि त्याला मुख्य वजिराची वस्त्र दिली. जिल्हाधिकारी, दिवाण आणि प्रांताचा सुभेदार अशा निरनिराळ्या कामामुळ मुझफ्फरखानल राज्यकारभाराचा खूप अनुभव होता. आणि एक तोडरमल सोडल्यास त्याच्या–इतकी महसुलाच्या कारभाराची माहिती दुसऱ्या कोणास नव्हती. पण मुख्य प्रधान या उच्च पदावर तो यशस्वी झाला नाही. उच्च प्रतीचे सर्वगामी कर्तुत्व, विशेषज्ञानापेक्षा मुत्सद्देगिरी आणि प्राप्त परिस्थितीशी मिळते-जुळते घेण्याची वृत्ती हे गुण मुख्य प्रधान म्हणून यशस्वी होण्याला अत्यावशक होते. अकबरासारख्या प्रतिभाशाली आणि कणखर वृत्तीच्या आणि इच्छाशक्तीच्या राजाच्या क्रांति–कारक धोरणांचे तंतोतंत पालन करणारा गृहस्थ मूख्य प्रधान असणे अत्यंत जरूरीचे होते. लष्करातील घोड्यांना राजचिन्हाचे डाग देणे, मनसबदारांचे दर्जे ठरवणे आणि जहागिरी जमिनी खालसा करणे किंवा त्या शाही मालकीच्या करणे आणि त्या नेमून देण्याऐवजी त्यांच्या देखरेखीसाठी स्वतंत्र अधिकारी नेमणे या अकबराच्या नव्या कायद्याना मुझफ्फरखानने विरोध केला. अकबराने जारी केलेल्या या कायद्यामूळे एकंदर राज्यकारभारावर फार दूरगामी परिणाम होऊन पूर्वीच्या शासनपद्धतीत मूलभूत बदल घडून आले आणि सर्व दर्जाच्या अधिकाऱ्यांच्या हितसंबंधावर त्याचे महत्त्वाचे परिणाम झाले. या कायद्यांची अंमलबजावणी करण्यास मुझफ्फरखान तयार नसल्यामुळे त्याला मुख्य मंत्र्याच्या पदावरून कमी करण्यात आले.

## प्रकरण ९ वे

# बिहार व बंगालवर विजय : इतर घडामोडी

### पाटण्यात दाऊदला घेरले

बंगाल, बिहार आणि ओरिसाचा सुलतान सुलेमान कराणी हा १५७२ मध्ये मरण पावला, आणि त्यानंतर पूर्वेकडील त्या प्रांतात फार अंदाधुंदी माजली. याचा उल्लेख मागच्या प्रकरणात आलाच आहे. सुलेमान नंतर गादीवर आलेला त्याचा थोरला मुलगा बायाझिद याला त्याच्या अफगाण सरदाराने ठार मारले आणि नंतर त्याचा धाकटा भाऊ दाऊद गादीवर आला. त्याने मुघल प्रदेशावर लढाई करून धमानियाला वेढा दिला. गुजराथची मोहीम संपवून एप्रिल १५७३ मध्ये फत्तेपूर सिक्रीला परत आल्यावर बिहार आणि बंगाल पादाक्रांत करण्यासाठी अकबराने मुनीमखानला हाताखाली मोठी फौज देऊन पाठवून दिले होते. ज्या वेळ काढू आणि ढिलाईच्या पद्धतीने त्याने मोहीम चालविली होती ती पाहून अकबर फार नाखूष झाला. म्हणून आक्टोबर १५७३ मध्ये गुजराथमधल्या बंडाळीचा मोड करून मोकळा झाल्यावर बादशहाने मीर बक्षी लष्करखान आणि लढाऊ जहाजावरचा अधिकारी परमानंद ( तोडरमलचा नातेवाईक ) यांना मोठी फौज देऊन मुनीमखानला मदत करण्यास आणि तिकडे मोहीम यशस्वी करण्यास पाठवून दिले अकबराच्या सुदैवाने परस्परातल्या भांडणामुळे अफगाण लोक फार दुर्बळ झाले होते. दाऊद आणि त्याचा कर्तबगार अधिकारी लोदीखान यांच्यामध्ये आता सख्य राहिले नव्हते. जरी लोदीखान दाऊदला गादीवर आणण्यास कारणीभूत झाला होता, तरी त्याचे रक्तपिपासू धोरण पसंत न पडल्यामुळे बिहारमधील सोन नदीच्या वरच्या बाजूस असलेल्या रोहटासच्या किल्ल्यात लोदीखान जाऊन राहिला. दाऊदने त्यांच्याविरुद्ध आपले सैन्य पाठवून दिले. त्यामुळे लोदीखानला मुनीमखानची मदत घेण्याशिवाय दुसरा पर्याय राहिला नाही. सैन्याच्या हालचालींचा वेग वाढविण्यासाठी बादशहाने तोडरमलच्या तोडीचा अधिकारी खास करून पाठविला होता. तरी सुद्धा प्रसंगानुरूप ज्या तातडीने हालचाली करावयास पाहिजे होत्या त्या मुनीमखान

करू शकला नाही. दाऊदच्या चिथावणीने लोदीने मदतीसाठी मुनीमखानला केलेली विनंती मागे घेतली आणि मुघलाशी लढण्याकरिता तो पुनः दाऊदला जाऊन मिळाला. लोदी आता मुघल सैन्यावर उलटला आणि कित्येक यशापयश घेत तो त्याच्याशी लढत होता पण थोडयाच दिवसात अफगाण लोकातील भांडणे पुनः सुरू झाली आणि लोदीला कैद करून दाऊदच्या हुकूमावरून ठार मारण्यात आले. पुनः एकदा शत्रूवर जोराची आणि त्वरेने चढाई करण्यास मुनीमखान चुकला आणि सोन नदी ओलांडून आस्ते आस्ते आणि सावधगिरीने पाटण्यापर्यंत पुढे सरकला बरोबर मोठे सैन्य असून सुध्दा दाऊदने पाटण्याच्या किल्ल्यात आश्रय घेतला होता. तिथे शाही फौजांनी त्याला वेढून टाकले.

## अकबराच्या मुलांची सुंता

गुजराथहून परत आल्यावर अकबराने आपल्या तिन्ही मुलांची सुंता समारंभ साजरा करण्याचा आदेश दिला. २२ आक्टोबर १५७३ रोजी हा समारंभ मोठ्या थाटाने पार पडला. सौर पंचांगाप्रमाणे राजपूत्र सलीम यावेळी ४ वर्षे, १ महिना आणि २२ दिवसांचा होता आणि चांद्रमासाप्रमाणे त्याचे वय ४ वर्षे, ३ महिने आणि ८ दिवस इतके होते. मुराद ३ वर्षे, ४ महिने आणि १५ दिवसांचा (सौर पंचांग) किंवा ३ वर्षे, ५ महिने आणि २२ दिवसांचा ( चांद्रमास ) व दानियल १ वर्ष १ महिना आणि १३ दिवस (सौर पंचांग) किंवा १ वर्ष १ महिना व २३ दिवस (चांद्रमास ) या वयाचे होते. या वेळी गाणे बजावणे, मेजवान्या, दानधर्म आदि उत्सव समारंभ करण्यात आले. समारंभाच्या शेवटी अनेक मूल्यवान वस्तूबरोबर आपले तुला दान करून अकबराने ती सर्व संपत्ती गरीब, विद्वान व धार्मिक लोकात वाटून टाकली.

परंपरागत चालीला अनुसरून अकबराने हा विधी केला असे या गोष्टीवर अबुल फझलने आपल्या वृतांत भर दिला. अकबराला हे संयुक्तिक वाटत नव्हते असेच बहुधा त्याला सूचित करावयाचे होते.

## सलिमच्या शाळा-प्रवेशाचा समारंभ

१८ नोव्हेंबर १५७३ रोजी राजपुत्र सलीम ४ वर्षे, ४ महिने आणि ४ दिवसांचा असताना (चंद्रमासाप्रमाणे), त्याला शाळेत घालण्याचा समारंभ फत्तेपूर सिक्रीला साजरा झाला. सुप्रसिद्ध विद्वान मौलाना वीर कलम हरावी यांस त्याचा शिक्षक नेमण्यात आले. राजपुत्राला प्रथम ईश्वराचे नाव घ्यायला लावून नंतर मुळाक्षराचे धडे देण्यात आले, या तारखेपासून त्याचा अभ्यासक्रम सुरू होऊन त्यात अरेबिक, हिंदी फारसी याशिवाय गणित, इतिहास, भूगोल, तत्त्वज्ञान आणि धर्मशास्त्र या विषयांचा समावेश होता. योग्य शिक्षकांच्या देखरेखीखाली

योग्य रितीने आखलेले शिक्षण देण्याची व्यवस्था त्याच्या पित्याने केली होती त्याचा उत्तम फायदा त्याने करून घेतला. या गोष्टीचा पुरावा राजा झाल्यानंतर त्याने लिहिलेल्या विद्वत्तापूर्ण रोजनिशीवरून मिळतो. हदि (परंपरा) शिकण्यासाठी तो शेख अब्दुन्नबीच्या शाळेत जाऊ लागला. अकबराबरोबर अजमेरच्या यात्रेला जाऊन त्याच्याबरोबर बिहार आणि इतर मोहिमांवरही तो गेला होता.

## राय रामदासची नायब दिवाणाच्या जागी नेमणूक

८ फेब्रुवारी १५७४ रोजी अकबर अजमेरच्या वार्षिक यात्रेस गेला. या वेळी त्याने अजमेर येथे त्याच्यासाठी नव्याने बांधलेल्या राजवाड्यात मुक्काम केला. या भेटीला विशेष महत्त्व होते. कारण बंगालवर लवकरच सुरू होणाऱ्या मोहिमेत यश मिळविण्यासाठी ख्वाजासाहेबाचे शुभ आशीर्वाद त्याला हवे होते. अकबर दर वर्षी अजमेरला यात्रेला जात असल्यामुळे त्याने आग्र्यापासून अजमेरपर्यन्त प्रत्येक टप्प्यावर एकेक विश्रांतिगृह बांधून घेतले. येथे त्याने राजा तोडरमलच्या मदतीसाठी राय रामदास याची नायब दिवाण म्हणून नेमणूक केली. तोडरमलच्या चतुरस्र कर्तृत्वामुळे राज्यातली अनेक तऱ्हेची दूरदूरची कामे त्याला करावी लागत. सचिवालयात आणि खलबतखान्यातच नव्हे तर युध्दभूमीवरसुध्दा त्याला काम करावे लागे. यामुळे त्याची दिवाणीची कामे मागे पडू लागली. म्हणून रामदासला नायब दिवाण नेमून महसूल खात्याचे तोडरमलचे बरेचसे काम त्याच्याकडे सोपविण्यात आले.

## पिकांच्या नासाडीबद्दल नुकसान-भरपाई

१५७४ च्या फेब्रुवारी महिन्यात एक महत्त्वाचा वटहुकूम जारी केला गेला, ज्यावरून अकबराची न्यायबुद्धी आणि रयतेच्या कल्याणाची काळजी दिसून येते. त्यावर्षी अजमेरच्या वाटेवर बादशहाने रस्त्याच्या दोन्ही बाजूस हत्यारबंद शिपाई ठेवून वाजूच्या पिकांना कुठलाही उपद्रव होणार नाही अशी तजवीज करण्यास दिलावर खानला सांगितले. याच वेळी लष्करी मोहिमेत किंवा इतर कारणांनी झालेल्या पिकांच्या नासाडीच्या किंमतीचा अंदाज न चुकता करावा आणि त्यामुळे झालेला तोटा महसुलाच्या हिशेबातून भरून द्यावा असा हुकूम त्याने कायम केला. काही वेळा तर सैन्याच्या हालचालीमुळे पिकांची झालेली नासाडी जागच्या जागीच रोख रकमेने भरून देण्याचा हुकूम अकबर देत असे.

## जोधपूरच्या चंद्रसेनविरुद्ध मोहीम

जोधपूरच्या मालदेवचा दुसरा मुलगा चंद्रसेन याने सिवानाचा किल्ला बळकट करून उघडपणे बादशहाची सत्ता धुडकावून लावली होती. त्याच्या विरुद्ध चालून जाण्याचा बेत अकबराने अजमेर येथेच आखला. शहा कुली महरम

रायसिंग केशवदास (मेरटयाच्या जयमलचा मुलगा), जगतराय (धरमचंदचा मुलगा) शिमलखान वगैरेंना त्याने मोठ्या फौजेसकट चंद्रसेनाविरुद्ध रवाना केले. हे सैन्य प्रथम सोजतवर चालून गेले. यावेळी सोजत चंद्रसेनचा पुतण्या कल्ला याच्या ताब्यात होते. मुघल फौज येताच कल्ला प्रथम शिरबारीच्या डोंगरात आणि तेथून कोरंब्याला पळून गेला. त्याचा पाठलाग करून त्याला शरण येण्यास भाग पाडण्यात आले. त्याला माफी देऊन बादशहाने आपल्या नोकरीत ठेवून घेतले. नंतर बादशाही फौज सिवानाच्या मार्गे निघाली. वाटेत चंद्रसेनचा प्रतिनिधी रावळ सुखराज आणि बादशाही फौज यांमध्ये निकराची लढाई झाली. राठोड अगदी चिकाटीच्या शौर्याने लढले पण अधिक बलवान शत्रूपुढे त्याचा पराभव झाला. तेथून सिवानाच्या किल्ल्याला वेढा देण्याच्या उद्देशाने मुघल सेना पुढे निघाली. आपला कर्तबगार सेनापती पट्टाजी राठोड याच्यावर किल्ल्याच्या रक्षणाची जबाबदारी सोपवून चंद्रसेन देशाच्या अंतर्भागात निघून गेला. अजमेरला अधिक वेळ घालविणे अनावश्यक वाटल्यावरून १७ मार्चला अकबर तेथून निघला आणि २७ मार्चला फत्तेपूर सिक्रीला येऊन पोचला. चंद्रसेनविरूद्धचा लढा जवळ जवळ २ वर्षे रेंगाळत चालला होता. बिकानेरच्या रायसिंगच्या सांगण्यावरून १५७५ च्या जानेवारीत चंद्रसेनविरुद्ध ताजी फौज पाठवावी लागली. पण याही वेळेस चंद्रसेनाने शाही फौजेला गुंगारा दिला आणि मोंगलाच्या सेनापतीस हात हालवीत परत येऊन अकबराची नाराजी पत्करावी लागली. फिरून एकदा अकबरचा आवडता जलालखान कोरची याच्या हाताखाली पाठविलेल्या तिसऱ्या सैन्याची तर यापेक्षाही अधिक दुर्दशा झाली. कारण या मोहिमेत जलालखान शत्रूच्या कोंडीत सापडून मारला गेला. शहाबाजखान कंबू या चवथ्या सेनापतीकडे ही मोहीम सोपविण्यात आली आणि तो मात्र सिवाना काबीज करण्यात सुदैवी ठरला (१५७६)

## अकबर बंगालच्या मोहिमेची तयारी करतो

दरम्यान पाटण्याचा वेढा अनेक महिने चालूच होता. किल्ल्यात सामग्री आणि शिबंदी भरपूर होती आणि गंगेच्या उत्तर काठावरील हाजीपूर दाऊदच्या ताब्यात असल्यामुळे त्या बाजूने किल्ल्याकडे रसद येण्याचा मार्ग मोकळा होता. त्यामुळे मुनीमखानच्या वेढ्याचा अर्थातच दाऊद आणि त्याच्या माणसांवर काही परिणाम झाला नाही. शिवाय पावसाळा तोंडाशी आल्यामुळे मोगल सैन्याला अडथळ्यांना तोंड द्यावे लागले असते, इतकेच नव्हे तर हालअपेष्टाही सहन कराव्या लागल्या असत्या. तेव्हा मुनीमखानने स्वतः अकबरास पाटण्यास येण्याची विनंती केली. त्याप्रमाणे अकबराने आग्ऱ्याला जाऊन मोहिमेसाठी सर्व तयारी करण्याचा हुकूम दिला. काही निवडक अधिकाऱ्यांसह आपला जनाना बरोबर

घेऊन अकबराने जलमार्गाने पुढे जावे आणि मुख्य सैन्याने खुष्कीच्या मार्गाने जाऊन त्याला पाटण्याजवळ येऊन मिळावे असे ठरले. हत्ती घोडे आणि शिपाई यांना घेऊ जाऊ शकेल असा जहाजांचा ताफा तयार करण्यात आला. यातील काही जहाजे फार मोठी प्रशस्त व सुंदर होती. त्यावर बादशाही मंडळींसाठी राहण्याला वेगवेगळ्या खोल्या, नौकातल आणि फुलांच्या बागा सुद्धा होत्या. काही जहाजांवर शासकीय कचेऱ्यांची व्यवस्था केली होती. त्यात फर्निचर, फाईली, चपराशी यांचीही सोय होती. दारुगोळ्याची जहाजे, खजिन्याची जहाजे, नगाऱ्यांची जहाजे, तंबू आणि गालीचे ठेवण्याची जहाजे, स्वयपाकाची जहाजे, आणि वाघ वगैरे ठेवण्यासाठी जहाजे, अशी नानातऱ्हेची जहाजे होती. सरदारांची जहाजे त्यांच्या जरुरीप्रमाणे लहानमोठी होती. जहाजांची मागची बाज निरनिराळ्या पशूंच्या आकाराची बनविली होती.

## अबुल फझल आणि बदायुनी यांची दरबारात हजेरी

अकबर बंगालच्या मोहिमेवर निघण्याची तयारी करीत असताना, दोन प्रसिद्ध विद्वान आणि भावी इतिहासकार अब्दुल कादीर बदायुनी आणि अबुल फझल हे प्रथमच आग्र्याला बादशहाच्या दरबारात येवून दाखल झाले. तत्कालीन इतिहासावर या दोघांच्या प्रभावी व्यक्तिमत्त्वाची छाप पडावयाची होती. जलालखान कोरची आणि हकीम ऐन उल् मुल्क यांच्या मध्यस्थीने अब्दुल कादीर बदायुनी* या विद्वान पण धर्मवेड्या सुन्नी मुसलमानाचा अकबराशी परिचय झाला. धार्मिक आणि साहित्यविषयक चर्चेत विशेष रस असल्यामुळे अकबराचे या त्याच्या भावी टीकाकाराशी थोडा वेळ बोलणे झाले. अबुल फजल या वेळी २४ वर्षांचा होता आणि मुलाखतीच्या वेळी 'सिंहासनाची कविता' या नावाच्या कुराणातील दुसऱ्या प्रकरणातल्या २५६ व्या कवितेवर त्याने स्वतः केलेले भाष्य बादशहाला सादर केले.‡ अकाली प्रौढत्व आलेल्या अबुल फजलचा व्यासंग दांडगा होता, जीवनमरणविषयक प्रश्नांचा त्याने गाढ विचार केला होता आणि तो अहंमन्य बनला होता. निरनिराळ्या देशांतील विद्वान आणि संत यांच्याबद्दल त्याने खूप वाचले होते आणि त्यांची भेट घ्यावी असे त्याला नेहमी वाटे. विविध धर्मपंथांतील उपचारवाद्यांमधील भेदांवर त्याने खूप विचार केला होता आणि तो ऐहिक गोष्टींपासून निवृत्त होण्याच्या विचारात होता. आपल्या बापाच्या आज्ञेला अनुसरून तो अकबराच्या

*अब्दुल कादीर बदायुनी याचा जन्म राजस्थानमध्ये बसावर येथे झाला. तो बदायुनला झाला असा चुकीचा समज लोकांमध्ये प्रचलित आहे.

‡ही टीका अबुल फजलचा बाप शेख मुबारक याने लिहिली असे लोक मानतात असा उल्लेख बदायुनीने केला आहे.

दरबारात दाखल झाला आणि तेथे त्याचे आनंदाने स्वागत करण्यात आले. बंगालची मोहीम संपवून परत आल्यावर अकबराने त्याला पुन: दरबारात बोलावून घेतले आणि वीसांची मनसबदारी त्याला दिली. थोडयाच दिवसांत अबुल फजल अकबराचा मित्र आणि सल्लागार होऊन शेवटी दरबारातल्या नवरत्नांत त्याची गणना होऊ लागली. बदायुनी मात्र बावीस वर्षांच्या नोकरीनंतर सुद्धा पहिल्यासारखाच वीसांचा मनसबदारच राहिला. तो असंतुष्ट, माणूसघाण्या बनला आणि आपल्या शाही मालकाचा विरोधी टीकाकार झाला. † अकबर बंगालच्या मोहिमेवर निघण्याच्या गडबडीत असल्यामुळे या उदयोन्मुख तरुण पंडिताचे विस्मरण झाले.

## अकबराच्या दिग्विजयामागील धोरण : जगत् राज्यावरील त्याची श्रद्धा

अकबराकडे अधूनमधून नजराणे पाठवून आणि कधी कधी आज्ञाधारकपणा दर्शवून त्याच्याशी मिळतेजुळते घेण्याचे आपल्या बापाचे धोरण झुगारून देऊन दाऊदने स्वत:ला राजा असे म्हणवून घेण्यास सुरुवात केली होती. त्यामुळे त्याच्याविरुद्ध युद्ध जाहीर करण्यास अकबरला विशेष कारण किंवा चिथावणी यांची खरोखरच गरज नव्हती. मुघल प्रांतात अतिक्रमण करून आणि झमानीयाला वेढा देऊन दाऊदने अकबराला मूर्खपणाने डिवचले होते. पण युद्धासाठी दाऊद-कडून समर्थनीय कारण मिळण्यापूर्वीच अकबराने पूर्वेकडचे प्रांत आपल्या सत्तेखाली आणण्याचा निश्चय केला होता. सुलेमानच्या मृत्यूची बातमी ऐकताक्षणीच त्याने मुनीमखानला बंगालच्या मोहिमेवर जाण्याचा हुकूम दिला.

१५७४ साली अकबर बिहारच्या मोहिमेवर निघाला. त्या वेळेपर्यंत हिंदुस्थानातील सर्व प्रदेश जिंकून घेण्याचे त्याचे धोरण अनेक वैचारिक विकासाच्या अवस्थांतून जाऊन अंतिम पूर्णतेला पोचले होते. हिंदुस्थानचे राजकीय, शासकीय आणि सांस्कृतिक ऐक्य हा त्या धोरणाचा पाया होता. तरुण बादशहा गादीवर आल्यावर काही वर्षे त्याचा आणि त्याच्या सल्लागारांचा मुख्य हेतू आजोबांच्या व बापाच्या हातातून गेलेले राज्य परत मिळवून घेणे एवढाच होता. यानंतर आक्रमक धोरण स्वीकारून राज्याचा विस्तार वाढविण्यास सुरुवात झाली. या काळात त्याने आपल्यापेक्षाही उत्तम कारभार करणाऱ्या राणी दुर्गावतीच्या अमलाखालील गोंडवनासारखे प्रदेश जिंकून घेतले. राज्यविस्तार करणे, धनसंपत्ती वाढविणे, स्वत:च्या फौजेला प्रत्यक्ष लढाईत गुंतवून ठेवून त्यायोगे मुघल मुलुखावर होणारे परकीयांचे आक्रमण टाळणे हे अकबराचे मुख्य हेतू होते. आपल्या शेजाऱ्यांनी आपल्यावर हल्ले करू नयेत म्हणून प्रत्येक राजाने आपल्या भोवतालचा मुलुख जिंकून घेण्याच्या कामी दक्ष असले पाहिजे. त्याचप्रमाणे सैन्यातील लोक आळशी होऊ

---

† बदायुनीला सैन्यात दाखल होण्याची परवानगी देण्यात आली होती.

नयेत म्हणून त्यांना युद्धात गुंतवून ठेवले पाहिजे असे अकबर वरचेवर म्हणत असे. हिंदुस्थानातला एक अत्यंत बलाढ्य राजा झाल्यानंतरच केवळ तो इतर प्रांतातील लोकांच्याबद्दल विचार करू लागला. गुजराथसारखे जे प्रांत त्यानंतर त्याने जिंकून घेतले त्यामध्ये राज्य विस्तार आणि धनसमृद्धी हे हेतू तर होतेच पण त्याचबरोबर जिंकलेल्या प्रांतातील लोकांना चांगल्या कारभाराचा लाभ मिळवून देण्याचाही हेतू होता. गुजराथच्या मोहिमेवर तो निघाला तेव्हाच हिंदुस्थानच्या ऐक्याची कल्पना त्याला सुचली. १५७२-७३ मध्ये मेवाडच्या राणा प्रतापचे मन वळवून त्याला आपले मांडलिक बनविण्याचे एकामागून एक शांततेचे चार प्रयत्न त्याने केले. सबंध उत्तर हिंदुस्थानात अकबराशी फटकून वागणारा मेवाडचा राणा प्रताप हा एकच उल्लेखनीय राजा राहिला होता. हिंदुस्थानातील अनेक राज्ये व छोटे छोटे राज्यकर्ते यांच्या ऐवजी एक देश आणि एक राजा हे धोरण अकबराला बंगाल, बिहार आणि ओरिसा हे प्रांत जिंकण्याची मोहीम सुरू करण्यापूर्वीच सुचले होते. अबुल फजल या बुद्धिमान सचिवाशी घनिष्ट संबंध येण्यापूर्वीही ही कल्पना त्याला आली होती. अबुल फजलने सारांशरूपाने हे धोरण पुढीलप्रमाणे सांगितले : "कालमहिमा जाणणारे शहाणे आणि विवेकी लोकांनी असे सांगितले आहे की, थोर आत्म्यानी दुर्लक्ष केल्यामुळे अनेक छोटया छोटया राज्यात विभागलेले हे जग जर विशाल कर्तृत्वाच्या एकाच न्यायी आणि समर्थ राजाच्या हाताखाली येईल तर मतभिन्नतेचा धुरळा खात्रीने खाली बसेल आणि मनुष्यमात्राला शांती लाभेल. याच कारणास्तव आजच्या युगाचा भाग्यविधाता असा अकबर इतर देश जिंकून घेण्याच्या कामात सतत गढलेला आहे." *

"जगत् शासना" ची कल्पना ही विसाव्या शतकाची देणगी असे समजण्यात येते. सोळाव्या शतकातच अकबराला ही कल्पना सुचली हे त्याच्या राजकीय ध्येयवादाचे मोठे श्रेय होय. अर्थात अकबराच्या योजनेत लोकशाही किंवा सनदशीर राज्यसत्ता यांना स्थान नव्हते. वस्तुत: लोकशाहीची कल्पनाच त्या काळात अज्ञात होती, आणि जगातले अनेक देश सोळाव्या शतकातील पूर्व आणि पश्चिम खंडातील इतर राजांप्रमाणेच अकबराला पण माहीत नव्हते. सर्व जगावर एक राज्य प्रस्थापित झाले, तर अशा राज्याचा ताबा घेण्यास आपण फार लायक आहोत, असे अकबराला बहुदा वाटत असावे.

## अकबर पाटण्याला जायला निघतो

पूर्वेकडच्या मोहिमेची तयारी पूर्ण झाल्यावर १९ जून १५७४ रोजी अकबराने आपल्या जलप्रवासास सुरुवात केली. खलिसाचा दिवाण शिहाबुद्दिन अहमदखान

---

* "जग" याचा अकबराचा अर्थ भारतीय उपखंड असा घ्यावा.

याच्याकडे राजधानीचा ताबा देऊन त्याच्या मदतीसाठी म्हणून नवा नायब दिवाण राय भगवानदास आणि नवा नायक बक्षी राय पुरुषोत्तम यांची नेमणूक केली. अकबराचा जनानखाना, थोरला राजपुत्र सलीम, पहिल्या दर्जाचे १९ सरदार आणि भगवन्तदास, मानसिंग, बिरबल, माधोसिंग, फैझी आणि झैनखान कोका यांच्यासारखे साथी आणि अब्दुल नबी आणि हकीम उलमुल्क यासारखे विद्वान लोक आणि मोठा सेवकवर्ग आपापल्या जहाजातून त्याच्याबरोबर निघाले. दोन मोठाल्या जाहाजात प्रत्येकी एक प्रचंड नर आणि दोन माद्या असे सहा हत्ती होते. इतर जहाजावर चित्ते होते. मिर्झा युसुफ खान रिझवी याच्या हाताखाली मोठे घोडदळ आणि हत्ती-दळ देऊन नदीच्या काठाकाठाने जाऊन पाटण्याजवळ बादशाही सैन्याला येऊन मिळण्याचा त्याला हुकूम देण्यात आला. २० जून रोजी सकाळी आग्र्याहून सर्व जहाजे निघाली. यमुनेला पूर आला होता. त्यामुळे इटाव्याजवळ पुष्कळ जहाजे गटांगळ्या खाऊन नदीत बुडाली. १३ जुलै रोजी अलाहाबादला मुक्काम करण्यात आला आणि येथे सुद्धा नदीत झालेल्या वादळामुळे ११ जहाजे बुडाली आणि शाही नगारखाना नादुरुस्त झाला. या दिवशी हिंदूंचा मोठा सण असल्यामुळे मानवी सागरासारखा दिसणारा विराट समुदाय पवित्र त्रिवेणीत स्नान करण्यासाठी नदीच्या तीरावर जमला होता. पुढचा मुक्काम १५ जुलै रोजी बनारसला झाला. आणि चिनार येथे नदी इतकी खवळली होती की पुष्कळ लोक भीतीने जहाजे सोडून तीरा-वर गेले. पण अकबराने आपली मनःशांती ढळू दिली नाही आणि कोणतीही चल-बिचल न दर्शविता आपला जलप्रवास चालू ठेवला. आपल्या खास पडावावर तो सरकारी कामकाज करीत असे; अनेक विषयांवर इतरांशी चर्चा आणि ग्रंथवाचन चालू असे. आणि मुक्कामाच्या वेळी खेळ आणि शिकार यांनी तो आपले मनोरंजन करीत असे. गाझीपूर जिल्ह्यात जेथे गोमती गंगेला येऊन मिळते तेथे सैदपूर या गावी पोचल्यावर राजपुत्र सलीम आणि जनानखान्यातील स्त्रिया यांची रवानगी गोमतीच्या मार्गे जोनपूरला करून देण्यात आली ( २३ जुलै ) आणि इतर लवा-जम्यासह अकबर पाटण्याला जाण्यास निघाला. चौसाचा उतार त्यांनी २८ ता. ला गाठला. लोदीपूरला, चित्ते नेणारी २ जहाजे बुडाली. त्यात अकबराचे आवडते २ चित्ते पण होते. याच ठिकाणी आणखी ३ बोटीही बुडाल्या. ४ ऑगस्टला पाटण्या-जवळ येऊन शहरापासून ५ मैल दूर अकबराने आपली छावणी केली. ऐन पावसाळ्यात पूर आणि वादळ यांना न जुमानता, मोठे धारिष्टय दाखवून हा जलप्रवास अकबराने पुरा केला आणि पावसाळ्याच्या चार महिन्यांत मोहिमांना बंदी घालणारी जुनी परंपरा त्याने यशस्वीरित्या मोडून टाकली.

**हाजीपूरचा पाडाव**

पाटण्याला पोचल्यावर दुसऱ्याच दिवशी अकबराने आपल्या प्रमुख लष्करी

अधिकाऱ्यांच्या युद्धमंडळाची बैठक भरविली आणि खान-इ-अलम याच्या हाताखाली ३००० घोडेस्वार देऊन गंगेच्या उत्तर तीरावरील हाजीपूर गाव काबीज करण्यासाठी त्याला पाठवून दिले. पाटण्याच्या लष्कराला सर्व रसद हाजीपूरहून जात असल्यामुळे ते गाव घेतल्यास दाऊदचा पाडाव होईल. असे अकबरला वाटले. खान-इ-अलमच्या सैन्याबरोबर छोटयाशा तोफा देऊन त्याने जहाजांनी हाजीपूरला जावे असे ठरले. शहाबाद जिल्हयातील जगदीशपूरचा राजा गजपती याच्याजवळ प्रचंड पायदळ असून सर्व बिहारमध्ये त्याचे फार वजन होते. तेथील भूभागाची पण त्याला संपूर्ण माहिती होती. त्याने खान-इ-अलमला मदत करावी असे ठरले. स्थानिक नावाड्यांच्या मदतीने मुघलांचे सैन्य गंगेच्या प्रवाहाच्या विरुद्ध दिशेने जाऊन हाजीपूर जवळून वाहणाऱ्या गंगेच्या फाटयाजवळ रात्री येऊन पोचले. मोगलांच्या सैन्याने जमिनीवरचा मार्ग रोखून धरला आणि ७ ऑगस्ट रोजी दोन्ही सैन्यांमध्ये तोफांची कडाक्याची लढाई झाली. गंगेच्या काठावरील एका उंचवटयावरून अकबर ही लढाई पहात होता. हाजीपूरचा किल्लेदार फत्तेखान बऱ्हा याचा पराभव होऊन तो मारला गेला आणि हाजीपूर मोगलांच्या हातात पडले ( ७ ऑगस्ट ).

## अकबर द्वंद्व युद्धास तयार होतो

अकबर पाटण्याला पोचण्यापूर्वीच मुसलमानांची निष्कारण हत्या टाळण्यासाठी अकबराबरोबर तह करण्याची सूचना मुनीमखानने दाऊदला केली होती. त्याप्रमाणे वाटाघाटीस सुरुवात होऊन दाऊदचा अफगाण दूत तहाचा संदेश घेऊन अकबराकडे आला. पूर्ण शरणागती पत्करून दाऊदने आपल्या दरबारात हजर व्हावे अशी अकबराने मागणी केली. त्याच वेळी आपल्या दोघांमध्ये किंवा दोघांनी निवडलेल्या कुठल्याही दोन सरदारांमध्ये किंवा दोन हत्तींमध्ये सुद्धा द्वंद्व-युद्ध लावून भांडणाचा निकाल लावावा अशीही जगावेगळी सूचना अकबराने पुढे मांडली. पण या वेडगळ सूचनेचा दाऊदने अव्हेर केला आणि दोन्ही पक्ष युद्धाला सज्ज झाले.

## पाटण्याचा पाडाव

७ ऑगस्ट रोजी अकबर एका हत्तीवर बसून पाटण्याचा किल्ला आणि आजूबाजूचा प्रदेश याची पाहणी करण्यासाठी निघाला. शहराच्या दक्षिणेस अर्ध्या मैलावर असलेल्या पंचपहाडी येथे अकबराची तुकडी येताच किल्ल्यावरच्या शिबंदीने तटावर उभ्या केलेल्या लांब पल्ल्याच्या तोफांनी तिच्यावर मारा केला. सुदैवाने अकबराला काहीही इजा झाली नाही. दाऊदजवळ २०,००० घोडे, शेकडो हत्ती, प्रचंड पायदळ आणि मोठा तोफखाना अशी प्रचंड सेना होती. पाऊस आणि गंगेचा पूर यामुळे आपण सुरक्षित आहोत अशा भ्रमात तो होता. पण पावसाळ्याला न

जुमानता शेकडो मैलांची चाल करून अकबर आपल्या विरुद्ध चालून येतो आणि विरोधी हवामानातही चढाई करतो हे पाहून दाऊदचा धीर खचला. हाजीपूर पडल्याची बातमी येताच घाबरून जाऊन १० ऑगस्टच्या आदल्या रात्री किल्ल्याच्या मागल्या दरवाजाने तो निसटला आणि एका जलद चालणाऱ्या जहाजात बसून तो बंगालकडे पळून गेला. विक्रमादित्य हा किताब असलेला श्रीधर नावाचा त्याचा प्रधान हातात सापडेल तो खजिना घेऊन जलमार्गाने पळून गेला. दाऊदचा मुख्य सेनापती गुजरखानने हत्तीसकट सर्व सेना बरोबर घेऊन आणि मृगवन दरवाजातून बाहेर पडून खुष्कीच्या मार्गाने पलायन केले. रात्रभर पाटणा शहरात प्रचंड हल्लकल्लोळ माजला. आणि त्या गोंधळात अनेक लोक चेंगरून मेले, आणि बरेच किल्ल्या भोवतीच्या खंदकात पडून बुडाले. जलमार्गाने पळून जाण्याचा प्रयत्न करणारे अनेकजण दुथडी भरून वाहात असलेल्या गंगेच्या प्रवाहात बळी पडले.

दुसऱ्या दिवशी पहाटे आपले प्रमुख अधिकारी बरोबर घेऊन आपल्या सैन्यानिशी अकबराने दिल्ली दरवाजातून पाटण्याच्या किल्ल्यात प्रवेश केला आणि अफगाणांनी टाकून दिलेली युद्धसामग्री व सर्व मौल्यवान चीजवस्तू यासह किल्ला ताब्यात घेतला. त्यात गुजरखानने किल्ल्यात सोडून दिलेले ५०-६० हत्ती होते दाऊद आणि श्रीधर मुघलांच्या हातात सापडणे अशक्य होते. पण अकबराने गुजरखानचा पाठलाग करण्याचा हुकूम दिला आणि ४ तास किल्ल्याची तपासणी केल्यानंतर पळपुटयांचा पाठलाग करण्याच्या कामी स्वतः पुढाकार घेतला. गुजरखान मोंगल सैन्याच्या कित्येक मैल पुढे होता तरीही पाठलागाचे दडपण त्याला जाणवल्याशिवाय राहिले नाही. पुनपुनच्या ओढ्यापाशी तो पोचला त्यावेळी एक दुर्घटना घडली. मुघलांच्या भीतीने घाईघाईने पुनपुन नदी ओलांडून जात असताना त्याचे हत्ती आणि इतर सैन्य यांच्या भाराने नदीवरचा तात्पुरता पूल मोडला आणि अनेक हत्ती, फार मोठी मालमत्ता आणि बरेच सैनिक यांना जलसमाधी मिळाली. पूल पडल्यानंतर त्या ओढ्यापाशी आलेली इतर अफगाण फौज आणि त्यांच्या मदतीस आलेली इतर सेना यांनी आपली हत्यारे, चिलखते आणि इतर चीजवस्तू फेकून देऊन पैलतीरावर जाण्याकरिता नदीत उड्या टाकल्या. दरम्यान मुनीम खानला आपल्या छावणीच्या बंदोबस्तासाठी माग ठेवून अकबर पुनपुन जवळ आला आणि क्षणाचाही विलंब न लावता त्याने ओढ्यात घोडा सोडला आणि सुरक्षितपणे पैलतीरावर गेला. त्याच्या पाठोपाठ त्याचे अधिकारी सैन्य नदीपार करून गेले आणि त्यांनी शत्रूचा जोराचा पाठलाग सुरू केला. त्या दिवशी अकबराने पाटण्यापासून दर्यापूरपर्यन्त ५२ मैलांची मजल मारली, आणि वाटेत गुजरखानचे २६५ हत्ती पकडले. पण गुजरखान मुघलांच्या हातून निसटून सुरक्षित स्थळी गेला. बादशहाच्या हुकमावरून मीरबक्षी शहाबाज खान आणि मजनून खान काकशाल या दोघांनी दर्यापूरच्या पुढे १४ मैल जाऊन सहावंटच्या

पुलापर्यंत गुजरखानचा पाठलाग केला, पण त्या अफगाण सेनापतीला गाठण्यात त्यांना यश आले नाही. तथापि सूर घराण्यातला शेवटला राजा अदली याचा बंगालच्या कराणीला जाऊन मिळालेला मुलगा हुसेन हा मुघलांच्या हातात सापडला आणि त्याला ठार करण्यात आले.

## बिहारच्या कारभाराची व्यवस्था : अकबर आग्र्याला परत येतो.

अकबर दर्यापूरला सहा दिवस राहिला. त्याने मुनीम खानला बिहारचा सुभेदार आणि बंगालच्या मोहिमेचे सरसेनापती नेमले. जौनपूरची जहागीर खान-इ-खानान कडून काढून घेऊन बादशहाच्या नव्या धोरणाप्रमाणे खालसात दाखल करण्यात आली आणि पूर्वीप्रमाणे दुसऱ्या कोणाकडे तो प्रांत न सोपवता त्याचा कारभार पहाण्यासाठी आणि जमाबंदी करण्यासाठी शाही अधिकारी नेमून रझवीखानला जौनपूरचा दिवाण नेमण्यात आले. आग्र्याहून आणलेली सर्व जहाजे आणि आरमारी तराफा मुनीम खानच्या ताब्यात देऊन शाही फौजेतील आणखी १०,००० सैन्य त्याच्या अधिपत्याखाली दिले. खान-इ-खानानच्या जुन्या शिपायांच्या पगारात वाढ केली. अशा तऱ्हेने मुनीम खानच्या हाताखाली २०,००० घोडदळ तयार झाले. तोडरमलच्या सेवेबद्दल त्याला स्वतंत्र निशाण व नौबत देऊन दाऊद-विरुद्धच्या मोहिमेत मुनीम खानला साहाय्य करण्याचा आदेश त्याला देण्यात आला. पाऊस आणि नद्यांना आलेले पूर यांची पर्वा न करता आणि आपल्या काही वरिष्ठ अधिकाऱ्यांचा सल्ला बाजूला ठेवून दाऊद विरुद्धची मोहीम ताबडतोब हाती घेण्याचा हुकूम अकबराने मुनीम खानला दिला. ही सर्व व्यवस्था केल्यावर अकबर आग्र्याला परत जाण्यास निघाला. वाटेत घियासपूरला ४ दिवस मुक्काम करून अफगाणांकडून पकडलेल्या हत्तींची त्याने पाहाणी केली. दरबारी कामकाज पाहिले आणि मिर्झा युसूफ खानची आपल्या मुख्य सैन्यासह जौनपूरला रवानगी केली. त्याच वेळी हैबतखान कराणी आणि त्याचा मुलगा बहादूरखान यांच्या ताब्यात असलेला रोहटासचा अभेद्य किल्ला जिंकून घेण्यासाठी दुसऱ्या सैन्यानिशी फरहात-खानला पाठवून दिले. त्याला जाऊन मिळण्याचा आदेश माजी वजीर मुझफ्फरखान याला देण्यात आला. २१ ऑगस्ट रोजी पाटण्याच्या मार्गाने चोसाला जाऊन तिथून गंगेचा पूर ओलांडून अकबर २४ तारखेला जौनपूरला येऊन पोचला. जौनपूरला अकबराचा मुक्काम ३३ दिवस इतका दीर्घकाळ होता. खालसात घेतलेला हा पहिलाच प्रांत असल्यामुळे त्याच्या कारभाराची व्यवस्था नव्या धर्तीने करणे जरूर होते. मिर्झा मीरक रिझवी ( रझवी खान ) आणि सिक्रीचा शेख इब्राहिम या दोघांना जौनपूरचे अंमलदार नेमून नव्या पद्धतीने कारभार कसा काय चालतो हे पाहाण्यासाठी अकबर स्वतः जौनपूरला राहिला. शिवाय जौनपूरला राहून दाऊद विरुद्ध मोहीम शिघ्रगतीने पुढे चालविण्यास त्याने मुनीम खानला उत्तेजन

दिले. २६ सप्टेंबर रोजी अकबर जौनपूरहून निघाला. आणि पुढल्याच टप्प्यावर म्हणजे खानपूर येथे तेलिया-गढीची नाकेबंदी केलेली खिंड काबीज केल्याची बातमी त्याला मिळाली. तेलिया-गढीची खिंड म्हणजे बंगालचे प्रवेशद्वारच होते. लखनौच्या मार्गे प्रवास करीत तो कनोजला जाऊन पोचला. तेथे त्याने उज्जैनचा विक्रमादित्य याच्या बत्तीस गोष्टी असलेल्या सिंहासन-बत्तीशी या संस्कृत ग्रंथाचे फारशीमध्ये भाषांतर करण्यास बदायुनीस आदेश दिला. थोड्याच आठवड्यांत हे भाषांतर तयार झाले, आणि ते बादशहाला पसंत पडून खीर्द अफझा असे नाव त्याला देण्यात आले. थोडे दिवस दिल्लीला घालवून पाटण्याच्या विजयाबद्दल ख्वाजाच्या कबरीचे दर्शन घेण्यासाठी तो अजमेरला गेला. अजमेरला जात असताना आग्रा ते अजमेर या रस्त्यावर दोन दोन मैलांच्या अंतराने हरणाच्या शिंगांनी सजवलेले उंच उंच स्तंभ उभारण्याचा त्याने हुकूम दिला. १३ जानेवारी, १५७५ रोजी अकबर फत्तेपूर सिक्रीला परत आला.

## तेलिया-गढी आणि टंडाचा पाडाव

अकबराच्या सूचनेप्रमाणे ऐन पावसाळ्यात मुनीम खानने दाऊद विरुद्ध मोहीम सुरू केली 'माझ्याजवळ २।। लाख फौज आहे' अशी प्रौढी मिरवणारा बंगालचा राजा लज्जास्पद रितीने आपली जबाबदारी टाकून देऊन टंडाला आपल्या राजधानीकडे पळून गेला. त्यामुळे पाटण्यापासून तेलिया-गढीचा सर्व प्रदेश काही प्रतिकार न होता चालून येणाऱ्या मोंगलांच्या हातात पडला. प्रथम सूरजगड आणि नंतर मुंगीर मुनीम खानच्या ताब्यात आले. खरगपूर, गिधोड आणि इतर ठिकाणचे राजे मुनीर खानला शरण येऊन मिळाले. भागलपूर आणि खालगांव या खास अफगाण वसाहती काही प्रतिकार न होता मुनीम खानच्या हातात पडल्या. बंगालचे प्रवेशद्वार अशा तेलिया-गढीच्या सुसज्ज खिंडीत शत्रूचे पहिले चिन्ह दिसले. पण तेथे जाण्याचा आणि पलिकडला सर्व रस्ता पाण्याखाली होता. खिंडीजवळच्या किल्ल्याला वेढा देण्याऐवजी किंवा खिंडीतून आपले सैन्य घुसवण्याचा प्रयत्न सोडून देऊन मुनीम खानने मजनूनखान काकशाल यास आपल्या तुकडीसह खिंडीला वळसा घालून दूरच्या आडवळणाने अरुंद आणि कठीण वाटेतून पलिकडे जावयास सांगितले. मुघलांची मुख्य फौज कियाखानच्या हाताखाली किल्ल्याच्या दरवाजावर चालून गेली. त्यामुळे घाबरून जाऊन अफगाण सैन्य रातोरात चोरवाटेने किल्ला खाली करून पळून गेले. आणि अशा तऱ्हेने बंगालमध्ये शिरण्याचा मार्ग मुघल सैन्यास खुला झाला. तेलिया-गढी पडल्यामळे घाबरलेला दाऊद टंडाहून ( हल्लीच्या मालडा जिल्ह्यात हे आहे ) ओरिसाला पळून गेला. २१ सप्टेंबर १५७४ रोजी कुठल्याही तऱ्हेचा प्रतिकार न होता बंगालची राजधानी मुनीम खानने सर केली.

## गुजराथमधील दुष्काळ आणि रोगाची साथ

बंगाल आणि बिहारमधील यशस्वी मोहीम चालू असतानाच १५७४-७५ साली माणसाने पाहिला नसेल किंवा एकला नसेल अशा भीषण दुष्काळाने व साथीच्या रोगाने गुजराथवर झडप घातली. ५-६ महिनेपर्यंत गुजराथवर या संकटाची छाया पडली होती. हा दुष्काळ पडण्याचे मुख्य कारण दुष्काळ किंवा अवर्षण हे नसून दीर्घकाळ चालू असलेली बंडाळी आणि लढाया, त्यामध्ये मृत्यूमखी पडलेले अनेक लोक, राज्यकारभारातली अंदाधुंदी आणि कोलमडून गेलेली आर्थिक व्यवस्था ही होत. महंमद अरीफ कंदाहरी या इतिहासकाराने यथार्थतेने लिहून ठेवल्याप्रमाणे हवा-पाणी दूषित झाल्यामुळेच दुष्काळ पडला असे नाही तर अफगाण, हबशी आणि मिर्झा यांचा गैरकारभार आणि जुलूम ही सुद्धा त्याला जबाबदार होती. दुष्काळ पडण्या-पूर्वी साथीच्या रोगाने, बहुदा प्लेगने, गुजराथला पछाडले. या आपत्तीची छाया गुजराथभर सर्वदूर पसरून असंख्य लोक प्रांत सोडून निघून गेले. मृत्युसंख्या एवढी मोठी होती की खुद्द अहमदाबादमधून सरासरी रोज प्रेतांनी भरलेल्या शंभर गाड्या शहराबाहेर जात असत. त्या प्रेतांना पुरेशी वस्त्रे आणि पुरण्याला पुरेशी जागा सापडणे अशक्य होते. तेव्हा खड्डयात प्रेते टाकून त्यावर माती लोटत असत. भडोच, पाटण आणि बडोदा या शहरांत आणि प्रांतात आणि वस्तुतः सर्व गुजराथभर दुष्काळाने भीषण रूप धारण केले होते. टंचाईमुळे जाड्याभरड्या जोंधळ्याचा भाव मणाला १२० पितळी टांका ( म्हणजे ६ रुपये ) इतका वाढला. जनावरांना व घोड्यांना चारा आणि वैरणी मिळत नसल्यामुळे झाडाची साल खाण्यास द्यावी लागत होती.

या दुष्काळामध्ये सरकारने लोकांना कुठल्याही तऱ्हेचे मदतीचे उपाय हाती घेतल्याचा दाखला आढळून येत नाही. दरबारी इतिहासकार अबुल फजल या आपत्तीचा कुठेच उल्लेख करीत नाही. अकबराने कोणत्याही तऱ्हेची मदत केली असतीच तर आपल्या शाही आश्रयदात्याची स्तुती करण्याची संधी त्याने खचित घालविली नसती.

## धार्मिक सभागृहाची स्थापना

धर्मशास्त्रविषयक प्रश्नांची अकबराला लहानपणापासून खूपच आवड होती. अनेक पंथांच्या धर्मगुरूंशी त्याचा निकट संबंध आला होता. जन्ममरणाबाबत अनेक मोठ्या प्रश्नाविषयी त्याच्या मनात शंका येत असत आणि आपले स्वतःचे आयुष्य इस्लामी धर्माची तत्त्वे आणि आचार यांना अनुसरून चालले आहे की नाही हे समजून घेण्याची त्याची तीव्र इच्छा होती. लढाया, राज्यविस्तार, मुत्सद्देगिरी तसेच अंतर्गत राज्यकारभार यात त्याला अपरिमित यश प्राप्त झाले होते. एवढे मोठे राज्य आणि

इच्छेनुसार सर्व प्रकारची ऐहिक सुखे प्राप्त करून दिल्या बद्दल तो ईश्वराविषयी कृतज्ञ होता. बदायुनी लिहितो, " रात्रीचा अधिक वेळ बादशहा ईश्वराचे ध्यान करण्यात आणि 'या हु', 'या हादी' हे मंत्र म्हणण्यात घालवीत असे. या मंत्रात तो पारंगत झाला होता. ईश्वराबद्दल त्याच्या मनात अपार भक्ती होती. तोच खरा दाता आहे आणि आपल्या यशाबद्दल परमेश्वराला धन्यवाद देण्यासाठी तो राजवाड्याजवळच एका बाजूला असलेल्या एका जुन्या इमारतीत अनेक वेळा सकाळी एका मोठ्या सपाट दगडावर बसून प्रार्थना आणि ध्यान करीत असे. अशा वेळी त्याचे डोके खाली नमलेले असून तो सुरम्य पहाटेच्या मंगल आनंदाचा आस्वाद घेत असे." धर्म आणि तत्त्वज्ञान यावरील चर्चा ऐकण्याचा त्याला फार शोक होता. "तत्त्वज्ञानावरील चर्चेचे मला इतके आकर्षण आहे की, त्यामुळे इतर कुठल्याच कामाकडे माझे लक्ष लागत नाही. चालू कामकाजाची आबाळ होऊ नये म्हणून मोठ्या निग्रहाने मी अशा चर्चा ऐकण्याचे सक्तीने टाळतो," असे अकबर म्हणत असे. १५७५ च्या सुरुवातीला आपल्या इतर कामातून रिकामा झाल्यामुळे महान तात्त्विक प्रश्नाकडे लक्ष देण्यास आणि त्याच्या आवडीची चर्चा करण्यास त्याला थोडीशी फुरसद मिळाली.

अजमेरच्या मार्गे पाटण्याहून परत आल्यावर अकबराने फत्तेपूर सिक्री येथे एक धार्मिक सभागृह ( इबादतखाना ) बांधण्याचा हुकूम दिला. ( फेब्रुवारी-मार्च १५७५ ). येथे दर गुरुवारी संध्याकाळी ( इस्लामी पंचांगाप्रमाणे शुक्रवार ) विद्वान मुसलमान पंडितांना धार्मिक विषयावरील चर्चेसाठी एकत्र बोलविण्यात येई. इबादत खान्याची छोटीशी इमारत जामी मशिदीच्या मागच्या बाजूस राजवाड्याजवळ असून तिला चार दिवाणखाने आणि चारी बाजूला प्रशस्त व्हरांडा होता या जागेवर पूर्वी शेख अब्दुला नियाझी सरहिंदी याचा आश्रम (खंका) होता. इमारतीला लागूनच अनुप नावाचा सुंदर तलाव होता. थोड्या महिन्याच्या अवधितच इबादतखाना आणि तलाव तयार झाले. गुरुवारी संध्याकाळी जामी मस्जिदमधील प्रार्थना संपवून अकबर उलेमा आणि आपल्या मुसलमान सरदारांना घेऊन इबादतखान्यात जाऊन तेथे सभा भरवीत असे. कोणी कोठे बसावयाचे ती जागा नक्की केली नसल्यामुळे सुरुवातीला काहीसा गोंधळ होई. कारण जमलेले सभासद कोठेही आवडेल त्या जागी जाऊन बसत असत. अकबराने पुढे पश्चिमेकडचा दिवाणखाना महंमदाचे वंशज समजल्या जाणाऱ्या सय्यदांच्यासाठी, दक्षिणेकडला उलेमा किंवा इस्लामी कायदेपंडितासाठी आणि उत्तरेकडला शेख किंवा धर्मशीलतेबद्दल प्रसिद्ध असलेल्या आणि खास अध्यात्मिक वरदान लाभलेल्या माणसांसाठी नेमून दिला. धार्मिक विषयात रस घेणाऱ्या सरदारांच्यासाठी पूर्वेकडला दिवाणखाना राखून ठेवला. अकबर मध्यभागी बसून यापैकी कुठल्याही दिवाणखान्यात जाऊ शकत असे. या सभांचा अध्यक्ष अकबरच असे, आणि त्याचे काम सबंध रात्रभर व कधी कधी दुसऱ्या दिवशी

( शुक्रवार ) दुपारपर्यंतसुद्धा चाले. धर्म, कायदा, तत्त्वज्ञान आणि ऐहिक बाबी अशा नाना तऱ्हेच्या विषयांवर येथे चर्चा होत असे. सभा संपल्यानंतर तेथे उपस्थित असलेल्या सर्वांना अकबर मुठी भरून सोन्याचांदीची नाणी वाटत असे. वादांत विशेष कौशल्य किंवा विद्वत्ता दाखवणाऱ्या लोकांना तो खास बक्षिसे देई.

या सभांमध्ये फक्त मुसलमान लोकांनाच भाग घेण्याची परवानगी असे. सुरुवातीला मक्दुम् उलमुल्क हा किताब असलेला शेख अब्दुल्ला सुलतानपुरी आणि मुख्य सद्र ( धर्मार्थ खाते आणि वर्षासने यांचा मंत्री ) शेख अब्दुन नबी यांच्या नेतृत्वाखालील सनातनी सुन्नी पंथांचे या सभातून बरेच प्रस्थ असे.सुन्नी नेत्यांबद्दल अकबराला फार आदर होता. अब्दुन नबीची हादीवरील (महंमदच्या वचनावरील) प्रवचने ऐकण्यासाठी तो पुष्कळदा अब्दुन नबीच्या घरी जात असे. आणि मोठ्या आदराने त्याचे जोडे उचलून त्याच्यापुढे ठेवीत असे. राजपुत्र सलीमला त्याने मुख्य सद्रच्या शाळेत घातले होते. पण काही काळ तेथील वादविवाद ऐकल्यानंतर तेथे जमणाऱ्या विद्वान धर्मगुरूंची गैरशिस्त, असहिष्णुता आणि व्यवहारज्ञानाचा अभाव अकबराच्या लक्षात येऊ लागला आणि तो त्यांच्याविषयी उदासीन झाला आणि जेव्हा त्यांची अगहार बुद्धी आणि लोभी स्वभाव, क्षुद्र वृत्ती आणि आपापसातील तंटे, भांडणे, उजेडात आली तेव्हा अकबराचा यांच्या विषयीचा सर्व आदर नष्ट झाला. अखेरीस त्यांचे हटवादी, संप्रदायनिष्ठ धर्मवेड आणि मुस्लीम कायद्याचे स्पष्टीकरण करताना त्यांच्यातील बुद्धिनिष्ठेचा आणि वास्तवतेचा अभाव पाहून सनातनी सुन्नी उलेमांच्या कुचकामीपणाविषयी अकबराची खात्री पटली आणि ते पदच्युत झाले. स्वतंत्र निरीक्षण, चिकित्सक तारतम्य बुद्धी आणि मनुष्य-स्वभावाचे उपजत ज्ञान यांच्या योगाने अकबर उलेमांच्या योग्यतेची नव्याने पारख करू शकला. तसेच विद्वान शेख मुबारक यांचा गुणी मुलगा अबुल फजल आणि इतर नव्या विचारांची मंडळी यांचा उलेमांच्या विरुद्धचा पक्ष निर्माण झाला. त्यांच्या कठोर तर्क पद्धतीचा परिणाम पण अकबरावर झाल्याशिवाय राहिला नाही. इबादतखान्याची स्थापना होण्यापूर्वी मुबारक यांच्यावर पाखंडीपणाचा आणि धार्मिक बाबतीत नवे पायंडे पाडण्याचा आरोप ठेवून मक्दुम उलल्मूक, अब्दुन नबी आणि इतर धर्मवेडया सुन्नी उलेमांनी त्याला देहांताची शिक्षा फर्मावली होती. अतिशय छळ झाल्यामुळे शेख आणि त्याचे मुलगे आग्र्याहून आपल्या घरातून गेले आणि केवळ सुदैवानेच विनाशातून बचावले. नंतर बादशहाचा आवडता दूध-भाऊ खान-इ-आझम या नावाने पुढे ओळखला गेला. मिर्झा-अझीझ-कोका याच्या मध्यस्थीने शेख मुबारकला माफी मिळून दरबारात पुनः त्याचे प्रेमाने स्वागत झाले. आपल्या बापाच्या शत्रूविरुद्ध अबुल फजलने शस्त्र उगारले आणि अब्दुन नबी, मक्दुम् उल्मुल्क आणि त्यांच्या गटातील लोकांचे तर्कदोष, तसेच त्यांची घमेंडखोर वृत्ती, ऐहिक विषयावरील त्यांची आसक्ती आणि उक्ती आणि कृती यामधली तफावत ही चव्हाट्यावर मांडली. जुन्या इस्लामी

कायदेपंडितांच्या उलेमा निर्णयाची टर उडविताना तो म्हणत असे की, त्याची स्पष्टीकरणे म्हणजे "या मिठाईवाल्याने किंवा त्या चांभाराने किंवा तशाच एखाद्या कातडी कमावणाऱ्या" ने केली होती. कारण ही माणसे धर्मगुरू असूनही व्यापार करीत असत. अबुल फजलच्या प्रखर युक्तिवादापुढे सनातनी सुन्नी पुढाऱ्यांचे धैर्य खचले, दरबारातला त्यांचा पक्ष मोडला आणि मकदुम उलमुल्क आणि अब्दुन नबी हे अधिकार भ्रष्ट झाले.

सभेमध्ये चर्चा चालू असता कधीकधी उलेमा मंडळी हमरीतुमरीवर येत आणि सभेत गोंधळ माजत असे. ऊंच फेटे बांधलेले, लांब झगेवाले धर्मगुरू सभेमध्ये प्रत्यक्ष बादशहा हजर आहे हे विसरून जाऊन स्वतःच्या युक्तिवादाच्या समर्थनार्थ वैयक्तिक शिव्यागाळी किंवा मारामारी करण्यासही मागेपुढे पाहात नसत. हे प्रत्यक्ष डोळयांनी पाहिलेला बदायुनी लिहितो, "एका रात्री हे सर्व उलेमा जोरजोरात, शिरा ताणून, एकमेकांशी भीषण आवाजात भांडू लागले आणि गोंधळ माजला. या उद्धट वर्तनाचा अकबराला फार राग आला." सभेमध्ये सभ्यपणे न वागणाऱ्यांची नावे माझ्याकडे पाठवून देत जा म्हणजे मी त्यांना सभागृहातून हाकलून देईन" असा हुकूम बादशहाने रोजनामा लिहिणाऱ्या इतिहासकारांना दिला. बदायुनी लिहितो की, बादशहाचा हुकूम मानला तर सर्व इबादतखाना रिकामा होईल म्हणजेच जमलेले सर्व लोक या बाबतीत दोषी होते असा त्याचा अर्थ होतो. बदायुनीने आपल्या "मुन्ताखाब उत तवारीख" या ग्रंथात अशाच दुसऱ्या एका प्रसंगाचा उल्लेख केला आहे. एकदा सभा चालू असताना असे सांगण्यात आले की, सरहिंदचा हाजी इब्राहिम याने फतवा काढून, नमाज पढण्याच्या वेळी तांबडा आणि पिवळा पोषाख घालण्यास मान्यता दिली आहे आणि त्याच्या समर्थनार्थ हादीचा पुरावा दिला. हे ऐकताच मीर अदील सय्यद महंमद याला राग आला आणि तो हाजी इब्राहिमला अकबराच्या देखत "पापी नतभ्रष्ट" म्हणून "अद्वातद्वा शिव्या देऊ लागला, आणि आपली काठी उगारून त्याच्या अंगावर धावून गेला." हाजी इब्राहिम मोठ्या शिताफीने तेथून पळून गेला. या रानटी वागणुकीमळे बादशहा अतिशय रागावला.

या सभांमधून चर्चिल्या जाणाऱ्या विषयांची सविस्तर यादी कंटाळवाणी होईल पण त्यातल्या काही महत्त्वाच्या विषयांची दखल घेणे एवढेच येथे शक्य आहे. हिंदूंच्यावर जिझिया कर पुन्हा लादावा यासंबंधी एक गमतीदार ठराव एका सभेत पास झाला. याचा उल्लेख बदायुनीने केला आहे. याचा सर्व बाजूंनी विचार करून त्याबद्दल बादशाही फर्मानाचा मसुदा तयार करावा असे मगदुम्-उल्मुल्क आणि अब्दुन-नबी यांना आदेश देण्यात आला. हा ठराव फक्त कागदोपत्रीच राहिला असे हिंदूंचा द्वेष्टा बदायुनी मोठ्या दुःखाने म्हणतो. आपल्या राजमुद्रेवर आणि नाण्यावर "अल्ला-हु-अकबर' हे वाक्य कोरावे या अकबराच्या सूचनेचा उल्लेख एका सभेत

आला आहे. बहुतेक सर्व उलेमांनी त्याला संमती दिली. पण हा वाक्यप्रयोग संदिग्ध असल्यामुळे लोकांच्या मनात गैरसमज निर्माण होईल या कारणास्तव हाजी इब्राहिमने तिला आपला विरोध दर्शविला. अकबराने त्याचा विरोध फेटाळून लावला आणि तो वाक्यप्रयोग स्वीकारला. पण सभेपुढे आलेला सर्वात महत्त्वाचा प्रश्न म्हणजे मुसलमानाने किती बायका कराव्या हा होता. त्यावर खूप वादळ माजले आणि त्याचे परिणाम दूरगामी ठरले. अकबराला अनेक बायका होत्या आणि आपली ही लग्ने बेकायदेशीर आहेत की नाही हे जाणून घेण्यास तो उत्सुक होता. वस्तुतः दरबारातल्या मुख्य उलेमांनी ही लग्ने कायदेशीर ठरवावी अशी त्याची आंतरिक इच्छा होती. मस्लीम कायद्याच्या काटेकोर अर्थाप्रमाणे एका वेळी चारपेक्षा अधिक बायका करता येत नाहीत असे सुन्नी कायदेपंडिताचे मत होते. तथापि मुख्य सद्रअब्दुन-नबी याने प्रथम अकबराने पृच्छा केल्यावरून सैल स्पष्टीकरण करून अकबराला सांगितले होते की, काही कायदेपंडितांच्या मते ९ किंवा १८ बायका सुद्धा करता येतात. पण इबादतखान्याची स्थापना झाल्यानंतर या प्रश्नाची चर्चा सुरू झाली तेव्हा अब्दुन-नबीने आपले मत बदलून इस्लामी धर्मप्रमाणे एका वेळी चारच बायका असाव्या या सर्वमान्य मताला तो चिकटून राहिला. त्यामुळे अकबर अर्थातच रागावला आणि संशयास्पद आणि वादग्रस्त बाबतीत "सामान्यतः निर्णय देणे काझीचा अधिकार आहे" आणि "मलिकी पंथाच्या काजीने एखादा 'मुताह' कायदेशीर आहे असे ठरविले तर शफी आणि हनाफी ( सुन्नी ) यांनी सुद्धा तो कायदेशीर मानला पाहिजे" या इतिहासकार बदायुनीच्या मताचा पुरस्कार त्याने केला. स्वतःच्या बाबतीत निकाल देण्यासाठी अकबराने हुसेन अरब मलिकी याची काझी म्हणून नेमणूक केली. अकबराची बहुतेक सर्व लग्ने मताह पद्धतीची असल्यामुळे कायदेशीर आहेत असा निर्णय हुसेनने दिला. नंतर बादशहाने मुख्य काझी याकुब याला पदावनत करून बंगाल प्रांताचा काझी म्हणून त्याची गौडला बदली केली. त्याच्या जागेवर बादशहाने मुलतानचा मौलाना जलालुद्दिन याला साम्राज्याचा मुख्य काजी नेमले.*

जवळ जवळ चार वर्षे इबादतखान्यातले वादविवाद उत्साहाने चालत होते. सप्टेंबर १५७९ मध्ये अकबराने स्वतःच सर्व धार्मिक आणि ऐहिक बाबतीत इस्लामी कायद्याचा मुज्ताहिद म्हणजे प्रमुख निर्णयकर्ता ही भूमिका धारण केली आणि यानंतर एक-दोन वर्षातच इबादतखाना बंद पडला. यापुढे शरियतची चर्चा किंवा स्पष्टीकरण करण्यासाठी उलेमांची गरज राहिली नाही.

---

*एका माणसाने किती बायका कराव्यात यासंबंधीचे कुराणातील वादग्रस्त वचन असे आहे : "तुम्हाला हव्या तितक्या स्त्रियांशी लग्ने करा, दोन आणि दोन, तीन आणि तीन, आणि चार आणि चार."

## सुधारणांचा आरंभ

जमीनमहसूल आणि लष्करी खाते यामध्ये करावयाच्या सुधारणांची एक योजना अकबराने १५७३ सालीच तयार केली होती. त्यामुळे राज्याच्या आर्थिक आणि लष्करी व्यवस्थेत मूलभूत बदल होणार होते. पण मुख्य मंत्री मुझफ्फर खान तुर्बाती यांच्या विरोधामुळे या सुधारणा अंमलात आणण्याचे तसेच राहून गेले होते. पाटण्याची यशस्वी मोहीम संपवून १५७५ मध्ये परत आल्यावर बादशहाला या गोष्टीकडे लक्ष देण्ययास फुरसद मिळाली आणि निरनिराळे वटहुकूम काढून त्याने या सुधारणा अंमलात आल्याचे जाहीर केले. त्याबरोबर अंमलात याव्यात यासाठी शहाबाझ खान दुसरा आसफ खान, राय पुरुषोत्तम आणि राय रामदास यांचे एक मंडळ नेमून त्यांच्यावर या बाबतची सर्व जबाबदारी सोपविण्यात आली. हे मंडळ महसूल नि लष्करी मंडळ म्हणून कार्य करीत होते. अबुल फजल म्हणतो की, "अकबर कारभाराच्या चालू व्यवस्थेबद्दल कधीही संतुष्ट न राहता कारभार अधिक चांगला व्हावा आणि तो लोकांच्या हिताचा व्हावा याकरिता तीत सुधारणा करण्याचा तो सतत प्रयत्न करीत असे."

## जहागिरींचे खालसात रूपांतर : करोडींची स्थापना

अकबराची पहिली सुधारणा जमिनीसंबंधीची होती आणि ती मुळास हात घालणारी होती. १५७५ पर्यंत राज्यातली बहुतेक सर्व शेतजमीन, दरबारातले सरदार आणि अधिकारी यांना पगाराच्या बदल्यात जहागीर म्हणून देण्यात येत असे. यापैकी थोडासा भाग बादशहाच्या प्रत्यक्ष वहिवाटीखाली असे. त्याला खालसा ( शाही ) किंवा राखीव जमीन म्हणत असत. १५७५ साली अकबराने जमिनी देण्याची पद्धत बंद करून अधिकाऱ्यांना आणि लष्कराला बादशाही खजिन्यातून पगार देण्यास सुरुवात केली. विद्वान आणि धर्मपंडित यांच्या चरितार्थ वेतनासाठी जमिनी देण्याची पद्धत त्याने चालू ठेवली. पण शेतसारा व इतर कर वसूल करण्याचे सर्व अधिकार जमीनदारांच्या हातून काढून घेण्यात येऊन ते मुलकी खात्यातील अधिकाऱ्यांकडे सोपविण्यात आले. अशा तऱ्हेने सर्व सोपविलेल्या जमिनीचे खालसा किंवा शाही जमिनीत रूपांतर करण्याची सुधारणा अकबराने केली. अशा तऱ्हेने रूपांतरित झालेला पहिला प्रदेश म्हणणे मुनीम खानच्या पूर्वीच्या सुभेदारीतील जौनपूर, बनारस, चुनार आणि करमनसा नदीपर्यंतचा मुलुख होय. ( ऑगस्ट सप्टेंबर १५७४ ). बंगाल, बिहार, गुजराथ आणि जुन्या राजघराण्यांची मांडलिक राज्ये वगळून बाकी सर्व साम्राज्याला हे तत्त्व लागू करण्यात आले.

यानंतरचे दुसरे पाऊल म्हणजे सगळा खालसा प्रदेश १८२ भागांत विभागणे हे होते. प्रत्यक विभागातून जवळ जवळ एक कोटी दाम म्हणजे दोन लक्ष पन्नास हजार रुपये इतका महसूल यावा अशी अपेक्षा होती. प्रत्येक विभागावर करोडी

नावाचा एक अनुभवी अधिकारी नेमावयाचा होता. आपल्या हाताखालचा कारकून आणि खजाची ( फोतादार ) यांच्या साहाय्याने त्याच्या विभागातील जमिनीच्या हद्दी ठरवून देणे, त्यातील सर्व गावांतील जमिनीची मोजणी करून लागवडीखालच्या जमिनीचा सारा ( कईद-ई-झबत ) ठरवून देणे ही कामे करोडीला करावी लागत. जमिनीची मोजणी करण्यासाठी एक मोजणी पद्धत नक्की करण्यात आली होती. लोखंडी कड्यांनी जोडलेल्या बांबूच्या गजाने किंवा जरीबने ही मोजणी होत असे. लागवडीखाली नसलेली पण लागवडी योग्य जमिनीची मोजणी करून ती लागवडी-खाली आणण्यास शेतकऱ्यांना उत्तजन देणे आणि शक्यतो ३ वर्षांच्या आत हळूहळू तिच्यावर सारा आकारण्यास सुरवात करणे, त्याचप्रमाणे आपल्या हाताखालील विभागाचे खंड पत्रक ( हाली हसील ) नक्की करून लागवडीखालच्या जमिनीची वाढ करण्याकरिता अटोकाट प्रयत्न करणे ही कामे पण करोडीला करावी लागत. तसेच आपल्या विभागात जमिनी नेमून दिलेल्या खातेदारांच्या हक्कांची चौकशी करण, त्यांच्या जमिनीचे एकूण क्षेत्रफळ नक्की ठरविणे हीही कामे त्याला करावी लागत. रयतेकडून सारा वसूल करून तो बादशाही खजिन्यात भरणे हे त्याचे कर्तव्य होते. पण सारा वसूल करताना कुठल्याही तऱ्हेची जुलुम जबरदस्ती होता कामा नये अशी सक्त ताकीद त्यांना दिलेली होती. जेणेकरून शेतकऱ्यांच्या हिताची अभिवृद्धी होईल ते करण्याचे आदेश त्यांना देण्यात आले होते

दुर्दैवाने या महत्त्वाच्या सुधारणेच्या कार्यवाहीची दखल घेण्याची तसदी बदायुनीखेरीज दुसऱ्या कुठल्याही तत्कालीन लेखकाने घतली नाही. या सुधारणे-मुळे कारभार चांगला चालला आणि पुष्कळ जमीन शेतीखाली आली, असे सामान्य-पणे अबुल फजलने लिहिले आहे. तो पुढे म्हणतो की, अफरातफरीला या पद्धतीमुळे आळा बसला.* बदायुनी हा स्वतः वीसांचा मनसबदार असून चरितार्थ वेतन म्हणून त्याच्याकडे एक हजार बिघे जमीन होती. या सुधारणेने इतराप्रमाणे त्याच्यावरही परिणाम झाला. आपल्या घोड्यांना डागण्याचे आपल्याला कधीच जमले नाही आणि या बाबतीत इमाम असल्यामुळे विनंती केल्यावरून आपल्याला सूट देण्यात आली होती असे बदायुनी कबुल करतो. त्याला देण्यात आलेली जमीन अर्थातच मुलकी अधिकाऱ्यांच्या ताब्यात गेली असणार. मनसबदारांच्या पागेतील घोड्यांना डागले पाहिजे या बाजवी सुधारणेला मिर्झा अझीज कोकान विरोध केला आणि याबद्दल बदायुनी मिर्झाचीच तरबदारी करतो. बदायुनीच्या बाजूने मुन्ताखाब-अत-तवारीख-मधला एक लांब उतारा व्हिन्सेंट स्मिथने उधृत केला आहे, बदायुनीच्याच शब्दात त्याचे सार असे "करोडींच्या अति-लोभामुळे देशाचा मोठा भाग उजाड झाला.

*बदायनीला जुन्या व्यवस्थेबद्दल सहानुभूती होती आणि लष्कर तसेच महसूल कारभार यात सुधारणा करण्याच्या तो विरुद्ध होता.

रयतेच्या बायकामुलांना गुलाम म्हणून विकण्यात आल्यामुळे त्यांची पांगापांग झाली आणि सगळीकडे अंदाधुंदी माजून राहिली." पण याच करोडींना पकडून गैर-वर्तनाबद्दल शिक्षा करण्यात येत असे तेव्हा बदायूनीच्या दृष्टीने ते हुतात्मे होत असत. कारण तो लिहितो, "पण राजा तोडरमलने करोडींना धारेवर धरले आणि त्यांना जबर मारहाण केल्यामुळे आणि खोडयात घालून छळ केल्यामुळे पुष्कळ चांगले लोक मृत्यू पावले." त्याचे शेवटचे वाक्य अधिक अर्थपूर्ण आहे. तो लिहितो, मुलकी अधिकाऱ्यांच्या दीर्घकालीन कैदेतच यातले इतके लोक मेले की त्यांना फाशी देण्याची किंवा त्यांचा शिरच्छेद करण्याची गरजच पडली नाही आणि ते मेल्यानंतर बिचाऱ्यांच्या अंगावर कपडा झाकायलासुद्धा कोणी पुढे आले नाही" शेवटी साम्राज्यात फक्त १८२ च करोडी होते आणि उघडच सगळे काही अफरातफर करणारे नव्हते. या सुधारणा म्हणजे फसवेगिरी आणि अपहार यांना पायबंद घालणाऱ्या योजना होत्या असे अबुल फजल निश्चितपणे सांगतो. यावरून त्या विद्वान मुल्लाची निंदा ही फारच अतिशयोक्तिपूर्ण आहे हे उघडच दिसते. जमिनीच्या क्षेत्र-फळाप्रमाणे तिचा सारा ठरविणे ही सुधारणा योग्य अशीच होती. प्रत्येक विभागाचे एक कोटी दाम सारा येईल अशा समजुतीने पाडलेले कृत्रिम विभाग एवढाच या सुधारणेतील मुख्य दोष होता. प्रत्येक चांगली सुधारणा प्रस्थापित हितसंबंधांना बाध आणतेच आणि मुख्यत: याच कारणाकरिता चांगल्या शासनाकरिता आवश्यक असलेल्या जहागिरींचे शाही जमिनीत रूपांतर करण्याची योजना आणि करोडींची संस्था या अप्रिय झाल्या.

## दफ्तरखान्याची स्थापना

दुसरी महत्त्वाची उपाययोजना म्हणजे दफ्तरखान्याची स्थापना होय. यासाठी अकबराने आपल्या शयनगृहाच्या दक्षिणेस पण राजवाड्याच्या आवाराबाहेर एक स्वतंत्र भव्य इमारत फत्तेपूर सिक्रीला बांधून घेतली. ती ४८ फूट लांब आणि २८ फूट रुंद असून तिच्या चारी बाजूंनी सुशोभित कमानी असलेला व्हरांडा होता. सर्व सरकारी दफ्तर या इमारतीत ठेवण्यात येऊ लागले. "दरबारात जे काही चालते त्याची कागदोपत्री नोंद करून ठेवावी म्हणजे अधिकाऱ्यांना त्याचे बहुमोल साहाय्य होईल, त्याचप्रमाणे सर्व सरकारी हुकूम जपून ठेवण्यात यावेत" असा हुकूम काढण्यात आला. सरकारी कागदपत्रे, जावक पत्रे, शाही आज्ञापत्र, महसूल विवरणपत्रके इत्यादि या कार्यालयात ठेवण्यात येत. हे कार्यालय हळूहळू बादशाही अभिलेखागार बनले. अकबराच्या कारकिर्दीचा अधिकृत इतिहास लिहिताना, विशेषत: साम्राज्याचे शाही राजपत्र अशी ऐने-अकबरी लिहिताना अकबराच्या तेथील दफ्तरांचा पूर्णपणे उपयोग केला होता. दुर्दैवाने त्या काळच्या इतिहासकाराला इतकी मूल्यवान अशी ही कागदपत्रे नष्ट झाली आहेत.

## डाग देण्याची पद्धत

तिसऱ्या सुधारणेच्या योगाने मनसबदार म्हणून ओळखल्या जाणाऱ्या शाही सेवकवर्गाचे पद्धतशीर रितीने दर्जे लावण्यात आले. हे दर्जे वीसपासून पाच हजार-पर्यंत होते. निरनिराळ्या दर्जाच्या मनसबदारांनी बाळगावयाचे पायदळ, घोडे, हत्ती, उंट, वाहने इत्यादींची संख्या ठरविण्यात आली. ठरलेले घोडेस्वार आणि घोडे, वाहतुकीची जनावरे प्रत्येक मनसबदार ठेवतो की नाही, ठराविक वेळी हजेरीपटात त्याची नोंद ठेवतो की नाही, सैन्य आणि घोड्यांच्या बाबतीत खोटेपणा नाहीना याची खात्री करून घेण्याकरिता सैनिक, डाग दिलेले घोडे आणि इतर प्राणी यांची वर्णन-पत्रके नोंदविण्यासाठी विस्तृत नियम करण्यात आले होते. घोड्यांना डागण्याचे नियम अल्लाउद्दिन खिलजी आणि शेरशहा यांच्या वेळी ढोबळ स्वरूपात अमलात होते. मीर बक्षी शहाबाझखानने त्यात सुधारणा करून ते विस्तृत केले. इतके तप-शीलवार नियम करून आणि अनेक प्रकारचे सावधगिरीचे उपाय योजून सुद्धा सन्यातली लाचलुचपत थांबली नाही. घोड्यांच्या आणि शिपायांच्या पोकळ नोंदी करून घोडेस्वार तपासणीच्या वेळपुरती घोड्याशिवाय शस्त्रे आणि इतर साधनसामग्री उसनी आणून स्वतःची म्हणून दाखवले जाई. मनसबदार हजेरी पत्रकात हिंदू आणि मुसलमान जमातीतले किरकोळ व्यापारी, वीणकर, पिंजारी, सुतार, भाजी-विके इत्यादी लोकांना शिपायाचा पोषाख देऊन खरे शिपाई म्हणून दाखवित असत, असे बदायुनी म्हणतो. उसने घोडे आणून त्यांना डागीत असत. हजेरी-पत्रके ही तयार झाल्यानंतर भाडोत्री माणसे आपापल्या कामावर निघून जात. या प्रकारचा भ्रष्टचार अकबराला माहीत होता. पण त्याचा निरुपाय होता.

अरबशहा नावाच्या एका गृहस्थाची मुलगी कासीमा बानू हिच्याशी अकबराने या वर्षी लग्न केले.

## भक्कर काबीज केले

बाबरचा वजीर, मीर खलीफा याचा मुलगा मुहीब अल्ली खान याला १५७२ मध्ये सिंध पादाक्रांत करण्यासाठी सैन्य देऊन पाठविले होते हे वाचकांच्या लक्षात असेलच. या स्वारीत थोडेसे यश मिळवून त्याने भक्करच्या किल्ल्याला वेढा दिला. हा वेढा सुरू असतानाच भक्करचा सुलतान महंमद हा २४ मे १५७४ रोजी मरण पावला. किल्ल्यावरच्या शिबंदीने किल्ला खाली करून देण्याची तयारी दर्शविली, पण मुहीब अल्ली खानवर विश्वास नसल्ययामुळे त्याच्या ताब्यात किल्ला देण्यास ते तयार नव्हते. तेव्हा अकबराने गसू खान बकावल बेग याला भक्करचा किल्लेदार नेमून किल्ला ताब्यात घेण्याला सिंधला पाठवून दिले. तेथे त्याची आणि मुहीब अल्ली खानची चकमक झाली. गेसूखान एका जहाजात चढला आणि किल्ल्यातील

शिबंदीच्या साहाय्याने २५ सप्टेंबर १५७४ रोजी त्याने भक्करच्या किल्ल्यात प्रवेश केला.

## बंगालचा कब्जा : दाऊदचा पाठलाग

दरम्यान बंगालची मोहीम समाधानकारकपणे चालू होती. टंडयाला आपली मुख्य छावणी ठेवून मुनीम खानने सर्व बंगाल पादाक्रांत करण्यासाठी चारी दिशांनी आपले सन्य पाठवून दिले. सदगांव आणि कटक घेण्यासाठी महंमद कुली खान बारलास याला हल्लीच्या तिनाजपूर जिल्ह्यातील घोराघाट घेण्यासाठी मजनून खान, याला फत्तेहबाद आणि बागला ( हल्लीचे बाकरगंज ) घेण्यासाठी मुराद खान याला आणि सोनार-गावला एतीमदखान याला पाठविण्यात आले. यांनी पश्चिम, उत्तर, दक्षिण व मध्यभाग असे चारी बाजूचे प्रांत तिथल्या अफगाण सरदारांच्या हातातून हिसकावून घेऊन दाऊदचा पाठलाग सुरू केला. दाऊद ओरिसामध्ये पळून जाऊन कटकला राहिला होता. दाऊदचे सेनानी राजू ऊर्फ काळा पहाड आणि सुलेमान हे घोराघाट भागात दंगल माजवीत होते, म्हणून त्यांचाही पाठलाग करण्यात आला. आग्र्याच्या दरबारातून पळून जाऊन झारखंडात अफगाणांना मिळालेला दाऊदचा चुलत भाऊ जुनद याचे पारिपत्य करण्याचे काम दुय्यम सेनापती राजा तोडरमल याने आपल्याकडे घेतले. महंमद कुली खानने सदगांवपर्यंतचा सर्व प्रांत काबीज केला. पण त्यानंतर सतत युद्धाला आणि बंगालच्या रोगट हवेला कंटाळलेल्या मुगल सैन्यात बेदिली माजली आणि त्यांनी युद्धबंदीचा आग्रह धरल्यामुळे त्याला आणखी पुढे जाता आले नाही. तोडरमलने नानाप्रकारे समजूत घालीत तरी मुघल सैन्याचे नीती धैर्य त्याला परत आणता आले नाही. याच वेळी सतत लढाईमुळे आणि बंगालच्या रोगट हवेमुळे थकून गेलेला महंमद कुली खान मंडलपूर यथे ( मदारन ) मरण पावला. यामुळे सैन्याचा धीर अधिकच खचला. बरद्वानच्या आघाडीच्या तळावरून तोडरमलने मुनीम खानला त्वरित पुढे येऊन सैन्याचा ताबा घेण्याबद्दल आणि पैशाची व्यवस्था करण्याबद्दल तातडीच्या विनवण्या केल्या, पण मुनीम खानचे आता वय झाले होते आणि त्याच्या आस्ते कदम हालचालीमुळे बंगालची मोहीम यशस्वी होण्यास बराच विलंब लागला.

## टुकऱ्याची लढाई (मार्च ३, १५७५)

मध्यंतरी मुघल सैन्यात आणि अधिकाऱ्यात दुही माजली आहे असे पाहून चढाई करून बंगालचे राज्य परत मिळवून घेण्याच्या उद्देशाने दाऊद कटकहून मिदनापूरला परत आला. म्हणून मुनीम खानला त्वरा करण्याबद्दल पुनः एकदा आग्रह करून तोडरमलने बरद्वान व हुगळी जिल्ह्यांतील आरामबागेच्या पश्चिमेस १८ मलांवर असलेल्या गड मंदारणकडे कूच केले आणि तिथून चेटोला ( चिटवा ) गेला.

ओरिसात जाऊन दाऊदचा नि:पात करण्याचा अकबरचा निर्वाणीचा हुकूम मिळा-ल्याने मुनीम खान तोडरमलला येथे यऊन मिळाला. या दोघा सेनापतींनी सैन्याला त्यांच्या कर्तव्याची जाणील देऊन आणि सर्व देश एका छत्राखाली एकत्र आणण्याची बादशहाची उदात्त कल्पना त्यांना समजावून देऊन त्याच्यात पुन: नीतिधैर्य आणले. हल्लीच्या दंतोन रेल्वे स्टेशनच्या अग्नेयेस ११ मैलांवर असलेल्या गड हरीपूर या गावी दाऊदची छावणी होती. त्याच्यावर अचानक हल्ला करून त्याला चकित करण्याचें मुघल सैन्याने ठरविलें. बंगालच्या त्या राजाने आपल्या छावणीभोवती खोल खंदक खणून मोर्चे बांधले होते आणि मिदनापूरच्या दक्षिणच्या बाजूला रस्त्याची मेढेबंदी केली होती. तसेच मुघल सैन्यावर अचानक हल्ला करण्यासाठी दोन्ही बाजूच्या जंगलात मोक्याच्या ठिकाणी आपली फौज लपवून ठेवली होती. मिदनापूरच्या मार्गाने सरळ जाऊन दाऊदवर हल्ला करण्यातला धोका तोडरमल आणि मुनीम खानला ठाऊक होता. तेव्हा दाऊदच्या एका बगलेच्या सैन्याला वळसा घालून पुढे जाण्याचा शहाणपणाचा निर्णय त्यांनी घेतला. इल्यासखान लंगा आणि त्या भागाची माहिती असलेली इतर माणसे यांच्या मदतीने अग्नेय दिशेने एका दूरच्या आडरस्त्याने लांबचा फेरा घेऊन ते नांजुरा या गावी जाऊन पोहोचले. पुढे गेलेल्या तुकडीने त्यांची वाट तयार केली होती. हे गांव मिदनापूरच्या रस्त्याजवळ असून हल्लीच्या दांतोन रेल्वे स्टेशनच्या पूर्वेस ११ मैलांवर आहे. दोन्हीकडच्या टेहळणी पथकांमध्ये ३ दिवस चकमकी सुरू होत्या. चवथ्या दिवशी प्रत्यक्ष लढाई पुढे ढकलणे शहाणपणाचे नाही असे दाऊदला वाटले. मुघल सैन्य अधीच त्याच्या एका बाजूला वळसा देऊन पुढे गले होते. आणि एखादा दिवस लढाईला उशीर केल्यास पिछाडीचे सैन्य ते कापून काढतील असा संभव होता. तथापि ज्योतिषांच्या सांगण्याप्रमाणे ३ मार्च हा अशुभ दिवस असल्यामुळे त्या दिवशी लढाई करण्यास मुनीम खान तयार नव्हता. पण आपल्या सर्व सैन्यानीशी दाऊद अचानक चाल करून येत आहे असे दिसताच त्याने आपल्या सैन्याला तयार होण्याचा हुकूम दिला आणि ३ मार्च १५७५ रोजी टुक्रा किंवा टुक्राकसबा ( जिल्हा बालासोर ) येथे लढाईला तोंड लागले. टुक्रा हे गाव नांजिऱ्याच्या पश्चिमेस ३ मैलांवर आणि दांतोन रेल्वे स्टेशनच्या पूर्वेस ९ मैलांवर आहे. मोंगल सैन्य मोठ्या घाईघाईने आलेल्या नेहमीच्या पद्धतीप्रमाणे लढाईस सज्ज झाले. स्वत: सैन्याच्या मध्यभागी राहून मुनीम खानने आघाडीवर खान-ई-आलमची नेमणूक केली. उजव्या बाजूस शहमखान जलैर आणि डाव्या बाजूस आस्रफखान आणि तोडरमल होते. अल्तिमिश किंवा आघाडीच्या राखीव फौजेवर कियाखानला ठेवण्यात आले. अफगाण फौजेची आखणी खालीलप्रमाणे होती. मध्यभागी स्वत: दाऊद असून आघाडीवर गुजरखान, डाव्या बाजूस इस्माईलखान आणि उजव्या बाजूस सिकंदर हे होते.

मुघल सैन्याची योग्य प्रकारे रचना पूर्ण होण्यापूर्वीच अफगाणांनी त्यांच्यावर

जोराची धडक मारली. अफगाण सैन्यातल्या हत्तींची तोंडे निरनिराळ्या पशूंच्या कातड्याने आणि याकच्या शेपट्यांनी झाकली होती. त्यांचे विचित्र रूप पाहून आणि त्यांच्या भेसूर डरकाळ्या ऐकून मुघलांचे घोडे बिथरले आणि मागे फिरले. मुघल सैन्याची रचना उधळली गेली आणि आपली फौज एकत्र जमविण्याचा व्यर्थ प्रयत्न करीत असता आघाडीचा सेनापती खान-ई-आलम ठार झाला. या संधीचा फायदा घेऊन गुजरखान कियाखानच्या हाताखालील इल्तिमिशचा धुव्वा उडवून खुद्द मुनीम खानच्या हाताखालील मध्यभागातील सैन्यावर हल्ला करण्यासाठी धाडसाने पुढे सरसावला. मुनीर खानला पिटाळून लावण्यात तो यशस्वी ठरला. पळून जाणाऱ्या सैन्याला एकत्र आणण्याच्या निमित्ताने मुनीमखान आपल्या सैन्याच्या मागे ५-६ मैल गेला. गुजरखानने मुनीम खानवरच सर्व शक्ती केंद्रित केली असती तर या लढाईत अफगाण राजाला यश मिळाले असते. पण मुनीम खानच्या मागे काही मैल गेल्यावर गुजरखान मुघलांच्या छावणीकडे परत फिरला आणि तेथे त्याच्या सैन्याने मुघल छावणी लुटण्यास सुरुवात केली. याचा फायदा घेऊन पांगलेल्या कियाखान इल्तिमिशचा सेनापती याने आपल्या हाताखालचे सैन्य पुन: गोळा केले आणि गुजरखानशी पुन्हा सामना देऊन त्याला ठार केले. यामुळे लढाईचे पारडे एकदम फिरले. गुजरखानच्या मृत्यूची बातमी समजताच सहा मैल मागे सरलेला मुनीम खान पुन: रणांगणावर दाखल झाला. मुघल सैन्याच्या डाव्या बगलेवरील अफगाणांचा हल्ला तोडरमलने मोठ्या शौर्याने थोपवून धरला होता, त्याने आता आक्रमक पवित्रा घेऊन उजव्या बाजूच्या अफगाण सैन्याला रणांगणातून पिटाळून लावले. खान-ई-आलम मेला आणि मुनीम खान पळून गेला हे समजले असताना-सुद्धा तोडरमलने आपल्या सैन्यास धीर देऊन युद्ध चालू ठेवले. अफगाण सैन्याच्या दोन्ही बाजूंनी या लढाईत विशेष पराक्रम गाजवला नव्हता. गुजरखान मेल्याची बातमी ऐकून आणि मुनीम खानची माघार म्हणजे युद्धातला एक डावपेच होता असे समजून निराश झालेला दाऊद युद्धभूमी सोडून कटकच्या मार्गे निघून गेला. या अनपेक्षित विजयामुळे मुघल सैन्यात आनंदीआनंद झाला. अफगाण सैन्याचा पाठलाग करून यांनी अमाप लूट हस्तगत केली. बंगालवर राज्य कुणाचे या प्रश्नाचा या लढाईने कायमचा निकाल लावला.

जरा जीर्ण झालेल्या मुनीम खानने हातात सापडलेल्या अनेक कैद्यांची निर्दय-पणे कत्तल करून आणि त्यांच्या डोक्यांचे आठ उंच मनोरे रचून या विजयोत्सवाला गालबोट लावले.

## दाऊदशी तह

या कष्टसाध्य विजयानंतर मुनीम खानने शहमखान जलैर आणि तोडरमल यांना ओरिसात पळून गेलेल्या दाऊदचा पाठलाग करण्यासाठी पाठवून दिले. पाठलाग

करीत ते भद्रक गावी पोचताच दाऊद सुखरूप कटकला पोहोचला आहे, आणि पुन्हा लढाईची तयारी करीत आहे अशी बातमी आली. राजा तोडरमलने समजूत घालण्याचा कितीही प्रयत्न केला तरी पुन: लढा करण्यास नाखूष असलेले मुघल सैन्य कटकच्या मोहिमेवर जाण्यास कबूल होईना. म्हणून मुनीम खानने स्वत: येऊन सैन्याचे अधिपत्य करावे असा तोडरमलने आग्रह धरला. मुनीम खानने ते मान्य केले आणि या दोघांनी मिळून सैन्यात पुन्हा जोम आणून युद्धास प्रवृत्त केले. हे पाहून दाऊद नरमला आणि तहाची बोलणी करण्यासाठी मुनीम खानकडे त्याने आपले दूत पाठविले. दाऊदशी तहाची बोलणी करण्यास तोडरमलचा कडवा विरोध होता. त्याच्या विरोधास न जुमानता मुनीम खानने युद्धाला विरोध असलेल्या आपल्या काही थोड्या अधिकाऱ्यांची गळ पडल्याने दाऊदचे म्हणणे मान्य करून शरण येण्यास सांगितले. "अकबराला नजराणा म्हणून तुझ्या सैन्यातले नाणावलेले हत्ती आणि इतर मूल्यावान भेटी पाठवून देऊन तू स्वत: मला भेटण्यास ये." असा निरोप मुनीम खानने दाऊदला पाठवला. १२ एप्रिल १५७५ रोजी दाऊद आपल्या प्रमुख माणसासह, जवळ कुठलीही शस्त्रे न घेता महानदीच्या तीरावर मोंगलांच्या भव्य छावणीत खान खानानच्या भेटीसाठी आला. आपल्या जवळचे उत्तम हत्ती आणि आपला पुतण्या बायाझिटचा मुलगा शेख महंमद याला त्याने ओलीस म्हणून फत्तेपूर सिक्रीला अकबराकडे पाठवून दिले. "ओरीसाचे राज्य दाऊदकडेच रहावे." असे ठरून औपचारिक तहाचा मसुदा तयार होऊन त्यावर सह्या झाल्या. ओरिसा जिंकून घेण्याची आलेली ही सुवर्णसंधी गमावण्याच्या कल्पनेलाच मुळी तोडरमलचा विरोध होता; त्याने तहाचा निषेध केला आणि त्यावर सही करण्यास नकार दिला. दाऊद हा अप्रामाणिक आणि कावेबाज असून त्याच्या शब्दावर विश्वास ठेवता येत नाही हे त्याचे मत बरोबरच होते हे दाऊदच्या पुढील वर्तनावरून खरे असल्याचे दिसून आले. दाऊदशी तह केल्यावर २१मेला मुनीम खान टंड्याला परत आला. तेथून त्याने तहाची सर्व हकीकत अकबराला कळवली आणि अकबराने आनंदाने त्यावर शिक्कामोर्तब केले.

## घोराघाटवर अफगाणांचा हल्ला

मुनीम खानच्या गैरहजेरीत बंगालमध्ये एक महत्त्वाची घटना घडली. बंगालमधील मुघल सैन्य कमी झाले असे पाहून काळा पहाड, बाबु-ई-मंगाली, आणि इतर अफगाण सरदार घोराघाटवर चाल करून आले. मजनून खान आणि इतर काकशाल यावर ते तुटून पडले आणि त्यांचा पराभव करून त्यांना टंड्याला पळवून लावले. एवढ्यातच दाऊदबरोबर तह करून मुनीम खान परत आला होता. टंड्याला न येता सरळ घोराघाटला जाऊन त्याने अफगाण सैन्याचा पराभव करून तेथून त्यांना हाकून दिले आणि घोराघाटाचा परत ताबा घतला.

## मुझफ्फरखान तुर्बाती बिहारमधल्या अफगाण बंडाळीचा बीमोड करतो

बिहारची राजधानी पाटणा ऑगस्ट १५७४ मध्ये मुघलांच्या हातात पडल्यावर सर्व बिहार प्रांत तत्त्वतः मुघल साम्राज्याचा भाग बनला होता. पण बिहारमधले काही भाग अजून अफगाण सरदारांच्या ताब्यात होते. रोहटासचा प्रसिद्ध किल्ला जिंकून घेण्यासाठी अकबराने फरहातखानला पाठविले होते आणि त्याच्या मदतीला माजी मुख्य वजीर मुझफ्फरखान याची नेमणूक केली होती. मुझफ्फरखानने प्रथम चोंड आणि साहसराम हे दोन परगणे आपल्या ताब्यात घेतले. नंतर रोहटासचा किल्लेदार हैबतखानचा मुलगा बहाद्दूर याचा पराभव करून रोहटासच्या किल्ल्याच्या वेढ्यात फरहातखानला मदत करण्यासाठी तो निघाला. हा वेढा अनेक दिवस चालण्याची शक्यता असल्यामुळे मुझफ्फरखान बादशाही हुकूमाप्रमाणे किल्ल्याचा वेढा उठवून बिहारमधील बंडखोर अफगाणांचे पारिपत्य करण्याच्या कामास लागला. आदमखान बटानी व दरियाखान काशी यांना झारखंडला हाकून देऊन त्याने इब्राहिमपूर व चारगाव ताब्यात घेतले. अधिक कुमक येईपर्यंत थांबण्याचा मुनीम खानचा आदेश न जुमानता तो आदमखान बटानीच्या अफगाण फौजेवर चालून गेला आणि दोन घनघोर युद्धांत त्याचा पराभव करून बिहारमध्ये त्याने शांतता प्रस्थापित केली. त्याच्या कामावर खूष होऊन अकबराने हाजीपूर जिल्हा त्याच्याकडे लावून दिला. मुझफ्फर खानने तो जिल्हा ताब्यात घेतल्यानंतर थोड्याच दिवसांनी दाऊदचा चुलत भाऊ हा बिहारवर स्वारी करण्याच्या तयारीत आहे अशी बातमी आली. राजा तोडरमलने जुनैदचा मिदनापूरनजीक पराभव केला होता पण त्या पराभवातून डोके वर काढून तो बिहारवर चाल करून गेला. याचवेळी ताजखान नावाच्या दुसऱ्या अफगाण सरदाराने बिहारवर स्वारी केली. या घडामोडी पाहून मुझफ्फरखान या प्रांतातील इतर बादशाही अधिका यांना जाऊन मिळाला आणि पुनपुन नदी ओलांडून या नव्या संकटाला तोंड देण्यास तयार झाला. याच्या गैरहजेरीत ताजखान पनवार त्याने हाजीपूरवर हल्ला करून मुझफ्फरखानच्या दुय्यम अधिकाऱ्याला ठार केले यामुळे मुझफ्फर खानला परत यावे लागले मोठ्या धोक्याचे धाडस करून आणि मोठ्या संकटाची लढाई देऊन त्याने अफगाण सैन्याला तेथून पिटाळून लावले आणि हाजीपूरवर परत हल्ला केला. दुर्दैवाने यावेळी मुघल सन्यात आपापसात भांडणामुळे बेदिली माजली होती. मुनीम खान आणि मुझफ्फरखान यांचे संबंध बिघडले होते त्यामुळे मुनीमखानला लढाईतल्या यशाचे सर्व श्रेय स्वतःला घ्यायचे होते आणि मुझफ्फरखान हाजीपूरमध्ये अतिशय बिकट परिस्थितीत लढाईला तोंड देत असता पाटण्यातील अधिकाऱ्यांनी मूर्खपणाने केवळ बघ्याची भूमिका घेतली होती. अफगाण पराभव पत्करायला तयार नव्हते. ते पुनः पुनः बिहारवर

हल्ले चढवित होते. अशा एका हल्ल्यात मुझफ्फरखान मारला गेला अशी अफवा उठली होती. पण खरोखरीच आपल्यापेक्षा संख्येने फार मोठ्या असलेल्या शत्रूवर विजय मिळवून मुझफ्फरखानने जुनदचा पाठलाग करून त्याला बिहारमधून हाकून दिले. याच्या एका मागून एक विजयांचा हेवा वाटून मुझीम खानने त्याला दरबारात परत जाण्याचा हुकूम दिला, पण आत मुझफ्फरखानच्या बिहारमधील कार्याबर बादशहा फार संतुष्ट झाला होता आणि त्याने मुझफ्फरखानला बिहारचा सुभेदार नेमले.

## राजस्त्रियांची मक्केची यात्रा :

बाबरची मुलगी, अकबराची आत्या आणि हुमायुननामाची भावी लेखिका गुलबदन बेगम हिची, मक्का आणि हेज्जादमधील इतर पवित्र स्थळांच्या यात्रा करण्याचे परमधार्मिक कर्तव्य पार पाडण्याची तीव्र इच्छा होती. ऑक्टोबर १५७५ मध्ये तिला यात्रेला जाण्याची परवानगी मिळाली. गुजराथ हा आता साम्राज्याचा एक भाग झाला असून तेथे शांतता होती. अरबी समुद्रावर सत्ता गाजवणारे पोर्तुगीज आणि अकबर यांमधील संबंध सलोख्याचे होते आणि त्यामुळे खुष्की आणि जलमार्ग या दोन्हींवर कसलाच धोका नव्हता. शिवाय अबुल फझल म्हणतो त्याप्रमाणे प्रत्येकाला आपापल्या धर्माचे पालन करून आपापल्या रीतीने देवाची पूजा करण्याला उत्तेजन देण्याचे अकबराचे धोरण होते. म्हणून अकबराने गुलबदन बेगमच्या प्रवासाची सर्व तयारी केली, इतकेच नव्हे, तर त्याकरिता लागणाऱ्या खर्चाची पुरेशी तजवीजही करून दिली. राजपुत्र मुरादची आई सलीमा सुलतान बेगम, कामरानची विधवा स्त्री आणि दोन मुली आणि जनानखान्यातील इतर काही स्त्रिया याही गुलबदन बेगमबरोबर निघाल्या त्यांच्याही खर्चाची अकबराने सढळ हाताने तरतूद केली. राजपुत्र मुराद गुजराथपर्यंत या स्त्रियांना घेऊन जाणार होता; पण तो लहान असल्याने गुलबदन बेगमच्या विनंतीवरून ते काम बाकी खान (बहुधा कुप्रसिद्ध अधमखानचा हा थोरला भाऊ असावा) आणि इतर काही अधिकाऱ्यांवर सोपवण्यात आले. या संधीचा फायदा घेऊन इतर पुष्कळ लोक या यात्रेत सामील झाले आणि १५७५ साली ऑक्टोबरच्या दुसऱ्या आठवड्यात ही मंडळी फत्तेपूर सिक्रीहून निघाली. वाटेत राजघराण्यातील या यात्रेकरूंचे त्यांना साजेसे स्वागत झाले पाहिजे आणि त्यांना शक्य त्या सर्व सुखसोयी पुरवल्या पाहिजेत असे हुकूम देण्यात आले. दरबारशी स्नेहाचे संबंध असूनसुद्धा यात्रेकरूंना सुरक्षिततेच्या हमीचा प्रवास-परवाना पोर्तुगीजांनी न दिल्यामुळे त्यांना सुरतेला जवळ जवळ एक वर्षभर अडकून पडावे लागले. जरूर तो प्रवास परवाना मिळाल्यानंतर यात्रेकरू मंडळी मार्गस्थ झाली. यात्रा पुरी करून परत येताना बोट फुटल्यामुळे या मंडळींना एडनला सुमारे एक वर्ष थांबावे लागले. ही मंडळी

१५८२ मध्ये हिंदुस्थानात परत आली.

## अकबर दरसाल हाजींचा काफिला पाठवितो

१५७५ पासून दरवर्षी हाज यात्रेकरूंचा एक काफिला अरबस्तानात पाठवण्यास अकबराने सुरुवात केली. इजिप्त, सिरिया आणि इतर मुसलमानी देशांतून असेच काफले दरवर्षी निघत असत. हिंदुस्थानातून जाणाऱ्या सर्व काफल्यांचा खर्च सरकारातून होत असे. दरवर्षी कोणातरी उच्च दर्जाच्या अधिकाऱ्याची काफल्यावर नेमणूक होत असे आणि प्रवासाची सर्व व्यवस्था करण्याचे काम त्याच्याकडे असे. त्याला मीर हाज किंवा मीर हाजी हा किताब देण्यात येत असे. निझामुद्दीन अहमद हा इतिहासकार म्हणतो की, ही प्रथा हिंदुस्थानात अभिनव होती. कारण अकबरापूर्वीच्या कुठल्याही राजाने असे यात्रेकरू सरकारी खर्चाने हेदजाजला पाठवले नव्हते. पाच सहा वर्षा-नंतर ही प्रथा बंद पडली.

१५७६ मध्ये अजमेरला असताना २९ सप्टेंबर रोजी सुलतान ख्वाजा याला मीर हाजी नेमून त्याला बरोबर ६ लाख रुपये आणि इतर देणग्या देऊन अकबराने मक्केला पाठवले. २९ सप्टेंबरला मुइनुद्दिन चिस्तीचा उरूस असल्यामुळे त्याच दिवशी यात्रेला सुरूवात झाली. यात्रेकरूचा पोषाख घालून (इहरम) ख्वाजाबरोबर उघडया डोक्याने आणि अनवाणी पायानी चालत जाऊन स्वत: बादशहाने लाक्षणिक अर्थाने यात्रा पुरी केली. स्वत: मक्केला जाण्यास तो उत्सुक होता, पण राजकीय कारणांमुळे त्याला आपला बेत रद्द करण्याचा सल्ला देण्यात आला, असे सांगण्यात येते. ज्या कुणाला यात्रेत सामील व्हायचे असेल त्याचा खर्च सरकार देईल असे त्याने जाहीर केले. पुष्कळ मंडळींनी या सवलतीचा फायदा घेतला. २० डिसेंबर १५७८ रोजी ख्वाजा फत्तेपूर सिक्रीला परत आला. घोडे, पैसा आणि इतर बक्षिसे देऊन त्याचा आणि इतर हाजींचा सन्मान करण्यात आला. १५७७ साली यात्रेकरूंचा आणखी एक तांडा शहा अबू तुरबच्या देखरेखीखाली मक्केला गेला. त्यांच्याबरोबर पूर्वीप्रमाणेच हेदजाझला दानधर्मासाठी मोठी रक्कम पाठवण्यात आली.

## दरबारी कामांची विभागणी

याच वर्षी दरबारी सेवेत रुजू असणाऱ्या अधिकाऱ्यांचे आणि सेवकांचे सात गट पाडून प्रत्येकाकडे दर आठवडयास २४ तासांचे (एक रात्र आणि एक दिवस) काम देण्यात आले. प्रत्येक गटावर एक अधिकारी आणि एक मीर अर्झी असे. रयतेकडून किंवा सरकारी नोकराकडून आलेले अर्ज स्वीकारण्याचे काम मीर अर्झी-कडे असे. प्रत्येकाच्या कामाची नोंदवही तयार करण्यात आली. या पुनर्रचनेमुळे

दरबारातील कामाला शिस्त लागून कामातील अनिश्चितता आणि द्विरूक्ती नाहीशी झाली.

## राज्यकारभारातील सुधारणांना विरोध. अझीझ कोकाची कैद.

नुकत्याच जाहीर झालेल्या सुधारणा, विशेषतः ठराविक सैन्य बाळगणे आणि घोडयांना डाग देणे या सुधारणा अंमलात आणणे मोठे कठीण काम होते. पुष्कळ नामवंत सरदार आणि अधिकारी जाणूनबुजून या सुधारणा अंमलात आणीत नसत. जनावरांना डाग देण्याबद्दलचा हुकम अंमलात न आणल्याबद्दल मुख्य मंत्री मुझफ्फर खान याला बडतर्फ करण्यात आले. मुझफ्फर खान नंतर सरदार खान-इ-आझम मिर्झा अझीझ कोका हा दुसरा या सुधारणांचा प्रभावी विरोधक होता. पण कोणीही आपल्या आज्ञेचा भंग करणे किंवा आपल्या सुधारणा बाजूला सारलेल्या पाहाणे अशा गोष्टी अकबर सहन करायला तयार नव्हता. अझीझ कोकाला अवज्ञे–बद्दल प्रायश्चित्त देण्याची संधी बादशहाला लवकरच मिळाली. बदकशानच्या मिर्झा सुलेमानच्या स्वागतासाठी ऑक्टोबर १५७५ मधे मिर्झा कोकाला गुजरातमधून खास बोलावून घेण्यात आले. नेमून दिलेल्या संख्येप्रमाणे घोडदळ त्याने ठेवले नव्हते. त्याची नोंदवही नव्हती आणि घोडे डागलेले पण नव्हते. ९ ऑक्टोबरला मिर्झा कोका फत्तेपूर सिक्रीत दाखल झाला. त्याने सुधारणांना विरोध केला इतकेच नव्हे तर तो त्यांवर अनुचित टीका करीत असे. म्हणून १५७६ साली मार्च महिन्याच्या पहिल्या आठवडयात अकबराने त्याला कैद केले. त्याचा अमीर हा किताब काढून घेतला आणि आग्ऱ्याला त्याच्याच घरी शेख इब्राहिमच्या देखरेखीखाली त्याला नजरकैदेत ठेवले.

बैरामखानचा मुलगा मिर्झा अबदुर रहीम याला खान-इ-अझमच्या जागी गुजरातचा सुभेदार नेमण्यात आले. तो वयाने लहान असल्याने त्याच्या मदतीसाठी वझीरखानला त्याचा नायब सुभेदार नेमण्यात आले. त्या प्रांतावर बीपकदासला दिवाण, मीर मुझफ्फरला बक्षी आणि मीर अलाउद्दीनला अमीन नेमण्यात आले.

राज्याच्या एका सर्वोच्च अधिकाऱ्याला बडतर्फ आणि कैद करून त्यची अमीरकी काढून घेऊन शासन करणे हे चांगल्या राज्यकारभाराच्या आणि शिस्तीच्य दृष्टीने आवश्यक होते. अझीझ हा अकबराचा दूधभाऊ असून अकबराचे त्यावर फार प्रेम होते. ‘ अझीझ आणि मी या दोघांमधे एक दुधाची नदी वाहात असून ती ओलांडणे मला शक्य नाही ’ असे अकबर नेहमी म्हणत असे. अशा बाबतीत नरमाई दाखविली असती, तर इतर सरदारांना वाईट उदाहरण घालून दिल्यासारखे झाले असते. बादशहाच्या खंबीरपणामुळे डाग देण्याचे नियम तो अंमलात आणू शकला. १५७८ मधे अझीझ कोकाची सुटका झाली खरी, पण त्याने माफी मागून डाग देण्याचे नियम पाळण्याचे

कबूल केल्यानंतरच. सेनाधिकारी म्हणून नोकरीच्या नव्या शर्ती मान्य न करणाऱ्या सैन्यातल्या इतर अधिकाऱ्यांना त्यांचा दर्जा कमी करून बंगालमध्ये पाठवून देण्यात आले. ते शुजातखान, मिर्झा अबदुल लेह मीर मिर्झा-उल-मुल्क, कासीम खान कोमार, दोस्त महंमद बाबा आणि मुहम्मद अमीन हे होते. त्यांना बोटीत घालून त्यांची बंगालला तेथल्या सैन्यात नोकरीसाठी रवानगी करण्यात आली.

## बदकशानच्या सुलेमानचे आगमन

सुलेमान हा वयोवृद्ध, महत्त्वाकांक्षी आणि कावेबाज राजकारणी पुरुष असून बाबरच्या वेळेपासून बदकशानवर त्याचे राज्य होते. त्याचा नातू शहारुख मिर्झा याने त्याची गादी बळकावल्यावर, तो आपला जावई मिर्झा हकीम याच्या दरबारात काबूलला आश्रयार्थ राहिला होता. या आधाशी म्हाताऱ्या सुलेमानकडून मिर्झा हकीमने दीर्घकाळ त्रास सहन केला होता. म्हणून त्याने शरीररक्षकांची एक तुकडी बरोबर देऊन त्याला हिंदुस्थानात जाण्याचा सल्ला दिला. पण वाटेत त्याचे शरीर-रक्षक निर्दयपणे त्याला सोडून गेले आणि आपली मुलगी आणि काही विश्वासू मंडळी ह्यांच्यावरोबर सुलेमान मोठ्या कष्टाने सिंधू नदीपर्यंत येऊन पोहोचला. वाटेत पठाणांच्या विरोधाला त्याला तोंड द्यावे लागले आणि त्यांच्याशी झालेल्या एका चकमकीत तो जखमी झाला. सुलेमानने अकबराकडे मदतीची याचना केली. त्याचे स्वागत करून राजधानीपर्यंतच्या त्याच्या प्रवासात शक्य तितक्या सौजन्याने आणि अतिथ्याने त्याला वागवावे असे आदेश अकबराने आपल्या पंजाबातल्या अधिकाऱ्यांना दिले. मथुरेच्या मार्गाने सुलेमान मिर्झा फत्तेपूर सिक्रीला येऊन पोहोचला आणि तेथे १८ आक्टोबर १५७५ रोजी त्याचे भव्य स्वागत करण्यात आले. फत्तेपूर सिक्रीपासून पाच मैलांपर्यंत रस्त्याच्या दोन्ही बाजूंना सोन्या-चांदीच्या साखळ्या आणि उंची साज यांनी मढविलेले ५००० शाही हत्ती, तसेच ढंगदार खोगिरांनी आणि अलंकारांनी सजवलेले अरबी आणि इराणी घोडे यांच्या रांगा लावल्या होत्या. दर दोन हत्तींच्या मध्ये सोनेरी पट्टा आणि मखमली साज घातलेला एकेक चित्ता असलेली एक गाडी, शिवाय नक्षीकामाचे मोठे झूल आणि अलंकार घातलेल्या दोन बैलांची एक सुशोभित गाडी होती. प्रथम काही ठळक सरदार मिर्झाला सामोरे गेले आणि त्यानंतर अकबर आपल्या प्रमुख अधिकाऱ्यांना बरोबर घेऊन येणाऱ्या पाहुण्यांचे स्वागत करण्यासाठी राजधानीपासून मिरवणुकीने घोड्यावरून ५ मैल पुढे गेला. अकबराला पाहताच मिर्झा आदबीने आपल्या घोड्यावरून उतरला आणि धावत धावत अकबराजवळ आला. मिर्झा वयाने फार मोठा असल्यामुळे अकबराला त्याला योग्य तो मान द्यावयाचा होता, म्हणून घोड्यावरून उतरून त्याने मिर्झाला आलिंगन दिले: आणि नंतर दोघेही घोड्यावर स्वार होऊन निघाले. अकबराने मोठ्या अगत्याने त्याच्या प्रकृतीची आणि

स्वास्थ्याची चौकशी केली. उत्तम तऱ्हेने शृंगारलेल्या फत्तेपूर सिक्रीतल्या दरबार महालात त्याच्या सन्मानार्थ भव्य स्वागत-समारंभ आयोजित करण्यात आला होता. अकबराने मिर्झाला मसनदीवर आपल्या शेजारी बसवून घेऊन आपल्या मुलांची व त्याची ओळख करून दिली. नगारखान्याच्या सज्ज्याजवळ हाथीपोळ येथे त्याची राहण्याची सोय केली होती. फत्तेपूर सिक्रीला मिर्झाचा मुक्काम जवळ जवळ ५ महिने होता. बदकशान परत जिंकून घेण्यासाठी मिर्झाला आर्थिक आणि लष्करी सहाय्य देण्याच्या बेतात अकबर होता आणि पंजाबचा सुभेदार खान-इ-जहन याची या मोहिमेकरिता नेमणूक करण्यात आली होती. पण इतक्यात बंगालचा सुभेदार मुनीम-खान मरण पावल्यामुळे अनेक प्रश्न निर्माण झाले आणि त्यामुळे अकबराने बहुधा आपला बेत बदलला असावा. मार्च १५७६च्या अखेरीस सुलेमानला मक्केच्या यात्रेवर जाण्याची परवानगी देण्यात आली. त्याच्या प्रवासखर्चाची आणि इतर सर्व व्यवस्था अकबराने केली. मक्केहून परत आल्यावर सुलेमान बदकशानला परत गेला आणि आपल्या नातवाकडून त्याने आपले राज्य पुन: जिंकून घेतले.

## मश्रीफन–इ–दिवाण म्हणून तोडरमलची नेमणूक

दाऊदविरुद्धच्या मोहिमेत संस्मरणीय अशी लष्करी आणि मुत्सद्देगिरीची कामगिरी करून राजा तोडरमल ऑक्टोबर १५७५ मध्ये दरबारात परत आला. येथे त्याचे मोठे आदराने स्वागत झाले. बंगालहून आणलेले निवडक ५४ हत्ती आणि इतर भेटी तोडरमलने बादशहाला नजर केल्या. मश्रीफन-इ-दिवाण हे उच्च पद देऊन त्याच्या कामगिरीला योग्य ती मान्यता देण्यात आली. धैर्य, शौर्य, सचोटी, स्वामीनिष्ठा आणि निर्लोभी वृत्ति याबद्दल अबुल फझलने तोडरमलची प्रशंसा केली आहे. पण त्याच्या मनावर धर्माचा अधिक पगडा होता आणि तो सूडबुद्धीचा होता असे मत व्यक्त करून या बादशहाच्या चरित्रकाराने राजावर अन्याय केला आहे. तरीसुद्धा अबुल फझल लिहितो, “ अप्रतीम धैर्य, निर्लोभी स्वभाव, कामातली तत्परता आणि उद्योगी वृत्ती या गुणांमध्ये तोडरमलसारखा माणूस सापडणे विरळा: किंबहुना तो अतुलनीयच होता. ” अकबराच्या सेवेतील माणसांत बहुधा तो सर्वोत्तम आणि सर्वांत कतृत्ववान अधिकारी होता.

## मुनीमखानचा मृत्यू : बंगाल आणि बिहार हातातून जातात.

दाऊदबरोबर मित्रत्वाची बोलणी करून त्याच्याबरोबर केलेल्या तहावर सही करण्यात मुनीमखान गुंतला असतानाच जलालउद्दिन सूरचे मुलगे आणि त्यांच्या हाताखालील काही अफगाण सरदार यांनी घोराघाट आणि त्याच्या आजूबाजूचा

काही मुलूख मोंगलांकडून जिंकून घेण्याचा घाट घातला. घोराघाटच्या राजाबरोबर संगनमत करून त्यांनी मजनूनखानचा पराभव केला आणि गौर आणि टंडापर्यंतचा प्रांत उध्वस्त करून गौरचा किल्ला पण जिंकून घेतला. पण मुइनुद्दिन अहमदखान आणि इतर अधिकाऱ्यांनी हल्लेखोरांविरुद्ध टंडा शहराचे यशस्वीरित्या संरक्षण केले. मुनीमखान परत येताच गौरजवळच्या जंगलात अफगाणी फौज पसार झाली. २१ मे रोजी मुनीमखान टंड्याला येऊन पोहोचला. तेथे काही दिवस राहून मुनीमखानने आपली राजधानी नदीच्या पैलतीरावर गौर येथे हलवली. गौर ही बंगालची जुनी राजधानी असून तेथे मजबूत किल्ला आणि कित्येक चांगल्या इमारती होत्या; पण गौर ही रोगट जागा होती आणि पावसाळ्यात तेथील हवा इतकी खराब झाली की, मुघलांचे खूपच नुकसान झाले. आजाराची साथ सुरू होऊन तीत इतर शिपायांबरोबर आश्रफखान, हाजीखान सेड्स्तानी, मुनीमउद्दीन खान यांच्यासारखे कसलेले अधिकारी बळी पडले. यात भर म्हणून याचवेळी दाऊदचा चुलतभाऊ जुनैद याने बिहारवर स्वारी केली आणि तिथल्या अफगाणांनी मुघलांना बिहारमधून हाकून देण्याचा निकराचा प्रयत्न केला. बिहारमधले बंड मोडून काढण्यासाठी मुनीमखान गौरहून निघाला, पण वाटेत टंड्याला पोहोचताच आजारी पडून २३ ऑक्टोबर १५७५ रोजी मरण पावला. यावेळी त्याचे वय ८० वर्षांचे होते.

मुनीमखान हा लौकिक आणि वजन याबाबतीत अकबराच्या प्रारंभीच्या कारकीर्दीत बैरामखानच्या खालोखाल सर्वात महत्वाचा सरदार होता. बैरामखान प्रमाणेच खान-इ-खानान हा किताब त्याला मिळाला होता. पण सैनिक किंवा सेनापती किंवा कारभारी म्हणून सुद्धा त्याचे कतृत्व नजरेत भरणारे नव्हते. तो अशक्त आणि धरसोड वृत्तीचा असून म्हातारपणी सुस्त आणि दुबळा बनला होता. नाव घेण्यासारखे त्याचे एक काम म्हणजे जौनपूरला गोमती नदीवर त्याने बांधलेला पूल होय.

मुनीमखानच्या मृत्यूमुळे बंगालमधल्या मुघल सैन्यात एकच गोंधळ माजला. तेथल्या अधिकाऱ्यांनी आपली एक सभा घेऊन त्यात अत्यंत साधारण बुद्धीच्या शहीमखान जलैर याला सैन्याचे अधिपत्य स्वीकारण्यास सांगितले. शहीमखान हा लायक तर नव्हताच, पण शिपायांतही तो लोकप्रिय नव्हता. मुघल सैन्यातल्या या गोंधळाचा फायदा घेऊन दाऊदने तहाच्या अटी मोडल्या आणि आपले गेलेले राज्य परत मिळविण्याच्या उद्योगास तो लागला. भद्रक काबीज करून त्याने नजरबहादूरला ठार
विण्याच्या उद्योगास तो लागला. भद्रक काबीज करून त्याने नजरबहादूरला ठार
मारले. जेलासोर (जलेश्वर) खाली करून मुरादखान टंड्याला पळून गेला. त्याचा कित्ता गिरवून इतर अधिकारी बंगाल सोडून बिहारला पळून गेले. अशा तऱ्हेने सर्व बंगाल मुघलांच्या हातातून गेले.

## खान-इ-जहानची बंगालला रवानगी

या घोर आपत्तीची खबर मिळताच अकबराने १५ नोव्हेंबर रोजी बंगाल परत जिंकून घेण्याच्या कामावर पंजाबचा सुभेदार खान-इ-जहान (हुसेन कुलीखान) याची नेमणूक केली आणि राजा तोडरमलला त्याच्याबरोबर जाण्याचा आदेश दिला. पंजाबच्या सुभेदाराची खाली झालेली जागा शहा कुलीखान महरम यास देण्यात आली. डिसेंबर १५७५ मध्ये खान-इ-जहान आणि तोडरमल बंगालला जाण्यास निघाले. वाटेत बंगालहून परत फिरणाऱ्या मुघल सैन्याची व त्यांची गाठ पडली. त्यांची मोठ्या मिनतवारीने समजूत घालून त्यांना बंगालकडे परत फिरण्यास या दोघांनी तयार केले. त्यांपैकी बहुतेक वंशाने मध्य आशियाइ तुर्क आणि धर्माने सुन्नी असल्यामुळे शिया पंथी आणि इराणी वंशाच्या खान-इ-जहानचे नेतृत्व स्वीकारण्यास ते तयार नव्हते. शिवाय बंगालमधल्या वाईट हवेला आणि सतत चाललेल्या युद्धाला ते कंटाळले होते. पण तोडरमलचे चातुर्य आणि खान-इ-जहानची उदारमनस्कता यामुळे त्यांचे प्रामाणिक सहकार्य मिळू शकले. याचा परिणाम म्हणजे मुघलांनी लवकरच तेलिया-गढी जिंकून घेतली (मार्च २६). तिथून टंड्यावर चालून जाऊन त्यांनी दाऊदला बचावाचे धोरण स्वीकारण्यास भाग पाडले. एका बाजूला नदी, दुसऱ्या बाजूस डोंगर आणि समोरच्या बाजूस दलदलीचा प्रदेश असलेली अक महाल (राजमहाल) जवळची एक मोक्याची जागा पाहून खान-इ-जहानने तेथे आपला तळ दिला. तिथून जवळच चर खोदलेली दाऊदची छावणी होती आणि दोन्ही सैन्यांत रोज चकमकी होत असत. अशा एका चकमकीत ख्वाजा अबदुल्ला नक्षबंदी मारला गेला. अकबराने बिहारमधील मुझफ्फर खान आणि इतर अधिकाऱ्यांना खान-इ-जहानच्या मदतीसाठी पाठवून दिले आणि त्याचवेळी शहाबाझ खानला शहाबाद जिल्ह्यात जगदीशपूरच्या गज–पतीच्या बंडाचा विमोड करण्यासाठी बिहारला पाठवले. * पुढे १८५७ सालच्या बंडात प्रसिद्धी पावलेला कुनवर सिंग याचा गजपती हा पूर्वज. त्याने बंड उभारून बिहारमधला पुष्कळ मुलूख आपल्या अंमलाखाली आणला होता. बंगालमधल्या सैन्यासाठी अकबराने जरूर ती साधनसामुग्री आणि पैसे पाठवून दिले. मुझफ्फर खान भागलपूरपर्यंत जाऊन पोहोचला आणि तेथून पावसाळ्यात मोहीम स्थगित

* टीप—गजपतीने जवळ जवळ वर्षभर मुघलांशी झुंज दिली. दाऊदशी संगनमत करून मुघलांना बंगालमध्ये प्रवेश मिळण्यास अडथळा केला. आऱ्याच्या किल्ल्याला वेढा देऊन तो त्याने काबीज केला आणि पराभूत होण्यापूर्वी अनेक महिने मुघलां-विरुद्ध गनिमी युद्ध चालू ठेवले. अखेर तो रोहटासच्या जंगलात पळून गेला. मुघलांच्या हातात तो सापडला नाही. (तेने अकबरी भाग ३ पाने १६९–१८६).

करावी असा आग्रह त्याने धरला. खान-इ-जहानला ही सूचना पसंत नव्हती. मुझफ्फर खान खान-इ-जहानला मिळण्यासाठी राजमहालाकडे निघाला. मुहीब अल्ली-खान आणि अकबराने पाठवलेले इतर साझावाल देखील ताबडतोब युद्धाला सुरुवात करण्याच्या विचाराचे होते. त्यांनी मुझफ्फर खानचे मन वळवले. १० जुलै रोजी बिहारमधली फौज खान-इ-जहानला येऊन मिळाली आणि १२ तारखेस राजमहालच्या लढाईला तोंड लागले. *

## राजमहालची लढाई

यावेळी पावसाळा होता आणि राजमहाल भोवतालच्या सर्व प्रांताला एखाद्या तळ्याचे स्वरूप आले होते. त्याची पर्वा न करता खान-इ-जहानने लढाई करण्याचे ठरवले. त्याच्या आघाडीचा नायक शहमखान होता आणि 'इलतिमिश' इस्माईल कुलीखानच्या हाताखाली होती. उजव्या बगलेवर मुझफ्फर खान, डाव्या बगलेवर तोडरमल आणि खान-इ-जहान स्वत: मध्यभागी अशी मुघल सैन्याची आखणी होती. शत्रु सैन्याची रचना नेहमीच्या पद्धतीने करण्यात आली होती. स्वत: मध्यभागी राहून दाऊदने उजव्या बगलेवर काळा पहाड आणि डाव्या बाजूस जुनैदला ठेवले. खान-इ-जहान हा किताब धारण करणाऱ्या इस्माइलला आघाडीवर ठेवले. पाण्यातून पुढे जाऊन आणि एक खोल ओढा ओलांडून मुघल सैन्य अफगाणांना येऊन भिडले. बादशहाच्या डाव्या बगलेने काळा पहाडवर हल्ला चढवला पण तो ठामपणे लढत होता. मुघल सैन्य त्रिथरण्याची लक्षणे दिसू लागताच तोडरमल स्वत: पुढे आला आणि आपल्या सैन्यास धीर देऊन त्याने शत्रूवर जोराचा हल्ला चढवला. काळा पहाड जबर जखमी होऊन युद्धातून पळून गेला. पाणी आणि चिखल यामुळे त्याचा पाठलाग करणे अशक्य होते. अफगाणांच्या डाव्या बगलेवर फारशी लढाई झाली नाही कारण तिथला अफगाण सेनानी जुनैद हा सकाळीच तोफेचा गोळा लागून जबर जखमी झाला. मुघलांच्या आघाडीचे ठीक चालले नव्हते. पण राखीव फौज मदतीला आल्याने आघाडी संघटित होऊन धाडसी हल्ला करून दोघांनी मिळून शत्रूला पिटाळून लावले. अफगाण खान-इ-जहान हा या चकमकीत ठार झाला. दोन्ही बाजूंच्या मध्यवर्ती फौजा एकमेकाला भिडण्यापूर्वीच मुघलांनी लढाई जिंकली. दाऊदचा घोडा दलदलीत रुतला. तो दुसऱ्या घोड्यावर चढला, पण त्याला पकडून ठार केले. त्याचे मुंडके फत्तेपूर सिक्रीला पाठवून देण्यात आले आणि त्याचे धड बंगालची राजधानी टंडा येथे एका वधस्तंभावर टांगण्यात आले. खान-इ-जहान आणि राजा तोडरमल यांच्या प्रचंड परिश्रमा-

---

* अबुल फझलची ऐने अकबरी मुझफ्फरखानची पक्षपाती आहे.

मुळे बंडाळीचे केंद्र बनलेला (बुलधाक खाना) बंगाल अखेरीस कायमचा मुघलांच्या ताब्यात आला. परकी राजघराणी आणि थोडेसे मुसलमान यांनी आपल्या शेकडो वर्षांच्या गैरकारभाराने लोकांना दारिद्र्यात आणि अज्ञानात ठेवले होते. म्हणून कराणींच्या निर्गमनाने जनतेने सुटकेचा निश्वास सोडला.

बंगालच्या मोहिमेवर जातीने देखरेख करण्यासाठी अकबर २२ जुलै रोजी फत्तेपूर सिक्रीहून निघून तो आग्रा जिल्ह्यातील बिरार गावापर्यंत पोहोचला होता. तेथे राजमहालच्या मोठ्या विजयाची खुषखबर देणारे खान-इ-जहानचे पत्र त्याला मिळाले. ही बातमी आणि दाऊदचे मुंडके घेऊन सय्यद अबदुल्ला खान अकरा दिवसांच्या दीर्घ प्रवासानंतर बिहारला पोचला. बादशहा नंतर मोठ्या आनंदाने राजधानीला परत फिरला.

## शेरगड आणि रोहटासगडचा कब्जा

पाटण्याची मोहीम संपल्यावर अकबराने फरहात खानला रोहटासचा अभेद्य किल्ला जिंकून घेण्यासाठी पाठवून दिले, याचा उल्लेख यापूर्वी आलाच आहे. पण दाऊदचा पराभव करून बिहार परत जिंकून घेण्याच्या खटपटीमुळे हे काम दोन वर्षे लांबले. बंगालचा अखेरचा पाडाव झाल्यावर अकबराचे लक्ष पुन्हा रोहटासकडे वळले. मुनीम खानच्या मृत्यूनंतर झालेल्या गोंधळात हा किल्ला जुनैदच्या हातात पडला आणि तिथला किल्लेदार म्हणून जुनैदने आपला विश्वासू दुय्यम अधिकारी सय्यद महमूद याची नेमणूक केली. आता सर्व बिहार मुघलांच्या अंमलाखाली आला होता आणि प्रांतात सर्वत्र सुव्यवस्था होती. अशा परिस्थितीत योग्य मदतीच्या अभावी रोहटास किल्ला ताब्यात ठेवणे अशक्य आहे असे सय्यद महमूदला वाटू लागले आणि किल्ला मुघलांच्या स्वाधीन करून अकबराच्या नोकरीत शिरण्याचा तो विचार करू लागला. यावेळी मुझफ्फरखान आणि शहाबाझखान हे अकबराचे दोन सेनापती बिहारमध्ये होते. 'रोहटाससारखा सुप्रसिद्ध किल्ला अकबरासाठी जिंकून घेण्याचे काम मीच केले असे दाखवून देण्यास दोघेही उत्सुक होते. मुझफ्फरखानने आपला दुय्यम अधिकारी मासूमखान काबुली याला रोहटास काबीज करण्यास पाठवून दिले. वाटेत त्याची आणि हुसेन खान अफगाण याची लढाई होऊन त्यात हुसेन खान ठार झाला. हुसेन खानचे त्या भागात वर्चस्व होते. त्यानंतर मासूम खान काळा पहाडचा पाडाव करण्यास निघाला. (२४ आक्टोबर १५७६). दाऊदच्या मृत्यूनंतर बिहारला पळून जाऊन रोहटासच्या आसपास आपली सत्ता प्रस्थापित करण्याच्या प्रयत्नात काळा पहाड होता. मासूमच्या विजयाच्या पाठोपाठ मुझफ्फरखान स्वतःच रोहटा-सकडे निघाला. पण त्यापूर्वीच शहाबाझ खान तेथे पोहोचला होता आणि त्याने किल्ला आपल्या ताब्यात घेतला होता. अकबराने नेमलेल्या अधिकाऱ्याच्या स्वाधीन किल्ला

करावा असे किल्ल्यावरच्या सेनेने ठरवले होते आणि शहाबाझ खानच बादशहाचा मुखत्यार असल्यामुळे त्याचे किल्ल्यावर स्वागत करण्यात आले. यामुळे मुझफ्फर खानाची अर्थातच फार निराशा झाली. बादशहाच्या हुकुमाप्रमाणे किल्ल्याचा ताबा मुहिबअल्लीखानकडे सोपवून शहाबाझखान दरबारात परतला.

बिहारमधील ससारामच्या नैऋत्येस २० मैलांवर असलेला शेरगडचा बळकट किल्ला गजपतीचा मुलगा श्रीराम याने काही प्रतिकार न करता बादशहाच्या स्वाधीन केला. शेरगड हे आता ससाराम जवळचे एक मोडकळीस आलेले खेडे आहे. श्रीरामचा बाप गजपती हा जंगलात पळून गेला होता. तेथेच काही काळानंतर तो मरण पावला. हा किल्ला इतका मजबूत होता की शहाबाझखानने साबात उभारून किल्ल्याला सुरुंग लावण्याची तयारी केली होती. सुदैवाने बादशहाच्या सैन्यापुढे आपला टिकाव लागणार नाही हे ओळखून श्रीरामने किल्ला शहाबाझ खानच्या स्वाधीन केला व स्वत: बादशहाची नोकरी पत्करली. हे दोन प्रसिद्ध किल्ले ताब्यात घेऊन बादशहाने बंगाल व बिहारवरील आपल्या अधिपत्यावर शिक्कामोर्तब केले. अरबी समुद्रापासून बंगालच्या उपसागरापर्यंत मुघल साम्राज्य आता पूर्व-पश्चिम पसरले.

• • •

# प्रकरण १० वे

# अकबर विरुद्ध राणा प्रताप

## अकबराचा महान प्रतिस्पर्धी राणा प्रताप

इ. स. १५६८ मे मध्ये मेवाडचा पश्चिमेचा अर्धा भाग अकबराच्या हातून निसटला होता. तो जिंकून घेण्याच्या आकांक्षेमुळे ज्या एका प्रतिस्पर्ध्याशी त्याला कधीही न संपणारा झगडा करावा लागला, तो, प्रदेशाचा विस्तार, साधनसामग्री, माणूसबळ यांबाबतीत फार कमी दर्जाचा असला तरी धैर्य, पौरुष, खंबीर चारित्र्य, स्वदेशाभिमान, युद्धकौशल्य आणि विधायक कर्तृत्व, दृष्टीची विशालता, राजकीय सूक्ष्मदृष्टी आणि मुत्सद्देगिरी हे गुण वगळता नेतृत्वाच्या इतर सर्व गुणांत खरोखरीच अकबराच्या तोडीचा होता. अकबर आणि राणा प्रताप हे जवळजवळ एकाच वयाचे असून दोघेही असामान्य पुरुष होते. दोघेही आपापल्या परीने अद्वितीय होते. दोघेही ध्येयवादाने प्रेरित झाले होते. प्रत्येकाचा ध्येयवाद निराळा होता. ध्येय गाठण्यासाठी कोणताही त्याग करावयाला ते सिद्ध होते आणि तरीही दोघेही प्रामुख्याने कृती करणारे पुरुष होते. सगळा भारतीय उपखंड एका छत्राखाली एकत्रित करावा ही अकबराची महत्त्वाकांक्षा होती आणि ती साध्य करण्यासाठी देशातील जुन्या राजघराण्यांविरुद्ध चढाई करणे त्याला आवश्यक होते. याउलट प्रतापच्या जीवनाचा मुख्य उद्देश, पडेल ती किंमत देऊन आपल्या राज्याचे स्वातंत्र्य राखणे आणि त्या काळातील सर्वांत बलाढ्य आणि समृद्ध राजाच्या कधीही न संपणाऱ्या आक्रमणापासून आपल्या सार्वभौम स्थानाचे जतन करणे हा होता. शतकानुशतके हिंदुस्थानातील राज्यकर्त्या रजपूत घराण्यांत पहिले स्थान पटकावणाऱ्या शिसोदिया (गुलोहित) घराण्याचा प्रमुख असल्याने अकबराचे सार्वभौमत्व मान्य करून पूर्वजांच्या लौकिकाला काळिमा न फासण्याचा राण्याचा कृतनिश्चय होता. प्रताप स्वातंत्र्याचा कैवारी असून शिवाय आपल्या धर्माचासुद्धा तो रक्षणकर्ता होता असे काही आधुनिक लेखक समजतात, ते चुकीचे आहे. अकबराच्या राज्यात हिंदु धर्म किंवा हिंदु जीवनमार्ग यांना धोका नव्हता. सर्व प्रकारच्या लोकांच्या, विशेषत: आपले रजपूत मित्र आणि मांडलिक यांच्या, धार्मिक समजुती आणि नाजूक भावना यांचा अकबर आदर करीत असे. स्वतंत्रता आणि स्वातंत्र्यप्रेम यांच्या जोडीनेच आपल्या घराण्याची, किंबहुना सबंध रजपूत वंशाची प्रतिष्ठा आणि मान यांचे रक्षण करण्याला प्रताप कटिबद्ध होता. रजपूत मानसशास्त्राचे अकबराचे ज्ञान गाढ होते आणि त्याला सहाजिकच असे वाटत

होते की, बाणेदार रजपुतांचा मुख्य जो राणा प्रताप त्याने आपले सार्वभौमत्व मान्य केले की, जे थोडे रजपूत राजे त्याची सत्ता जुमानत नव्हते तेही शरण येतील. १५६८ साली चितोडचा पाडाव झाल्यावर दोन वर्षांच्या अवधीत राजस्थानातला बहुतेक भाग आपखुषीने अकबराला शरण आला होता. अकबराला न जुमानणाऱ्या रजपूत राजांमध्ये मारवाडचा चंद्रसेन आणि बुंदी, डुंगरपूर, बन्सवारा, इदार आणि सिरोहीचे राजे हे होते. शिवाय उत्तरेस हिमालयापर्यंत आणि पूर्वपश्चिम समुद्रापर्यंत पसरलेल्या विशाल साम्राज्याच्या मध्यभागी मेवाडच्या पश्चिमेकडला थोडासा प्रांत स्वतंत्र राहू देणे अकबराला मानवण्यासारखे नव्हते. त्याने अगदी प्रथम गुजराथची मोहीम आखली तेव्हापासून म्हणजे इ. स. १५७२ पासून मेवाडचा प्रश्न अकबराने आपल्या मनातून कधीही जाऊ दिला नव्हता.

## प्रतापचे पूर्वायुष्य : मेवाड प्रांतावर मुघलांचा दबाव

राणा प्रतापच्या पूर्वायुष्याबद्दल फारच थोडी माहिती आहे. तो उदयसिंगचा थोरला मुलगा असून ९ मे १५४० रोजी त्याचा जन्म झाला. उदयसिंगची आवडती राणी भत्यानी हिचा मुलगा जगमल याने आपला भाऊ प्रताप याला मेवाडची वडिलोपार्जित गादी मिळण्यास विरोध केला. कारण उदयसिंगने जगमलला युवराज नेमले होते. पण मेवाडच्या सरदारांनी प्रतापच्या न्याय्य हक्काला पाठिंबा दिला. २८ फेब्रुवारी १५७२ रोजी उदयसिंग मृत्यू पावला त्या अशुभ दिवशी उदेपूरपासून ईशान्येस १६ मैलांवर असलेल्या गोगुंडा या गावी प्रतापला गादीवर बसविण्यात आले. तथापि, औपचारिक राज्याभिषेक-समारंभ काही दिवसांनंतर मेवाडची त्यावेळची राजधानी कुंभळगड येथे साजरा करण्यात आला. ३२ वर्षांचा राणा प्रताप शारीरिक आणि मानसिक दृष्ट्या ऐन उमेदीत असून आपल्या कर्तव्याची आणि जबाबदारीची व पुढे वाढून ठेवलेल्या संकटांची त्याला स्पष्ट कल्पना होती. याबद्दल जेम्स टॉड याच्या अप्रतिम शैलीत सांगावयाचे झाल्यास एका सुप्रसिद्ध राजघराण्याची कीर्ति आणि पदवी यांचा वारसदार प्रताप झाला खरा; पण त्याच्या राजधानीचा ठिकाणा नव्हता, साधनसंपत्ती काहीही नव्हती आणि त्याच्या नात्याचे आणि कुळीचे लोक पराभवामुळे निरुत्साही झालेले होते. तथापि, त्याच्या वंशाची उदात्त वृत्ती त्याच्या अंगी बाणल्यामुळे चितोड पुन: कसे मिळवावे, आपल्या घराण्याचा मान कसा राखावा आणि गेलेली सत्ता पुन: कशी प्राप्त करून घ्यावी याचा ध्यास त्याला लागला होता.*[२] १५६७ च्या सप्टेंबर महिन्यात चितोडचा किल्ला लढविण्याचे काम जयमलवर सोडून उदयसिंगने गिरवाच्या पहाडी मुलखात आश्रय घेतल्यानंतर आयुष्याची

* Annals and Antiquities of Rajasthan (Calcutta ad,) P,345

साडेचार वर्षे प्रतापने मेवाडच्या पश्चिमेकडील खडकाळ डोंगरी मुलुखात भटकण्यात घालवली. आयुष्याची घडण होण्याच्या या काळात त्यावेळी परक्यांच्या हातात असलेल्या त्याच्या पित्याच्या राजधानीपासून फार दूर अशा ठिकाणी आयुष्य कंठणे त्याला भाग पडले होते. या काळात आपल्या प्रदेशाच्या कानाकोपऱ्याची खडा न् खडा माहिती प्रतापला झाली. इतकेच नव्हे तर पुढे त्याचे साथीदार आणि पाठीराखे होणाऱ्या तेथील आदिवासी लोकांशी त्याचा निकटचा परिचय झाला असला पाहिजे. प्रौढ दशेतील प्रारंभीच्या या परिस्थितीमुळे कष्टात आयुष्य घालविण्याची सवय प्रतापला झाली असली पाहिजे आणि सामान्य जनांमध्ये घालविलेल्या हालअपेष्टांच्या आणि झगडयाच्या आयुष्यामुळे वैधर्म्याने आपल्या पूर्वजांच्या वैभवाचे स्मरण होऊन ते वैभव पुन: प्राप्त करून घेण्याची प्रेरणा त्याला झाली असली पाहिजे. मेवाडच्या पूर्व भागावर अकबराने लष्कराच्या सहाय्याने प्रस्थापित केलेली आपली सत्ता, जमिनीची पाहाणी आणि आपल्या वडिलार्जित राज्याच्या राहिलेल्या भागाची त्याने केलेली व्यवस्था, कोंडी करण्यासाठी वेढा घालण्याची त्याने केलेली यशस्वी कारवाई हे पाहून त्याचे मन चिंतेने भरून गेले असले पाहिजे. या काळात मेवाडवरची आपली पकड घट्ट करून बहुतेक सर्व राजस्थान आपल्या सार्वभौमत्वाखाली आणण्याचे आणि गुजराथ जिंकण्याची योजना पक्की करण्याचे अकबराचे प्रयत्न चालू होते. १५७२ च्या अखेरीस मेवाडच्या उत्तरेस, पूर्वेस आणि पश्चिमेस मुघलांचे राज्य पसरले होते. त्याची दक्षिणेकडची आणि अग्नेयेची सरहद्द तेवढीच मुघलांच्या प्रभाव-क्षेत्राबाहेर होती. राणा प्रतापच्या राज्याची संपूर्ण कोंडी करावयाची व अशा प्रकारे लष्करी आणि राजकीय दबाव आणून त्याला लढाईशिवाय आपले सार्वभौमत्व मान्य करावयास भाग पाडण्याचे अकबराचे ठरलेले धोरण होते.

## वाटाघाटीच्या मार्गाने मेवाडचे प्रश्न सोडविण्याचे अकबराचे प्रयत्न

फेब्रुवारी १५६८ मध्ये चितोड जिंकून घेतल्यानंतर चार वर्षेपर्यंत अकबराने मेवाडविरुद्ध कुठलीच प्रत्यक्ष लष्करी कारवाई केली नाही. पण या चार वर्षांत मेवाडची कोंडी करून तीन बाजूंनी प्रतापवर लष्करी दडपण आणण्याचा जोरदार प्रयत्न त्याने केला. मुघलांनी काबीज केलेल्या मेवाडच्या आतील भागात अकबराने मध्य आशियातील शिबंदी लष्कर स्थापन केले, राज्याच्या पूर्वेकडच्या अर्ध्या भागात जमिनीची पाहणी, जमाबंदी आणि मुघल कारभाराची नित्याची इतर वैशिष्टये चालू करण्यात आली; तसेच मुसलमान अधिकारी आणि राण्याला सोडून गेलेले जगमल सारखे रजपूत लोक यांना दिलेल्या नेमणुकी (जगमलची नेमणूक जहाझपूरवर करण्यात आली) किंवा अजमेरच्या ख्वाजा चिस्तीच्या कबरीला[3] दान देण्यात

३. जी. एन्. शर्मा, 'Mewar & the Mughal Emperors' Pages85-86

आलेल्या जमिनी, यामुळे मेवाडच्या काही भागांचे हस्तांतर झाले होते. या सर्वांचा परिणाम म्हणून मेवाड आतून चिमटचात पकडला गेला. त्याचवेळी इंदार, सिरोही, डुंगरपूर, वन्सवारा आणि बुंदी या सारख्या स्वाभाविक मित्र-राज्यांपासून मेवाडला अलग करण्याचे धोरण जोराने पुढे रेटण्यात येत होते.

इ. स. १५७२ च्या जुलैमध्ये अकबर गुजराथ जिंकण्याच्या मोहिमेवर निघाला. गुजराथ पादाक्रांत केल्याने नैर्ऋत्येच्या बाजूने मेवाड पूर्णपणे वेढला जाण्याचा संभव होता. त्याच वेळी त्याने राण्याबरोबर वाटाघाटी करण्यासाठी एक शिष्टमंडळ पाठविण्याचे ठरविले. राणा पूर्वजांच्या गादीवर बसल्याला पुरते चार महिनेही झाले नव्हते. अंबर, मारवाड (जोधपूर), बिकानेर आणि जैसलमेर येथल्या रजपूत राजाप्रमाणेच राणा प्रतापने आपल्याशी एकनिष्ठ राहावे यासाठी त्याचे मन वळविण्याकरिता अकबराने जी चार शिष्टमंडळे पाठविली आणि जी सर्व अयशस्वी ठरली त्यांपैकी हे पहिले होते. बादशहाच्या विश्वासातला आणि खास मर्जीतला सरदार जलालखान कोर्ची हा या मंडळाचा नेता होता. तो चतुर, लाघवी आणि विनोदी होता. असे शिष्टमंडळ पाठविण्याला परिस्थिती अनुकूल आहे असे अकबराला वाटले. ऑगस्ट किंवा सप्टेंबरमध्ये त्याला पाठविण्यात आले आणि २७ नोव्हेंबरला अपयश पदरात घेऊन तो अहमदाबाद येथे अकबराच्या छावणीत परत आला. [४]

बादशहाला आता असे वाटू लागले की, या नाजूक कामावर राण्याच्या नात्यातलाच आणि त्याच्या धर्माचाच वजनदार आणि उच्चपदस्थ रजपूत दूत पाठविणे अधिक उचित होईल. म्हणून १५७३ सालच्या एप्रिल महिन्यात अंबरचा राजा मानसिंग याला त्याने प्रतापच्या भेटीसाठी उदेपूरला पाठवून दिले. पण राणा प्रतापने जरी त्याचे मोठ्या स्नेहाने स्वागत केले, तरी आग्र्याला जाऊन बादशहाच्या दरबारात हजर होण्याचे त्याने नाकबूल केले, आणि निराश होऊन जूनच्या अखेरीस मानसिंगला परतावे लागले. त्यानंतर १५७३ च्या सप्टेंबर-ऑक्टोबरमध्ये मानसिंगाचा पिता राजा भगवानदास याच्या नेतृत्वाखाली पाठविलेल्या शिष्टमंडळासही हात हालवीतच परत यावे लागले. शेवटचे दौत्य तोडरमल याने केले. तो एक समर्थ सैनिक, सेनापती आणि पहिल्या दर्जाचा मुत्सद्दी आणि जमाबंदीतज्ञ तर होताच, शिवाय खाजगी जीवनात तो उत्तम हिंदू असून, राण्यावर त्याची अनुकूल छाप असेल अशी अपेक्षा होती. पण हे दौत्यसुद्धा आपला हेतू साध्य करू शकले नाही. (डिसेंबर १५७३). [५]

राणा प्रताप स्वेच्छेने काही आपली सार्वभौम सत्ता सोडणार नाही आणि सर्वंकश युद्धाशिवाय दुसऱ्या कशानेही तो हादरणार नाही, मुघल आधिपत्य मान्य करायला तयार होणार नाही, अशी अकबराची आता खात्री पटली.

## प्रतापविरुद्ध राजामानसिंगाची रवानगी

डिसेंबर १५७३ मध्ये सर्व वाटाघाटी निष्फळ ठरल्यानंतर अकबराने प्रतापविरुद्ध युद्ध करण्याचे ठरविले. पण बिहार-बंगालची मोहीम त्याने हाती घेतली होती आणि तीत मुघलांचे बरेच मोठे सैन्य मुनीमखानच्या हाताखाली जवळजवळ वर्षभर गुंतले होते आणि तेथे स्वतः जाण्याची आवश्यकता अकबराला वाटू लागली होती. शिवाय राजस्थानच्याच एका कोपऱ्यात जोधपूरचा चंद्रसेन राठोड याने उघड बंड केले होते; आणि रायसिंग, जलालखान कोर्ची आणि कुंभळगडचा भावी विजेता शाहबाझ-खान यांसारखे त्याचे उत्तम सेनापती चंद्रसेनवर पाठवावे लागले होते. १५७६ साली राठोडांचा सिवानाचा किल्ला काबीज केला आणि बंगालचा विजय दृष्टिपथात आला. तेव्हा बादशहाने पश्चिम मेवाड जिंकण्याची मोहीम आखली.

दरबारचा इतिहासकार अबुल फझल म्हणतो की, "राणा प्रतापच्या गर्वाचा नक्षा उतरविणे आवश्यक होते. त्याचा गर्व हा "त्याच्या पूर्वजांच्या वैभवाचा," "त्याच्या स्थानाचे सामर्थ्य, त्याच्या प्रदेशाचा विस्तार आणि मानाकरिता जीवाची कुर्बानी करायला तयार असणाऱ्या रजपुतांची प्रचंड संस्था"[६] यांचा तो गर्व होता. "तो करीत असलेली अवज्ञा आणि त्याची आढ्यता, तो करीत असलेली फसवणूक आणि सोंगे ही सर्व मर्यादेबाहेर गेली होती"[७] म्हणून त्याचा पाडाव करणे इष्ट होते. त्याप्रमाणे १५७६ च्या मार्च महिन्यात अजमेरला दरबार भरला असता हे काम पार पाडण्याकरिता अकबराने अंबरचा राजा मानसिंग याची नेमणूक केली. मानसिंगने साम्राज्यातील एक सर्वांत समर्थ सेनापती म्हणून नावलौकिक मिळविला होता आणि तो बादशहाच्या विश्वासातला असून त्याला 'पुत्र' ही पदवी प्राप्त झाली होती. १ एप्रिल १५७६[८] रोजी ५००० निवडक सैन्य बरोबर घेऊन मानसिंग अजमेरहून निघाला. त्याच्या मदतीला गाझीखान बक्षी, आसफखान, सय्यद अहमद, हाशीम बऱ्हा, जगन्नाथ कछवा, सय्यीद राजू, मिहतर खान, माधोसिंग, राय लुन करण, मुजाहिद बेग, खानगार इत्यादि अनेक प्रसिद्ध सरदार होते. आसफखानला सैन्याचा बक्षी नेमण्यात आले.[९]

मानसिंगने मुघलांच्या ताब्यात असलेल्या मेवाड प्रांतातील मंडळगडकडे (अजमेरच्या आग्नेयेस सुमारे ७० मैलांवर) सरळ कूच केले आणि अधिकारी आणि सैन्य त्याला येऊन मिळेपर्यंत जवळजवळ दोन महिने तेथेच त्याने मुक्काम केला. त्यानंतर तो उदेपूरच्या वायव्येस सुमारे १६ मैलांवर असलेल्या गोगुंडाच्या (प्रतापची दुसरी राजधानी आणि त्याच्या हालवालींचा तळ) दिशेने निघाला आणि (राज-समुद्र तलावाच्या उत्तरेस) माही आणि हल्लीचे नाथद्वार या रस्त्याने जाऊन बनास

नदीच्या उत्तर तीरावर मोलेला या गावी त्याने आपली छावणी केली. हे गाव गोगुंडाच्या मार्गावर खामनौर पासून अदमासे २ मैलांवर आहे.

## राण्याची संरक्षणाची व्यवस्था

बाहेरून येणारे सततचे लष्करी दडपण, आतून चिमटयात पकडण्याचे डावपेच आणि लागोपाठ आलेली चार शिष्टमंडळे यांवरून आपल्यापेक्षा वरचढ अशा प्रतिस्पर्ध्याशी युद्ध—जीवन-मरणाचे युद्ध—अटळ आहे याची जाणीव प्रतापला झाली असली पाहिजे. कारण दोन्ही पक्षांपैकी कोणीही माघार घेण्याचा संभव नव्हता परिणामत: राणाने अशा युद्धाची तयारी केली. चाल करून येणाऱ्या मुघल सैन्याला अन्न, चारा आणि निवारा ही काहीसुद्धा मिळू नयेत म्हणून आपल्या राज्यातील मैदानी मुलूख निर्दयपणे उजाड व उध्वस्त करून टाकण्याचा आदेश त्याने दिला. गिरव्यापासून कुंभळगडपर्यंत आणि त्याही पलीकडे डोंगरपट्टी आणि दऱ्याखोऱ्यातील सर्व मोक्याच्या जागा त्याने मोर्चे बांधून मजबूत केल्या आणि हळदीघाटीच्या खिंडीच्या रक्षणासाठी आपले शूर सैनिक ठेवून दिले. तेथील भिल्ल जमातीबरोबर मैत्रीचे संबंध जोडले आणि त्याने आपल्या लोकांना स्वावलंबन आणि देशाभिमान या उच्च ध्येयांनी प्रेरित केले. गुहील बाप्पा रावळ, कुंभ आणि संग यांच्या भूमीच्या उदात्त उद्दिष्टाची जाणीव त्याने त्यांना करून दिली. गनिमी काव्याचे तंत्र त्याने पूर्णतेला नेले आणि सैन्याला सतत दक्ष राहण्यास सांगितले. ' दिल्लीचे अस्थिर सिंहासन जिंकून घेण्याची योजना त्याने आखली होती ' या जेम्स टॉडच्या विधानाशी सहमत होणे कठीण आहे. तो म्हणतो, " आपल्या पूर्वजांची भव्य कृत्ये आणि चितोड हा त्यांच्या शत्रूचा अनेकवेळा बंदिखाना झाला होता, अशा गोष्टी त्याच्या भूमीच्या जुन्या इतिहासातून वाचण्याची सवय जडल्यामुळे दिल्लीचे अस्थिर सिंहासन उलथून पाडण्याच्या त्याच्या प्रयत्नात दैवाचा फेरा आपल्याला हात देईल असा विश्वास त्याला वाटत होता. हा विचार जितका योग्य तितकाच उदात्तही होता. "[१०] हळदीघाटीची लढाई १८ जून १५७६ रोजी झाली. तत्पूर्वी १५६८ मध्ये उदयसिंगाच्या हातून गेलेला मेवाडचा कोणताही भाग मुघलांकडून जिंकून घेण्याकरिता राणा प्रतापने चढाई केल्याचा पुरावा नाही. हे काम त्याने १५७६ नंतर सुरू केले आणि त्यात तो अंशत:च यशस्वी झाला. आग्रा किंवा दिल्ली जिंकून घेण्याचा त्याचा विचार नव्हता. मेवाडचे रक्षण करावे आणि शक्य झाल्यास चितोड परत मिळवावे हाच केवळ त्याचा उद्देश होता.

---

* राजस्थान सरकारने येथे आता मोटारीचा रस्ता करून या जुन्या घाटीचा मागमूसही ठेवला नाही.

## प्रताप मानसिंगावर चालून जातो

मानसिंग "हा स्वतःला दुय्यम असलेला जमीनदार"[११] म्हणजे राज्यकर्ता असला तरी थोड्याच काळापूर्वी त्याला मांडलिक असलेल्या घराण्याचा वंशज आहे, असे राणा समजत असे हे अबुल फझलचे म्हणणे रास्त आहे. म्हणून त्याला हल्लेखोर म्हणून मेवाडमध्ये प्रवेश करू देणे प्रतापला कमीपणाचे वाटले आणि म्हणून मंडलगड येथेच त्याच्याशी सामना देण्याला तो फार उत्सुक होता. पण खुल्या मैदानात मुघल सैन्याविरुद्ध निकराचे युद्ध करण्याचा धोका पत्करण्यासाठी त्याचे मन वळविण्यात आले. मुघल अशा युद्धात निष्णात होते. तेव्हा कुंभळगडच्या पहाडी किल्ल्यावरून डोंगराच्या पायथ्याशी उतरून हळदीघाटीच्या पश्चिमेस आठ मैलांवर लोहसिंग या गावी प्रतापने आपली छावणी ठोकली. कुंभळगडची डोंगरपट्टी अरुंद होत होत हळदीघाटीजवळ तिला एका खिंडीचे स्वरूप प्राप्त झाले होते. युद्धापूर्वीची रात्र प्रतापने येथेच घालविली. मुघल सैन्य आधीच मोलेलाला येऊन पोहोचले होते. दोन्ही शत्रु सैन्यांमधील अंतर आता जेमतेम १२ मैल होते.

## हळदीघाटीचे रणक्षेत्र

मुघल आणि रजपूत सैन्यांत झालेले हे संस्मरणीय युद्ध हळदीघाटीचे युद्ध म्हणून इतिहासात प्रसिद्ध आहे. "मेवाडची थर्मोपिली" असे टॉडने या युद्धाचे यथायोग्य वर्णन केले आहे. हळदीघाटी (काही आधुनिक लेखकांना वाटते त्याप्रमाणे हळदीघाट नव्हे) ही हळदीसारख्या पिवळ्या रंगाची डोंगरी घाटी असून दक्षिणे कडून ईशान्येला दीड मैल पसरली असून खामनौर खेड्याच्या दक्षिणेस ती संपते. याचमुळे अबुल फझल या लढाईला खामनौरची लढाई असे म्हणतो. या लढाईत प्रत्यक्ष भाग घेतलेला असूनसुद्धा बदायुनी या लढाईला "गोगुंडाची लढाई" असे म्हणतो. तथापि, त्यानेच लिहिलेल्या वृत्तांतावरून असे स्पष्ट दिसून येते की, ही लढाई गोगुंडा किंवा खामनौर किंवा त्या घाटीत कोठेच झाली नाही. ही घाटी तर इतकी अरुंद आहे की, सध्या ४०० वर्षे लोटल्यानंतरसुद्धा या घाटीच्या बहुतेक भागातून खांद्याला खांदा लावून दोन माणसे देखील जाऊ शकत नाहीत.० हळदी-घाटी खिंडीच्या आतल्या बाजूस बादशहाबाग या नावाने ओळखल्या जाणाऱ्या एकमेव मैदानावर पण ही लढाई लढली जाणे शक्य नव्हते; कारण हे मैदान इतके लहान आहे की, तेथे दोन्ही बाजूचे कमीत कमी ८००० सैन्य आणि तितकेच हत्ती व घोडे यांचे रणक्षेत्र, होणे शक्य नव्हते. बदायुनीने आपल्या ग्रंथात उल्लेख केलेली सैन्याची पाखरण आणि त्याच्या हालचाली एवढ्या मर्यादित जागेत होणे शक्य नाही. बादशाही फौजेची डावी बाजू खिंडीच्या तोंडावर (दार दहना-इ-घाटी) होती

आणि ते खामनौरच्या आग्नेयेस दोन तीन मैलांवर आहे असे या युद्धाचा हा साक्षी निश्चितपणे सांगतो. यावरून मुघल सैन्याची मधली आणि उजवी बाजू पूर्वेकडील खिंडीच्या तोंडापासून पश्चिमेकडील बनास नदीपर्यंत पसरली होती. बदायुनी नंतर म्हणतो की, राणाची फौज खिंडीच्या मागून आली (आझ अकाब दर्रा बरमदाह). त्याची आघाडीची फौज हकीम सूरच्या नेतृत्वाखाली डोंगराच्या पश्चिमेकडून बाहेर पडली (आझ जनीब किल्ला रआई-ई-कोह), आणि राणा स्वतः हकीम सूरच्या मागोमाग खिंडीच्या मध्यावरून बाहेर पडला (आझ-मियान-इ-घाटी)[१२]. यावरून ही लढाई हळदीघाटीच्या बाहेर खामनौर आणि ती खिंड यांच्यामध्ये पसरलेल्या मैदानावर झाली, हे स्पष्ट आहे. हे मैदान खडबडीत असून दगडधोंड्यांनी आणि काटेरी झुडुपांनी भरलेले होते असे बदायुनी म्हणतो ते बरोबर आहे.[१३] दोन्ही बाजूच्या आघाडीच्या फौजांची पहिली सलामी येथे झडली आणि नंतरची लढाई खामनौरच्या नैर्ऋत्येस बनास नदीच्या दक्षिण तीरापर्यंत पसरलेल्या मैदानात झाली

मेवाडच्या "ख्याता" मध्ये जतन करून ठेवलेल्या परंपरेप्रमाणे मानसिंगाच्या हाताखाली बादशाही फौजेत ८०,००० घोडदळ आणि राणाकडे २०,००० घोडेस्वार होते. मुहनोत नैनसीच्या आकड्याप्रमाणे मानसिंगजवळ ४०,००० आणि प्रतापजवळ ८ ते १०,००० घोडदळ होते.[१५] टॉड म्हणतो की, प्रताप २२,००० शूर रजपूतांनिशी लढाईत उतरला होता आणि त्यांपैकी फक्त ८,००० सैनिक परत आपल्या घरी गेले बाकीच्या १४,००० ना शूरांचे मरण प्राप्त झाले.[१६] हे अकडे फार अतिशयोक्तीचे आहेत. "शहाणा माणूस एखादी गोष्ट चौपट करून सांगतो आणि मूर्ख माणूस दसपट करून सांगतो.*" या हिंदी म्हणीला धरूनच हे आकडे दिलेले दिसतात. तत्कालीन मुघल इतिहासकार आणि लढाईत प्रत्यक्ष हजर असलेला बदायुनी यांच्या म्हणण्याप्रमाणे मानसिंगजवळ ५,००० फौज होती.[१७] त्यांत बहुतेक मध्य आशियातले उझबेक, कझाक आणि बदकशी, शिवाय हिंदी फत्तेपूर सिक्रीचे शेखजादे आणि बर्हाचे सय्यद वगैरे हिंदी मुसलमान आणि रजपुतांपैकी बहुतेक मानसिंगच्या कछवा जमातीतले लोक होते. राणाजवळ ३००० घोडेस्वार,[१८] आणि भिल्लराज पुंजा याच्या हाताखाली काही शेकडा भरतील इतकी भिल्ल सेना होती. बदायुनीच्या हकीगतीत यांचा उल्लेख नाही. कारण ते फार मागे राहिले होते आणि त्यांनी युद्धात भाग घेतला नव्हता. युद्धातील मोठ्या तोफा मेवाडच्या पश्चिमेकडील डोंगराळ भागात खेचून नेणे शक्य नसल्यामुळे मुघल सैन्याजवळ सुधारलेल्या पद्धतीचा हलका तोफखाना होता. दोन्ही सैन्यांजवळ लढाऊ हत्ती होते; पण

---

* "चतुर चौगुण, मूरख दसगुण".

राण्याजवळ तोफखाना नव्हता. तलवारीशिवाय लढाईतील त्याची मुख्य शस्त्रे म्हणजे धनुष्यबाण आणि भाले ही होती.

## हळदीघाटीची लढाई १८ जून १५७६

रणांगणावर मुघलांचे सैन्य याप्रमाणे रचण्यात आले होते. आघाडीवर ८० निवडक तरुण लढवय्ये सय्यद हाशीम बऱ्हाच्या हाताखाली उभे करण्यात आले होते. त्यांना आघाडीचे तरणेबांड (बुझा-इ-हरावल) असे म्हणत असत. त्यांच्यामागे आघाडीच्या रक्षकसेनेची दोन पथके जगन्नाथ कछवा आणि सैन्याचा बक्षी आसफ-खान यांच्या हाताखाली खडी होती. त्यांच्या मागे माधोसिंग कछव्याच्या हाताखाली तिसरे पथक इलतिमिरा किंवा आघाडीची राखीव फौज होती. मध्यभागी मानसिंग स्वत: असून त्याच्या हाताखाली त्याचे कछवा रजपूत आणि ख्वाजा महंमद रफी बदक्षी, शिहाबुद्दिन कारो, पायंदा कझाक आणि अली मुराद उझबेक यांच्या अधिपत्या-खालील तुकड्या होत्या. उजव्या बाजूस सय्यद अहमदखान बऱ्हा याच्या हाताखालील सय्यद होते आणि डाव्या बाजूस सिक्रीचे शेखजादे (शेख सलीम चिस्तीचे नातेवाईक), इतर मुसलमान शिपाई आणि सांभरचा राजा लूनकरण याच्या हाताखालील कछवा रजपूत होते. गाझीखान बदक्षी डाव्या बगलेचा प्रमुख होता. सैन्याच्या पिछाडीची राखीव फौज मिहितर खान याच्या अधिपत्याखाली होती.[१९]

प्रतापच्या सैन्याला आपल्या छावणीतून हळदीघाटीच्या चिंचोळ्या खिंडीच्या वाटेने [२०] बाहेर यावे लागत असल्यामुळे युद्धक्षेत्रावर त्यांची पद्धतशीर रचना करणे अशक्य होते. प्रतापचे सैन्य खिंडीतून दोन तुकड्यांनी बाहेर पडले. हकीमसूरच्या हाताखालील आघाडीची फौज खिंडीच्या तोंडातून प्रथम पुढे सरकली आणि त्याच्या मागोमाग खुद्द प्रतापची मुख्य सेना होती. खुल्या मैदानात मुघल सैन्याच्या समोरा-समोर येताच प्रतापने आपल्या सैन्याची आखणी खालीलप्रमाणे केली : हकीम सूरच्या हाताखालील आघाडीच्या फौजेत सालुंबरचा किसनदास चुंदावत, सरदार-गडचा भीमसिंग, देवगडचा संग आणि (जयमलचा मुलगा) बदनोरचा रामदास यांच्या तुकड्या होत्या. शिवाय हकीम सूरच्या नेतृत्वाखाली काही अफगाण सैन्य होते. आपले वंशपरंपरागत शत्रू जे मुघल त्यांच्यावर सूड उगवण्यासाठी हकीम सूर प्रतापला येऊन मिळाला होता. सैन्याच्या उजव्या बाजूस ग्वाल्हेरचा भूतपूर्व राजा रामशहा, डाव्या बाजूस मानसिंग झाला हे होते. आपल्या शूर सैनिकांसह राणा प्रताप सैन्याच्या मध्यभागी राहिला. पनर्वाचा भिल्ल राजा पुंजा याच्या हाताखालची भिल्ल सेना खिंडीच्या आतल्या बाजूस लपलेली होती. खुल्या मैदानावर त्याची व शत्रूची प्रत्यक्ष गाठ पडलीच नाही. आणीबाणीच्या प्रसंगी उपयोगी पडेल अशी निराळी राखीव फौज राणाने ठेवली नव्हती. त्याच्याजवळ दारूगोळा नव्हता.

१८ जून १५७६ रोजी सकाळी हकीम सूरच्या हाताखालील राण्याची आघाडीची फौज एकाएकी हळदीघाटी खिंडीच्या ईशान्येकडील तोंडावाटे बाहेर पडली; आणि त्याच्या पाठोपाठ प्रताप आपले मुख्य सैन्य घेऊन आला. प्रतापने प्रथम चढाई केली आणि त्याच्या आघाडीने शत्रूवर यशस्वी रीत्या इतक्या जोराचा हल्ला चढविला की, सय्यद हशीमच्या हाताखालील आघाडीचे तरणेबांड आणि त्यांच्याच मागे असलेली जगन्नाथ आणि आसफखान यांच्या हाताखालची आघाडीची फौज त्या खडबडीत आणि झुडुपांनी भरलेल्या मैदानात गर्दीने रेटली जाऊन एकत्र मिसळली गेली. त्यांचा पराभव करून रजपूत सैन्याने त्यांना मागे पिटाळून लावले. सय्यद हशीम घोड्यावरून पडला आणि आफसखान आणि बहुधा त्यांच्यामागून बदायुनी मध्यभागी असलेल्या मुघल सैन्याच्या आश्रयाला पळून गेले. निकराने लढणारा जगन्नाथ कछवा जवळजवळ पडण्याच्या बेतात होता, पण तेवढ्यात माधोसिंगच्या हाताखालची इल्तिमिश त्याच्या अचावासाठी धाऊन आली, पण इल्तिमिशची कुमकसुद्धा राण्याच्या माऱ्यापुढे टिकू शकली नाही. राण्याच्या दोन्ही बाजूंची फौज मुघल शत्रूवर तुटून पडण्यासाठी पुढे सरसावली. राजा राम शहाने मुघल सैन्याच्या डाव्या बगलेवरील गाझीखान बदक्षी याच्यावर हल्ला चढवून पराभूत करून त्याला मागे रेटले. हा हल्ला इतका दुर्निवार होता की, सांबरच्या लून करणच्या हाताखालचे रजपूत सैन्य मेंढयांच्या कळपाप्रमाणे सैरावैरा धावत जाऊन आघाडीच्या फौजेमधून शिरून उजव्या बाजूच्या बरासय्यदच्या तुकडीच्या आश्रयाला गेले. फत्तेपूर सिक्रीचे शेखजादे लढाईतून एकजात पळून गेले. पळता पळता सलीम चिस्तीचा जावई शेख मन्सूर याच्या ढुंगणात शत्रूचा एक बाण येऊन घुसला. त्यानंतर कित्येक दिवस त्या जखमेचा त्रास शेख मन्सूरला सहन करावा लागला. स्वतः मुल्ला असून सुद्धा गाझीखान काही वेळ लढाईत तग धरून राहिला. पण लढता लढता तलवारीचा वार लागून त्याच्या उजव्या हाताचा अंगठा तुटून पडला. मग मात्र तो टिकाव धरू शकला नाही आणि "अनिवार्य संकटापासून पळून जाणे ही महंमद पैगंबराचीच एक परंपरा आहे" असे ओरडत तो पळून गेला. रजपुतांच्या पहिल्या हल्ल्याला पाठ दाखवून पळत सुटलेली मुघल सेना न थांबता बनास नदीच्या पलीकडे १० ते १२ मैल गेली.

याच वेळी राण्याच्या डाव्या बाजूवर असलेला माना झाला याने मुघलांच्या उजव्या बाजूवर हल्ला चढविला. सय्यद लोकांनी त्याचा खूप निकाराने प्रतिकार करून सुद्धा त्यांना पराभव पत्करावा लागला. तरीही बऱ्हाच्या सय्यदांनी आपली जागा न सोडता प्रतिकार चालूच ठेवला. त्यांनी जर असे केले नसते, तर बादशाही सैन्यावर फार मोठी आपत्ती कोसळली असती असे बदायुनी म्हणतो.

शत्रूची तरण्याबांड सैनिकांची आघाडीची तुकडी, आघाडीची रक्षकसेना, इल्तिमिश आणि उजव्या व डाव्या बाजूची फौज यांची फळी फोडल्यावर राणा प्रतापचे सैन्य मुघल सैन्याच्या मध्य भागाकडे वळले. राणा प्रतापच्या पुढे जाऊन ग्वाल्हेरचा राजा राम शहा याने शत्रु-सैन्यावर शौर्याचे जे हल्ले चढविले त्यांचे शब्दात वर्णन करता येण्यासारखे नाही. आता खुद्द मानसिंग लढाईत उतरला. तो इतक्या शौर्याने लढला की, त्याचा पराक्रम पाहून अब्दुल कादीर बदायुनीसारख्या त्याचा विरोधी टीकाकारालासुद्धा त्याचे कौतुक वाटले आणि हर्षभराने तो उद्गारला की, मानसिंगच्या त्या दिवसाच्या नेतृत्वाने " हिंदूंच्या हाती इस्लामची तलवार आहे" हा मुल्ला शेरीचा अभिप्राय खरा असल्याची त्याची खात्री पटली. शत्रूला जाऊन भिडण्यासाठी राणाने मुघलांची मधली फळी फोडण्यासाठी आणि मानसिंग ज्या ठिकाणी उभा होता तेथे जाण्याची वाट मोकळी करण्यासाठी आपले हत्ती शत्रू-सैन्यावर सोडले. शिसोदियांचा प्रसिद्ध हत्ती लोना याने मुघलांचा हत्ती गजमुख याच्याशी सामना देऊन त्याला घायाळ केले. गजमुख पळून जाणार एवढ्यात लोनाच्या माहुताला गोळी लागलेली पाहून लोना मागे फिरला. राणाचा सर्वांत प्रसिद्ध हत्ती रामप्रसाद, याने लोनाची जागा घेतली. या रामप्रसादवर अकबराचा फार दिवस डोळा होता. मुघलांनी आपला हत्ती राम मदार याला रामप्रसादशी सामना करण्यास सोडले. राम मदारवर मात करण्याच्या तयारीत रामप्रसाद असतानाच रामप्रसादचा माहुत शत्रूकडल्या एका बाणाने ठार झाला. या संधीचा फायदा घेऊन बादशहाचा हत्तीदलाचा प्रमुख हुसेनखान मोठ्या चपळाईने स्वतःच्या हत्तीवरून उडी मारून रामप्रसादच्या पाठीवर जाऊन बसला आणि अशा तऱ्हेने रामप्रसाद बादशाही फौजेच्या ताब्यात आला. आता दोन्ही सैन्यांच्या मधल्या फळचा एकमेकाला भिडल्या आणि त्यांच्यात मोठी हातघाईची लढाई सुरू झाली. त्यात राम शहा, त्याचे तीन मुलगे (शालीवाहन, मानसिंग आणि प्रतापसिंग) व सुप्रसिद्ध जयमलचा मुलगा रामदास हे अतुल पराक्रम गाजवून शेवटच्या क्षणापर्यंत शौर्याने लढून धारातीर्थी पतन पावले. यात रामदास हा जगन्नाथ कछव्याचा वार लागून मरण पावला. दोन्ही बाजूचे रजपूत सरदार आणि त्यांच्या हाताखालची सेना यांच्यामधील ही लढाई अवर्णनीय अशा शत्रुत्वाने आणि मोठ्या चुरशीने लढली गेली. दोन्ही बाजूंकडून आव्हाने-प्रति आव्हाने देण्यात येत होती आणि द्वंद्वयुद्धेही खेळली जात होती. आपला प्रसिद्ध घोडा चेतक यावर स्वार झालेला राणा प्रताप आणि हत्तीवर बसलेला मानसिंग हे लढाईत प्रत्यक्ष भाग घेत होते. अमरकाव्य वंशावली आणि राजरत्नाकर या ग्रंथांत भाटांनी असा वृत्तांत दिला आहे की, एखाद्या भुकेल्या वाघासारखा चेतक उडी मारून मानसिंगच्या हत्तीच्या गंडस्थळावर तुटून पडला आणि क्रोधाविष्ट राण्याने मानसिंग-वर आपल्या भाल्याचा वार केला; पण हौद्यात वाकून मानसिंगने तो चुकविला. या

झटापटीत चेतकच्या पुढल्या पायांना जखम झाली. हा वृत्तांत संशयास्पद वाटतो. तथापि, राणा प्रताप आणि मानसिंग हे एकमेकांजवळ होते आणि त्यांनी "परा-क्रमाची कृत्ये केली" हे सत्य आहे. सुदैवाने या दोघांमध्ये द्वंद्व युद्ध झाले नाही. आपला पुढारी मानसिंग याच्या मदतीस येऊन माधोसिंग कछवाने राणा प्रतापचा प्रतिकार केला. कछवानी मानसिंगच्या भोवती कडे करून राणावर पुन: पुन: हल्ले चढविले. माधोसिंग कछवाबरोबर झालेल्या चकमकीत राणा प्रतापला बाणांच्या आणि भाल्याच्या जखमा झाल्या. असे असूनसुद्धा राण्याच्या सैन्याची सरशी होत होती आणि राणा प्रतापने राखीव फौज ठेवून यावेळी ताजे सैन्य रणांगणात आणले असते, तर विजयश्रीने बहुधा त्याला माळ घातली असती; पण ते व्हायचे नव्हते. युद्धाचे पारडे आपल्या विरुद्ध फिरते आहे असे दिसताच बादशाही राखीव फौजेचा अधिपती मिहतरखान आपले नगारे वाजवीत पुढे सरसावला आणि "अकबर स्वत: दौड करीत येऊन पोहोचला आहे," असे सर्वांना ओरडून सांगू लागला.

पहाटे चार वाजल्यापासून सतत लढत असलेली राण्याची सेना आता थकून गेली होती. सुरुवातीच्या विजयाचा जोष कमी झाला होता आणि मुघल सैन्य सर्व बाजूंनी पुन: एकत्र येऊ लागले होते. मिहतर खानच्या हाताखालील नवे सैन्य पाहून आणि अकबर स्वत: आल्याची खबर ऐकून शिसोदियांचा धीर खचला; आणि जखमी झालेल्या राण्याच्या स्वामीनिष्ठ सेवकांनी चेतकचा लगाम हातात धरून हळदी-घाटीच्या खिंडीकडे त्याला मागे नेले.

रणांगणातून राणा प्रताप निघून जाण्यापूर्वी थोडाच वेळ बदायुनीने आपला खास पराक्रम या युद्धभूमीवर करून दाखवला. राणा प्रतापच्या छोट्याशा सैन्याला मुघलांनी जवळ जवळ घेरून टाकले होते. ही हकीकत प्रत्यक्ष बदायुनीनेच लिहिली असली तरी ती संगतवार नाही आणि लेखकाच्या पूर्वग्रहामुळे दूषित झालेली आहे. या बाबतीत अबुल फझलचे मोजके शब्द प्रत्यक्ष काय झाले याची बरोबर कल्पना आणून देतात. यावेळी लढाई जवळ जवळ संपलीच होती आणि मुघलांची आघाडी आणि दोन्ही बाजूंच्या फौजा युद्धाला पुन्हा तयार झाल्या होत्या. अशा वेळी आसफ-खानच्या सांगण्यावरून बदायुनीने आपल्याकडील आणि शत्रूकडील अशा दोन्ही बाजूंच्या रजपूतांना गोळ्या घालून ठार मारण्यास सुरुवात केली. असे करण्यात काफीर लोकांना मारून आपण इस्लामची मोठी सेवा बजावली आणि त्यामुळे काफिरांना मारणारा म्हणून गाझी ही पदवी मिळण्यास आपण पात्र ठरलो असे बदायुनीचे म्हणणे आहे.

राणा रणांगणातून निघून जाण्यापूर्वी एक उल्लेखनीय घटना घडली. बाडी सादडीचा झाला बिदा केवळ स्वामीनिष्ठेखातर पुढे आला आणि राण्याच्या डोक्या-

वरचे छत्र आपल्या डोक्यावर धारण करून 'मी राणा आहे' असें म्हणत राण्याच्या पुढे होऊन शत्रूसैन्यात घुसला. यामुळे राण्याला थोडी उसंत मिळून त्याला आणि हकीम सूरला हळदीघाटीच्या खिडीतून पसार होऊन गोगुंडाकडे निघून जाण्यास फुरसद मिळाली. राणा गेल्यानंतर काही वेळ युद्ध चालूच होते. रणांगणावर बिदाला हवे होते तसे शूराचे मरण मिळाले. बिदाचे पतन झाल्यावर लढाई संपली आणि राण्याची राहिलेली फौज खिडीच्या मार्गाने माघार घेऊन गोगुंड्याच्या पश्चिमेस कोलियारीला जाऊन पोहोचली. अशा तऱ्हेने सकाळी आठ वाजता सुरू झालेली लढाई दुपारी मध्यान्हीच्या सुमारास संपली आणि राजा मानसिंगला विजय प्राप्त झाला.*

या लढाईत दोन्ही बाजूंचे पुष्कळ सैनिक कामास आले. बादशहाच्या फौजेतील १५० लोक मारले गेले आणि ३०० वर जखमी झाले. राण्याच्या सैन्यातले ५०० लोक मेले. त्यांत अनेक नाव घेण्यासारखे शूर योद्धे होते. ग्वाल्हेरचा राजा राम शहा आणि त्याचे तीन मुलगे, बाडी साद्रीचा झाला बिदा, बदनोरचा राम दास, दोदिया भीम सिंग, शंकर दास राठोड, रावत नैतसी आणि झाला मानसिंग इत्यादि प्रमुख योद्धे राण्यासाठी लढता लढता मरण पावले. राणा प्रतापने अडचणीच्या वेळी दिलेल्या आश्रयाची फेड ग्वाल्हेरच्या तनवार राजघराण्याने अशा रीतीने आपल्या रक्ताने केली. हळदीघाटीच्या लढाईनंतर राजाराम शहाच्या मागून ग्वाल्हेरच्या गादीवर हक्क सांगणारा एकही पुरुष जिवंत राहिला नाही. राण्याच्या बाजूच्या जखमी झालेल्या लोकांची संख्या मृत्यू पावलेल्यांपेक्षा जवळ जवळ दुपटीने होती.

## हळदीघाटीच्या लढाईचे परिणाम

परिणामाच्या दृष्टीने हळदीघाटीची लढाई जितकी हातघाईची तितकीच निष्फळ ठरली. मानसिंगच्या मोहिमेतील दोन मुख्य हेतू, राणा प्रतापची कैद किंवा मृत्यू आणि मेवाडचा कब्जा हे दोन्ही साध्य झाले नाहीत. मेवाडच्या डोंगराळ आणि उजाड मुलुखात १८ जूनला इतकी गरमी होती की, डोक्यात मेंदूला उकळ्या फुटत होत्या आणि 'हवा भट्टीसारखी गरम असून सैन्याला हालण्याची सुद्धा ताकद राहिली नव्हती.' त्यामुळे मुघल सैन्याला शत्रूचा पाठलाग करणे सर्वस्वी अशक्य झाले आणि

*सकतसिंगने राण्याच्या पाठीमागे लागलेल्या दोन मुघल शिपायांना ठार केले. चेतक मारला गेला तेव्हा आपला घोडा राण्यास बसावयास दिला आणि यामुळे दोन्ही भावांत सलोखा घडून आला अशी लोकगीतात ग्रथित केलेली हकीकत अफूच्या नशेत लिहिल्यासारखी वाटते. सकतसिंग अकबराच्या नोकरीतच राहिला. १५८१ सालच्या काबूलच्या मोहिमेत एक सेनानी असा त्याचा उल्लेख आहे. पाहा-ऐने अकबरी–भाग ३, पान ३५३.

गोगुंडाच्या पश्चिमेस कोलियारीला पसार होऊन तेथे एक रात्र विश्रांती घेण्यास राण्यास अवसर मिळाला. राण्याने आपली फौज खिंडीत लपवून ठेवली असून ती आपल्यावर अचानक हल्ला करील ही भीती पण मुघल सैन्याला सतावीत होती. या सर्व कारणांमुळे मानसिंग बनास नदीवरील आपल्या छावणीत परत फिरला आणि तेथून दुसऱ्या दिवशी गोगुंड्याला गेला. गोगुंडा राण्याने आधीच खाली केले होते. तेथे राहिलेल्या लोकांचा–अदमासे २०–बंदोबस्त करून मानसिंगने शहर आपल्या ताब्यात घेतले; पण शिसोदियांच्या पराक्रमाने तो इतका वचकून गेला होता की सर्व रस्त्यांची नाकेबंदी करून शहराभोवती घोडेस्वारांना उडी मारून ओलांडता येणार नाही इतकी उंच भिंत त्याने उभी केली. त्याशिवाय शहराच्या चारीही बाजूंना खोल खंदक पण खणून ठेवला. राण्याशी दोन हात करणे फार कठीण काम आहे असे इतर सर्वांप्रमाणेच मुघल सैन्याला पण वाटत होते. गोगुंड्याहून फत्तेपूर सिक्रीला परत जातांना राण्याचा पराभव झाला या गोष्टीवर विश्वास ठेवायलाच लोक तयार नव्हते, असे बदायुनीने स्पष्ट लिहून ठेवले आहे. वाईट आणि असुरक्षित रस्ते, आजूबाजूच्या लोकांचा विरोध आणि मुख्यत: दाण्यापाण्याचा अभाव यामुळे गोगुंडात मुघल सैन्याचे फार हाल झाले. गोगुंडाभोवतालच्या डोंगराळ मुलुखात आधीच पीक कमी आणि त्यात शिसोदियांनी रसद तोडून टाकलेली. त्यामुळे धान्य विकण्यास कोणी वंजारा येईनात. भोवतालच्या प्रदेशात सैन्याच्या तुकड्या पाठवून जबरदस्तीने दाणागोटा मिळवण्याच्या प्रयत्नांना पण फारसे यश आले नाही. तेव्हा मुघल सैन्यावर जनावरांचे मांस आणि गोगुंडात मोठ्या प्रमाणात पिकणारे आंबे खाऊन आपला उदरनिर्वाह करण्याचा प्रसंग आला. अर्थातच पुष्कळ शिपाई त्यामुळे आजारी पडले. अधिक काळ गोगुंडाला राहणे शक्य नसल्याने सप्टेंबर १५७६ मध्ये मानसिंग तेथून निघाला. त्याची पाठ फिरताच गोगुंडा आणि त्याच्या आसपासचा मुलुख पुन: राण्याच्या हातात गेला.

हळदीघाटीच्या विजयामुळे खुद्द बादशहाचे फारसे समाधान झाले नाही. राण्याचा पाठलाग करून त्याला कैद किंवा ठार न केल्याबद्दल त्याने मानसिंगला दोष दिला. राण्याच्या प्रदेशात लूटमार न करण्याचा मानसिंगाने आपल्या सैन्याला दिलेला आदेश पण बादशहाला आवडला नाही. त्या रागामुळे त्याने काही दिवस मानसिंग आणि आसफखान यांना दरबारात येण्याची बंदी केली. पण झाल्या प्रकरणात मानसिंगचा काही दोष नव्हता, हे बादशहास लवकरच कळून चुकले. मेवाडच्या रखरखीत उन्हाळ्यात आणि हळदीघाटीच्या खिंडीत भिल्ल तिरंदाज लपून बसलेले असताना शत्रूचा पाठलाग करणे अविचाराचे होते. शिवाय पश्चिम मेवाडच्या उजाड मुलुखात लूट मिळण्याची पण फारशी शक्यता नव्हती. थोड्याच दिवसांत बादशहाचा

राग गेला आणि मानसिंग व आसफखान या दोघांना त्याने पुन्हा आपल्या मर्जीत घेतले.

हळदीघाटीच्या लढाईने राण्याची तात्पुरती माघार झाली खरी पण त्याचा पुरता बीमोड मुळीच झाला नाही. अनेक दृष्टीने हळदीघाटीची लढाई एक इष्टापत्तीच ठरली. युद्धातल्या पराजयाने राणा नामोहरम तर झाला नाहीच पण त्याचा आत्मविश्वास वाढून बादशहाला प्रतिकार करण्याच्या त्याच्या निश्चयास अधिक बळकटी आली. एका बलाढ्य राजाच्या प्रचंड सेनेबरोबर आपल्या छोट्याशा फौजेने केलेली निकराची लढाई पाहून शत्रूला शरण न जाण्याच्या आपल्या दृढनिश्चयाला न्यायाचे आणि नीतीचे पाठबळ आहे असा विश्वास त्याला वाटू लागला. १८ जून १८७५ म्हणजे हळदीघाटीच्या लढाईपूर्वीचा आणि नंतरचा राणा प्रताप ह्या दोन अगदी निराळ्या व्यक्ती वाटू लागतात. हळदीघाटीच्या पराजयाने शहाणा होऊन मुघलांकडून मेवाड परत जिंकून घेण्याचे त्याचे नंतरचे बेत अधिक वास्तववादी झालेले दिसतात. यापुढे बलाढ्य शत्रूला सामोरे जाऊन त्याच्याशी उघड्या मैदानात सामना देण्याचे प्रतापने सातत्याने टाळले. आपल्या डोंगराळ मुलुखात अत्यंत सोयीची आणि आपल्या भिल्ल अनुयायांना सर्वस्वी मानवणारी गनिमी युद्धाची पद्धत प्रतापने आत्मसात केली. हळदीघाटीच्या लढाईने प्रताप आणि अकबर यांच्यामधील युद्धतंत्रात हा फार मोठा बदल घडवून आणला.

## अकबर प्रतापची कोंडी करतो

हळदीघाटीच्या लढाईनंतर पाच दिवसांनी (जून २३) तेथील विजयाची बातमी अकबराला मिळाली व हळदीघाटीला मिळालेले एकमेव विजयचिन्ह म्हणजे प्रतापचा प्रसिद्ध हत्ती रामप्रसाद बदायुनीने बादशहाला नजर केला. राणा हातातून निसटून गेला ही गोष्ट अकबराच्या मनात सारखी सलत होती. म्हणून राण्याला पकडण्याची शक्य ती सर्व योजना करण्याच्या मागे तो आता लागला. ख्वाजाच्या उरसात भाग घ्यावा आणि राण्याविरुद्धच्या हालचाली तेथूनच सुरू कराव्या या उद्देशाने तो सप्टेंबरमध्ये अजमेरला गेला. मानसिंग आणि आसफखान यांना त्याने गोगुंडाहून परत बोलावून घेतले. हळदीघाटीच्या लढाईत भाग घेतलेल्या धाझीखान बदक्शी, मिहतर खान, अली मुराद उझबेक इत्यादि सरदारांना त्याने बढती दिली, पण मानसिंग आणि आसफखान यांच्या पदरात काहीच टाकले नाही. मानसिंगाच्या वाईटावर असलेल्या काही लोकांनी चुगल्या केल्यामुळे बादशहा नाराज होता, असे अबुल फझल म्हणतो. राण्याचे पळून जाण्याचे सर्व मार्ग रोखून त्याची संपूर्ण कोंडी करण्याचा डाव बादशहाने रचला. जलौर आणि सिरोही येथील राजांना प्रतापपासून वेगळे काढून

प्रतापला सर्व बाजूंनी वेढून टाकणे असा या डावपेचातला मुख्य भाग होता. गुजराथच्या मोहिमेच्या वेळी जलौरचा ताजखान आणि सिरोहीचा देवरा राय यांनी अकबराचे जुजबी वर्चस्व मान्य केले होते, पण नंतर लवकरच त्यांनी राणा प्रतापशी स्वतंत्रपणे सलोख्याचा तह केला होता. समजुतीच्या मार्गाने किंवा जरूर पडल्यास शक्तीचा वापर करून त्यांना ताळ्यावर आणण्यासाठी बादशहाने तारसुन खान, रायसिंग आणि सय्यद हशीम वर्दा यांची सैन्यासकट तिकडे रवानगी केली. प्रबळ बादशहाला विरोध करण्यात कुठलाच शहाणपणा नाही असे समजून ताजखान आणि देवरा राय यांनी बादशहाचे वर्चस्व मान्य केले व स्वतः दरबारात हजर राहाण्यास संमती दिली. गुजराथच्या सरहद्दीवरील नादोत या गावी हशीम बर्दा आणि रायसिंग यांना बादशहाने ठेवले. त्या भागातील लोकांच्या हालचालीवर लक्ष ठेवून राणा प्रतापच्या राज्यात जाणाऱ्या रस्त्यांची नाकेबंदी करण्याचे काम त्यांच्याकडे होते.

## अकबराची गोगुंडाकडे चाल

इतके झाल्यावर १२ ऑक्टोबर १५७६ रोजी अकबर अजमेरहून गोगुंडाला जाण्यास निघाला. शिकारीला जाण्याचा बहाणा करून त्याने आपल्या बरोबर खूप मोठे सैन्य घेतले. आपल्या सेनापतींना जे करता आले नाही ते आपल्या प्रत्यक्ष उपस्थितीने साधून जाईल असे त्याला वाटले. मेवाडच्या लोकांच्या मनात दहशत उत्पन्न करून प्रतापला पकडावे असा त्याचा अंतस्थ हेतू होता. प्रतापचा मित्र आणि सहकारी इदारचा राजा नारायणदास याचे पण पारिपत्य करावयाचे होते. "दक्षिणेकडील पहाडी मुलुखात राजद्रोही राण्याने डोके वर काढले होते; आणि इदारमध्ये नारायणदासने आत्मप्रौढीचा झेंडा उभारला होता." या सर्व प्रवासात मुघल सेनेला अत्यंत 'हुशार' राहण्याचा हुकूम देण्यात आला होता. राजाच्या तंबूभोवती पहारा करणाऱ्या अधिकाऱ्यांना पहारा संपण्यापूर्वी व पहारा सुरू होताना बादशहापुढे हजर व्हावे लागत असे. राण्याचा निःपात करून त्याचा मुलुख उध्वस्त करून टाकण्यासाठी कुतुबुद्दीनखान, भगवंतदास, आणि मानसिंग यांच्या हाताखाली एक मोठी फौज पुढे पाठवून देण्यात आली. आसफखान, मीर घीयासुद्दीन यांच्या हाताखाली दुसरी एक फौज, नारायणदासचे पारिपत्य करण्यासाठी इदारला निघाली. कुतुबुद्दीन खान आणि भगवंतदास हे गोगुंड्याला पोहोचताच राणा प्रताप पहाडी मुलुखात निघून गेला. नारायण दास पण डोंगरपट्टीच्या आश्रयाला निघून गेला. पण इदारच्या घराघरातून आणि देवळात राहिलेले रजपूत सैनिक इदारविरुद्ध पाठविलेल्या सैन्याशी सामना करण्यास सरसावले. मुघल सैन्याबरोबर निकराची लढाई करून त्यांनी उमरखान आणि हसनबहादुर यांना ठार मारले, पण बादशहाच्या प्रचंड फौजेपुढे

त्यांचा निभाव न लागून इदार शेवटी मुघलांच्या हातात पडले. नंतर कुलीजखान जाग्यावर नाही या संधीचा फायदा घेऊन राणा प्रतापच्या सहाय्याने नारायण दास इदारला परत आला आणि गावापासून जवळच मुघल सैन्यावर त्याने जोराचा हल्ला चढविला. मुघलांच्या आघाडीची फळी फोडून तेथे त्याने शत्रूची खूप कत्तल केली, पण शेवटी पराभव पावून त्याला डोंगरपट्टीत माघार घ्यावी लागली (२३ फेब्रुवारी १५७७).

## प्रताप अकबराच्या हातावर तुरी देतो.

गोगुंडाच्या मोहीमेवर असताना अकबर हळदीघाटीपर्यंत जाऊन आला, पण प्रतापला पकडण्याचे त्याचे सर्व डावपेच व्यर्थ गेले. मग मोहीला ३००० आणि मदारियाला ५०० विश्वासू सैनिक अकबराने ठेवले. इतर ठिकाणी पण त्याने असाच बंदोबस्त केला. राण्याच्या हालचालीवर नजर ठेवून तो डोंगरपट्टीतून बाहेर पडताच त्याच्याशी सामना करण्याचा हुकूम या शिबंदीस देऊन अकबर पश्चिम मेवाडमधून उदेपूर आणि बांसवारा या मार्गे माळव्याकडे निघाला. राण्याविरुद्ध केलेल्या चढाईत अपयश पदरात घेऊन बादशहाचा हुकूम मोडून कुतुबुद्दिन आणि भगवन्तदास गोगुंडाहून दरबारात परत आले. त्यांना दरबारात येण्याची बंदी करण्यात आली पण नंतर लवकरच त्यांना माफी मिळाली. गोगुंडा परत मिळविण्यासाठी राण्याने हालचालीस सुरुवात केली आहे अशी बातमी येताच भगवन्तदास, मानसिंग, मिर्झाखान (बैरामखानचा मुलगा) आणि कासीमखान यांना तिकडे पाठवण्यात आले. गोगुंड्याला मुघल शिबंदीची पुन्हा एकदा स्थापना करून ते परत आले. शहा फक्रुद्दिन आणि जगन्नाथ कछवा यांना उदेपूरला आणि भगवन्तदास व सय्यद अब्दुल्लाखान यांना उदेपूरच्या घळीचे (देवडी) रक्षण करण्यास ठेवून बादशहा स्वतः वान्सवाऱ्याला निघून गेला. वान्सवाऱ्याचा रावळ प्रताप आणि डुंगरपूरचा रावळ अस्करन या दोन्ही राजांनी आजपर्यंत बादशहाचे वर्चस्व मान्य केले नव्हते. त्यांची समजूत घालून त्यांना दरबारात आणण्यात आले. तेव्हा अकबराने त्यांचे मोठे स्वागत केले. अशा तऱ्हेने दोन्ही राज्ये अकबराची मांडलिक झाली आणि अकबराने डुंगरपूरच्या राजकन्येशी विवाह केला. लग्नाच्या वाटाघाटी लूनकरण आणि बिरबल या दोघांनी केल्या व अकबर फत्तेपूर सिक्रीला परत फिरला असताना राजकन्येला घेऊन हे दोघे अकबराकडे आले.

## सिरोही आणि बुंदीचा पाडाव

याच सुमारास गुजराथच्या सरहद्दीवर ठेवलेल्या रायसिंगला सिरोहीचा पाडाव करण्याचा हुकूम देण्यात आला. रायसिंग सिरोहीच्या वेढ्यात गुंतला असताना

रायमल काही सैन्यानिशी त्याच्या कुटुंबाला बिकानेरहून घेऊन येत होता. सुरतन देवरा किल्ल्यातून बाहेर पडून रायमलवर तुटून पडला. त्यात पराभव झाल्यामुळे सिरोही खाली करून सुरतन देवरा अबूच्या भक्कम किल्ल्यात जाऊन राहिला. सिरोही आपल्या विश्वासू अधिकाऱ्यांच्या हातात सोडून रायसिंग अबूला गेला आणि तेथील किल्ल्याला त्याने वेढा दिला. त्यामुळे घाबरून जाऊन सुरतन शरण येण्यास तयार झाला. रायसिंगने त्याला अकबराकडे नेले व अकबराने त्याची शरणागती मान्य केली.

याचवेळी बुंदीचे राजघराणे आणि तेथील मजबूत किल्ला यावर पण अकबराचे लक्ष होते. रांतमभोरचा भूतपूर्व राजा राय सुर्जन याचा मुलगा दुदा याने प्रतापशी संगनमत करून बंडाचा झेंडा उभारला होता. या बंडाचा बिमोड करण्यासाठी अकबराने ऑगस्ट, सप्टेंबर १५७६ मध्ये सफदरखानला तिकडे पाठवून दिले. त्याच्या हातून ही कामगिरी पुरी न झाल्यामुळे, ३० मार्च १५७७ रोजी झैन खान कोकाची बुंदीला रवानगी करण्यात आली. दुदाचा बाप सुर्जन आणि भाऊ भोज हे दोघे झेन खान बरोबर होते. उंतगारदानच्या उंच टेकडीवर हातघाईची लढाई होऊन अनेक लोक मारले गेले. त्यात दुदाचा पराभव होऊन तो पहाडी मुलखात पळून गेला. बुंदीचे राज्य मग भोजला देण्यात आले. मात्र दुदा पळाला तो मुघलांच्या हातात कधीच सापडला नाही व शेवटपर्यंत अकबराला शरण आला नाही. १५८५ सालच्या ऑक्टोबर महिन्यात तो मरण पावला.

बुंदीचा पाडाव झाल्यामुळे राणा प्रतापच्या सर्व मुलखाची कोंडी झाली. इतके झाल्यावर अकबर फत्तेपूर सिक्रीला परत जाण्यास निघाला व तेथे १२ मे १५७७ रोजी जाऊन पोहोचला.

## शहाबाझ खानची प्रतापविरुद्ध पहिली मोहीम

तारीखवार इतिहास थोडा बाजूला ठेवून राणा प्रतापला शरण आणण्याचे अकबराचे निष्फळ प्रयत्न आणि राण्याने केलेला अकबराचा यशस्वी प्रतिकार, या प्रकरणाचा शेवट येथेच केलेला बरा. राणा प्रतापला शरण येण्यास भाग पाडणे हा आता अकबराच्या प्रतिष्ठेच्या प्रश्न झाला होता. भोवतालच्या राजांशी खलबत करून त्यांना बादशहाविरुद्ध युद्धास प्रवृत्त करणे आणि मुघलांनी जिंकून घेतलेला मेवाडचा प्रांत परत मिळविणे या प्रयत्नात राणा प्रताप जुलै १५७६ पासून गुंतला होता. हल्लीच्या भाषेत बोलावयाचे म्हणजे बेचिराख नीतीचा अवलंब करून त्याने आपला सर्व मुलुख उजाड करून टाकला होता. अशा मुलखापासून मुघलांना कुठलाही फायदा मिळणे जवळ जवळ अशक्य होते. मुघलांच्या ताब्यातल्या मेवाडच्या भागावर

हल्ले करून तो उध्वस्त करण्यास आणि लुटण्यास प्रतापने प्रारंभ केला. इ. स. १५७७ च्या ऑक्टोबर महिन्यात मोदीच्या परगण्यावर हल्ला करून त्याने तिथल्या उभ्या पिकांचा नाश केला. तिथला ठाणेदार मिजा-हित-बेग याची आणि राण्याच्या लोकांची लढाई होऊन त्यात मिजा-हित-बेग मारला गेला. प्रतापच्या या कारवाया स्वस्थ बसून पाहणे अकबराला सर्वस्वी अशक्य होते. सर्व हिंदुस्थान एकछत्री अंमलाखाली आणण्याच्या धोरणानुसार आणि स्वतःच्या प्रतिष्ठेखातर प्रतापचा पाडाव करणे अकबराच्या दृष्टीने अत्यंत जरूरीचे होते. याचसाठी एकामागून एक आपले नामवंत सरदार त्याने प्रतापविरुद्ध पाठवून दिले. अबुल फझलच्या म्हणण्याप्रमाणे " दोन सत्तांतील झगडयामुळे देशाची शांती ढळू नये आणि राजकीय ऐक्यात कुठलाही बिघाड होऊ नये " म्हणून अकबराने इ. स. १५७७ च्या ऑक्टोबर महिन्यात अजमेरहून भगवंतदास, मानसिंग, पायंडा खान मुघल, सय्यद कासीम, सय्यद राजू, उलुघ, असद तुर्कोमन, गजरा चव्हाण आणि इतर अनेक सेनानींना प्रतापचा निःपात करण्यासाठी पाठवून दिले. मीरबक्षी शहाबाझ खानकडे या सेनेचे नेतृत्व होते. आपल्या मोहीमेस मोठ्या हिरीरीने सुरुवात करून शहाबाझ खान पश्चिम मेवाडात दूरवर घुसला. राण्याच्या मुलखातल्या डोंगराळ वाटांची नाकेबंदी करण्यासाठी नंतर त्याने बादशहाकडे कसलेल्या सैनिकांची मागणी केली. त्याप्रमाणे फत्तेपूर सिक्रीहून निवडक सैन्यासह शेख इब्राहीमची इआदलाई (लावलाली) येथे रवानगी करण्यात आली.

## कुंभळगडचा पाडाव

या मोहीमेत शहाबाझ खानला बरेच यश मिळाले. ५ महिन्यांत राण्याच्या बचावाचे मुख्य ठिकाण आणि त्याची राजधानी उदेपूरच्या उत्तरेस ४० मैलांवर असलेले कुंभळगड येथे तो जाऊन पोहोचला. तिथल्या मजबूत किल्ल्याला वेढा देण्यापूर्वी त्याने भगवंत दास आणि मानसिंग यांना दरबारात परत पाठवून दिले. राण्याच्या धर्माचे आणि वंशाचे हे लोक वेढा यशस्वी करण्यात अडथळे आणतील असे त्याला वाटले असावे. कुंभळगडच्या खाली ३ मैलांवर वसलेले कैलवाडा जिंकून घेतले. नंतर त्याने खुद्द कुंभळगडला वेढा दिला. शरीफखान घाझीखान आणि मिर्झाखान यांनी टेकडयांवर चढून किल्ल्यावर पुनःपुन्हा जोराचे हल्ले चढवले. इतक्यात किल्ल्यातली एक मोठी तोफ फुटून तेथील युद्धसामुग्रीची राखरांगोळी झाली. यामुळे किल्ल्यावरील शिबंदीचा धीर खचला. मुघलांनी रसद पुरवणारे सर्व मार्ग रोखून धरल्यामुळे किल्ल्यावर धान्यसामुग्रीची तंगी भासू लागली. हे ध्यानात येताच किल्ल्याच्या रक्षणाची कामगिरी आपल्या सैनिकांवर सोडून राणा संन्याशाचा वेश घेऊन किल्ल्यातून निघून गेला. नंतर किल्ल्याचे दरवाजे उघडून रजपूत सैन्य मुघलांना सामोरे गेले आणि त्यांनी मुघल सैन्याबरोबर अत्यंत चुरशीचा सामना दिला. ३ एप्रिल

१५७८रोजी किल्ला मुघलांच्या हातात पडला. गाझीखान बदक्षी याला कुंभळगडचा किल्लेदार नेमून शहाबाझ खान राण्याचा पाठलाग करण्यास निघाला. पण राण्याला पकडण्याचे त्याचे प्रयत्न निष्फळ ठरले. गोगुंडा आणि उदेपूर खानाने एक दिवसात जिंकून घेतले. तिथल्या डोंगराळ मुलखात ठिकठिकाणी आपली शिबंदी ठेवून शहाबाझ खान फत्तेपूर सिक्रीला परत आला.

## शहाबाझ खानची दुसरी व तिसरी मोहीम

मुघल शिबंदीवर छुपे हल्ले करण्यास प्रतापने पुन: सुरवात केली असे कळताच १५ डिसेंबर १५७८ रोजी शहाबाझ खानला दुसऱ्यांदा त्याचा बंदोबस्त करण्यासाठी धाडण्यात आले. त्याच्याजवळ पुष्कळ खजीना आणि हाताखाली घाझीखान, महम्मद हुसेन, सय्यद तैमूर बदक्षी, मीरझादा अलीखान, इत्यादी प्रमुख सरदार होते. तिथला सर्व बंदोबस्त करून १५७९ च्या मध्यास शहाबाझ खान दरबारात परत आला असे अबुल फझल म्हणतो. ता. ९ नोव्हेंबर १५७९ रोजी अजमेरहून परत येताना साम्भर येथून अकबराने शहाबाझ खानला पुन: एकदा मेवाडात शांतता प्रस्थापित करण्या-साठी पाठवून दिले. त्याने केलेल्या उत्तम कामंगिरीमुळे प्रतापला " वाईट दिवस येऊन तो एक जंगली वनचर बनला " असे अबुल फझल म्हणतो. रानोमाळ भटकत फिरणाऱ्या राण्याला पकडणे मात्र मुघल सैन्याला जमले नाही. पण तेजमल शिसो-दियाच्या वसतीस्थानावर हल्ला करून तेथे एक छोटीशी लष्करी छावणी उभारण्यात शहाबाझ खानला यश आले. इ. स. १५८० मध्ये बंगालच्या मुघल अधिकाऱ्यांनी बंड पुकारल्यामुळे शहाबाझ खानला परत बोलावून त्याची तिकडे रवानगी करण्यात आली.

## जगन्नाथ कछवाची मोहीम

प्रमुख मुघल सेनानी बिहार, बंगालमधील बंड मोडण्यात गुंतले आहेत आणि अकबर स्वत: काबूलच्या मोहिमेवर आहे हे पाहून प्रतापने काही ठिकाणच्या मुघल शिबंदीचा पाडाव करून मंडलगड आणि चितोडपर्यंतच्या मुलखात छापे घातले. त्याचे पारिपत्य करण्यासाठी १५८४ सालच्या डिसेंबर महिन्यात अकबराने जगन्नाथ कछवाला पाठवून दिले. मेवाडपर्यंत जलद कूच करून जगन्नाथने सय्यद राजूला मंडलगडच्या रक्षणासाठी ठेवून दिले. तेथून राण्यावर त्याच्याच वसतीस्थानात स्वारी करण्यासाठी तो पश्चिम मेवाडच्या पहाडी मुलखात घुसला. त्याच्याशी उघड उघड लढाई करण्याचे टाळून दुसऱ्याच एका घळीतून बाहेर पडून प्रतापने मंडलगड जवळच्या मुलखावर छापा घातला. सय्यद राजूने त्याचा पाठलाग करण्याचा प्रयत्न केला पण

त्याला हुलकावणी देऊन राणा मोठ्या वेगाने चितोडकडे निघाला. जगन्नाथ आणि राजू या उभयतांनी मिळून राण्याचा डोंगरपट्टीपर्यंत पाठलाग केला.१५८५सालच्या सप्टेंबर महिन्यात एका सायंकाळी त्यांनी राण्याच्या गुप्त वस्तीवर अचानक हल्ला केला आणि त्याला जवळजवळ कैद केले. या हल्ल्याचा वेळीच सुगावा लागल्यामुळे प्रताप हळूच आपल्या घरून निघाला आणि एका घळीत जाऊन लपला. प्रतापवरचा राग जगन्नाथने त्याचे घर आणि मालमत्ता लुटून काढला. मुघल सैन्य परत फिरले तेव्हा त्यांच्यावर हल्ला करण्याच्या उद्देशाने प्रताप उघड्या मैदानात आला, पण मुघल सैन्य दुसऱ्याच रस्त्याने परत गेल्यामुळे त्याला निराश होऊन परत जावे लागले.

## थोर आणि दिलदार मनाचा प्रताप

अबदुर रहीमखान खाननची बायकामंडळी युवराज अमरसिंगच्या हातात पडली आणि राण्याच्या सांगण्यावरून त्यांना रहीमखानकडे सन्मानाने परत पाठविण्यात आले, अशी एक प्रचलित लोकवार्ता प्रत्यक्ष घडलेल्या गोष्टीवर आधारित असावी असे वाटते. शिरोहीच्या आसपास शिकार करण्यासाठी खान खानान गेला आणि बरोबर वेड्यासारखा आपली बायकामंडळी पण घेऊन गेला, असे अबुल फझल म्हणतो. सैन्यापासून अलग होऊन काही रजपूत शिपायांबरोबर त्याची चकमक उडाली. प्रसंग मोठा बाका होता, पण सुदैवाने खान खानान " मोठ्या संकटातून " वाचला. ही गोष्ट इ. स. १५८५ मध्ये घडली.

## आक्रमक हल्ल्यांचा शेवट : राणा प्रतापचा मृत्यू

जगन्नाथच्या मोहिमेस अपयश आल्यावर अकबराने प्रतापला पकडण्याचा नाद सोडून दिला असावा; कारण १५८५ सालानंतर राण्याविरुद्ध पाठवलेल्या कुठल्याच मुघल सरदाराचा उल्लेख इतिहासात आढळून येत नाही. याच वेळी वायव्य सरहद्दीचे रक्षण करण्यात अकबर सर्वस्वी गुंतला होता आणि राण्याकडे लक्ष देण्यास त्याला सवड नव्हती. याचा पूर्ण फायदा घेऊन पश्चिम मेवाडमधील मुघलांनी व्यापलेला बहुतेक सर्व मुलुख प्रतापने पुन: जिंकून घेतला. तसेच पूर्वेकडील मोही, उदेपूर आणि मंडल येथील लष्करी ठाणी आणि तिकडला बहुतेक सर्व भाग त्याने पुन: आपल्या अंमलाखाली आणला. मेवाड प्रांतात अग्नेयेस जहाजपूरपर्यंत राण्याने आपली सत्ता पुन: प्रस्थापित केली. आपल्या आयुष्याची शेवटची १२ वर्षे प्रतापने गेलेले राज्य परत मिळवण्यात, राज्याची नवी घडी बसवण्यात, आपले लष्करी सामर्थ्य वाढवण्यात आणि चावन्दला नवी राजधानी वसवण्यात खर्च केली. मुघलांच्या आक्रमणाची भीती होतीच, पण प्रत्यक्ष आक्रमण झाले नाही. त्यामुळे त्याला ह्या काळात बरीच

स्वस्थता लाभली. चावन्दा येथेच १९ जानेवारी १५९७ रोजी धनुष्य वाकवताना झालेल्या जखमेमुळे त्याला शांतपणे मरण आले. अबुल फझलच्या इतिहासात याचा केवळ उल्लेखच सापडतो. प्रतापच्या कारकीर्दीचे मूल्यमापन तो करत नाही. ०

## प्रतापच अखेरीस विजय

जवळ जवळ २५ वर्षे अकबर आणि प्रताप एकमेकांसमोर दंड थोपटून उभे होते. या द्वंद्वात अकबराचा हेतू उदात्त असला तरी त्याचे धोरण आक्रमक होते. याच्या उलट प्रतापचे धोरण बचावाचे असून आपल्या राज्यापुरतेच मर्यादित होते. या दीर्घ काळपर्यंत चालू असलेल्या लढ्यात अकबर शेवटी हरला आणि प्रताप विजयी झाला. त्यावेळचा सर्वात बलिष्ठ राजा आपल्या सर्व साम्राज्याची शक्ती पाठीशी घालून प्रतापशी सामना करत होता. तरीसुद्धा न डगमगता प्रतापने शेवटपर्यंत त्याची शरणागती पत्करली नाही. या दोघांमधील सर्वंकष युद्धात आपल्या घराण्याचा अभिमान आणि राज्याचे स्वातंत्र्य या दोनच गोष्टींवर प्रतापची सर्व मदार होती. साम, दाम किंवा दंड यांपैकी कुठल्याच विलोभनांना तो बळी पडला नाही. पहाडी मुलुखात वास्तव्य करीत असताना आपल्या मुलांचे हाल पाहून आपला ध्येयवाद बाजूला ठेवून राण्याने शरणागतीचे पत्र अकबराला लिहून तयार केले. पण बिकानेरचा कवि आणि योद्धा पृथ्वीराज राठोड याने त्याला त्याच्या ध्येयाची जाणीव देताच राण्याने ते पत्र फाडून टाकले, अशी एक वदंता आहे. ती सर्वस्वी खोटी असून या गोष्टीला इतिहासात कोणताही आधार सापडत नाही. सर्व हिंदुस्थानात एकछत्री राज्य स्थापण्याच्या अकबराच्या प्रयत्नाला हातभार न लावण्यात प्रतापने फार मोठी चूक केली असा एक विचार-प्रवाह हल्ली दिसून येतो. * केवळ 'हो' किंवा 'नाही' या दोन शब्दांत या प्रश्नाचे उत्तर देता येणे शक्य नाही. त्यावेळच्या इतिहासाचे जुजबी

---

० प्रतापचा मुलगा अमरसिंग याने राण्याला विषबाधा केली अशी शंका अबुल फझल घेतो, पण ती निरर्थक वाटते. (ऐने अकबरी भाग–३ पान ७१७). आपल्या जहांगीरच्या चरित्रात (प्रत ३ पाने १९१–९२) वेणीप्रसाद यांनी प्रतापच्या मृत्यूची हकीकत टॉडने लिहिली तशीच दाखल करून घेतली आहे. पण ती सत्याला धरून नाही. चावंद येथील नव्या राजवाड्यात राण्याला मृत्यू आला. गरीब झोपडीत वास्तव्य करण्याची आता त्याला गरज नव्हती.

* जी. एन्. शर्मा – Mewar & the Moghul EmPire, page 121. R. Q. Tripathi Rise & Fall of the Moghul Empire Volume. 1 page 78 and pages 223 to 225.

अवलोकन आणि आधुनिक पद्धतीने त्यावेळच्या घडामोडींचे मूल्यमापन, यामुळे प्रतापविषयी ही समजूत झालेली दिसते. खरी गोष्ट अशी आहे की, राण्याच्या असहकारास त्याच्यापेक्षा अकबरच जास्त जबाबदार होता. कारण राण्याने आपल्या दरबारात येऊन हजेरी दिली पाहिजे, हा आपला हट्ट अकबराने शेवटपर्यंत चालू ठेवला. इ. स. १५६७–६८ मधल्या चितोडच्या वेढयाच्या वेळी आणि त्यानंतर बादशहाची चार शिष्ठमंडळे आली, तेव्हासुद्धा बादशहाच्या दरबारात हजर न राहण्याचा आपला निश्चय मेवाडच्या राजाने स्पष्ट केला होता. बादशहाच्या सर्व वकिलांचे स्वागत करून प्रतापने त्यांना मानाचे पोषाख वगैरे अर्पण केले; आणि अकबराच्या साम्राज्यात दाखल होण्यामुळे होणारे फायदे आणि तसे न करण्यात प्रतापची झालेली चूक याबद्दल डॉ. त्रिपाठींनी विस्ताराने लिहिलेले आहे. या बाबतीत प्रतापची भूमिका किती योग्य होती आणि त्याचा आधुनिक लेखकांनी कसा विपर्यास केला आहे, हे मी माझ्या एका लेखात दाखवून दिले आहे. (J. I. H. April 1961.) १५७२ ते १५७६ या काळात बादशहाशी सलोखा करण्यास राणा तयार होता पण ते एका अटीवर. ती अट म्हणजे मुघल दरबारात स्वत: हजर न होण्याची. १५७६ मधील हळदीघाटीच्या लढाईनंतर त्याच्या या भूमिकेत एक महत्त्वाचा फरक झाला. ' काय वाटेल ते होवो, मुघलांचे वर्चस्व मी मान्य करणार नाही ' अशी भूमिका राण्याने आता घेतली. प्रतापच्या या दोन भूमिकांतील फरक आणि त्याचे महत्व आधुनिक लेखकांना कळलेले दिसत नाही. त्याने आपल्या थोरल्या मुलाला आग्र्याला पण पाठविले, हे अबुल फझलसुद्धा मान्य करतो. अकबराच्या हट्टीपणामुळे या प्रदीर्घ लढाईला सुरुवात होऊन जहांगिरने अमरसिंग राजा झाल्यावर मेवाडची ही मागणी मान्य केल्यावरच या झगडयाचा शेवट झाला. आपल्या राज्यातील सर्व धर्मांच्या लोकांना समबुद्धीने वागवून विकासाचे सर्व मार्ग सगळ्या जमातींना सारखेच खुले ठेवण्याचे अकबराचे धोरण जर मुघल अमदानीत अव्याहत चालू राहिले असते, तर राण्याने आपल्या संकुचित मनोवृत्तीने देशाच्या ऐक्यात एक मोठी धोंड उभी केली हे म्हणणे कदाचित् योग्य ठरले असते. दुर्दैवाने अकबराचे उदार धोरण पुढील मुघलांच्या राजवटीत टिकले नाही. जहांगीरने त्याचा अर्धवट पुरस्कार केला. शहाजहानचा कल अकबरापूर्वीच्या धोरणाकडे दिसून येतो. औरंगजेबाने तर हे धोरण अजिबात सोडून देऊन इस्लामी वर्चस्वाखाली हिंदुस्थानात एक इस्लामी साम्राज्य उभे करून हिंदू धर्माचा छळ करण्याचे धोरण चालू केले. एकंदरीत पाहाता अकबराचे निधर्मी राज्य स्थापण्याचे धोरण जास्तीत जास्त ८० वर्षे टिकून राहिले; आणि अकबराच्या वेळी सुद्धा हिंदू आणि मुसलमान यांची मूल्ये आणि विचारधारा अलगच राहिल्या. अकबराला येऊन मिळालेले जवळ-

जवळ सर्व हिंदू राजे सरते शेवटी प्रतापचे धोरण स्वीकारून औरंगजेबाला विरोध करण्यास तयार झाले. अकबराच्या उदार धोरणाच्या शाश्वतीबद्दल भरवसा नसल्यामुळे मुघल दरबाराबाहेरील सर्व हिंदु समाज राणा प्रतापशी सहमत होता. संस्कृत, राजस्थानी, हिंदी आणि क्वचित गुजराथी साहित्यातून याविषयी आढळणाऱ्या उल्लेखांवरून हे सिद्ध होते. केवळ एक वीर पुरुष म्हणूनच नव्हे तर हिंदूंची प्रतिष्ठा आणि मान राखणारा अजिंक्य योद्धा म्हणून राणा प्रतापचे स्मरण लोकांना राहिले आहे. प्रतापचा मुलगा अमरसिंग गादीवर आल्यावर मेवाडचे स्वातंत्र्य एवीतेवी नष्ट झालेच तेव्हा, प्रतापने १५७२ सालीच मांडलिकत्वास कबुली दिली असती तर त्यावेळी झालेली प्रचंड हानी वाचली असती हे म्हणणे वस्तुस्थितीला धरून नाही. १६१५ साली आपल्या स्वाभिमानास धक्का लागू न देता अमरसिंगने सुचविलेल्या तहाच्या अटी जहांगीरने मान्य केल्या, याचे कारण राणा प्रतापने आणि त्याच्या नंतर १८ वर्षे अमरसिंगने मुघल सत्तेशी निर्धाराने दिलेला लढा हेच आहे. अंबर, जोधपूर, बिकानेर, जयसलमेर आणि डुंगरपूर इत्यादि रजपूत राजघराण्यांपेक्षा मेवाडला मिळालेले अधिक मानाचे स्थान याच्या मुळाशी मेवाडच्या राजांचा अपूर्व स्वार्थत्याग होता, यात बिलकूल शंका नाही. अतुल स्वार्थत्याग करून राणा प्रतापने जन्मभर अकबराला कडवा विरोध केला. भारताच्या अमर तेजाचे आणि परंपरागत वैभवाचे रक्षण करून ते वैभव नष्ट करू पाहाणाऱ्यांचा तीव्र विरोध करणारा असामान्य पुरुष म्हणून प्रतापचा उल्लेख करतात तो उगीचच नाही.*

० ० ०

* विसाव्या शतकात देखील असंख्य लोक प्रतापला आपल्या जीवितकार्याचे स्फूर्तिस्थान मानतात. हळदीघाटीची यात्रा करून तिथल्या खिंडीतली पिवळी माती मोठ्या आदराने आपल्या कपाळाला लावून घेणारे हजारो लोक आजपण सर्वत्र दिसतात. चितोडचे नांव ऐकताच अंगावर कृतज्ञतेचे रोमांच उभे राहतात आणि ज्यांच्या पूर्वजांनी स्वातंत्र्यासाठी अपूर्व लढा दिला त्या मेवाडच्या लोकांबद्दल भारतात सगळीकडे प्रेमादराची भावना दिसून येते.

# प्रकरण ११ वे

# आत्मनिरीक्षण आणि शांतीकडे वाटचाल

## अकबराच्या आयुष्यात महत्त्वाचे परिवर्तन

हळदीघाटी आणि बंगालच्या विजयानंतर ( इ. स. १५७६ ते १५७९) अकबराचे विचार, वर्तणूक आणि धोरण यात हळूहळू होणारा फरक स्पष्टपणे दिसू लागतो. तसे पाहिले तर याची सुरुवात जानेवारी, फेब्रुवारी १५७३ मध्ये किंवा तत्पूर्वीच झाल्याचे दिसून येते. हिंदू, जैन, झोरास्ट्रियन आणि खिरस्ती धर्मगुरूंचा निकट सहवास घडल्यामुळे एकंदर मानवाचे जीवन आणि त्याचे भवितव्य याबद्दल अकबराचे विचार पुष्कळच प्रगल्भ झाले होते. त्यांनी सांगितलेल्या गोष्टी नुसत्याच ऐकून सोडून न देता प्रत्यक्ष आचरणात आणण्याचा प्रयत्न केल्यामुळे अकबराचा स्वभाव पार बदलून गेला. हा त्याच्या आयुष्यातील फार मोठ्या परिवर्तनाचा काल होता, असे म्हणण्यास हरकत नाही.

## शहा मन्सूरला वजीरकीची वस्त्रे

इ. स. १५७६ च्या अखेरीस अकबराने ख्वाजा शहा मन्सूर शिराझी याला आपला वजीर नेमले. सामान्य कुटुंबात जन्मलेला शहा मन्सूर याने आपल्या नोकरीची सुरुवात बादशहाच्या अत्तरखान्यात एक कारकून किंवा हिशेबनीस म्हणून केली होती. तेथे त्याचे नीट जमले नाही असे दिसते. कारण मुख्यमंत्री मुझफ्फर खान याच्याशी न पटल्यामुळे त्याला नोकरीवरून कमी करण्यात आले. त्यानंतर मुनीमखानच्या अधिपत्याखाली तो बंगालच्या स्वारीवर गेला. मुनीमखानच्या मृत्यूनंतर हिशेबात घोटाळा केल्याबद्दल तोडरमलने त्याला बेड्या घालून कैदेत ठेवले होते. कोणत्याही वजनदार व्यक्तीचा पाठिंबा नसतानासुद्धा अकबराने त्याची लायकी ओळखून त्याला दरबारात बोलावून घेतले आणि नोव्हेंबर १५७६ मध्ये त्याला वजीरकीची वस्त्रे दिली. आर्थिक बाबींची त्याला चांगली माहिती होती. वजीराचे कामसुद्धा त्याने चांगल्या तऱ्हेने केले; पण शहाणपणा आणि धूर्तता कमी असल्यामुळे त्याच्या कारकीर्दीत सरकारचे नाव बद्दू झाले. शिवाय त्याला कोणत्याच व्यक्तीचा किंवा पक्षाचा पाठिंबा नसल्यामुळे त्याची नेमणूक लोकांना आवडली नाही.

## खानदेशवरच्या मोहीमेतील अपयश

गादीवर आल्यानंतर लवकरच अकबराने दक्षिण प्रांत जिंकून घेण्याचे ठरविले होते. १५६४ साली माळव्यामध्ये बंडखोर अबदुल्लाखान उझबेक याचे पारिपत्य करण्यात गुंतलेला असतानाच अकबराने खानदेशचा राजा मीरन मुबारक शहा याच्याशी संपर्क साधून सप्टेंबर महिन्यात त्याच्या मुलीशी लग्न केले होते. इ. स. १५७२ मध्ये गुजराथच्या स्वारीवर असतानाच खानदेश आणि दक्षिणकडील इतर राज्ये जिंकून घेण्याचा अकबराने निश्चय केला होता. पण उत्तरेकडील पुष्कळसा भाग अजून त्याच्या सत्तेखाली आलेला नसल्यामुळे त्याने आपला हा बेत पुढे ढकलला. अगोदर हातातले काम वेगळे करण्याची अकबराची रीत होती असे अबुल फझल म्हणतो ते खरेच आहे. तरीसुद्धा यावेळी खानदेश-मध्ये एक शिष्टमंडळ पाठवून तिथला नवा राजा अलीखान याच्याशी अकबराने मैत्रीचे संबंध जोडले. मुघल दरबाराशी मैत्री म्हणजे आपल्या स्वातंत्र्याला धोका हे समजून राजा अलीखानने अकबराकडे वार्षिक नजराणे पाठविण्याचे हळूहळू बंद केले. त्यासाठी इस. १५७६ च्या अखेरीस अकबराने शहाबुद्दिन अहमद खान याला खानदेशच्या स्वारीवर पाठविले. त्याच्या हाताखाली मोठे सैन्य व कुतुबुद्दिन महंमद खान, सुजाता खान, बाकी खान, नौरंग खान, मिर्झा निजात खान, अली दोस्त खान इत्यादि अधिकारी होते. बिहारमधून परत आलेल्या शहाबाझ खान मीर बक्षी याला सैन्याला लागणारी सर्व सामुग्री गोळा करण्याचा हुकूम देण्यात आला. राजा अली खानला खानदेशच्या किल्ल्यात पिटाळून देऊन नंतर शहाबुद्दिनने किल्ल्याला वेढा दिला. किल्ला पडण्याच्या बेतात होता; एवढ्यात मुझफ्फर हुसेन मिर्झा याने गुजराथवर स्वारी केल्याची बातमी शहाबुद्दिन अहमदखानला मिळाली. (तबकत–इ-अकबरी मध्ये याचा कुतुबुद्दिन महंमद खान असा उल्लेख आहे.) ही बातमी येताच राजा अलीखानकडून बादशहाच्या नावे मोडी खंडणी वसूल करून आणि वेढा उठवून शहाबुद्दिन गुजराथला परत गेला. अशा तऱ्हेने खानदेश-विरुद्ध पहिली मोहीम असफल झाली. तरीसुद्धा हिंदुस्थानातल्या मुघल साम्राज्याच्या इतिहासातली ही एक महत्त्वाची घटना समजली पाहिजे. अकबराचे मांडलिकत्व कबूल करणारा दक्षिणेकडील पहिला राजा म्हणजे खानदेशचा राजा अलीखान. या घटनेमुळे दक्षिण हिंदुस्थान जिंकून घेण्याचा मार्ग अकबराला खुला झाला.

## गुजराथमधील मुझफ्फर हुसेनच्या बंडाळीचा मोड

इ. स. १५७४–७५ मधल्या दुष्काळामुळे आणि रोगराईमुळे पुढे पुष्कळ दिवस गुजराथचा कारभार विस्कळित झाला होता. येथील सुभेदार वजीरखान

हा सामान्य प्रतीचा माणूस असून गुजराथमधील चमत्कारिक परिस्थिती ताळ्यावर आणण्याचा वकूब त्याच्यात नव्हता. तेथील व्यवस्था नीट लावून देण्यासाठी अकबराने तोडरमलची खास रवानगी केली. सुलतानपूर, नंदुरबार, बडोदा; भडोच आणि चांपानेर या गावांना भेट देऊन तिथल्या जमाबंदीची व्यवस्था तोडरमलने नीट लावून दिली; आणि नंतर अहमदाबादला येऊन तो राज्यकारभारात सुधारणा करण्याकडे लक्ष घालू लागला. १५७३ सालच्या जानेवारी महिन्यात कामरानची मुलगी गुलरुख बेगम ही आपला मुलगा मुझफ्फर हुसेन मिर्झा याला घेऊन दक्षिणेत निघून गेली होती. मुझफ्फर हुसेन मिर्झा जानेवारी १५७३ मध्ये परत गुजराथमध्ये आला आणि त्याने बडोदा सहज काबीज केले. यावेळी त्याचे वय अदमासे २० वर्षांचे असून बादशहाविरुद्ध असलेले पुष्कळ लोक त्याच्या निशाणाखाली एकत्र झाले होते. वजीरखान घाबरून जाऊन अहमदाबादलाच बसून राहण्याच्या विचारात होता. तोडरमल यावेळी पाटणला होता. त्याने शत्रूवर चाल करून जाण्याचा आग्रह धरल्यामुळे वजीरखान तोडरमलबरोबर बडोद्याकडे निघाला. हे पाहताच मुझफ्फर हुसेन युद्ध न करताच प्रथम खंबायतला आणि नंतर जुनागडला निघून गेला. दुलाका येथे झालेल्या हातघाईच्या लढाईत तोडरमलच्या खास प्रयत्नामुळे मिर्झाचा दणदणीत पराभव होऊन तो जुनागडकडे पुन: पळून गेला. १५७७ साली सप्टेंबरच्या पहिल्या आठवड्यात तोडरमल दरबारात परत आला.

तोडरमलची पाठ फिरताच मुझफ्फर जुनागडहून बाहेर पडला आणि खंबायतवर छापा घालून त्याने तेथील व्यापाऱ्यांकडून जबरदस्तीने पुष्कळ लूट गोळा केली. यावेळी वजीरखानच्या सैन्यात पुष्कळ असंतोष माजला होता. त्यामुळे शत्रूला तोंड न देता तो अहमदाबादला परत आला आणि तेथे त्याला मिर्झाने घेरून टाकले. किल्ल्यावर चढाई करत असताना मिर्झाचा मुख्य सल्लागार मीर अली हा गोळी लागून ठार झाला; त्यामुळे धीर खचून जाऊन शत्रूने अहमदाबादचा वेढा उठवला आणि मिर्झा दक्षिणेत पळून गेला. वजीरखान हा नालायक सुभेदार आहे असे दिसून आल्यामुळे त्याला इदारला पाठवून देण्यात आले व शहाबुद्दिन अहमदखानची माळव्याहून गुजराथमध्ये बदली करण्यात आली.

खानदेशामध्ये राजा अलीखानने मुझफ्फर हुसेन खानला पकडून कैदेत ठवले. नंतर अकबरच्या सांगण्यावरून त्याला फत्तेपूर सिक्रीला पाठवून देण्यात आले. तेथे तो काही दिवस कैदेत होता. एप्रिल १५७९ मध्ये अकबराने त्याचे गुन्हे माफ करून त्याची सुटका केली; आणि त्याला चांगली वागणूक दिली.

एवढेच नाही तर नंतर काही वर्षांनी बादशहाने आपली थोरली मुलगी सुलतान खानीम हिचे त्याच्याशी लग्न लावून दिले.

## राजपुत्रांना मनसबदारी

मनसबदारीची पद्धत अकबराने १५७५ सालीच सुरू केली होती. तोपर्यंत सर्वांत मोठी मनसबदारी पाच हजारांची असे ती आता दहा हजारांची करुन अकबराने युवराज सलीम याला दहा हजारी मनसबदार केले. तसेच राजपुत्र मुराद याला सात हजारांची आणि राजपुत्र डॅनीयल याला सहा हजारांची मनसबदारी देण्यात आली. याचवेळी खाजगीकडील बारा हजारांचे सर्व घोडदळ (आबाटी फौज) हे पण सलीमच्या हाताखाली देण्यात आले.

## तोडरमलचे देव हरवतात :

## अकबर मनोहरनगरचा पाया घालतो.

अजमेरची वार्षिक यात्रा संपवून अकबर १५७७ च्या ऑक्टोबरमध्य पंजाबला जाण्यास निघाला. वाटेत मरहोट येथे कछव्याचा प्रसिद्ध राजा रुपसीचा भाऊ नारायणदास याच्या घरचा पाहुणचार घेऊन अकबराने त्याचा मोठा सन्मान केला. ६ नोव्हेंबर रोजी तो अंबरला पोहोचला. एका ठिकाणाहून दुसऱ्या ठिकाणी बादशाही छावणी बदलताना राजा तोडरमलचे पूजेतले देव कुठेतरी गहाळ झाले. राजा तोडरमल मोठा धार्मिक असून देवाची पूजा केल्याशिवाय तो काही खातपीत नसे. देव हरवल्यामुळे अत्यंत कष्टी होऊन त्याने खाणेपिणे सोडून दिले आणि त्याची झोप पण उडाली. अकबराने खूप समजूत घातल्यावर तोडरमल थोडासा शांत झाला आणि आपल्या कामात लक्ष घाल लागला. अंबरला असताना अकबराने एक जुनेच पण ओसाड झालेले शहर पुनः वसवण्याचे ठरवले; व २ नोव्हेंबर रोजी स्वतःच्या हाताने या शहराचा पाया घातला. येथे एक किल्ला आणि इतर इमारती बांधण्याचा हुकूम आपल्या शिल्पकारांना देऊन राय लून करण याचा मुलगा मनोहरदास याचे नांव या शहरास देण्याचे अकबराने ठरवले. मनोहरनगर हे जयपूरच्या ईशान्येस २८ मैलांवर असून ते आता मनोहरपूर या नावाने ओळखले जाते.

## आकाशात धूमकेतू दिसतो

नोव्हेंबरच्या पाच तारखेस सूर्यास्तानंतर एक लांब शेपटीचा धूमकेतू आकाशात दिसू लागला. हा पुष्कळ दिवस दिसत होता. याच वेळी इराणचा राजा

तह्मास्प याचा मुलगा शहा इस्माईल साफावी हा मरण पावला. त्याचा मृत्यू धूमकेतुमुळे झाला असे लोकांना वाटले.

## टाकसाळीत सुधारणा

जयपूरच्या ईशान्येस ६० मैलांवर कोटपुतळी येथे दरबार असताना २ डिसेंबरला अकबराने सुजातखानला बिहारचा मुख्य अधिकारी नेमले आणि राज्याच्या टाकसाळीच्या कारभारात सुधारणा घडवून आणण्यासाठी मुझफ्फर खान, तोडरमल आणि शहा मन्सूर या तीन अर्थ–तज्ज्ञांची खास समिती नेमली. अगदी सामान्य प्रतीच्या अधिकाऱ्यांकडे – चौधरींकडे – यापूर्वी टाकसाळींची व्यवस्था सोपवलेली होती. शिरीन कलम (Sweet Pen) ही पदवी मिळालेल्या ख्वाजा अब्दुल शमदच्या देखरेखीखाली या टाकसाळींची व्यवस्था आता सोपविण्यात आली. त्याचे कारभाराचे मुख्य ठिकाण फत्तेपूर सिक्रीला ठेवले. निरनिराळ्या प्रांतातील मुख्य शहरातल्या टाकसाळींवर उच्च अधिकाऱ्यांची नेमणूक करण्यात आली. त्या अनुसार लाहोरची टाकसाळ मुझफ्फरखानच्या हाताखाली, तंड्याला असलेली बंगालची टाकसाळ तोडरमलच्या हाताखाली, जौनपूरची टाकसाळ शहा मन्सूरच्या हाताखाली, अहमदाबादची इमाद उद्दिन हुसेन याच्या हाताखाली आणि पाटण्याची आसफखानच्या हाताखाली देण्यात आली. नाण्यांचे आकार, वजन आणि किंमत यांतही फेरफार करण्यात आले. याच वेळी चौकोनी आकाराचे रुपये पाडण्याचे ठरवण्यात आले.

## युरोपांतील कलाकृती

काम आणि आराम या दोहोंचा समन्वय साधून अकबर दिल्लीमार्गे वाऊली सराईला गेला. तेथे हाजी हबीबउल्ला याने गोव्याहून आणलेल्या काही युरोपांतील कलाकृती त्याने पाहिल्या. त्यात माणसाच्या आकाराचा एक मोठा ऑर्गन असून तो तीन माणसांना एकदम वाजवता येत असे. पोर्तुगीज लोकांचे कसब शिकून घेण्यासाठी अकबराने आपल्याकडील काही कारागीर गोव्याला पाठविले होते. तेथून शिकून आल्यावर नव्याने हस्तगत केलेल्या कलेचे नमुने त्यांनी अकबराला दाखवले. ते पाहून बादशहा फार खूष झाला.

## राजा मधुकर अकबरास शरण येतो.

वीरसिंग देव बुंदेलाचा थोरला भाऊ, ओरछाचा राणा मधुकर याने बंड केल्यामुळे अकबराने सादिकखानला त्याच्या पारिपत्यासाठी पाठवून दिले.

डोंगराळ भागातील दाट जंगलात शिरून सादिकखानने कऱ्हेराच्या किल्ल्याला वेढा दिला. तिथला राजा घोरमन परमानंद परमार हा मधुकरच्या पक्षाचा होता. काही दिवस युद्ध केल्यानंतर परमानंद सादिकखानला शरण आला. नंतर जंगल साफ करून बादशाही फौज ओरछाकडे निघाली. अनेक दिवस मधुकरने बादशाही फौजेला दाद दिली नाही. पण अखेरीस बादशहाच्या प्रबळ सेनेपुढे हार खाऊन तो पहाडी मुलखाच्या आश्रयास निघून गेला. सरतेशेवटी अकबराला शरण जाण्याचे ठरवून तो झेलमच्या तीरावरील भेऱ्या नजीकच्या अकबराच्या छावणीत दाखल झाला (मे १९५७). अकबराने त्याला माफी केली. थोड्या दिवसांनंतर त्याने पुन: एकदा बंडाचा झेंडा उभारला आणि १५९२ सालात मरण येईपर्यन्त त्याने मुघल राज्याला त्रास दिला.

## खान-इ–जहानची सतगावची मोहीम

बंगालचा राजा दाऊद मरण पावल्यावर त्याच्या कुटुंबातली मंडळी आणि त्याचे अनुयायी सतगावला जमा झाले. त्यातला एक अफगाण–माटी या नावाने ओळखला जाणारा–महमदखान खासखेल याने दाऊदच्या खजिन्यातला बराचसा भाग हस्तगत केला होता. तो अकबराला नजर करून त्याच्या नोकरीत शिरावे असा त्याचा बेत होता. हा बेत त्याच्या सहकाऱ्यांना पसंत न पडल्यामुळे दोन्ही पक्षांत यादवी माजून दोघेही फार हतबल झाले. यापुढे सतगावला राहणे धोक्याचे आहे असे वाटून दाऊदची आई नवलाखा आणि त्याच्या कुटुंबातील इतर मंडळी यांनी बादशहाकडे संरक्षणाची याचना केली. बंगालचा सुभेदार खान-इ-जहान मुर्शिदाबाद जिल्ह्यातील ग्वास या गावी तिला सामोरा गेला. इतके होऊनसुद्धा बंगालमधील अशांत वातावरण नाहीसे झाले नाही.

## अब्दुल नबीची पदच्युती

राज्याचा मुख्य सदर, अब्दुल नबी याने जवळजवळ १० वर्षे बादशहाच्या मनावर इतका पगडा बसविला होता की त्याच्या ताब्यातील धर्मादाय खात्या-शिवाय इतर राज्यकारभारातही अब्दुल नबीचा पुष्कळ हात असे. १५७८ सालच्या जानेवारी महिन्याच्या अखेरीस बादशहाच्या मर्जीतून तो उतरला. अधिकारावर असताना त्याच्याइतकी सत्ता दुसऱ्या कोणत्याच सदरला नव्हती, असे बदायुनी म्हणतो ते खरे आहे. आपल्याकडे आलेल्या याचकांना अब्दुल नबीने जितके तनखे दिले तितके दुसऱ्या कोणीही दिले नसावेत. १५७५ सालापासूनच शेखची कर्तबगारी, स्वामीनिष्ठा आणि सचोटी याबद्दल अकबराच्या मनात शंका येऊ

लागली होती. इबादतखान्यातील त्याची उथळ आणि आप्पलपोटी गैरवागणूक आणि बादशहाच्या अनेक लग्नांबाबत त्याचे दुटप्पी धोरण याचा अकबराला फार राग आला होता. १५७६ साली अब्दुल नबीने मथुरेच्या एका ब्राम्हणाला; महमद पैगंबराबद्दल अनुदार उद्‌गार काढल्याच्या निमित्ताने, बादशहाची परवानगी न घेता ठार केले होते. या बाबतीत इतर धर्मगुरूंचा सल्ला घेऊन, ब्राम्हणाला अब्दुल नबीने दिलेली शिक्षा अत्यंत गैरवाजवी व अन्यायाची होती असे अकबराने ठरवले. अब्दुल नबीचे हे कृत्य अकबर कधीच विसरला नाही आणि त्याबद्दल त्याला क्षमा पण केली नाही. याचवेळी धर्मादाय खात्यातील अफरातफरीची काही प्रकरणे बादशहाच्या नजरेस आली. अजमेरहून पंजाबला जात असताना या प्रकरणांची गुप्त चौकशी करून रोहटक जिल्ह्यातल्या गोहाना गावच्या काही खातेदारांची अकबराने प्रत्यक्ष मुलाखत घेतली. अब्दुल नबी विरुद्ध केलेले आरोप सिद्ध झाले (जानेवारी १५७८). मुख्य सदरचे अधिकार तावडतोब कमी करून बादशहाने राज्यातल्या प्रत्येक प्रांतासाठी निरनिराळे सदर नेमले. त्यांच्या कामावर साधारण लक्ष ठेवण्यापलिकडे मुख्य सदरला आता फारसे काम राहिले नाही. मौलाना अब्दुला सुलतान पुरी याची पंजाबच्या सदरेवर तावडतोब नेमणूक करून इतर प्रांतांसाठी योग्य माणसांची नावे अकबराने मागविली.

इ. स. १५७८ मध्ये अब्दुल नबीला मुख्य सदरच्या जागेवरून कमी करण्यात आले आणि २० डिसेंबर १५७८ रोजी त्या जागेवर, मक्केहून परत आलेल्या सुलतान ख्वाजाची नेमणूक करण्यात आली. १५७९ च्या अखेरीस शेखला त्याच्या इच्छेविरुद्ध मक्केला पाठवून देण्यात आले. हिंदुस्थानात परत आल्यावर १५८३ साली तो संशयीत रीतीने मृत्यु पावला. *

---

* तबकत-इ- अकबरी भाग २ पान २३३-३४, अकबरनामा भाग ३ पाने २६३, २७८. मक्केला जाणाऱ्या यात्रेकरूंची देखभाल करण्यासाठी आणि खुद्द मक्केतल्या आणि मदिनेतल्या गोरगरिबांमध्ये दानधर्म करण्यासाठी अब्दुलनबी आणि मखदुम उलमुल्क यांची त्यांच्या मर्जीविरुद्ध ' मीर हाज ' म्हणून नेमणूक करण्यात आली ( १५७९ ). या दोन लोभी आणि खाबू मुल्लांनी राहिलेले आयुष्य मक्केत काढावे असा अकबराचा विचार होता. पण बादशहाची परवानगी न घेताच दोघे हिंदूस्तानात परत आले. मखदुम उलमुल्क नंतर अहमदाबादला मरण पावला (१५८२). अबदुलनबीला अबुल फझलच्या ताब्यात देण्यात आले. अकबराच्या हुकुमानुसार १५८३ मधे त्याला ठार मारण्यात आले. (इक्बालनामा)

## अकबराच्या धार्मिक विचारात क्रांतीकारी बदल

इ. स. १५७६–७७ मध्ये अकबराचे वैयक्तिक जीवन आणि धार्मिक विचार यांमध्ये अत्यंत महत्त्वाचा फरक झालेला दिसून येतो. या काळात सर्वांबद्दल समभाव आणि धार्मिक बाबतीत उदार धोरण यांकडे त्याचा अधिकाधिक कल झालेला दिसून येतो. अनेक देशांतल्या आणि अनेक पंथांतल्या विद्वानांचा आणि धर्मगुरूंचा निकट संबंध आणि त्याची स्वतःची अंतर्मूख दृष्टी यांचा हा परिणाम असावा. इ. स. १५७८ च्या फेब्रुवारीमध्ये मांसाहार निसर्गनियमाविरुद्ध आहे असे आपले मत बोलून दाखवण्यास त्याने सुरुवात केली. यापूर्वीच काही दिवस शुक्रवारी मांस खाण्याचे त्याने सोडून दिले होते. त्याचप्रमाणे इतर काही दिवशीही मांसाहार वर्ज्य करावा असे त्यास आता वाटू लागले. अध्यात्मिक गोष्टींचे चिंतन करून 'मी आणि माझे' यामुळे उत्पन्न होणाऱ्या मायाजालाबद्दल तो बोलू लागला. जगाच्या उत्पत्तीमागे एक शाश्वत तत्त्व असून ते शाश्वत तत्त्व म्हणजेच ईश्वर आहे आणि तो ईश्वर विश्वात सर्वत्र भरून राहिला आहे, असे त्याला वाटू लागले. अबुल फझल म्हणतो, "विविधतेमागे दडून असलेली एकात्मतेची ज्योत पाहण्याची व समाजात राहूनही समाजापासून अलिप्त राहण्याची शक्ती असलेला (बादशहा) धन्य होय. तसेच साधुवृत्तीने राहून राजदंड हातात धरणाऱ्या बादशहाच्या सर्वसंग्राहक मनोवृत्तीचे कौतुक करावे तेवढे थोडेच आहे.' १५७८ च्या मार्च महिन्यात शिकारीहून लाहोरच्या छावणीत परत येता येता अकबर वरील विचारात गढून गेलेला असताना वाटेत घोड्याने ठोकर खाल्ल्यामुळे तो जमिनीवर पडला. हा 'देवाने पाठवलेला संदेश' आहे असे मानून अकबर पुष्कळ वेळ 'ध्यानमग्न होऊन बसला होता.'

झेलम नदीजवळील भेरा गावाजवळ २२ एप्रिल १५७८ रोजी अकबराने गमघा करून शिकारीस जाण्याचे ठरवले. नदी ओलांडून जाऊन, ५० मैल परिघातली वन्य श्वापदे हाकारीत आणून त्यांना एका कोंडीत पकडावे असे त्याने आपल्या सरदारांना व अधिकाऱ्यांना सांगितले. हे सर्व करावयास चार दिवस लागले. शिकारीला सुरुवात झाली; पण एवढ्यात एखादा साक्षात्कार झाल्यासारखे होऊन अकबराच्या नेहमींच्या वागणुकीत आणि चेहेऱ्यात एकदम फार मोठा बदल दिसू लागला. शिकार बंद करण्यास सांगून हातात सापडलेल्या श्वापदांना न मारता सोडून देण्याचा हुकूम अकबराने दिला. देशी पद्धतीने वाढवलेले आपले लांब केस त्याने कापून टाकले; आणि फार मोठ्या रकमेचा दानधर्म केला. ज्या फळझाडाजवळ त्याला हा साक्षात्कार झाला, त्याच्या भोवती एक बगीचा करून तेथे एक इमारत बांधावी असे त्याच्या मनात आले. त्याच

दिवशी नदी ओलांडून तो आपल्या छावणीत परत आला. अकबराच्या मन:स्थितीतला हा फरक कशामुळे झाला हे सांगणे कठीण आहे. ध्यानमग्न सुफी आणि योगी यांना होणाऱ्या ब्रह्म – साक्षात्कारासारखा हा काहीतरी प्रकार असावा. बादशहाच्या छावणींजवळच असलेला महंमद अरीफ कंदाहारी 'बादशहाला प्रत्यक्ष ईश्वरी साक्षात्कार झाला' असे म्हणतो. (इलहामात –इ– घैबी वारीद शुद). जेथे हा साक्षात्कार झाला ती जागा 'छोटी मक्का' (मक्का – इ – खुर्द) या नावाने ओळखली जाऊ लागली. अबुल फझल लिहितो, "शोधत असलेले सापडल्यामुळे अकबराची दृष्टी दिव्य झाली आणि त्याची ब्रह्मानंदी टाळी लागली. ईश्वराची प्रत्यक्ष भेट झाल्याची चिन्हे दिसू लागली. मुक्तीच्या शोधात असलेल्या साधु-पुरुषांना जे सापडले नाही त्याचा बादशहाला साक्षात्कार झाला.' एका दिव्य अनुभूतीची प्राप्ती होऊन बादशहाला ईश्वराचे प्रत्यक्ष दर्शन घडले असा सर्वांचा समज झाला. आपल्या मुलाच्या प्रकृतीबद्दल मोठी चिंता वाटून मरीयम मकानी त्याला भेटण्यासाठी फत्तेपूर सिक्रीहून भेऱ्याच्या छावणीत आली. दूरवर सामोरे जाऊन अकबराने तिचे स्वागत केले.*

आपल्याला आलेल्या या दिव्य अनुभवाबद्दल ईश्वराचे आभार मानण्यासाठी अकबराने फार मोठा दानधर्म केला. फत्तेपूर सिक्रीचा अनूप तलाव (६०X६०X९ फूट खोल) सोन्याचांदीच्या व तांब्याच्या नाण्यांनी भरून टाकण्याचा आदेश त्याने आपल्या अधिकाऱ्यांना पाठविला. या नाण्यांची किंमत एक कोट रुपये झाली. राजधानीला परत आल्यावर तीन वर्षांच्या अवधीत अकबराने ही रक्कम निरनिराळ्या माणसांमध्ये वाटून टाकली. ही रक्कम वाटण्याचे काम १५७८ साली सुरू झाले. "सोने, चांदी आणि तांब्याची नाणी आपल्या मुठीत भरून घेऊन अकबर ती सर्व तऱ्हेच्या लोकांना देत असे." याचवेळी निरनिराळ्या ठिकाणी स्वखर्चाने बादशहाने गरीब बेघर लोकांच्यासाठी धर्मशाळा बांधून अन्नक्षत्रे उघडली. २ जुलै १५७९ रोजी फत्तेपूर सिक्रीच्या पोलो मैदानावर जमलेल्या एक लाख लोकांना व बायका मुलांना त्याने प्रत्येकी एक एक नाणे (चांदीचे ?) दिले. त्यावेळी तेथे इतकी अलोट गर्दी लोटली होती की, ८० लोक गर्दीत चेंगरून मेले. नाणी वाटण्याचे काम बादशहाच्या खास देखरेखीखाली झाले.

---

* या प्रसंगानंतर अकबर कसा वागला याचे चटकदार वर्णन दलपत याने आपल्या 'दलपत विलासात' केले आहे.

काबूलवर स्वारी करण्याचा आपला बेत सोडून देऊन मिर्झा हकीमची समजूत काढण्यासाठी त्याची सख्खी बहीण साकीना बेगम हिला अकबराने काबूलला पाठविले; आणि दोघांमधील सलोख्याचे संबध दृढ होण्यासाठी मिर्झा हकीमने आपल्या मुलीचे राजपुत्र सलीमशी लग्न लावून द्यावे असे त्याने सुचविले. नंतर दिल्ली आणि मथुरेच्या मार्गाने अकबर राजधानीला परत आला. येता येता त्याने अजमेरला पुन: एकदा भेट दिली. एका चपळ घोड्यावर स्वार होऊन तो मथुरेहून निघाला आणि रोजी ५० मैलांची मजल करीत करीत चार दिवसांत अजमेरला ख्वाजाच्या दर्शनासाठी येऊन पोहोचला. तेथल्या उरुसात एक दिवस भाग घेऊन (८ सप्टेंबर) फक्त नऊ शरीर–रक्षक बरोबर घेऊन ११ सप्टेंबर १५७८ रोजी एक वर्षानंतर तो फत्तेपूर सिक्रीला परत आला. भेऱ्याला झालेल्या साक्षात्कारामुळे त्याच्या शरीरप्रकृतीला कुठलाही अपाय झाला नाही व शिकार, खेळ आणि धाडसाची कामे यावद्दलची त्याची आवड पण कमी झाली नाही.

## धर्मचर्चेस पुन: सुरुवात.

अकबर राजधानीत स्वत: हजर नसल्यामुळे धर्मसभेत होणाऱ्या बैठकी जवळ जवळ वर्षभर बंद पडल्या होत्या. राजधानीला परत आल्यावर ३ ऑक्टोबर १५७८ रोजी अकबराने धर्मसभा पुन: भरवण्याचे ठरवले; आणि त्यासाठी ३ ऑक्टोबर १५७८ रोजी हिंदू, जैन, ख्रिश्चन, यहुदी, सेबियन आणि झोराष्ट्री अशा सर्व धर्मांच्या लोकांना आमंत्रण दिले. "सर्व धर्मांची मूलतत्त्वे तपासून त्याबाबत सर्व पुरावे गोळा करून, त्यांतल्या चांगल्या वाईट गोष्टी निराळ्या काढाव्यात" असा अकबराचा मुख्य हेतू ह्या सभा बोलावण्यात होता. दर गुरुवारी रात्री निरनिराळ्या धर्मगुरूंच्या सभा बोलावून अकबर त्यांचे वादविवाद ऐकत असे. बदायुनी म्हणतो, "शिया आणि सुन्नी पंथांतील भेद किंवा इस्लामी कायदेपंडित आणि मौलवी यांमधील वाद एवढ्यावरच ही चर्चा न थांबता इस्लामच्या मूळ तत्त्वावरच येथे आता टीका होऊ लागली." कुराण ईश्वरप्रणित आहे किंवा खोटे, महंमद ईश्वराचा प्रेषित होता किंवा नाही; ईश्वर, पुनर्जन्म इत्यादि विषयांवर कुराणातली मते, याविषयी बहुतेक सर्व मुसलमान धर्मपंथांत एकवाक्यता होती. अकबराच्या धर्मसभांतून आता यावरच टीका आणि चर्चा होऊ लागली. यामुळे सनातनी उलेमांचे धाबे दणाणून गेले. पण ख्रिश्चन धर्मगुरूंच्या हल्ल्याला मुसलमान मौलवींनी एकमुखाने तोंड दिले नाही. उलेमांचे दोन मुख्य पुढारी मखदुम्–उल्–मुल्क आणि अब्दुन् नबी यांच्यात बाचाबाचीला सुरूवात होऊन एकमेकांना शिव्या देण्यापर्यंत त्यांची मजल

गेली. खिजरखान सारवानी आणि मीर हबश यांना त्यांच्या धार्मिक मताबद्दल हकनाक मारून टाकल्याचा आरोप मखदुम् – उक् – मुल्क याने अब्दुन नबीवर केला. हा बापाचे ऐकत नाही आणि त्याला मूळव्याधीचा विकार आहे म्हणून त्याच्याबरोबर प्रार्थना करणे योग्य नाही इतके म्हणण्यापर्यंत त्याची मजल गेली. अशा तऱ्हेने उलेमांच्यात उघड दोन तट पडले आणि एक दुसऱ्याच्या विरुद्ध बाजू घेऊ लागला. यामुळे "सद्वर्तनी (जोहार – इ – नफीस) आणि सत्याचा शोध घेणारा (तालीब हक)" बादशहा फार बुचकळ्यात पडला. उलेमांच्या भांडणाचा फायदा घेऊन हिंदू, ख्रिश्चन आणि झोरेस्ट्रियन धर्मपंडितांनी इस्लामी भ्रामक धर्मसमजुतींवर निर्भयपणे टीका करण्यास सुरुवात केली. सर्व धर्मांची मुख्य तत्त्वे इबादत खान्यातल्या चर्चेवरून समजून घेण्याचा प्रयत्न अकबराने केला. इतकेच नव्हे तर इबादत खान्यात होणाऱ्या चर्चेव्यतिरिक्त इतर दिवशी हिंदू, ख्रिश्चन, पारसी आणि सुफी धर्मगुरूंच्या वैयक्तिक भेटी गाठी घेऊन त्या त्या धर्मपंथातील मते आणि आचार यांची संपूर्ण माहिती अकबराने उपलब्ध करून घेतली.

निरनिराळ्या धर्मांच्या परस्पर योग्यतेबद्दल या सभांतून खूप चर्चा आणि वादविवाद होत असत. शेकडो वर्षे राज्यकर्त्यांचा धर्म असल्यामुळे देशात आणि राजदरबारी इस्लामी धर्माला फार महत्त्वाचे आणि मानाचे स्थान प्राप्त झाले होते. हिंदू आणि जैन धर्मांना मान्यता नव्हती, इतकेच नव्हे तर त्या धर्मांतील लोकांना अगदी हलक्या प्रतीचे मानले जाई. मुसलमानांच्या रोजच्या बोलण्या-चालण्यात हिंदू धर्माचा पाखंड (कुफ्र) असा उल्लेख करण्यात येई. हिंदू आणि जैन धर्मपंडितांना अकबराने इबादतखान्यात आमंत्रण देऊन आपल्या धर्माची बाजू मांडण्यास अवसर दिला, इतकेच नव्हे तर इस्लामी आणि ख्रिश्चन धर्म-पंडितांसमोर आपल्या धर्माचे श्रेष्ठत्व दाखवून देण्याची संधी त्यांना दिली. इतकेच करून तो थांबला नाही, तर इस्लामी धर्मतत्त्वांवर टीका करण्याची मुभा पण अकबराने त्यांना दिली. यामुळे दरबारी लोकांत मोठी खळबळ उडाली. या सर्व वादविवादात अपक्ष पुढाऱ्याची भूमिका घेऊन केवळ सत्य शोधून काढण्याकडे अकबराचा कल असे. या धार्मिक सभांत भाग घेऊन तेथील चर्चा ऐकण्यात अकबर रात्रीच्या रात्री घालवीत असे, असे त्यावेळच्या सर्व जाण-कारांचे अभिप्राय आहेत. सत्य जाणून घ्यावे एवढाच अकबराचा या चर्चेत भाग घेण्याचा हेतू असून वादाच्या भरात रागावून आपली समतोल बुद्धि त्याने कधी ढळू दिली नाही, हे बदायुनी सुद्धा कबूल करतो. अनेक पंथांतले साधू लोक आणि असंख्य विद्वान यांना अतिशय आदराने वागवून त्यांच्या-

बरोबर खाजगीरीत्या अहोरात्र चिंतन आणि संशोधन करण्यात अकबर आपला वेळ घालवीत असे. हंस–क्षीर–न्यायाप्रमाणे प्रत्येक धर्मातील योग्य तत्त्वे बाजूला काढून ती आत्मसात् करण्याचे असामान्य बुद्धिवैभव बादशहाजवळ होते, हे पण बदायुनी कबूल करतो.

या वादविवादात प्रत्यक्ष भाग घेऊन त्याबाबत अध्यक्ष या नात्याने निर्णय देण्याचे काम अकबर स्वत: करीत असे. वादातील आपल्याला चुकीच्या वाटणाऱ्या प्रत्येक मुद्यावर चर्चा करण्यास लावून प्रत्येक प्रश्नावरील आपली मते तो उघडपणे सभेपुढे मांडत असे. उदाहरणार्थ, हिंदूंना बाटवून मुसलमान करणे हे प्रत्येक मुसलमानाचे कर्तव्य आहे, असे इतर मुसलमानांप्रमाणेच त्याचेही सुरुवातीला मत होते, पण इतरांवर बळजबरीने आपला धर्म लादून त्यांना आपल्या धर्मात ओढणे यात धर्माच्या दृष्टीने काहीच फायदा नसून "आपल्या बुद्धीला पटेल त्या धर्माचा स्वीकार करणे यातच माणसाचे हित आहे" अशी आता त्याची खात्री झाली होती. सुंता करणे किंवा प्रार्थनेच्या वेळी जमिनीला डोके लावणे आणि धर्मसूत्रांची (कलिमा) पोपटपंची करणे म्हणजे धर्म नव्हे, असे मत तो आता प्रतिपादन करू लागला. राग, लोभ, लालसा इत्यादि वासना काबूत आणून उत्कृष्ट विचारांची जोपासना करणे हा खऱ्या धर्मभावनेचा पाया आहे, असे तो मानू लागला. माणसाच्या रोजच्या व्यवहारावर योग्य परिणाम करील तोच खरा धर्म, असे सांगून याबाबतीत तो हिंदुधर्माची फार तारीफ करीत असे. धर्मासाठी आपले जीवित, आपली मालमत्ता आणि आपली कीर्ती या आयुष्यातल्या उत्तमोत्तम गोष्टींचे संपूर्ण बलिदान करण्यास हिंदू लोक तयार असतात. परकीय संकट पुढे उभे राहिले असता हिंदू स्त्रिया स्वत: जळून खाक होण्याचे पत्करतात. एक–पत्नी–व्रताचा टेंभा मिरवणाऱ्या ख्रिश्चन मिशनऱ्यांना तो म्हणाला, "स्त्रियांचा मान राखणे ही तुमच्या धर्मातली एक महत्त्वाची बाब आहे असे तुम्ही मानता म्हणून एका माणसाला एकापेक्षा अधिक लग्ने करण्याची परवानगी तुमच्या धर्मात नाही. यामुळे तुमच्या धर्मातल्या स्त्रियांमध्ये धर्माविषयी निष्ठा आणि त्यासाठी प्रसंग पडल्यास प्राणत्याग करण्याची तयारी दिसून आल्यास ते फारसे आश्चर्यकारक वाटण्याची गरज नाही; पण हिंदु धर्मातील स्त्रियांमध्ये ही गोष्ट सातत्याने आढळून येते, ही खरी नवलाची गोष्ट आहे. सर्व तऱ्हेच्या खस्ता खाऊन हिंदू स्त्रियांनी प्रेम आणि मैत्रीची ज्योत सतत तेवत ठेवली आहे." याला उत्तर देता न आल्यामुळे सभागृहात सर्वांची तोंडे आश्चर्याने 'आ'वासून बंद पडली.

एका तुच्छ लेखलेल्या धर्माबद्दल बादशहाचे हे विचारपूर्ण आणि नि:पक्ष-

पाती उद्गार ऐकून धर्मांध मुसलमान समाजाला मोठाच धक्का बसला. पारंपारिक इस्लामी धर्माच्या बाहेर दुसरीकडे कुठेच ज्ञानाचा प्रकाश दिसत नाही, असे मानणाऱ्या धर्मवेड्या उलेमांचे पितळ उघडे पडले आणि त्यापैकी अकबरावर नेहमी टीका करणाऱ्या संकुचित वृत्तीच्या उलेमांनी दरबाराचा त्याग करून एकाकी जीवन पत्करले.

अशा उलेमांचे उदाहरण म्हणून इतिहासकार बदायुनीचा दाखला देता येण्यासारखा आहे दरबारात येण्याचे सोडून देऊन तो बादशहाला दुरूनच सलाम करू लागला. अकबराचा उदार मतवाद, त्याची माणुसकी, सर्व धर्मांत काहीतरी सत्य लपलेले आहे आणि सर्व पंथांमध्ये सचोटीचे आणि धार्मिक वृत्तीचे लोक आढळतात, मुसलमान धर्मच तेवढा सर्वगुणसंपन्न आणि खरा असे नाही, असा त्याचा विश्वास, या सर्वांबद्दल बदायुनीने आपला विरोध प्रदर्शित केला. अब्दुन नबी मख्दुम – उल् – मुल्क आणि इतर प्रमुख उलेमा यांच्या आपसातील भांडणाबद्दल आपली नापसंती व्यक्त करून इस्लामसारखा दुसरा धर्म नाही, हे अकबराला पटवून न दिल्याबद्दल, त्याने या उलेमांना दोषी ठरवले. याझदचा मुल्ला महंमद आणि शेखताजुद्दिन यांच्यावर अकबराला योग्य मार्गापासून दूर नेण्याबद्दल टीका केली. सूर्य, अग्नि आणि प्रकाश यांचे आदराने स्मरण केल्यापासून होणारे फायदे अकबराच्या मनावर बिंबवल्याबद्दल त्याने बिरबलाची निंदा केली. बादशहाच्या मनात घडून आलेल्या बदलाबद्दल पुरुषोत्तम आणि देवी यांच्यासारखे हिंदू पंडित आणि ख्रिश्चन व झोरास्ट्रियन धर्मगुरु यांच्या सहवासाला जबाबदार धरले. या सर्वांपेक्षाही त्याने अकबराला दोष दिला, तो त्याचे 'अज्ञान', त्याची जिज्ञासा, प्रत्येक गोष्टीचा खोलात शिरून त्याबद्दल शोध घेऊन चर्चा करण्याचा त्याचा स्वभाव याबद्दल; कारण बदायुनीच्या मते हे सर्व इस्लामी परंपरेच्या विरुद्ध होते.

अकबराच्या उदार धोरणाचे प्रत्यक्ष फळ म्हणजे सर्व धर्मांबद्दल सारखीच आस्था दाखवून हिंदू, जैन आणि पारशी पंडित, साधुपुरुष आणि धार्मिक संस्था या सर्वांना त्याने सुरू केलेले सरकारी वेतन हे होय. देशात मुसलमानी राज्य सुरू झाल्यापासूनच इस्लामी पंडितांना अशी वतने देण्याची पद्धत सुरू झाली होती ती अर्थातच अकबराने चालू ठेवली. श्री. के. एम्. झवेरी यांनी लिहिलेल्या 'Imperial Farmans' या उत्कृष्ट पुस्तकात याबद्दलचे अनेक दाखले सापडतात. १३ सप्टेंबर १५७७ रोजी विठ्ठलेश्वर नावाच्या एका हिंदु पुजाऱ्याला आपल्या 'श्री नाथजी' या दैवताची देखभाल करण्यासाठी अकबराने मथुरेजवळील गोकुळ नावाचे गाव दान केले; तसेच आपल्या दैवताची पूजाअर्चा करण्यात कुठल्याही

तऱ्हेची अडवणूक किंवा छळ होणार नाही असे आश्वासन त्याला देण्यात आले. हिंदू धर्मातील ईश्वराबद्दलची कल्पना समजून घेण्यासाठी अकबराने बोलाविलेल्या अनेक हिंदू पंडितांत विठ्ठलेश्वर हा एक होता. त्याची विद्वत्ता आणि साधु-वृत्ती याचा अकबरावर फार प्रभाव पडला असावा. कारण ३ मार्च १५८१ रोजी काढलेल्या दुसऱ्या एका फर्मानाने या आचार्यांच्या गायींना खालसा आणि जहागीर या दोन्ही जमीनींवर अनिर्बंध चरण्याची परवानगी दिली गेली. दोन वर्षांनंतर जतीपुऱ्याचे गाव त्याच्याकडे वंशपरंपरागत लावून देण्यात आले (इ. स. १५८३) आणि १५८८ साली गोवर्धन मंदीराच्या गायींना सावी आणि आसपासच्या इतर गावांमध्ये मोफत चरण्याचा हक्क देण्यात आला. १५९३ सालच्या मे महिन्यात मथुरा, साहर, मानगोटा आणि ओड या परगण्यांत मोर मारण्याची किंवा इतर कुठलीही शिकार करण्याची बंदी करण्यात आली. त्याचप्रमाणे नवसारीचा पारशी धर्मगुरू, दस्तुर माहृचारजी याला दोनशे बिघे जमीन बादशहाने वंशपरंपरा देणगी म्हणून देऊन त्यावरील सर्व सारा माफ केला. अशाच तऱ्हेने १५९५ साली आणखी शंभर बिघा जमीन त्याचा मुलगा केकोवाद याला देण्यात आली. देशात निरनिराळ्या ठिकाणी हिंदू मंदीरे, हिंदू पंडित आणि साधु पुरुष यांना अशी अनेक वतने इ. स. १५७६ नंतर देण्यात आली असावीत. दुर्दैवाने अशा वतनांची कागदपत्रे माणसांच्या हलगर्जीपणामुळे काळाच्या भक्ष्यस्थानी पडून नाहीशी झाली.. मथुरा, वृंदावन, काशी आणि इतर ठिकाणांच्या वतनदारांच्या वंशजांकडे अशी कागदपत्रे अजून पाहायला मिळतात.

## अकबर खुतबा वाचतो

रबी-उल-अव्वल या मुसलमानी महिन्यात दर वर्षी अकबर महंमद पैगंबराची जन्मतिथी पाळत असे. ९ मे १५७९ रोजी सर्व सय्यद, उलेमा, शेख आणि सरदार यांचे मोठे संमेलन भरवून अकबराने फत्तेपूर सिक्रीला महंमद पैगंबराच्या जन्मदिनानिमित्त मोठी मेजवानी दिली. महंमद आणि त्याच्यानंतर आलेले खलिफा, तसेच तैमूर आणि मिर्झा उलुघ बेगसारखे अकबराचे पूर्वज शुक्रवारी आणि ईदच्या दिवशी खुतबा वाचीत असत, असे अकबराला या समारंभाच्या वेळी सांगण्यात आले. आपणही तसेच करावे असे वाटून शुक्रवार २६ जून १५७९ रोजी फत्तेपूर सिक्रीतल्या जामी मस्जीदमधील व्यासपीठावर चढून अकबराने खालील खुतबा म्हटला. राजदरबारातला कवी फैजी याने हा खास लिहून दिला होता.

> " ज्याने आम्हाला हे साम्राज्य दिले,
> आणि आम्हाला सद्बुद्धी देऊन आमचे हात बळकट केले,
> ज्याने आम्हाला न्यायाचा मार्ग दाखवून सारासार विचार करण्यास शिकविले, ज्याचा महिमा माणसाच्या बुद्धीला करता येत नाही, त्या ईश्वराच्या नावाने आम्ही बादशहाचा जयजयकार करतो !
> ईश्वर अत्यंत थोर आहे ! "

हा खुतबा वाचत असताना अकबराची बोबडी वळून व्यासपीठावरून खाली उतरण्यासाठी त्याला दुसऱ्याची मदत घ्यावी लागली आणि इमामाने करावयाच्या राहिलेल्या प्रार्थनेचा भाग पुरा करण्यास त्याने दरबारचा खातीब हाफीझ महंमद अमीन यास सांगितले, असे बदायुनी म्हणतो. पण दुसऱ्या लेखकांचे म्हणणे असे आहे की, अकबराने खुतबा वाचल्यानंतर व्यासपीठावरून खाली उतरून प्रार्थनेस सुरुवात केली. हिंदुस्तानाबाहेरील इस्लामी राज्यांत राजाने स्वतःच खुतबा वाचण्याची पद्धत पूर्वापार चालू होती. पण हिंदुस्तानात अकबराने हा प्रकार नव्यानेच सुरू केला, असे येथील जुन्या विचारांच्या लोकांचे मत होते. असे करण्यात अकबराचा काहीतरी अंतस्थ हेतू असावा असेही काही जणांना वाटले.

## बादशहा स्खलनशील असणेच शक्य नाहीं ' अशा अर्थीचे फर्मान :

वरील कुतबा वाचल्यानंतर दोन महिन्यांतच ' इस्लामी शरीयतचा ( कायद्याचा ) अर्थ सांगणारा आणि त्याबद्दल अखेरचा निर्णय देणारा माझ्या-खेरीज दुसरा कोणी नाही, ' असे अकबराने जाहीर केले. हे करण्यासाठी ' महझर ' नावाचा एक कायदेशीर दस्तऐवज तयार करून त्यावर दरबारातल्या प्रमुख उलेमांच्या सह्या त्याने घेतल्या. असे करण्याबद्दल त्याला उलेमांनीच सुचविले असे अबुल फझल म्हणतो. इस्लामी धर्म-पंडितांपेक्षा ( मुश्ताहिद ) बुद्धी, ज्ञान आणि भलेपणा यांत बादशहा वरचढ असल्यामुळे त्यानेच मुख्य धर्म-पंडिताची जागा स्वीकारावी, असे या उलेमांचे मत होते. कुराण आणि शारीयत-मध्ये लिहिल्याप्रमाणे न्यायी राजा ( इमान-इ- आदील ) हा इस्लामी धर्म-पंडितांपेक्षा अधिक योग्यतेचा असतो, या आपल्या सहकाऱ्यांच्या म्हणण्यास मान देऊन त्यांची निराशा न करण्याच्या हेतूने अकबराने हे फर्मान काढले, असे मानण्यास सबळ पुरावा आहे. अनेक वर्षांपूर्वी म्हणजे १५७३ च्या जूनमध्ये इस्लामी धर्मांचे सर्व अधिकार तू स्वतःकडे घ्यावे असा सल्ला शेख मुबारकने अकबराला दिला होता. नंतरच्या सहा वर्षांत अबुल फझल, फैझी आणि

दरबारातले प्रमुख मुसलमान सरदार यांनी धर्मवेड्या उलेमांची पुष्कळच नाचक्की केली होती. 'सर्वोच्च धर्मगुरू'ची जागा घेण्यास अकबरही तयारच होता. कारण आपल्यापेक्षा उच्च अशा कुठल्याही धार्मिक किंवा ऐहिक सत्तेचा अधिकार मानण्यास तो तयार नव्हता हे बदायुनीचे म्हणणे खरेच आहे. हिंदुस्थानात इस्लामी राज्याची स्थापना झाल्यापासून राज्यकारभारात उलेमांचे मोठे प्रस्थ माजले होते आणि सुलतानी अंमलात तर ( इ. स. १२०६ ते १५२६ ) ते राजांना पदच्युत देखील करीत असत. बाबर, हुमायून, शेरशहा आणि त्याच्या वंशातले राजे यांच्या काळात राज्यकारभारात उलेमांचा सल्ला घेणे अपरिहार्य होते. इ. स. १५७५ पर्यंत खुद्द अकबर अब्दुल-नबी आणि तत्सम इस्लामी धर्मगुरूंना मोठ्या आदराने वागवत असे. पण त्यानंतर त्यांची सत्ता त्याला नकोशी झाली; कारण समान नागरिकत्व आणि सर्वधर्म सहिष्णुता या त्याच्या राज्यकारभारातील दोन मुख्य तत्त्वांना त्यांचा विरोध होता. कडव्या व धर्मांध उलेमांच्या विरुद्ध एक नवा पक्ष निर्माण करण्यात अकबराचा हात प्रामुख्याने असण्याची शक्यता आहे. विरुद्ध पक्षाचा पुढारी अबुल फझल याला याबाबतीत अकबराचा पूर्ण पाठिंबा होता. 'मुस्ताहिद ' आणि 'सुलतान-इ-अदिल ' यांच्या अधिकाराबाबत गरम चर्चा झाल्यानंतर २ सप्टेंबर १५७९ रोजी एक दस्तऐवज तयार करण्यात आला. तो शेख मुबारक याच्या हातचा असून त्यावर इतर उलेमांनी मोठ्या नाखुषीने सह्या केल्या. त्या दस्तऐवजातील मजकूर असा—

"हिंदुस्थानात आता सर्वत्र शांतता प्रस्थापित होऊन न्यायाचा आणि दयेचा अंमल सुरू झाला आहे. यामुळे निरनिराळ्या थरांतले लोक, विशेषत: ईश्वरी ज्ञान प्राप्त झालेले विद्वान लोक, मुक्तीचा मार्ग दाखवून देणारे हुषार कायदेपंडित, आणि ज्ञानाचा सर्वत्र प्रसार करत हिंडणारे लोक—अरबस्तान आणि इराणमधून येऊन आता हिंदुस्थानात स्थायिक झाले आहेत. आम्हाला—म्हणजे हिंदुस्थानातल्या प्रमुख उलेमांना—कायदेकानूंच्या विविध शाखोपशाखांचे तसेच न्यायतत्त्वशास्त्राचे संपूर्ण ज्ञान आहे, व सारासार विचारांती तयार केलेल्या राजाज्ञांचीही चांगली माहिती आहे; एवढेच नाही, तर आमचे शुचित्व व सद्भावना जगजाहीर आहेत. अशा आम्ही उलेमांनी कुराण आणि शारीयत यांमधील खालील वचनांचा सखोल अभ्यास केला आहे. ती वचने अशी......
'परमेश्वर, त्याचा प्रेषित व तुमच्यापैकी जे कोणी अधिकारपदावर असतील त्यांच्या आज्ञा पाळा.' दुसरे म्हणजे 'देवापुढे शेवटचा न्यायनिवाडा होण्याच्या अखेरच्या दिवशी जो कोणी देवाचा अत्यंत लाडका ठरतो, तोच खरा न्याय्य पुढारी असतो. जो कोणी अमीराची आज्ञा पाळतो, तो माझीच आज्ञा पाळतो

व जो कोणी त्याच्या विरुद्ध बंड करतो, तो माझ्याच विरुद्ध बंड करतो. 'आणि तिसरे म्हणजे सारासार विचारांवर आधारलेले वरील दोन आणि इतर अनेक दाखले लक्षात घेऊन आम्ही अशा निर्णयाप्रत आलो आहोत की, 'देवाघरी न्यायी राजाची योग्यता मुझाहिदपेक्षा फार उच्च प्रतीची आहे.'

"याशिवाय आम्ही असे जाहीर करतो की, इस्लामी धर्माचा राजा, सर्व मनुष्यजातीचे विश्रामस्थान, खऱ्या धर्माच्या अनुयायांचा पुढारी, या जगात ईश्वराच्या सावलीसारखा वावरणारा, अबुल-फतेह जलालउद्दिन महंमद अकबर, पादीश-इ-घाझी (देव याचे राज्य चिरायु करो!) याला ईश्वरीज्ञान झालेले असून तो अत्यंत न्यायी व सूज्ञ राजा आहे."

"वरील कारणांमुळे यापुढे इस्लामी धर्मपंडितांत धार्मिक प्रश्नांबाबत मतभेद निर्माण झाल्यास त्या बाबतीत बादशहाने दिलेला निर्णय आणि काढलेले फर्मान आम जनतेला मान्य करावा लागेल. कारण बादशहाजवळ अपार बुद्धिमत्ता व सारासार विचार करण्याची शक्ती आहे; आणि आपल्या लोकांचे हित साधून सर्वत्र शांतता राखण्यासाठी तो सदैव तत्पर आहे."

"तसेच कुराणातल्या एखाद्या संदर्भाच्या आधारे आपल्या लोकांच्या हितासाठी बादशहाने जर एखादे आज्ञापत्र काढले, तर ते सर्वांनी शिरोधार्य मानले पाहिजे. तसे न करणाऱ्यांचे इहलोकी सर्व धार्मिक हक्क व मालमत्ता नष्ट करण्यात येऊन परलोकी त्यांना नरकवास घडेल."

"ईश्वराची थोरवी लक्षात घेऊन आणि इस्लामी धर्माचा प्रचार होण्यासाठी अत्यंत शुद्ध हेतूने हा दस्तऐवज तयार करण्यात आला असून इस्लामी धर्माच्या आम्ही उलेमांनी आणि धर्मपंडितांनी राजीखुषीने हिजरी सन ९७८ च्या रजब महिन्यात (ऑगस्ट-सप्टेंबर १५७९) त्यावर आपल्या सह्या केल्या आहेत."

या दस्तऐवजावर मुख्य सदर अब्दुन नबी, मखदुम-उल-मुल्क, मुख्य काझी जलाल उद्दिन मुलतानी, मुख्य मुफ्ती सदर जहान, गाझी खान बदक्षी, शेख मुबारक इत्यादि अनेक प्रमुख उलेमांच्या सह्या आहेत.

याच दस्तऐवजाला बादशहाचे अस्खलन शीलतेचे फर्मान असे चुकीचे म्हटले जाते, व या फर्मानामुळे बादशहा नुसता राजाच न राहता पोपसारखा धर्मगुरु पण झाला असे मानण्यात येते, ते पण चुकीचे आहे. इस्लामी धर्माच्या कोणत्याही प्रश्नाबाबत इस्लामी धर्मपंडितात मतभेद झाल्यास त्यातले कोणते मत खरे मानावयाचे हे ठरविण्याची सत्ता अकबराला या महझरने मिळाली. या बाबती-

तला त्याचा निर्णय अखेरचा समजण्यात येऊन सर्व उलेमांनी व मुसलमान समाजांनी त्याचे पालन करणे अपरिहार्य झाले. त्या अर्थाने बादशहा स्वतःच धर्मगुरु (मुस्तहिद) होऊन धार्मिक बाबतीत स्वतंत्र निर्णय घेण्याचा अधिकार त्याला मिळाला. तसेच कुराणाचा संदर्भ न सोडता कुठलाही नवीन कायदा करण्याचा अधिकार बादशहाकडे आला. या फर्मानामुळे बादशहाकडे धार्मिक बाबतीत खूप सत्ता आली हे खरे असले तरीसुद्धा खऱ्या अर्थाने तो स्वतः मुस्ताहिद झाला नाही किंवा इस्लामी धर्माच्या सर्वांत श्रेष्ठ धर्मगुरूचे स्थान पण त्याला प्राप्त झाले नाही. सर्व धार्मिक प्रश्नांवर निर्णय देण्याचा उलेमांचा हक्क तसेच बादशहाचे खाजगी जीवन आणि राज्यकारभारातील धार्मिक किंवा मुलकी धोरण यांबाबत बादशहाला सल्ला देण्याचा अधिकार उलेमांकडून काढून घेण्यात आला.

## सनातनी मुसलमानांची प्रतिक्रिया

वरील फर्मान आणि अकबराने वाचलेला खुतबा यामुळे पुष्कळ असंतोष आणि खळबळ निर्माण झाली हे अबुल फझल मान्य करतो. अकबराविषयी नाना तऱ्हेच्या अफवा उठवून त्यावर उघड टीका करण्यास पुष्कळ सनातनी मुसलमानांनी सुरुवात केली. 'आपण ईश्वराचे अंश आहोत' असे दाखवून देण्याचा अकबराचा यात हेतू आहे असे काही लोक म्हणू लागले. 'ईश्वराचा खास प्रेषित' या उच्च पदावर आपली स्थापना करून घ्यावी असा अकबराचा हेतू असल्याचे दुसरे काही लोक म्हणू लागले. इस्लामी धर्माबद्दल नाराजी प्रगट करून तो धर्म धोक्यात आणण्याचा बादशहाचा हेतू आहे आणि बादशहाने आपला पूर्वापार चालत आलेला सुन्नी पंथ सोडून शिया पंथाचा स्वीकार केला आहे असे आणखी काही लोकांचे मत पडले. अबुल फझलच्या मते हे आरोप निराधार होते. ''कुठल्याही माणसाने 'मी परमेश्वराचा अंश आहे' असे म्हणणे अत्यंत मूर्खपणाचे आहे आणि हा विचारसुद्धा माझ्या मनात येणे शक्य नाही,'' असे उत्तर अकबराने आपल्या टीकाकारांना दिले. अकबराने स्वतः धार्मिक आणि सामाजिक कायदे रूढ केले, इस्लामी धर्मपंडितांच्या मतांमधील चुका दाखवून दिल्या आणि मुख्य धर्मगुरूला बाजूला ठेवून स्वतःच खुतबा वाचला आणि मुख्य मुस्ताहिदचे काम स्वतःकडे घेतले यामुळे अकबर स्वतःला ईश्वराचा प्रेषित समजतो, असे लोकांना वाटू लागले सर्व - धर्म - समभाव (सुलाह – इ – कुल), निरनिराळ्या धर्मातल्या लोकांचा सहवास आणि इबादत खान्यातली त्याची निःपक्षपाती वागणूक यामळे इस्लामी धर्माबद्दल त्याला प्रेम

नव्हते असे लोकांना वाटू लागले. धर्मसभेत ख्रिस्ती मिशनऱ्यांनी उलेमांना निरुत्तर केल्यावर अकबराने त्यांची बाजू घेतली नाही म्हणून तो ख्रिस्ती धर्माचा पक्षपाती ठरला. शिया पंथाच्या उलेमांच्या बाबतीत तसेच झाले. या सर्व गोष्टी विचारात घेता १५७९ च्या अखेरपर्यन्त तरी अकबरावरचे हे सर्व आरोप खोटे होते, या अबुलफझलच्या म्हणण्याशी सहमत होण्यास काही प्रत्यवाय दिसत नाही. अकबराने इस्लामी धर्माचा कोणत्याही तऱ्हेने अनादर केला नाही किंवा सय्यद आणि उलेमांना, साष्टांग नमस्कार (झिजदा) घालून आपल्या पायाचे चुंबन घेण्यास पण लावले नाही, असे हा राजदरबारचा इतिहासकार म्हणतो.

## हिन्दुधर्माच्या सहिष्णुवृत्तीचा अकबरावर पडलेला प्रभाव.

हिंदुस्थानातील निरनिराळ्या धर्मांचा अभ्यास केल्यामुळे येथील सांस्कृतिक परंपरेशी परिचय होऊन तिला अनुरूप असे सर्व लोकांशी सलोख्याने राहण्याचे तत्त्व त्याच्या मनावर बिंबले आणि प्रत्यक्ष राज्यकारभारात त्याचे प्रत्यंतर दिसून येऊ लागले. हिंदुस्थानात हजारो वर्षे चालत आलेली सर्व धर्मांबद्दल असलेली आदराची भावना अब्दुल कादीर बदायुनीसारखा पाक मुल्ला सुद्धा, या भावनेशी सहमत न होऊनही मान्य करतो. अमूलचा शरीफ याला त्याच्या धार्मिक मताबद्दल सर्व इस्लामी राज्यांतून हाकून देण्यात आले. अखेर हिंदुस्थानात त्याला आसरा मिळाला. इतकेच नव्हे तर येथे आपल्या पाखंडी मतांचा प्रचार करण्याची संपूर्ण मोकळिकही मिळाली. याचा उल्लेख करून बदायुनी म्हणतो, "हिंदुस्थान खंडप्राय देश असून येथे कोणीही माणूस दुसऱ्याच्या कारभारात लुडबुड करीत नाही आणि प्रत्येक माणसाला आपल्या मताप्रमाणे वागण्याची पूर्ण मुभा आहे." सर्व गोष्टींचा सतत अभ्यास करून स्वतःमध्ये त्याचप्रमाणे सुधारणा घडवून आणणाऱ्या अकबराला भारतीय संस्कृतीचे चिरंतन तत्त्व * समजावून घेण्यास फार वेळ लागला नाही. या दृष्टीने पहिला

---

* 'अकबर नामा' भाग ३ पान २६०; अबुल फझल लिहितो– "विविधतेच्या खाली ऐक्य लपलेले आहे ही गोष्ट बादशहाच्या प्रखर बुद्धिमत्तेला आकलन झाली आहे आणि याबाबत तो इतका दक्ष असतो की देशातले सर्व शिकलेले लोक आणि धर्ममार्गावरचे यात्रेकरू या धर्मवीराला आपला पुढारी मानतात."

अशोक, चंद्रगुप्त, विक्रमादित्य, हर्षवर्धन इत्यादि भारतवर्षातल्या उत्तमोत्तम राजांच्या मालिकेत त्याची गणना करावी लागते.

## अजमेरची शेवटची यात्रा

८ सप्टेंबर १५७९ रोजी ख्वाजाच्या कबरीचे दर्शन घेण्यासाठी अकबर अजमेरला जाण्यास निघाला. ही त्याची अजमेरची शेवटचीच यात्रा ठरली अस्खलनशीलतेचे फर्मान निघाल्यावर एक आठवड्याच्या आत ही यात्रा झाली. मुसलमान साधुपुरुषांच्या दर्ग्याचे दर्शन घेऊन त्यांचे आशीर्वाद घेण्याच्या मुसलमानी पद्धतीवरचा अकबराचा विश्वास आता उडत चालला होता. "काही विशिष्ठ परिस्थिती सोडल्यास अशा यात्रा करणे यात धर्माची बाजू फार गौण होती असे त्याच्या प्रगल्भ बुद्धीला आता वाटू लागले. तरीसुद्धा लोकांना शांत ठेवण्याच्या हेतूने तो या यात्रेला निघाला." १४ ऑक्टोबरला अजमेरला पोचल्यावर अकबराने ख्वाजाच्या कबरीचे दर्शन घेतले येथे असतानाच, मागे उल्लेख केल्याप्रमाणे, त्याने अब्दुन नबी आणि मखदुम – उड – मुल्क यांना मक्केला हद्दपार केले. अजमेरहून परत येत असताना सांबर येथून त्याने शहावाझ खानला राणा प्रतापच्या विरुद्ध पाठवून दिले. तेव्हा झैन येथे एटावाच्या भूपत चव्हाण बरोबर झालेल्या चकमकीत झैन खान कोका जखमी झाला, पण त्याच्या अनुयायांनी भूपतचा वध केला. कोकाच्या भेटीला जाऊन अकबराने त्याच्या प्रकृतीची चौकशी केली. अजमेरहून परत येत असताना अकबर एका खास उभारलेल्या तंबूत जुन्या इस्लामी पद्धतीला अनुसरून रोज नमाज पढत असे. सुनी पंथापासून अकबर हळूहळू दूर चालचा आहे असा लोकांच्या मनात उत्पन्न झालेला समज नाहीसा करण्यासाठी तो हे करत असे. ११ डिसेंबर १५७९ ला तो फत्तेपूर सिक्रीला परत आला. पुढील वर्षी म्हणजे १५८० साली ख्वाजाच्या उरुसाला त्याने आपला मुलगा दानियल याला अजमेरला पाठवून दिले. (जुलै ३०) दर्ग्यांना अशा वरचेवर भेटी देणे हे उथळ प्रवृत्तीचे लक्षण असून त्यात मूर्तिपूजेचा आणि ईश्वराच्या अनेकत्वाचा पुष्कळसा भाग आहे अशी अकबराची खात्री झाली होती. अजमेरला पुष्कळ दानधर्म करून राजपुत्र राजधानीला परत आला.

## काश्मीरचा युसफखान अकबराकडे येतो.

काश्मीरचा राजा अलीखान चक याचा मुलगा युसफखान १५८० सालच्या जानेवारी महिन्यात अकबराची मदत मागण्यासाठी फत्तेपर सिक्रीला आला.

अलीखानच्या मृत्यूनंतर त्याचा मुलगा युसफखान आणि भाऊ अब्दल यांच्यामध्ये गादीच्या वारश्यावद्दल तंटा सुरू होऊन त्यात काही सरदारांनी युसफखानची बाजू घेतली. या भांडणामुळे उद्भवलेल्या लढाईत युसफखानचा पराभव झाला, तेव्हा काश्मीरहून पंजाबला पळून येऊन त्याने राजा मानसिंग आणि मिर्झा युसफखान यांच्याकडे मदतीची याचना केली. त्यांनी युसफखानला बादशहाच्या दरबारात पाठवून दिले. तेथे अकबराने त्याचे प्रेमाने स्वागत केले.

## दमणवरची अयशस्वी स्वारी

मक्केला जाणाऱ्या मुसलमान यात्रेकरूंना त्रास देणाऱ्या पोर्तुगीजांच्या ताब्यातले दमण बंदर जिंकून घेण्यासाठी अकबराने फेब्रुवारी १५८० मध्ये कुतुबुद्दिन खानला तिकडल्या स्वारीवर पाठवून दिले. गुजराथ आणि माळव्यातील बादशाही फौज त्याच्या बरोबर देण्यात आली; पण नंतर त्याला स्वारीवरून परत बोलाविण्यात आले.

## मक्केहून खास अवशेष म्हणून आणलेला दगड :

याच सुमारास मीर अबु तुरब मक्केहून परत आला. महंमद पैगंबराच्या पावलाचा ठसा ज्या दगडावर उमटल्याचा समज होता, तो दगड त्याने मक्केहून आपल्या बरोबर आणला. असल्या गोष्टीवर अकबराचा विश्वास नव्हता. तरीसुद्धा सनातनी लोकांच्या समजुतीखातर तो मीरला कित्येक मैल सामोरा गेला आणि तो दगड स्वतःच्या खांद्यावर घेऊन अकबर काही पावले चालला. नंतर तो दगड मोठ्या इतमामाने राजधानीत आणण्यात येऊन अबु तुरबच्या घरात त्याची प्रतिष्ठापना करण्यात आली.

## राज्याची बारा सुभ्यांमध्ये विभागणी

याच सुमारास १५८० मध्ये अकबराने आपल्या राज्याची १२ सुभ्यांत विभागणी केली. प्रत्येक सुभ्यात एक सिपाही सालार ( राज्यप्रमुख ), एक दिवाण, एक बक्षी, एक मीर अदल, एक सदर, एक कोतवाल, एक मीर बहर ( नाविकदलाचा प्रमुख ), आणि एक वाकनीस यांची नेमणूक केली. आग्रा, दिल्ली, अवध, अजमेर, अहमदाबाद ( गुजराथ ), बिहार, बंगाल, काबुल, लाहोर ( पंजाब ), मुलतान आणि माळवा अशी या बारा सुभ्यांची नावे होती. यामुळे सर्व राज्यांत एकाच तऱ्हेची राज्यपद्धती सुरू झाली. सुभ्यांतील अधिकाऱ्यांचे किताब सर्व ठिकाणी सारखेच असून सर्व कारभार एकाच भाषेत म्हणजे फारसी

भाषेत होऊ लागला. सर्व सुभ्यांमध्ये समान कायदे आणि राज्यकारभाराची एकसूत्री पद्धत सुरू करण्यात आली.

## १० वर्षांची सारा पद्धत :

बंगाल आणि बिहारमध्ये मोठे बंड सुरू झाले असताना सुद्धा अकबराने आपल्या शासनाची कामे चालू ठेवून इ. स. १५८० मध्ये ऐन-इ-दहसाला नावाची जमीन-महसूलाची नवी पद्धत अंमलात आणली. मागील दहा वर्षांच्या सरासरी उत्पन्नावर ही आधारित होती. राजा तोडरमल आणि शहा मन्सूर यांच्याकडे हे काम सोपविण्यात आले. पण दरम्यान तोडरमलला बंगालमधील बंडाचा बिमोड करण्यासाठी जावे लागल्यामुळे शहा मन्सूरने ही पद्धत अंमलात आणली. " बादशहाच्या राज्याच्या १५ व्या वर्षापासून २४ वर्षापर्यंतच्या साऱ्याचे सरासरी प्रमाण काढून त्यातला दहावा हिस्सा खजिन्यात भरावा " असे ठरविण्यात आले. या पद्धतीमुळे शेतकऱ्यांची व खातेदारांची गाऱ्हाणी दूर झाली, असे अबूल फझल म्हणतो.

# प्रकरण १२ वे

## अकबर आणि झोरोस्ट्री धर्म

### पहिले खिरस्ती आणि जैन धर्म प्रचारक मंडळ

### दस्तुर मेहरजी राणा आणि अकबर यांची पहिली भेट इ. स. (१५७३)

इ. स. १५७८–७९ मध्ये पारशी धर्मगुरूंना फत्तेपूर सिक्रीच्या धर्मसभेत भाग घेण्यासाठी पाचारण करण्यात आले. तत्पूर्वी अनेक वर्षे झोरास्ट्री धर्माबद्दल अकबराने थोडीबहुत माहिती गोळा केली होती. १५७३ सालच्या जानेवारी, फेब्रुवारी महिन्यांत सुरतेच्या वेढ्यात गुंतला असताना पार्शी लोक आणि त्यांचा धर्म याबद्दलची काही माहिती अकबराच्या कानावर आली. त्यावेळचा प्रसिद्ध मोबिद किंवा धर्मगुरू दस्तूर मह्यरजी राणा याला लोक मेहेरजी राणा या नावाने ओळखत असत– याला अकबराने नवसारीहून खास सुरतेला बोलावून घेतले. पारशी धर्माच्या तत्त्वांची त्याच्याकडून माहिती करून घ्यावी असा बादशहाचा विचार होता. नवसारी गाव सुरतेपासून १८ मैलांवर असून ते त्याकाळचे झोरोस्ट्री धर्माचे एक मुख्य केंद्र समजण्यात येत असे. सर्व धर्मांची तत्त्वे समजावून घेण्याची जिज्ञासा असलेल्या बादशहावर मेहेरजीने विशद करून सांगितलेल्या पारशी धर्मतत्त्वांचा खूप प्रभाव पडला. * राजधानीला येऊन मेहेरजीने पारशी धर्मावर अधिक विवेचन करावे आणि इबादतखान्यातील धार्मिक चर्चेमध्ये भाग घ्यावा अशी विनंती अकबराने मेहेरजीला केली.

### फत्तेपूर सिक्रीला मेहेरजीचे आगमन :

### काही पारशी धर्मविधींचा अकबराकडून स्वीकार :

बादशहाच्या विनंतीला मान देऊल १५७३ साली मेंहेरजी राणा बादशहाबरोबरच फत्तेपूर सिक्रीला गेला किंवा नाही याबद्दल नक्की उल्लेख आढळत नाही.

---

* जीवन जे. मोदी, A petitiog in Persian Vearse of Dastur Kaikobad of Nevasari to Emperor Jahangir. पाहा K. R. Kama institute monograph पाने ९०–९१

तो बहुदा यानंतर काही वर्षांनी फत्तेपूर सिक्रीला गेला असावा. १५७८ साली इबादत खान्यातल्या धार्मिक चर्चेत पारशी धर्मगुरूंनी भाग घेतला असा उल्लेख अबुल फझलच्या बखरीत सापडतो. अर्थातच मेहेरजी या धर्मगुरूंचा प्रमुख होता. झोरास्ट्री धर्म हा खरा धर्म असून सूर्याची व अग्नीची पूजा ही परमेश्वराची भक्ती करण्याचे उत्कृष्ट मार्ग आहेत, असे त्याने प्रतिपादन केले. भाषा, भूगोल आणि संस्कृती या तिन्ही दृष्टींनी अकबराला पारशी धर्म जवळचा वाटू लागला. हिंदुस्थानातल्या पारशांचे पूर्वज इराणात असून त्यांचा धर्म इराणातील राजांचा धर्म होता, हे आढळून आल्यावर बादशहाला मेहेरजीच्या प्रवचनात खूपच रस वाटू लागला. मेहेरजीला फारशी भाषा चांगलीच येत असल्यामुळे त्याचे विचार समजून घेण्यास अकबराला दुभाष्याची गरज लागली नाही. इराणमधील लोकां-बद्दल अकबराला फार प्रेम वाटत असे. इराणी लोकांकडून इस्लामी धर्माने पुष्कळ चालीरीती आणि गृह्यसंस्कार घेतले असल्यामुळे अकबराला इराणबद्दल विशेष आपुलकी वाटे. या उपरान्त या देशातल्या असंख्य हिंदू लोकांचा धर्म मुसलमानी धर्मापेक्षा पारशी धर्माशी मिळताजुळता असून हिंदूंना पण सूर्याची व अग्नीची पूजा मान्य होती. या कारणामुळे पण अकबरावर पारशी धर्माचा प्रभाव पडला असावा. पारशी धर्मातली गूढ तत्त्वे, त्यातले मंत्र आणि खास समारंभ यांची मेहरजीने अकबराला ओळख करून दिली. यामुळे अकबर इतका प्रभावित झाला की, त्याने पारशी धर्माप्रमाणे सूर्य आणि अग्नी यांची पूजा करण्यास सुरुवात केली. प्रकाश देणारा सूर्य हा सर्व सृष्टीच्या मुळाशी असून प्रत्यक्ष ईश्वराचा अवतारच आहे, असे पारशांप्रमाणेच अकबराला पण वाटू लागले; आणि १५८० सालच्या मार्च महिन्यापासून सूर्याला रोज साष्टांग नमस्कार घालण्यास त्याने सुरूवात केली. पारशी धर्मात विहित असलेले पवित्र अग्निकुंड राजवाड्यात तयार करण्याचा हुकूम अबुल फझलला देऊन त्यातला अग्नी कधीही विझणार नाही अशी खबरदारी घेण्यात आली. संध्याकाळी दिवे लागताच उठून दिव्याला आदराने नमस्कार करण्याची प्रथापण अकबराने चालू केली. पारशी धर्माने मान्य केलेला सदरा आणि कुस्ती पण तो घालू लागला. राज्याच्या २५ व्या वर्षापासून (इ. स. १५८०) त्याने राज्यात पारशी पंचांग सुरू केले. इ. स. १५८२ पासून पारशी नवज्योत आणि इतर १४ पारशी समारंभ त्याने पाळण्यास सुरवात केली.

## सूर्योपासनेस बिरबलाचा पाठिंबा

सूर्योपासनेवर दृढ विश्वास असणारा अकबराचा मित्र बिरबल आणि

जनानखान्यात होमहवन करणाऱ्या रजपूत राण्या यांचाही परिणाम कळत न कळत अकबराच्या मनावर झाला. " सूर्य सर्वत्र प्रकाश देतो, धनधान्याची आणि मानवी जीविताची समृद्धी करतो, म्हणून तो आपल्या पूजेस पात्र आहे." असे बिरबल सांगत असे.

## अकबर मेहेरजीला एक जहागीर देतो

दस्तुर मेहेरजी राण्याचा प्रभाव अकबरावर इतका पडला की, त्याने मेहेरजीच्या चरितार्थासाठी (मदद – इ – माश) २०० बिघा जमीन वंशपरंपरागत जहागीर म्हणून त्याला देऊन टाकली. १५९१ साली मेहेरजी मृत्यू पावल्यानंतर ही जहागीर कैकोबाद याच्याकडे आली आणि १५९५ साली आणखी १०० बिघा जमीन बादशहाने कैकोबादला दिली. पारशी धर्मासाठी मेहेरजीने केलेली मोठी कामगिरी लक्षात घेऊन त्याच्या इतर सहकाऱ्यांनी त्याला नवसारीचा प्रमुख धर्मगुरु नेमले.

## अकबराच्या दरबारातील इराणी पंडित.

पारशी धर्म आणि फारसी भाषा यांबद्दल अकबराचे कुतूहल सारखे वाढतच गेले. १५९२ साली दस्तुर अरदेशर नावाच्या प्रसिद्ध पंडिताला अकबराने इराण मधून आपल्या दरबारात खास बोलावून घेतले आणि फारसी भाषेचा शब्दकोश तयार करण्याचे काम त्याच्याकडे सोपविले. या शब्दकोशात जुने फारसी, दारी आणि पहलवी शब्द व वाक्प्रचार यांचा पण समावेश होता. झोरोस्ट्रियन धर्माची संपूर्ण माहिती १५७९ मध्येच अकबराला झाली असल्यामुळे त्यानंतर पार्शी धर्माबद्दल विशेष चर्चा करण्याची जरुरी बादशहाला नव्हती, असे जीवन जमशेटजी मोदी याने प्रगट केलेले मत बरोबर नाही. तसे पाहिले तर जेजुइट धर्मगुरूंकडून ख्रिस्ती धर्माची तत्त्वे त्याने इ. स. १५८०–८२ या वर्षातच समजावून घेतली होती. तरीसुद्धा यानंतर दोन ख्रिस्ती धर्ममंडळे राजधानीत बोलावून त्यांचे विचार बादशहाने लक्षपूर्वक ऐकले. तसेच जैन धर्मातील एकापेक्षा अधिक शिष्टमंडळे त्याच्या दरबारी येऊन गेली. धर्म आणि तत्त्वज्ञान या विषयांची त्याची जिज्ञासा सतत जागृत होती व सापडेल त्या मार्गाने सत्याचा शोध घेण्याचे त्याचे प्रयत्न चालूच होते. तसे पाहता दस्तुर अरदेशरचे दरबारातले काम साहित्यक्षेत्रातले होते. पण तो एक मोठा धर्मपंडित असल्यामुळे त्याने केलेले झोरोस्ट्री धर्माचे विवेचन अकबर लक्षपूर्वक ऐकत असे. इबादतखाना १५७९ साली बंद झाला; तरीसुद्धा निरनिराळ्या पंथांतले विद्वान लोक आणि

धर्मगुरू हे अकबराजवळ नेहमी असत आणि त्यांच्याबरोबर धार्मिक चर्चेत तो भाग घेत असे. किरमानचे इराणी धर्मगुरू बोलावून त्यांच्याबरोबर पारशी धर्मातल्या गूढ तत्त्वांची चर्चा अकबराने केली. याझदानी आणि आबादानी लोकांचा धर्मगुरू दस्तुर अझर कैवान याच्याशी पत्रव्यवहार करून बादशहाने त्याला धार्मिक चर्चेसाठी हिंदुस्थानात बोलाविले. हिंदुस्थानात येणे अशक्य असल्यामुळे अझर कैवानने आपले विचार बादशहाला एका पत्राद्वारे कळवले. 'Self existing being' यावर लिहिलेले एक पुस्तक पण त्याने अकबराला पाठवून दिले.

## अकबराचा ख्रिस्ती धर्माशी प्रथम परिचय :

१५७३ सालच्या जानेवारी, फेब्रुवारी महिन्यांत सुरतेच्या वेढ्यात गुंतला असताना अकबराचा ख्रिस्ती धर्माशी प्रथम परिचय झाला. गोव्याच्या पोर्तुगीजांचे एक शिष्टमंडळ यावेळी त्याला भेटण्यास सुरतेला आले होते. अँटनी कॅब्राल नावाचा गृहस्थ या शिष्टमंडळाचा पुढारी होता. सुरतेच्या शिबंदीला अकबराविरुद्ध मदत करण्यासाठी हे पोर्तुगीज लोक गोव्याहून आले होते; पण मुघल सैन्याचे सामर्थ्य पाहून त्यांनी आपला विचार बदलला आणि बादशहासाठी नजराणे घेऊन ते दरबारात दाखल झाले. या भेटीचा अकबरावर पुष्कळ परिणाम झाला आणि त्याने पोर्तुगालचे लोक आणि तेथील धर्म यांविषयी आस्थेने चौकशी केली. इ. स. १५७७ मध्ये बंगालमधील सतगावचा पोर्तुगीज अधिकारी पेड्रो टॅव्हरीस हा आपल्या बायकोला घेऊन फत्तेपूर सिक्रीला आला होता. त्यांचे सौजन्य व सभ्य चालीरीती यांवर खूष झालेल्या अकबराची त्यांच्यावर मेहेरनजर होती. सर्व धर्मपंथांची माहिती करून घेण्यास उत्सुक असलेल्या अकबराने पेड्रो टॅव्हरीसला ख्रिस्ती धर्माबद्दल पुष्कळ प्रश्न विचारले. सतगावचा पोर्तुगीज पाद्री ज्युलियन परेरा हा या कामासाठी योग्य असल्याची सूचना पेड्रोने केली. बादशहाचे आमंत्रण स्वीकारून मार्च १५७८ मध्ये ज्युलियन परेरा फत्तेपूर सिक्रीला आला. आणि इबादतखान्यातील चर्चेत भाग घेऊ लागला. अकबराच्या शंकांचे समाधान करण्याइतकी विद्वत्ता परेराजवळ नव्हती. ख्रिस्ती धर्माचा अभ्यास व प्रचार करण्यासाठी जेजुइट लोकांनी गोव्याला काढलेल्या विद्यापीठातला एखादा विद्वान पंडित बोलावून घ्यावा, अशी सूचना त्याने अकबराला केली.

**गोव्याच्या पोर्तुगीज मिशनऱ्यांना अकबर आमंत्रण पाठवितो :**

गोव्याचे बडे लाट साहेब, तिथले प्रमुख धर्मगुरू आणि जेजुइट पाद्री यांच्यासाठी तीन निरनिराळे खलिते लिहून अकबराने आपल्या विश्वासातला अब्दुल्लाखान याची रवानगी गोव्यात केली. गोव्यातल्या दोन विद्वान धर्मपंडितांना खिरस्ती धर्म समजावून देण्यासाठी आपल्या दरबारात पाठवून देण्याची विनंती अकबराने या पत्राद्वारे केली होती. १५७९ च्या सप्टेंबर महिन्यात अब्दुल्लाखानचे शिष्टमंडळ गोव्याला जाऊन पोहोचले. तेथे त्यांचे अत्यंत आदराने स्वागत करण्यात आले. बादशहाकडे पाठविलेल्या मिशनऱ्यांना पोर्तगीजांच्या विरुद्ध ओलीस ठेवून घेतील अशी शंका आल्यामुळे गोव्याचा राजप्रमुख त्यांना पाठविण्यास प्रथम कां-कूं करीत होता. अखेरीस त्याची समजूत काढण्यात येऊन गोव्याच्या तीन विद्वान धर्मपंडितांना फत्तेपूर सिक्रीला पाठविण्यात आले (नोव्हेंबर १०). रुडॉल्फ अक्वाव्हिव्हा, अँटनी मॉनसेराट आणि फ्रॅन्सीस हेन्रीकेझ अशी या तीन धर्मपंडितांची नावे होती. अॅक्वाव्हिव्हा हा इटालीतल्या आत्रीच्या ड्यूकचा मुलगा असून जवळ जवळ २९-३० वर्षांचा होता. पूर्व गोलार्धात खिरस्ती धर्मप्रचाराचे काम करण्यासाठी त्याने खास शिक्षण घेतले होते. या कामाबद्दल त्याला इतके प्रेम होते की त्यानिमित्त मृत्यू पत्करण्यासही तो तयार होता. ४३ वर्षांचा मॉनसेराट हा स्पेनमधील कॅटलोनिया येथील रहिवासी असून मोठा धर्मपंडित होता. हेन्रीकेझ हा खरा खिरस्ती धर्म स्वीकारलेला इराणमधला मुसलमान. फारसी भाषा त्याला येत असल्यामुळे इतर दोघांबरोबर त्याला फत्तेपूर सिक्रीला पाठविण्यात आले. कुलीन घराण्यातला जन्म, विद्वत्ता आणि खिरस्ती धर्मावरील दृढ विश्वास या गोष्टी ध्यानात घेऊन अॅक्वाव्हिव्हाला या शिष्टमंडळाचा पुढारी नेमण्यात आले. त्याची राहणी अगदी साधी असून तो चारित्र्यशील आणि विनयसंपन्न होता. खिरस्तीचा संदेश हिंदुस्थानातल्या लोकांपर्यंत पोहोचविण्याची याची महत्त्वाकांक्षा होती. १७ नोव्हेंबर १५७९ रोजी ही मंडळी अकबराचा वकील आणि डॉमिनिक पिरेझ हा दुभाषी (आर्मिनियातला खिरश्चन) यांच्यासह गोव्याहून निघाली. सुरत, मांडू, उज्जैन, सारंगपूर, सिरोंग, मारवार, ग्वाल्हेर आणि धोलपूर या मार्गाने मोठ्या कष्टाचा प्रवास संपवून ही मंडळी २८ फेब्रुवारी १५८० रोजी फत्तेपूर सिक्रीला येऊन पोहोचली. अकबराला आणि हिंदुस्थानातल्या लोकांना खिरस्ती धर्मात ओढून घेण्याची मोठी आशा मनात बाळगून हे लोक बादशहाच्या दरबारी आले होते. येता येता वाटेत नारवार येथे मॉनसेराट आजारी पडला. यामुळे प्रथम काही

दिवस रुडॉल्फ आणि हेन्रीकेझ या दोघांचीच बादशहाच्या दरबारात हजेरी होती.

## गोव्यातल्या धर्ममंडळाचे स्वागत

फत्तपूर सिक्रीला पोहोचल्यावर रुडॉल्फ आणि हेन्रीकेझ यांना ताबडतोब अकबराकडे नेण्यात आले. बादशहाने त्यांचे मोठ्या आदराने स्वागत करून रात्री २ वाजेपर्यंत त्यांच्याशी बोलणी केली. सरकारी अतिथीगृहात त्यांची राहण्याची उत्तम सोय करून त्यांच्या दिमतीला योग्य ती माणसे नेमून दिली. दुसऱ्या दिवशी हे दोघे पुन: अकबराला येऊन भेटले आणि त्यांनी सात भागांत लिहिलेली बायबलची सुंदर प्रत बादशहाला नजर केली. या भेटीचा अत्यंत आदराने स्वीकार करून अकबराने आपला फेटा उतरवून या ग्रंथातला प्रत्येक भाग आपल्या डोक्यावर ठेवला आणि नंतर त्याचे आदराने चुंबन घेतले. यांपैकी खिरस्तचरित्र कोठल्या भागात आहे याची चौकशी करून त्याने तो भाग आपल्या छातीशी धरला.

## मिशनऱ्यांची असहिष्णुता

दर गुरुवारी होणाऱ्या धर्मसभेत हे धर्मपंडित भाग घेऊ लागले. कित्येक वेळा खास महालात किंवा बादशहाच्या खाजगी निवासस्थानी चर्चा चालू असे. खिरस्ती धर्म आणि इस्लाम या दोन धर्मांतील गुणदोषांची चर्चा या प्रसंगी एका दुभाष्याच्या मदतीने होत असे. परदेशातून आलेले हे लोक बादशहाचे पाहुणे असल्यामुळे येथील रिवाजास अनुसरून बादशहाने त्यांच्याबरोबर फार समजूतदार धोरण ठेवले होते. अनेक बाबतींत त्यांना पाठिंबा देण्याकडे त्याचा कल असे. रुडॉल्फ आणि मॉनसेराट हे विद्वान आणि धर्मप्रवण असले, तरी महंमद आणि कुराण याविषयी ते अत्यंत हेटाळणीची भाषा वापरीत. महंमद पैगंबराला ढोंगी, खोटे बोलणारा आणि सैतानी प्रवृत्तीचा अशी विशेषणे लावण्यासही त्यांनी कमी केले नाही. त्यांची एकंदर वागणूक जातीय आणि राष्ट्रीय अभिमानाने भरलेली असून आपल्या खाजगी पत्रव्यवहारात मुसलमानी लोक रानटी असून एकंदर हिंदुस्थानातले लोक दुष्ट आहेत असा उल्लेख ते करतात. अब्दुल कादीर बदायुनीसारख्या सुन्नी मुसलमानाइतकेच हे पण कॅथॉलिक पंथाचे हेकेखोर अभिमानी होते. आपल्याप्रमाणेच इतर धर्मही सत्यावर आधारलेले असून त्यांत अनेक चांगल्या गोष्टी, आहेत हे जाणून घेण्याची समजूतदार वृत्ती त्यांच्यामध्ये मुळीच नव्हती. असभ्य भाषा न वाप–

रण्याबद्दल त्यांना अनेक वेळा ताकीद देणे अकबराला भाग पडले आणि धर्मवेड्या मुसलमानांनी चिडून जाऊन त्यांचा खून करू नये म्हणून योग्य तो बंदोबस्त अकबराला करावा लागला. इस्लामी धर्म बेकायदा ठरवून खिरस्ती धर्माचा स्वीकार करण्याच्या बेतात अकबर आहे असा समज होऊन हे पोर्तुगीज पाद्री फत्तेपूर सिक्रीला आले होते. आपल्या धर्माबद्दलच्या अभिमानास बळी पडून त्यांनी आपल्या हेकेखोर वृत्तीचे असे काही प्रदर्शन केले की, त्यामुळे अकबर अनेक वेळा मोठ्या चमत्कारिक परिस्थितीत सापडला. सर्व धर्म हे एकाच ध्येयाकडे नेणारे निरनिराळे मार्ग आहेत, असे मानणारे दरबारातले उदार मतवादी अबुल फझल आणि हिंदू सरदार यांना खिरस्ती पाद्र्यांच्या या वागणुकीचे हसू आले तर काही नवल नाही. अकबराचे उदार धोरण आणि सर्व धर्मसमभाव हा खिरस्ती पाद्र्यांनी स्वतःच्या उभ्या आयुष्यात कधी न पाहिलेला एक नवाच चमत्कार होता. हिंदु धर्म, जैन धर्म झोरोस्ट्री धर्म, खिरस्ती धर्म आणि इस्लाम या सर्वांबद्दल सारखाच आदर बाळगून त्यांतील धर्मतत्त्वांचा मान राखणे कुणालाही कसे शक्य आहे हेच या खिरस्ती पाद्र्यांना कळेना.

## अकबराची मैत्रीची वागणूक

खिरस्ती पाद्र्यांच्या वागण्यातले हे दोष लक्षात घेऊनसुद्धा अकबर त्यांच्याशी खूप मैत्रीच्या नात्याने वागत असे. त्यांच्या बाबतीत अत्यंत उदार धोरण ठेवून ते राजधानीला येताच अकबराने ८०० सोन्याची नाणी रुडॉल्फकडे भेट म्हणून पाठवून दिली. त्यांपैकी स्वतःच्या आणि स्वतःबरोबरच्या सहकाऱ्यांच्या उदरनिर्वाहापुरती रक्कम जवळ ठेवून बाकीची रक्कम रुडॉल्फने अकबराकडे परत केली. अनेक वेळा बादशाही भटारखान्यातले अन्न त्यांच्यासाठी पाठविण्यात येत असे. इबादतखान्यात आणि खाजगी भेटीत अकबर त्यांना विशेष आदराने व प्रेमाने वागवीत असे. फत्तेपूर सिक्रीला पोहोचल्यानंतर काही दिवसांनी त्यांची राहण्याची सोय अकबराने आपल्या खास राजवाड्यातल्या एका भागात करून दिली. आपल्यासमोर उभे असताना डोक्यावरची टोपी त्यांनी काढू नये असा आग्रह अकबराने धरला. त्यांच्याशी हस्तांदोलन करून त्यांना तो आपल्या सिंहासनाजवळ बसवून घेई आणि त्यांच्याबरोबर खाजगी संभाषण करीत असे. याचा फायदा घेऊन मोठा जनानखाना बाळगण्याबद्दल, सतीची चाल बंद न केल्याबद्दल आणि राज्यकारभारातील इतर दोष काढून ही पाद्री मंडळी अकबरावर उघड उघड टीका करीत असत. पण ही टीका अकबराने कधीच मनावर घेतली नाही.

बायबलाचा आदराने स्वीकार करून ख्रिस्ती धर्मग्रंथाबद्दल आदर दर्शविण्या-साठी बादशहा अनेक वेळा आपले शिरस्त्राण काढून ठेवत असे. ख्रिस्ती देवळात प्रवेश करून अकबर येशू आणि मेरीच्या चित्रांना नमस्कार करीत असे. पोर्तुगीज भाषा शिकण्यासाठी आपला दुसरा मुलगा मुराद याला त्याने मॉनसेराटच्या हाताखाली ठेवले. इस्लामी मुल्लांच्या विरुद्ध अकबर या पोर्तुगीज मिशनऱ्यांची बाजू पण कधी कधी घेत असे. ख्रिस्ती धर्माचा जाहीर प्रचार करून हिंदू आणि मुसलमान लोकांना ख्रिस्ती धर्मात घेण्याची मुभा अकबराने त्यांना दिली होती. फत्तेपूर सिक्रीला मेलेल्या एका पोर्तुगीज गृहस्थाची मशालीच्या उजेडात क्रूस पुढे धरून मोठी प्रेतयात्रा काढण्याची व चारचौघांच्या देखत त्याला मूठमाती देण्याची परवानगी त्यांना देण्यात आली. एक रुग्णालय बांधून वैद्यकीय सल्लागार मंडळ नेमण्यालाही अकबराने काही हरकत घेतली नाही. या ख्रिस्ती धर्मप्रचारकांना अकबर स्वतःचे मित्र समजत असे आणि त्यांना लागेल तेव्हा लागेल ती मदत द्यावी असे त्याने अबुल फझलला सांगून ठेवले होते. राजदरबारातील हकीमास अकबराने रुडॉल्फ, मॉनसेराट आणि इतर ख्रिस्ती पाद्र्यांच्या तैनातीस ठेवले होते. एक दोन वेळा तर ख्रिस्ती पाद्र्यांच्या गळ्यात हात घालून तो खास बागेत फिरायला पण गेला होता.

## मॉनसेराट अकबराबरोबर काबूलला जातो

फेब्रुवारी १५८१ मध्ये आपला भाऊ मिर्झा हकीम याच्या विरुद्ध काबूलवर केलेल्या स्वारीत अकबराने मॉनसेराटला आपल्या बरोबर घेतले होते. चौकस बुद्धीच्या या विद्वान जेजूइट पंडिताने या प्रवासाची ठेवलेली रोजनिशी उपलब्ध असून त्यात अकबराची छावणी, त्याचे सैन्य आणि स्वारीची इतर सर्व माहिती आहे. ही रोजनिशी आता 'मंगोलिकल लिगे-शिओनिस कॉमेन्टेरीयस' या नावाने पुस्तकरूपाने प्रसिद्ध झाली असून त्याचे इंग्रजी भाषांतर उपलब्ध आहे. अकबराच्या दरबारात आलेल्या पहिल्या शिष्ट-मंडळाबद्दल आणि काबूलच्या स्वारीबद्दल अधिकृत माहिती या पुस्तकात आपल्याला पाहाण्यास मिळते. स्वारीच्या गडबडीत असतानासुद्धा अकबर वेळ काढून मॉनसेराटबरोबर ख्रिस्ती धर्माबद्दल कधी कधी चर्चा करत असे. 'येशूला सुळावर चढवले' त्या प्रसंगाबद्दल बारिक सारिक तपशील अकबर मॉनसेराटला विचारत असे. याबद्दल एक निबंध तयार करून मॉनसेराटने तो बादशहाला नजर केला. तसेच पोर्तुगालचा इतिहास, भूगोल आणि तेथील राज्यपद्धती व इतर अनेक विषयांवरची माहिती अकबराला या पंडिताकडून

मिळाली. १५७८ मध्ये पोर्तुगालचा राजा सिबॅस्टियन याच्या मोरोक्कोला झालेल्या पराभवाबद्दल सुद्धा अकबराने मॉनसेराटकडून माहिती गोळा केली.

## चर्चेसाठी घेतलेले विषय

खिरस्ती धर्मातल्या अनेक विचारांवर खिरस्ती पाद्रयांची प्रवचने झाली. त्यांची सविस्तर माहिती मनोरंजक आहे. 'बायबल हा ईश्वरनिर्मित ग्रंथ आहे' यावरून चर्चेला सुरूवात झाली. जुन्या करारात बायबलचा उल्लेख असल्यामुळे त्याचा अधिकार कुराणापेक्षा अधिक आहे, कारण कुराणाचा असा उल्लेख जुन्या करारात नाही, असे मत खिरस्ती धर्मप्रचारकांनी मांडले. शिवाय बायबल हे ईश्वरप्रणित आहे, ही गोष्ट महंमद पैगंबराने पण मान्य केली होती. बायबल ईश्तरप्रणित आहे हे मान्य केल्यास येशू हा ईश्वराचा अंश आहे हे पण आपोआप सिद्ध होते, अशी मिशनरी भूमिका होती. त्यानंतर स्वर्ग आणि नरक याबद्दल कुरणातील उल्लेख विचारात घेऊन येशूच्या मृत्यूबद्दल कुराणातल्या विधानांची विसंगती दाखवून देण्याचा प्रयत्न खिरस्ती पाद्रयानी केला नंतर त्यांनी येशू आणि महंमद यांच्या खाजगी जीवनाची तुलना केली. अशा तऱ्हेने बायबल हे ईश्वरप्रणित आहे की कुराण आणि येशू व महंमद यांच्या गुणविशेषांची तुलना या दोन मुख्य मुद्यांवर प्रथम चर्चेस सुरूवात झाली. येशूच्या ईश्वरी अंशाबद्दल इतर लोकांनी दिलेले दाखलेच यावेळी खिरस्ती लोकांनी पुढे केले. खिरस्ती धर्मातली त्रिमूर्ती आणि ईश्वरी अवतार याबदल अकबराला मोठे कोडे पडले होते. 'ईश्वराला पुत्र होईल' हा विचारच मला समजत नाही असे तो म्हणे. तसेच येशूच्या ईश्वरी आणि पार्थिव अंशाबद्दलही त्याच्या मनात खूप कुतूहल होते. यावेळीच इतर गोष्टींबद्दलही चर्चा झाली. त्या म्हणजे (१) खिरस्ताचे पुनरागमन (२) अखेरचा निवाडा (Last Judagement (३) The Status of paraclete (४) The Holy Ghost (५) नोहाच्या बोटीचा गर्भित अर्थ (The significance of Noaha's Ark (५) श्रद्धा किंवा धर्ममत (faith) आणि ईश्वराची करुणा (Grace) यांमधील फरक, (६) खिरस्ती प्रभु-भोजन समारंभ (Mass) इत्यादि.

वरील सर्व प्रश्नांबाबत अकबराने आपल्या शंकाकुशंकांच समाधान करण्यासाठी खिरस्ती प्रचारकांना पुष्कळ प्रश्न विचारले. क्रुसावरून खाली येऊन येशूने यहुदी लोकांचे आव्हान का स्वीकारले नाही? येशूच्या दैवी अंशाबद्दल शंका असणाऱ्या संत टॉमसला आपल्या जखमेत बोटे घालण्यास का परवानगी

दिली ? देवाच्या उजव्या हातास बसणे (Sitting at the right hand of God) आणि ख्रिस्ती भिक्षूंचे ब्रम्हचर्य याचा अर्थ काय ? अशा तऱ्हेचे अनेक प्रश्न अकबराने त्यांना विचारले. आर्मेनियन ख्रिस्ती आणि नेस्टोरियन ख्रिस्ती यांच्या धर्ममतांचे विवरण करण्यासही त्याने सांगितले. महंमद पैगंबराचे नाव जेनिसिस आणि बायबल यांमधून मुद्दाम काढून टाकले, असा आरोप इस्लामी पंडितांनी केल्यावरून मोठे वादंग माजले. ख्रिस्ती धर्मग्रंथ दूषित करण्यास महंमदच जबाबदार आहे, असा पवित्रा ख्रिस्ती भिक्षूंनी घेतला. कुराणात अनेक चुका असून त्यात अनेक अनैतिक विधाने आहेत, या मॉनसेराटच्या आरोपामुळे वातावरण खूपच तापले आणि जपून शब्द वापरण्याची ताकीद मॉनसेराटला रागावलेल्या बादशहाकडून मिळाली.

अशा तऱ्हेने बायबल आणि कुराण यांतला ईश्वरी ग्रंथ कोणचा आणि त्याची योग्यता किती याबद्दल खूप वाद माजला. हा प्रश्न निकालात काढण्यासाठी अग्निदिव्य करावे असे जलेसरचा मुल्ला शेख कुतुबुद्दिन याने सुचविले. अकबराला हा मार्ग योग्य वाटल्यावरून एक अग्नि प्रज्वलित करण्यात आला आणि एक ख्रिस्ती भिक्षू आणि इस्लामी मुल्ला यांनी बायबल आणि कुराण हातात घेऊन बादशहासमोर अग्निप्रवेश करावा असे आव्हान करण्यात आले. ईश्वराचा अंत पाहण्याचा हा प्रकार आहे आणि असे करणे ख्रिस्ती धर्माच्या विरुद्ध आहे, असे बादशहाला सांगून रुडॉल्फने अग्निप्रवेश करण्याचे नाकारले. या गोष्टीचा निरनिराळ्या प्रकाराने उल्लेख केलेला आढळतो. ही सूचना प्रथम ख्रिस्ती भिक्षूकडून आली आणि मौलवी लोकांनी त्याला मान्यता दिली नाही, असे अबुल फझल म्हणतो; पण ही सूचना शेख कुतुबुद्दिनकडून आली आणि ख्रिस्ती लोकांनी ती भ्याडपणे नाकारली, असे बदायुनी म्हणतो. बदायुनीचे म्हणणे बरोबर असावे असे वाटते; कारण ही सूचना एका मुल्लाने प्रथम केली आणि ती ख्रिस्ती धर्मात बसत नाही म्हणून रुडॉल्फने ती अमान्य केली. मॉनसेराटला हे मान्य असावे; कारण त्याने रुडॉल्फची बाजू घेऊन त्याच्यावरील भ्याडपणाचा आरोप खोडून काढला आहे.

### ख्रिस्ती धर्ममंडळाला आलेले अपयश

कॅथॉलिक धर्मगुरूंचा मुक्काम अकबराच्या दरबारात एक वर्षभर होता. हेन्रीकेझ जवळजवळ एका वर्षाच्या वास्तव्यानंतर १५८१ साली फत्तेपूर सिक्री सोडून गेला. त्याचे या धर्ममंडळात विशेष महत्त्व नव्हते. एप्रिल १५८२ आणि फेब्रुवारी १५८३ मध्ये अनुक्रमे मॉनसेराट आणि रुडॉल्फ यांनी बादशहाचा

निरोप घेतला. बादशहा खिरस्ती धर्म स्वीकारणार अशी मोठी आशा बाळगून हे खिरस्ती प्रचारक फत्तेपूर सिक्रीला आले होते; पण एक वर्षाच्या वास्तव्यात त्यांच्या प्रवचनांवरचे बादशहाचे लक्ष उडत चालले आहे, असे त्यांना आढळून आले. गोव्याहून पण त्यांना परत फिरण्याचा आदेश मिळाला. त्यांच्या मते अकबर खिरस्ती झाला नाही याची दोन मुख्य कारणे म्हणजे त्याचा वृथाभिमान आणि त्याच्या जनानखान्यातल्या अनेक बायका. अनेक स्त्रियांशी लग्न लावलेल्या अकबराला खिरस्ती धर्माचे एकपत्नीव्रत मान्य होण्यासारखे नव्हते आणि वृथा अभिमानाच्या बळी पडून खिरस्ती धर्माचे वर्चस्व आणि देवाचे सार्वभौमत्व मानण्यास तो तयार नव्हता. खरे पाहता हे दोन्ही तर्क चुकीचे होते. खिरस्ती धर्म स्वीकारण्यासाठी अकबराने या खिरस्ती धर्मगुरूंना दरबारात बोलावले नव्हते. तसेच आपली श्रद्धा असलेल्या परमेश्वराचे वर्चस्व न मानण्याइतका पाखंडी आणि दुराभिमानी पण तो नव्हता. एक-पत्नी-व्रताची अडचण मात्र खरी होती. लग्न लावलेल्या रजपूत राण्यांना टाकून देऊन रजपूत लोकांचा रोष ओढवून घेणे अकबराला अशक्य होते. खिरस्ती धर्मातली चांगली तत्त्वे शोधून काढून त्यांचा आपल्यासाठी व देशासाठी उपयोग करून घेणे हा अकबराचा खरा हेतू गोव्याच्या खिरस्ती भिक्षूंना समजलाच नाही. खिरस्ती धर्माची प्रत्यक्ष माहिती करून घेऊन खिरस्ती धर्मगुरूंच्या साह्याने खिरस्ती धर्मग्रंथांचे यावनी भाषेतून फारसी भाषेत भाषांतर करून ते हिंदुस्तानातील विद्वान लोकांना उपलब्ध करून द्यावे, हा अकबराचा खरा हेतू होता. अबुल फझलने या गोष्टीवर इतका भर दिला आहे की, आधुनिक युरोपातील लेखकांच्या ध्यानात ती येऊ नये याचे आश्चर्य वाटते. खिरस्ती धर्म हा सर्वश्रेष्ठ धर्म आहे अशी खात्री झाली असूनसुद्धा अकबर खिरस्ती झाला नाही. त्यामागे काही राजकीय आणि खाजगी कारणे आहेत असा जो पोर्तुगीज धर्मप्रचारकांचा समज आहे त्यात स्वत:ची फसवणूक करून घेण्याचाच भाग अधिक दिसतो. हिंदू, जैन आणि झोरोस्ट्री धर्मातल्या अनेक चालीरीती अकबराने स्वीकारल्या; पण खिरस्ती धर्माबद्दल तसे काही झाले नाही. येशू, मेरी आणि खिरस्ताचे अनुयायी यांच्या प्रतिमांबद्दल त्याने आदर दाखवला एवढेच. हिंदुस्थानातले उदारमतवादी लोक आजसुद्धा असा आदर दाखवतात; पण यावरून खिरस्ती धर्मावर त्यांचा नितांत विश्वास आहे, असे म्हणता येत नाही. खिरस्ती धर्मातल्या त्रिमूर्ती आणि अवतार या गोष्टी अकबराला मुळीच पटल्या नाहीत. त्यामुळेच खिरस्ती धर्मप्रचारकांना त्याच्या दरबारात संपूर्ण अपयश आले.

याशिवाय मरियम मकानी आणि जनानखान्यातल्या इतर स्त्रिया व हिंदू

आणि मुसलमान धर्मपंडित आणि सरदार यांचा खिरस्ती धर्माला विरोध हे पण कारण होतेच. मॉनसराट आणि रूडाल्फ यांचा हटवादी धर्मवेडेपणा पण बादशहाचे मन खिरस्ती धर्मावरून उडून जाण्यास कारणीभूत झाला असावा. तसे उघडपणे त्याने कधी दाखवले नाही हे त्याच्या स्वभावला धरूनच होते.

## दमणवर मुघलांची स्वारी

खिरस्ती धर्मप्रचारकांना परत बोलावण्याचे एक कारण म्हणजे एप्रिल १५८२ मध्ये मुघल सैन्याने दमणवर केलेली स्वारी हे होय. सुरतेविरुद्ध पोर्तुगीजांनी केलेल्या स्वारीचा बदला म्हणून या स्वारीची आखणी करण्यात आली होती. हिंदी महासागरात पोर्तुगीजांचे वर्चस्व असून पश्चिमेकडील समुद्रकिनारा त्यांच्या ताब्यात होता. असे असल्यामुळे पोर्तुगीज लोक पुष्कळदा हिंदुस्थानच्या भूमीवर आक्रमण करून अरबस्तानात जाणाऱ्या मुसलमान यात्रेकरूंना त्रास देत असत. इ. स. १५७५ मध्ये दमणजवळील बलसाड गाव पोर्तुगीजांना देणगी म्हणून देईपर्यंत त्यांनी गुलबदन बेगमला हेदजच्या यात्रेला जाऊ दिले नाही, याचा उल्लेख पूर्वी आलेलाच आहे. या अपमानाचे उट्टे काढण्यासाठी १५८० मध्येच अकबराने कुतुबुद्दिनखानला दमणच्या स्वारीवर पाठवले होते. पण याचवेळी गोव्याहून खिरस्ती प्रचारकांना बोलावल्यामुळे त्यांच्या मार्गात काही अडथळा येऊ नये व स्वत:ला खिरस्ती धर्माची माहिती मिळावी म्हणून अकबराने ही स्वारी तहकूब केली पण यामुळे स्वस्थ न बसता आपले आक्रमक धोरण चालूच ठेवून काही पोर्तुगीज चाचांनी सुरतेवर हल्ला केला. त्यांचा प्रतिकार करून त्यांना हुसकावून देण्यात आले आणि पकडलेल्या नऊ चाच्यांना फाशीची सजा दिली. हे पाहून दमणमधल्या काही आततायी लोकांनी सुरतेवर हल्ला केला; पण त्यांचही योग्य तो प्रतिकार करून त्यांना हाकलून देण्यात आले. त्याच्या पुढल्या वर्षी म्हणजे इ. स. १५८२ साली भडोचचा फौजदार कुतुबुद्दिनखान याने बलसाड परत देण्याची मागणी करून ५ एप्रिल रोजी दमणवर हल्ला चढवला; पण तेवढ्यात मार्टिन अल्फान्झो द मेलो याच्या हाताखालील पोर्तुगीज फौज तेथे येऊन पोहोचली आणि त्यांनी मुघल सैन्याचा निकराने प्रतिकार केला. दमणच्या स्वारीबद्दल बादशहाकडे नापसंती व्यक्त करण्याचा आदेश रुडॉल्फला गोव्याच्या राजप्रमुखाकडून मिळाला. या स्वारीबाबत मला काही माहिती नाही, असे सांगूनसुद्धा बादशहाने आपल्या सरदाराला दोष देण्याचे साफ नाकारले; तथापि कुतुबुद्दिनला लढाई थांबविण्यास सांगून पोर्तुगीजांच्या वाटेला न जाण्याचा सल्ला त्याने दिला.

## स्पेनचा राजा दुसरा फिलिप याच्या दरबारात वकील पाठविण्याची तयारी

गोव्याचे धर्ममंडळाचे काम संपवून मॉनसेराट परत जाण्यास निघाला. या संधीचा फायदा घेऊन पोर्तुगालच्या गादीवर बसलेला राजा दुसरा फिलिप याचे अभिनंदन करण्यासाठी आपला एक वकील स्पेनला पाठविण्याचे अकबराने ठरविले. रुडॉल्फला फत्तेपूर सिक्रीला राहण्याचा आग्रह करून आपले दोन मुघल सरदार अब्दुल्ला खान आणि सय्यद मुझफ्फर ह्यांना बरोबर घेऊन स्पेनला जाण्याची जबाबदारी त्याने मॉनसेराटवर सोपवली. तेथून दोन ख्रिस्ती भिक्षूंचे शिष्टमंडळ बोलाविण्याचा हेतू पण यात होता. आपल्या वकिलाबरोबर पाठविलेल्या पत्रात फिलिपला 'युरोपचा राजा' असे संबोधून अकबर खरा धर्म जाणून घेण्याची आपली इच्छा प्रगट करतो. या पत्रात पुढे तो लिहितो "ईश्वरी साक्षातकाराने प्रगट झालेली, जुन्या करारात प्रसिद्ध झालेली पहिली पाच पुस्तके ( Pentateuch ). ख्रिस्ताचा शुभवृत्तांत ( gospels ) आणि ख्रिस्ती प्रार्थनागीते ( psalms ) यांची अरबी आणि फारसी भाषेत भाषांतरे झाली आहेत, असे मला समजते. सर्वांना कल्याणकारक असणारी ही पुस्तके आपल्या दरबारी असल्यास त्यांच्या मूळ प्रती किंवा भाषांतरे इकडे पाठवून द्यावीत". तारीख "रबी-डल-अबल ९९० हिजरी" ( मार्च, एप्रिल १५८२ ). बादशहाने पाठविलेली ही वकीलात गोव्याच्या पलिकडे जाऊ शकली नाही. ५ ऑगस्ट रोजी सुरतेला पोहोचल्यावर इतक्या लांबचा प्रवास टाळण्याच्या हेतूने सय्यद मुझफ्फर दक्षिणेत पळून गेला. अनेक जिवावरच्या संकटांना तोंड देत मॉनसेराट व अब्दुल्लाखान गोव्याला येऊन पोहोचले; पण दर्यावरचा मोसम ठीक नसल्यामुळे लिस्बनला जाण्याचा परवाना त्यांना देण्यात आला नाही. परिणामी अब्दुल्लाखान फत्तेपूर सिक्रीला परत आला आणि स्पेनला प्रतिनिधी पाठविण्याचा बेत तसाच राहिला. *

फेब्रुवारी १५८३ मध्ये गोव्याला परत जाण्याची परवानगी अकबराने रुडॉल्फला दिली. मे महिण्यात तो गोव्याला जाऊन पोहोचला. गोव्याजवळील सालसेट जिल्ह्यातील गुमकोलीम या गावी २७ जुलै या रोजी त्याचा खून झाला. इ. स. १८९३ मध्ये तो मुक्त होऊन स्वर्गात शाश्वत सुखाप्रत गेला'

---

* कॉमेन्टेरिअस, १६३, १८४-१९१; अकबराचे दुसऱ्या फिलिपला पत्र पाहा: इन्शा-इ- अबुल फझल ( एन्. के. प्रेस लखनौ, १८६२ ) पा. ३७–३९. दोन्ही पत्रांतला मजकूर एकच होता. त्यातले एक फिलिपला आणि दुसरे युरोपच्या विद्वान लोकांना पाठवले होते.

शी घोषणा कॅथॉलिक चर्चतर्फे करण्यात आली. "देवाचा आवडता रुडॉल्फ क्वा व्हीवा" ( Blessed Rudolf Acquaviva ) अशी त्याची प्रसिद्धी ाली.

## न धर्माशी अकबरचा प्रथम–परिचय

१६ व्या शतकात आग्रा हे जैन धर्माचे एक मुख्य ठिकाण होते. त्यामुळे न धर्मासंबंधी अकबराला प्रथमपासून बरीच माहिती होती. येथे त्याची आणि न लोक आणि जैन धर्मगुरु व यांची प्रथम ओळख झाली. अंबरच्या राजघरा-याशी अकबराचा आलेला संबंध आणि अजमेरला त्याने वरचेवर यात्रेसाठी लेला प्रवास यामुळे राजस्थानमधल्या जैन आचार्याशी त्याचा संबंध आला. ाच्या दरबारात आलेल्या पहिल्या जैन पंडिताचे नाव तापागाछाचा बुद्धिसा-र असे सांगतात. दयाकलश नावाच्या प्रसिद्ध जैन मुनीचा अनुयायी खरतार-छाचा साधुकीर्ति याचा आणि बुद्धिसागराचा वादविवाद १५६८ साली राज–रबारी झाल्याचा उल्लेख आढळतो. समकालीन तपागाछाची, पद्मसुंदर या तिसऱ्या न साधूची आणि अकबराची ओळख होती. निरनिराळया धार्मिक पंथांबद्दल तूहल आणि जिज्ञासा असल्यामुळे अकबर लहानपणापासूनच निरनिराळया र्मातल्या लोकांची भेट घेत असे. यावरून १५६८ पूर्वीच त्याचा जैन आचार्यांशी बंध आला असावा, असे मानण्यास जागा आहे. इ. स. १५७८ मध्ये इबादत ान्यात इस्लामी धर्माबाहेरील इतर लोकांना येण्याची परवानगी देण्यात आली. ावेळी काही जैन पंडित तेथे हजर होते. यात बिलकूल शंका नाही. इ. स. ५७८–७९ च्या दरम्यान जैन भिक्षू आणि श्वेतांबरी जैन साधू धर्मसभेत हजर सल्याचा हवाला अबुल फझल देतो.

## ादशहाच्या दरबारातले पहिले अधिकृत जैन शिष्टमंडळ

इबादतखान्यातल्या जैन लोकांच्या वागणुकीचा अकबरावर फार चांगला रिणाम झाला. आणि हीर विजय सुरी नावाच्या त्या वेळच्या अत्यंत प्रसिद्ध न धर्मगुरूला दरबारात येण्याचे आमंत्रण पाठविण्यात आले. हीर विजय सुरी त्यावेळी श्वेतांबर जैनांचा मुख्य धर्मगुरु होता. गुजराथमधील पालनपूर ावी विसाओस्वाल कुटुंबात १५२६ साली हीराजी ( हीर विजयचे पहिले ांव) याचा जन्म झाला. त्याचे आईबाप लहानपणीच मृत्यू पावले. वयाच्या ३ व्या वर्षी ( १५३९ ) पाटणच्या विजयानंद सुरीचे शिष्यत्व त्याने पत्क-ले. १५५४ मध्ये तो सिरोहीचा जैन आचार्य झाला. १५६६ साली श्वेतांबर

जैनातील कपागाछा पंथाचा तो गुरू आणि प्रमुख झाला. जम्बुद्वीपप्रज्ञापति यावरील त्याच्या टीकेमुळे एक विद्वान साधू पुरुष अशी त्याची कीर्ती सर्व हिंदुस्थानभर पसरली. त्याचे नांव बादशहाच्या दरबारी पण ऐकू येऊ लागले. इ. स. १५८२ च्या सुरुवातीला राजधानीला भेट देऊन जैन धर्माचे तत्त्वज्ञान बादशहाला समजावून द्यावे अशा अर्थाचे बादशहाच्या सहीचे आमंत्रण त्याच्याकडे गेले. आग्र्यातल्या जैन मंडळींनी हीर विजय सुरीला आपल्यातर्फे आग्र्याला बोलावून घ्यावे अशी सूचना बादशहाने केली. तसेच बादशहाचे आमंत्रण स्वीकारण्याविषयी या जैन साधूचे मन वळवावे' असे गुजराथचा सरदार शहाबुद्दिन अहमदखान यास कळविण्यात आले. हीरविजयची विद्वत्ता आणि जैनधर्म विशद करून सांगण्याची हातोटी याची वार्ता कानावर आल्यामुळे अकबर त्याची भेट घेण्यास फार उत्सुक झाला होता. राजधानीच्या प्रवासात या मोठ्या पाहुण्याची सर्व तऱ्हेची बरदास्त राखण्याचा हुकूम शहाबुद्दिन अहमदखानला देण्यात आला. हीर विजय सुरीचा मुक्काम यावेळी भडोच जवळच्या गंधार नावाच्या छोट्याशा बंदराच्या गावी होता. आपल्या अनुयायांच्या हरकतीस व भीतियुक्त विरोधास न जुमानता हीर विजय सुरीने बादशहाच्या आमंत्रणाचा आनंदाने स्वीकार केला. या भेटी–मधून जैन धर्माचा आणि जैन लोकांचा पुष्कळ फायदा होईल असे त्याला वाटले. प्रवासाची तयारी झाली. शहाबुद्दिन अहमद खानने त्याचे मोठ्या आदराने स्वागत केले आणि पुष्कळ खजिना, पालख्या, घोडे आणि हत्ती त्याच्या व त्याच्या अनुयायांच्या दिमतीस दिले या सर्व संपत्तीचा आणि डामडौलाचा स्वीकार न करता हे जैन मुनी पायी प्रवास करीत आणि वाटेतल्या गावांना भेटी देत, तेथे जैन धर्माचा प्रचार करीत राजधानीकडे निघाले. पाटणहून सुरीने आपला शिष्य विमलहर्ष उपाध्याय याच्या बरोबर आपले काही खास शिष्य देऊन त्याची फत्तेपूर सिक्रीला आधी रवानगी करून दिली. सिद्धपूरला आल्यावर त्याच्या खालोखाल जैन धर्मावर अधिकार सांगणारा त्याचा प्रमुख शिष्य विजयसिंग सुरी याला काठेवाडला परत पाठविण्याचे ठरले. हीरीविजयच्या गैरहजेरीत त्याचे काम विजयसिंग सुरीने पाहावे असा यातला हेतू होता.

## हीर विजय सुरी फत्तेपूर सिक्रीला पोहोचतो

७ जून १५८३ रोजी ६७ भिक्षूंच्यासह हीर विजय सुरी फत्तेपूर सिक्रीला येऊन पोहोचला. शहरातल्या लोकांनी त्या सर्वांची थाटाने मिरवणूक काढून शहरातील उपाश्रयात त्यांना पोहोचवले. अबुल फझलने त्याची प्रथम भेट घेऊन नंतर त्याची व अकबराची गाठ घालून दिली. त्याची साधुवृत्ती

आणि जैन धर्माविषयी त्याचे ज्ञान याचा बादशहावर फार प्रभाव पडला. हीर विजय सुरीचा दरबारात दोन वर्षे मुक्काम होता. १५८३ चा पावसाळा त्याने आगऱ्याला काढला आणि तेथून मथुरेची व ग्वाल्हेरची वारी करून तो राजधानीला परतला. परत आल्यावर त्याच्या व अकबराच्या अनेक वेळा भेटी होऊन त्यात जैन धर्म आणि त्याचे कर्मकांड आणि धार्मिक उत्सव यांविषयीची संपूर्ण माहिती त्याने अकबराला करून दिली. साधुचरित सुरीचा स्वभाव, विद्वत्ता आणि व्यक्तिमत्व यांमुळे अकबर इतका हरखून गेला की; त्याने त्याला जगद्‌गुरु ही पदवी बहाल केली. इहलोक आणि परलोक या दोन्हींचे ज्ञान असणाऱ्या अकबराच्या दरबारातील उत्तमोत्तम २१ विद्वानांच्या यादीत याचे नाव सापडते. ‘ माझ्याकडून काय हवे ते मागून घ्या ’ असा बादशहाने हीर विजयला आग्रह केला. निष्कांचन ब्रम्हचाऱ्याचे जीवित जगणाऱ्या चारित्र्यवान आचार्यांना स्वत:साठी काहीच मागावयाचे नव्हते. सर्व प्राणिमात्रांबद्दल अहिंसा मनात बाळगून त्या मूक प्राण्यांवर दया दाखवावी, असे त्याने अकबराला सांगितले. तदनुसार बादशहाने अनेक कैदी सोडून दिले आणि राज्यातील सहा प्रांतांत राहणाऱ्या जैन लोकांचा पर्यूषण हा सण सुरू असताना १२ दिवस प्राणिहत्त्येस बंदी करण्याचे फर्मान काढले. दुसऱ्या एका फर्मानाने गुजराथ आणि काठेवाडमधील हिंदू आणि जैन लोकांवरील जिझिया कर कायमचा बंद केला. यांतील काही फर्माने अजून उपलब्ध आहेत. ६ जून १५८४ रोजी काढलेल्या (७ जमादि उल अखीर ९९२ हिजरी) माळव्यासंबंधीच्या फर्मानाचे इंग्रजी भाषांतर मालकम याने ‘ A memoir of Central Indid & Malwa ’ या पुस्तकात उद्‌धृत केले आहे. जैन लोकांच्या वस्तीत नेमून दिलेल्या दिवशी प्राणिहत्त्या करू नये याचा बादशाही हुकुमात खास उल्लेख केलेला आहे.

## राजदरबारी जैन धर्माचा प्रभाव

१५८५ साली हीर विजय सुरी फत्तेपूर सिक्रीहून काठेवाडला परत गेला; पण जैन धर्माचा प्रभाव बादशहाच्या मृत्यूपर्यंत मुघल दरबारात दिसून येत असे. हीर विजय बरोबर आलेला शांतिचंद्र नावाचा जैन मुनी फत्तेपूर सिक्रीलाच राहिला. दुसरा एक जैन धर्मगुरु भानुचंद्र याला हीर विजयने लाहोरला अकबराकडे पाठवून दिले. १५८७ साली शांतिचंद्र राजधानीहून निघाला; तेव्हा बादशहाने त्याच्या हातात दुसरे एक फर्मान दिले. त्यात जिझिया कर रद्द झाल्याचे पुन्हा म्हटले होते आणि निरनिराळे दिवस धरून एकंदर ६

महिने प्राणिहत्येस बंदी करण्यात आली होती. शांतिचंद्राने अकबराला उद्देशून एक स्तुतिस्तोत्र रचून त्यात हीर विजय सुरीच्या शिकवणीमुळे बादशहाने केलेल्या अनेक धर्मकृत्यांचा उल्लेख केलेला आहे. १५८७ सालापासून बादशहाच्या दरबारात आलेला भानुचंद्र १५९२ मध्ये अकबराबरोबर काश्मीरला गेला. जैन धर्मग्रंथावर त्याचे असामान्य प्रभुत्व असून तपगाछाचा मेरुमणी असा त्याच्याविषयी उल्लेख केलेला आढळतो. दरबारातील पाचव्या प्रतीच्या विद्वान मंडळींत त्याचा उल्लेख केलेला ऐने अकबरीत सापडतो.

हीर विजय सुरी दरबारातून काठेवाडला निघून गेल्यावर सुद्धा बादशहा त्याला विसरला नाही; कारण त्यानंतर बादशहाने गुजराथ आणि इतर प्रांतांतील सुभेदारांना काढलेली जैन लोकांना द्यावयाच्या सवलतीबद्दलची अनेक फर्माने उपलब्ध आहेत. १६ फेब्रुवारी १५९० रोजी गुजराथचा सरदार खान–इ–आझम याला पाठविलेल्या फर्मानात जैन देवळांच्या कारभारात कुठलीही ढवळाढवळ न करण्याचा स्पष्ट आदेश आहे. जैन धर्माबाहेरील लोकांनी जैन देवळात वस्ती करू नये, असाही आदेश यात आहे जैन लोक तंत्रविद्येचा अवलंब करणारे आहेत असे समजून त्यांना कोणी वाईट वागणूक देऊ नये आणि जैन देवळांच्या डागडुजीच्या कामात कोणीही अडथळा आणू नये, असेही या फर्मानात म्हटले आहे. १५९२ साली हीर विजय सुरीच्या नावाने आणखी एक फर्मान काढून अकबराने ते आग्रा, माळवा, लाहोर, मुलतान, अहमदाबाद आणि इतर काही प्रांतांतल्या सुभेदारांकडे पाठवून दिले. सिद्धाचल, गिरनार, तरंगा, केशरीनाथ आणि अबु या गुजराथमधील टेकड्या, राजगीरच्या पाच टेकड्या आणि सारभेटची टेकडी, तसेच बंगलमधील पार्श्वनाथचे शिखर आणि त्याच्या पायथ्याची सर्व देवळे आणि कोठ्या व श्वेतांबर जैनांची इतर सर्व यात्रेची ठिकाणे जैनांच्या ताब्यात द्यावी असे या फर्मानात म्हटले आहे. *

हीर विजय सुरीचे चरित्र आणि कार्य यासाठी खालील ग्रंथ पाहा.

(१) हीर विजय सुरी रस – ले. वृषभदास.

(२) कृपारसकोष — ले. शांतीचंद्र उपाध्याय.

---

* Proceedings of the Iindian History congress 1939; Pages 1062 to 1065

Commisariat, Part 2, Pages 233 to 234

(३) हीरासौभाग्य काव्य – ले. देवीमल.

(४) जगद्गुरुकाव्य – ले. पद्मसागर.

जैन धर्मपद्धतीला अनुसरून दक्षिण काठेवाडमधील दीव येथील पोर्तुगीज वसाहतीजवळ असलेल्या उना या गावी १५९६ मध्ये हीर विजय सुरींने आमरण उपोषण करून देहत्याग केला.

भानुचंद्र हा पाचव्या श्रेणीतला विद्वान याबद्दल पाहा ऐने अकबरी भाग १ पान ६१७.

## जैन धर्माचा अकबरावर झालेला परिणाम

झोरोस्ट्री धर्मातील सूर्योपासनेचा अकबराच्या मनावर जसा परिणाम झाला, तसाच परिणाम जैन धर्मातील अहिंसा तत्त्वाचा झाला. जैन आणि हिंदू धर्मपंडितांशी संबंध आल्यानंतर अहिंसा तत्त्वाचा त्याच्या मनावर फार खोल ठसा उमटला. स्वत:चा सामिष आहार कमी करून आपल्या अत्यंत आवडीचा शिकारीचा नाद त्याने जवळ जवळ सोडून दिला. राज्यात वर्षातले सुमारे सहा महिने प्राणिहत्त्येला बंदी केली. याविषयी १५८१ साली बादशहाने काढलेल्या कडक हुकमाचा उल्लेख अबुल फझल करतो, त्यात जैन धर्माची शिकवण पुष्कळशी दिसून येते. उदा.– उंदरांना मारू नये, बैलांचे पालन-पोषण करावे; विशिष्ट मोसमात चित्ते पकडू नयेत किंवा त्यांची शिकार करू नयें, सशांची शिकार करून ते खाऊ नयेत, अशा तऱ्हेचे हुकूम काढलेले आढळून येतात. पाचव्या हुकमान्वये काही दिवशी मासे पकडण्यास घातलेली बंदी, सहाव्या हुकुमान्वये काही दिवशी साप मारण्यास बंदी, सातव्या हुकुमान्वये घोडे मारून त्यांचे मांस खाण्यास मनाई, आठव्या हुकुमान्वये शेळचा न मारणें, नवव्या हुकुमान्वये माकडांची शिकार न करणे व पिंजऱ्यात कोंडून ठेवली असतील त्यांना सोडून देणे, दहाव्या अन्वयें कोंबडी न मारणे, अकराव्या अन्वयें कुत्र्याचा शिकारीसाठी उपयोग न करता त्यांचे पालनपोषण करणे. आणि बाराव्या अन्वयें डुकरांची शिकार न करणे, इत्यादि हुकूम दिलेले आढळतात. तसेच चांद्रमासीय वर्षातल्या प्रत्येक महिन्यात काही सत्कार्य करण्याची प्रथा सुरू करण्यात आली. उदा.– पहिल्या महिन्यात कुठल्याही प्राणिमात्राची हत्त्या करावयाची नाही, दुसऱ्या महिन्यात कैद्यांची सुटका करावयाची, तिसऱ्या महिन्यात देणग्या द्यावयाच्या, चौथ्या महिन्यात शरीर स्वच्छ ठेवावे व त्याचे कोणत्याही प्रकारे चोचले पुरवू नयेत, पाचव्या महिन्यात उंची वस्त्रें वापरा–वयाची नाहीत, सहाव्या महिन्यात कातड्याचा उपयोग करावयाचा नाही,

सातव्या महिन्यात एखादे परोपकारी कृत्य करावयाचे, आठव्या महिन्यात कोणावर जुलूम करावयाचा नाही, नवव्या महिन्यात गरजू लोकांना अन्न-वस्त्र द्यावयाचे, दहाव्या महिन्यात सहस्रनामाचा पाठ करावयाचा, अकराव्या महिन्यात पूर्वरात्री जागरण करून इतर धर्मांतल्या लोकांचे आदरातिथ्य करावयाचे व बाराव्या महिन्यात लोकोपयोगी वास्तूंची उभारणी करावयाची. हे नियम पाळण्याची कोणावर जबरदस्ती नव्हती, पण बादशहा ते शक्यतोवर पाळण्याचा प्रयत्न करीत असे आणि त्याला खूष ठेवू पाहणारे दरबारातले लोक त्याचे अनुकरण करीत असत.

———o———

# प्रकरण १३ वे

## इ. स. १५८०–१५८३ मधील मोठे बंड

### बिहारमध्ये बंडाला सुरुवात

इ. स. १५८० च्या सुरुवातीला बिहार आणि बंगालमधील बादशहाच्या फौजांनी आणि अधिकाऱ्यांनी सर्वत्र बंडाचा झेंडा उभारला. दोन्ही प्रांतांत जवळ जवळ एकाच वेळी बंडाला आरंभ झाला; पण त्याची सुरुवात बिहारमधून झाली. खाजगी जहागिरी खालसात घेऊन सरदारांचे तनखे कमी करणे, मनसबदारांना त्यांचे घोडे डागण्याबद्दल सक्ती आणि हाताखालच्या सैनिकांची वेळोवेळी गणती करण्याबद्दलचे नवे हुकूम यांमुळे बिहारमध्ये सर्वत्र असंतोष धुमसत होता. त्यातच नव्या कायद्यामुळे उत्पन्न झालेली आर्थिक हलाखी आणि पूर्वापार आलेले हक्क काढून घेतलेल्या उलेमांचा रोष यांची भर पडली. अकबराच्या धार्मिक धोरणाबद्दलही उलेमांमध्ये खूप असंतोष होताच. १५८० च्या मार्च महिन्यात नवीन नेमणूक केलेला बक्षी राय पुरुषोत्तम, दिवाण मीलांना तय्यब, सय्यद मुजाउद्दिन आणि खोजा समशेरखान यांची रवानगी अकबराने बिहारला केली. तिथल्या परिस्थितीची प्रत्यक्ष पाहाणी करून त्यात सुधारणा घडवून आणावी, असे त्यांना सांगण्यात आले होते; पण खेळीमेळीचे व समजुतीचे धोरण न ठेवता त्यांनी जनावरांना डागण्याचे आणि सैनिकांची शिरगणती करण्याचे धोरण जबरदस्तीने अंमलात आणले. याच सुमारास जोनपूरचा काजी मुल्ला महंमद याझदी याने एक फतवा काढून अकबर इस्लामी धर्मापासून च्यूत झाला असून मौलवींना आणि पर्यायायने अल्लाला दिलेल्या जमिनी त्याने हिरावून घेतल्या आहेत; तस्मात् त्याच्या विरुद्ध बंड करून उठणे हे मुसलमानांचे आद्य कर्तव्य आहे, असे जाहीर केले. याचा परिणाम म्हणजे काबूलच्या मिर्झा हकीमचा प्रतिनिधी मासूमखान काबुली * याला पुढे करून प्रांतातले सय्यदबेद बक्षी,

---

* काबुली हा मिर्झा हकीमचा दूधभाऊ असून फार पराक्रमी होता. काबूलहून आल्यावर त्याला ५०० ची मनसबदारी देऊन बिहारला पाठविण्यात आले. तेथे त्याने काळापहाड बरोबर सामना केला. नंतर त्याला १००० ची मनसबदारी देण्यात आली. 'बंडखोर' या टोपण नावाने अकबर त्याचा उल्लेख करीत असे–मुनतखाब उत्तवारीख भाग २. पान २६३५, २६६.

अरब बहादुर, सादत अली, हाजी कुलाबी, दरवेश आली शब्रु, सय्यद बदक्षी इत्यादि जहागिरदारांनी व अधिकाऱ्यांनी बंडास सुरुवात केली. यांचे अनुकरण करून शेजारच्या जिल्ह्यातील हाजीपूरचा शहम, मीर मुईझ उलमुल्क, मीर अली अकबर, आर्राचा समंजी खान इत्यादि दुय्यम अधिकारी बंडात सामील झाले. प्रांताचा सुभेदार मुर्हाब्बि अलीखान याने त्यांचे पारिपत्य करण्याची तयारीं केली. मासूम खान काबुलीची त्याने पाटण्याहून रोहटास जवळील मुहबली-पूरला बदली केली. तसेच घोड्यांना डागण्याची आणि सैनिकांच्या शिरगणती संबंधीचे हुकूम अंमलात आणण्याची व्यवस्था केली. परंतु त्याच्या हाताखालील काही अधिकाऱ्यांनी त्याची अवज्ञा करून उद्धट आणि बंडखोर वृत्ती स्वीकारली. त्याचवेळी सुभेदार मुझफ्फर खान याने फत्तेखान मनकाली याच्या ताब्यात देऊन पाठविलेला खान–इ–जहानचा खजिना आणि इतर चीजवस्तू, बंगालच्या सारा–वसुलीची नगद रक्कम, दाऊदची आई नवलाखा आणि इतर काही स्त्रिया या पाटण्यात दाखल झाल्या. या काफल्यावर हल्ला करण्याचा बंडखोरांचा बेत मुहीब अलीखानच्या दक्षतेमुळे फसला.

गाझीपूर जिल्हा बंडखोर मासूम खान फरान् खुडीच्या हाताखालील बंडखोरांच्या ताब्यात जाऊ नये म्हणून राय पुरुषोत्त तिकडे गेला आणि वारा-णसीची बंडाळी मोडण्यासाठी समशेरखानाने तिकडे कूच केले. दरम्यान बंड-खोरांचा एक पुढारी अरब बहादुर याने फत्तेखानच्या काफल्याचा पाठलाग करण्याचा प्रयत्न केला; पण सुदैवाने चौसाचा उतारा ओलांडून काफला निघून गेला आणि अरबच्या हातात थोड्या हत्तींशिवाय दुसरे काही पडले नाही. या वेळच्या झटापटीत हब्श खानचा पराभव होऊन त्याला कैद करण्यात आले. पण कैदेतून पळून जाऊन रोहटासगडला तो मुहीब अली खानला जाऊन मिळाला. याचवेळी पुरुषोत्तमला फूस दाखवून चौसाला आणण्यात आले. बक्सारजवळ अरब बहादुरने त्याचा पराभव करून गाझीपूरला नेऊन त्याला ठार मारले. ही बातमी मिळताच अरब बहादुरच्या विरुद्ध चाल करून जाऊन मुहीब अलीखानने त्याचा पराभव केला.

### तोडरमलची बिहारला रवानगी

बंडाची बातमी मिळताच अकबराने राजा तोडरमलच्या हाताखाली मोठी फौज देऊन त्याची बिहारला बंडाचा बीमोड करण्यासाठी रवानगी केली. त्याच्याबरोबर सय्यद फरीद बक्षी, मिहर अली खान सिल्डोझ, राजा आस्करन, राय लून करण इत्यादि नामवंत अधिकारी दिले. अलाहाबाद आणि अवध

येथल्या अधिकाऱ्यांना बादशाही फौजेस मिळून तोडरमल आणि तार्सून खान यांच्या हुकुमाप्रमाणे काम करण्याचा आदेश देण्यात आला. चंदेरी आणि नाखार कडील सादिकखान, बाकीखान आणि इतर अधिकाऱ्यांना पण बिहार-कडे तातडीने जाण्याचे हुकूम सुटले. काजी अली बगदादी याची मीर बक्षीच्या जागी नेमणूक करून सैन्याची फेर उभारणी करण्याचे काम अकबराने त्याच्या-कडे दिले. इतक्यात काबूलचा मिर्झा हकीम हिंदुस्थानवर स्वारी करून येत आहे अशी बातमी आली. तेव्हा पंजाबमधले सैदखान, भगवन्त दास, मानसिंग आणि मिर्झा युसफखान यांना हकीमविरुद्ध चालून जाण्याचा हुकूम देण्यात आला. एवढ्यात बदकशानमध्ये गडबड झाल्यामुळे मिर्झा हकीम सिंधू नदी-कडे वळला नाही व त्याच्या विरुद्ध पाठविलेली फौज पुढील हुकुमाची वाट पाहात सरहद्दीवर थांबली.

## बंगालमधले बंड

बिहारमधल्या बंडाबरोबरच बंगालमध्येही बंडाला सुरुवात झाली. तो प्रांत जिंकल्याला आता दोन वर्षे झाली होती. पण तेथे अजून शांतता प्रस्थापित झाली नव्हती. शांततेच्या काळात सुद्धा तेथे एकदम बंडाचे वादळ उठत असे; त्यामुळे एक दंगेखोर प्रांत असा बंगालचा उल्लेख जुन्या पुस्तकांतून आढळतो. दुर्दैवाने एप्रिल १५७९ मध्ये नेमलेला तिथला सुभेदार मुझफ्फर खान हा हुशार असला, तरी स्वाभाने हट्टी होता आणि लोकांची समजूत काढणे त्याला जमत नसे. आपला अमीन आणि सदर हकीम अब्दुल फाता, बक्षी मिर्झा मीरक रझवी आणि दिवाण मीर आदम यांना आपले सहकारी न समजता ते आपल्या सत्तेवर टपले आहेत असे समजून तो त्यांचा द्वेष करीत असे. या बंडाची निरनिराळी नऊ कारणे अबुल फाझलने दिली आहेत; पण त्यांपैकी तीनचारच महत्त्वाची वाटतात. बाकीची कारणे या मूळ कारणांतूनच उद्भवली होती. बंगालची वाईट हवा आणि तेथील नोकरांच्या अडचणी लक्षात घेऊन अकबराने तिथल्या फौजेच्या आणि अधिकाऱ्यांच्या पगारात १००% आणि बिहारमध्ये ५०% नी वाढ केली होती. अर्थमंत्री ख्वाजा शहा मन्सूर याने वेडेपणाने बंगालमधील नोकरांचा पगार ५०% नी आणि बिहारमधील नोकरांचा पगार २०% नी कमी केला. मुझफ्फर खाननें हा हुकूम सुरुवातीपासून लागू करून मनसबदार आणि शिपाई यांच्याकडे पूर्वी मिळालेला जादा पगार परत करण्याची मागणी केली. दुसरी गोष्ट म्हणजे मरहुम खान-इ-जहान याच्या खाजगी माल-मत्तेबद्दल चौकशी करण्याचा वेडगळ हुकूम मुझफ्फर खानने काढला. तो पण

अशा तऱ्हेने की त्यामुळे खान – इ – जहानचा भाऊ इस्माइल – कुली – खान आणि त्याचे तुर्की अनुयायी उगाचच दुखावले गेले. तिसरी गोष्ट म्हणजे बक्षीच्या जागेवर नेमणूक झाल्यानंतर रझवीखानने जमीनदारांच्या हक्कांची चौकशी करून नवीन सारापद्धती अंमलात आणली. त्यामुळे जमीनदारांचे पुष्कळ नुकसान झाले. पुष्कळअधिकाऱ्यांच्या जहागिरी कमी करण्यात येऊन त्यांनी जमविलेली वाजवीपेक्षा जास्त साऱ्याची रक्कम खजिन्यात जमा करण्याचे हुकूम सोडण्यात आले. अशा दोन गोष्टींचा स्पष्ट उल्लेख त्या वेळच्या कागदपत्रात सापडतो. खान – इ – जहानच्या मृत्यूनंतर ईस्माइल – कुली – खानला खूष ठेवण्यासाठी त्याची जहागीर वाढवून देण्यात आली होती. त्याने केलेला वसूल खजिन्यात भरावा असा हुकूम निघाला. खाल्दीन खान याची जलासौरची जहागीर काढून घेण्यात येऊन त्याच्यावरही वरीलप्रमाणेच हुकूम बजावण्यात आला. लाचलुचपतीचा आणि लोकांना बंडाची चिथावणी देण्याचा आरोप शाबीत झाल्यावरून सुभेदाराने जमाबंदीचा अधिकारी रोशनबेग याला सर्व लोकांसमक्ष फाशी दिले. यामुळे घाबरून गेलेल्या काकशाल मंडळींनी स्वतःची डोकी भादरून उंच टोप्या धारण केल्या आणि गौरला जमा होऊन मुझफ्फर खानची मालमत्ता लुटली. चवथी गोष्ट म्हणजे जनावरांना डागण्याचा कायदा अंमलात आणणाऱ्या दुय्यम अधिकाऱ्यांनी मनसबदारांकडून लाच मागण्यास सुरुवात केली. त्यातले कित्येक मनसबदार अशी लाच देण्यास असमर्थ होते. बंगालमधील बरीचशी वस्ती अफगाण लोकांची असून राज्यकारभारातली कडक शिस्त पाळण्याची सवय त्यांना नव्हती. त्यातच अकबराचा समधर्मभाव व मुसलमान आणि मुसलमानेतरांना सारखीच वागणूक देण्याची त्याची पद्धत यामुळे बंडाच्या आगीत आणखीच तेल पडल्यासारखे झाले. १९ जानेवारी १५८० रोजी बाबाखान जब्बारी हा इतर असंतुष्ट अधिकारी आणि शिपाई बरोबर घेऊन तंडचाजवळ गंगेपार (भागीरथी) झाला आणि तारीख २८ रोजी त्याने सुभेदाराविरुद्ध बंड पुकारले.

या मंडळीचा बिमोड करण्यासाठी मुझफ्फरखानने मीर जमाल उद्दिन हुसेन याच्या हाताखाली एक मोठी फौज पाठविली. त्याच्या मदतीला रझवीरखान, तैमुरखान, राय तिपूरदास, मीर आदम आणि इतर अधिकारी दिले. बंडखोरांनी थोडी कच खाऊन तहाचा बोलणी करण्याची तयारी दाखविली; पण बादशाही अधिकाऱ्यांचा त्यांच्यावर विश्वास बसेना आणि शेवटी रझवीखान आणि सय्यद अली इशाख यांना विश्वासघाताने कैद करून काकशाल लोक आपला हट्ट धरून बसले. यामुळे तहाची बोलणी फिसकटली अकबराने स्वतः येऊन बंडाचा बिमोड करावा अशी विनंती बंगालच्या अधिकाऱ्यांनी केली; पण बादशहाने

सूज्ञपणे राजधानीतच काही दिवस काढून नंतर पंजाबला जाण्याचे ठरविले. कारण काबूलचा आपला भाऊ मिर्झा हकीम याने बंडखोरांशी संगनमत केले असून तो हिंदुस्थानवर स्वारी करण्याच्या विचारात आहे; तसेच दरबारातले काही सरदार पण बंडखोरांच्या बाजूचे आहेत असा संशय अकबराला आला होता.

## दरबारातल्या कटाचा मुळातच बिमोड : मुझाफरखानचा खून :

११ मार्च १५८१ रोजी अकबराच्या राज्याला २५ वर्षे पूर्ण झाली. त्याच वर्षी बंगाल आणि बिहारमध्ये बंडाला सुरुवात झाली. २५ व्या राज्यदिना-निमित्त अकबराने ताझ आणि तमघा हे व्यापारी कर रद्द केले. या महत्त्वाच्या सवलतीमुळे खजिन्यात येणारी कराची मोठी रक्कम बंद झाली हे खरे, पण त्यामुळ व्यापाऱ्यांना आणि दुकानदारांना धंद्यात थोडीफार सूट मिळाली. मुझफ्फरने पाठवलेला खजिना पण या महत्त्वाच्या सुधारणेनंतर थोडयाच दिवसांनी फत्तेपूर सिक्रीला सुखरूप येऊन पोहोचला. हत्तीखान्यात १७१ नव्या हत्तींचा भरणा झाला. पूर्वेकडील प्रांतात बंडाळी चालूच होती. दरबारातली काही मंडळी बंडखोरांना आतून सामील असून बादशहाला ठार मारून मिर्झा हकीमला गादीवर बसवि-ण्याचा व नंतर बंडखोरांशी बंगालमध्ये हात मिळवणी करण्याचा त्यांनी कट केला. हा कट वेळीच उघडकीस येऊन त्यात सामील असणाऱ्यांना कैद करण्यात आले. त्यांचा पुढारी मिराकी याला देहदंडाची शिक्षा झाली.

बंगालमध्ये बादशाही फौजा आणि बंडखोर यांच्यांत झालेल्या सुरुवातीच्या चकमकीत बंडखोरांना माघार घ्यावी लागली, पण तंडा काबीज करण्याचे ठरवून मंहमद बंग काकशाल आणि हाम–झबन यांच्या हाताखाली बंडखोर सेना गंगेपार झाली. बंगालमधील फौजेच्या एका तुकडीने त्यांचा पराभव केला. त्यामुळे नामोहरम होऊन बंडखोरांनी सलोखा करण्याची तयारी दर्शवली. पण अशी बोलणी करण्यास मुझाफ्फरखानने हट्टाने साफ नकार दिला. इतक्यात बिहारचे बंडखोर बंगालमधील बंडखोरांशी हातमिळवणी करण्यासाठी बंगालकडे निघाले आहेत आणि दोघे मिळून लढाई देणार आहेत, अशी बातमी आली. बिहारी बंडखोरांना बंगाल बाहेरच थोपवून धरण्यासाठी मुझफ्फर खानने आपल्या सैन्याची एक तुकडी बंगालमध्ये शिरण्याची तेलियागढीची खिड रोखून धरण्यासाठी तिकडे पाठवून दिली. पण तेथे पोहोचण्यास त्यांना एक दिवस उशीर झाला. त्या आधी एक दिवस तेलिया गढीची खिड़ बिहारी बंडखोरांच्या हातांत पडली होती. दुसऱ्या दिवशी तैमुरखान आणि ख्वाजा शामसुद्दिन यांच्या हाताखालील

बंगालमधील फौजेचा बंडखोरांनी पराभव केला. त्याचवेळी बाबाखान काकशाल व इतर बंगाली बंडखोर आकमहालजवळ नदी पार करून बिहारमधील बंडखोरांनी जाऊन मिळाले. त्या दोघांनी मिळून तंड्याला वेढा देऊन मुझफ्फरखानची कोंडी केली. १४ दिवस बादशाही फौजा आणि बंडखोरांचे सैन्य-यांच्यामध्ये अधूनमधून चकमकी चालू होत्या, पण मुझफ्फरखानने भ्याडपणाचे धोरण स्वीकारल्यामुळे बंडखोरानी शहरात जबरीने प्रवेश केला. बंडखोरांना लाच म्हणून खूप मोठी रक्कम देण्याचे आमिष दाखवून " मला जिवानिशी मक्केला जाऊ द्या " अशी विनंती घाबरलेल्या मुझफ्फरखानने बंडखोरांना केली. पण बंडखोरांनी मुझफ्फरखानला पकडून हाल हाल करून ठार मारले. ( सुमारे १९ एप्रिल १५८० ). मुख्य अधिकाऱ्यांपैकी हकीम अबुल फतेह, ख्वाजा शमसुद्दिन आणि राय पात्र दास हे तिघेच बंडखोरांच्या हातातून निसटून बिहारमध्ये हाजीपूरला जाऊन पोहोचले.

## बंडखोर मिर्झा हकीम राजा झाल्याचे जाहीर करतात

विजयी बंडखोरांनी मिर्झा हकीम राजा झाल्याचे जाहीर करून त्याच्या नावाने खुतबा वाचला. अकबरासाठी मरहुम – खान – इ – जहानने तयार केलेल्या सुंदर छबिन्याखाली एकत्र येऊन राज्याचे अधिकार त्यांनी आपापसात वाटून घेतले. बंडखोर म्हणून अकबर ज्याचा उल्लेख करीत असे त्या मासूमखान काबुलीला खान–इ–दौराने ही पदवी देऊन मुख्य प्रधान ( वकील ) नेमण्यात आले. बाबाखान काकशाल याला खान–इ–आझम हा किताब देऊन बंगालचा सुभेदार नेमण्यात आले. मजनून खान काकशालचा मुलगा जब्बारी याला १०,००० ची मनसबदारी आणि खान–इ–जहान हा किताब देण्यात आले. वझीर जमील याला खान–इ– झमन ही पदवी देऊन तुझक बेगीच्या जागेवर बढती देऊन नेमण्यात आले. अशा तऱ्हेने सर्व लोकांना निरनिराळे अधिकार देऊन प्रत्येकाला जहागीर, निशाण आणि नगारा देण्यात आला. तंड्याच्या किल्ल्यात कैदेत असलेला विख्यात बंडखोर, नागोर आणि अजमेरचा माजी सुभेदार मिर्झा शरफुद्दिन याने १९ एप्रिल १५८१ या घातवारीच स्वतःची सुटका करून घेतली होती. त्याला बंडखोरांचा पुढारी नेमण्यात आले. हा बंडखोरांचा नाममात्र पुढारी असून खरे नेते मासूमखान काबुली आणि बाबाखान काकशाल हे होते.

## तोडरमल मोंगीरच्या वेढ्यात सापडतो.

बिहारमध्ये तिरहुतचा कमाविसदार सय्यद बदक्षीचा मुलगा बहादुर याने

राजचिन्हे धारण करून आपल्या बापाला कैद केले. राजा होण्याची स्वप्ने सोडून देऊन मासूनखानच्या हाताखाली बंडखोरांना जाऊन मिळण्याचा सल्ल बापाने मुलाला दिला होता. बहादुरने तिरहूत पासून हाजीपूर पर्यंतचा प्रांत आपल्या ताब्यात घेतला. दुसरा प्रबल बंडखोर म्हणजे अरब बहादुर. बंगाल–मधील बाबाखानच्या हाताखाली बंडखोरांना जाऊन मिळण्यास निघण्यापूर्वी मासूमखान काबुलीने अरब बहादुरला पाटण्यास मागे ठेवले होते. येथे मुहीब अली खानशी झालेल्या काही दिवसांच्या लढाईनंतर अरब बहादुरचा पराभव होऊन पाटणा खानच्या हातात पडले. तसेच जौनपूरमध्ये सुद्धा तारसुन खान, सादि-कखान, गाझी खान आणि उलुघखान यांच्या प्रयत्नांमुळे बादशाही फौजा युद्धासाठी सज्ज झाल्या. या प्राथमिक विजयानंतर तोडरमल आणि इतर अधिकारी बिहारमधील बंडखोरांचा समाचार घेण्यासाठी तिकडे वळले. मुझफ्फर खानचा खून होऊन बंगाल शत्रूच्या हाती पडल्याची दु:खद बातमी त्यांना गंगेच्या तीरावर पोहोचताच मिळाली. या बातमीने निराश न होता त्यांनी आपले आगे–कूच चालूच ठेवले. मुहीन अली खान, शबम खान, समंजी खान आणि बाकी कोलानी यांच्या हाताखालील बिहारमधील फौज त्यांना येऊन मिळाली. दोन्ही फौजांनी पाटण्याजवळ मसलत करून बडखोरांविरुद्ध मजबूत फळी उभारण्याचे ठरविले. लढाईच्या पावित्र्यात सैन्याची रचना करून शस्त्रास्त्रांनिशी ते पुढे निघाले. अरब आणि हबीब यांच्या हाताखालील बंडखोर सैन्याने पाटणा खाली केले आणि बादशाही फौज मोंगीरला जाऊन पोहोचली. बादशाही फौजेला येऊन मिळालेला मासूमखान फरानखुडी हा आघाडीवर असलेला सेनानी आतून बंडखोरांना सामील होता. बादशाही फौजेचा मुख्य पुढारी राजा तोडर-मल याला एका लष्करी कवायतीत ठार मारण्याचा कट त्याने रचला. याचा वेळीच सुगावा लागून राजा तोडरमलने कवायतीला हजर राहण्याचे नाकारले. पण मासूमखानबद्दल आपल्याला संशय आला आहे हे जाहीर न करण्याची खबरदारी त्याने घेतली. दरम्यान बंगालमधील बंडखोर तेलियागढीचा पहाडी मार्ग ओलांडून बिहारमध्ये आले होते. त्यांची बादशाही फौजेशी चकमक झाली. खास करून मासूमखान फरानखुडी आणि हाताखालील सैन्यातले इतर काही अधिकारी आणि शिपाई हे फितुर असल्याचा संशय आल्यावरून आपल्या सहकाऱ्यांचा सल्ला मान्य करून तोडरमलने खुल्या मदानावर लढाई करण्याचे टाळले. एकंदर सर्वच बाजूंनी राजद्रोहाची चिन्हे दिसत होती. मोंगीर किल्ल्याची तटबंदी मजबूत करून तो आत ठाणे देऊन बसला. ५०० हत्ती, ३०,००० घोडेस्वार, मोठा तोफखाना आणि अनेक बोटींचा काफला यांनी सुसज्ज अस–

लेल्या बंडखोरांनी मोंगीरला वेढा दिला. हा वेढा अनेक महिने चालू राहिला आणि परिस्थिती इतकी बिघडली की, तारसुन खान दिवाणा, हुमायून कुली आणि शहा दिवाणा हे सरदार तोडरमलला सोडून आपल्या हाताखालच्या फौजा निशी शत्रूला जाऊन मिळाले.

## बंडाचा बिमोड करण्यासाठी अकबराने योजलेले उपाय

वरील हकीगत समजताच अकबराने अझीझ कोकाला कैदेतून मुक्त केले व त्याला ५००० ची मनसबदारी, खान-इ-आझम हा किताब आणि मुझफ्फर खानच्या मृत्यूमुळे खाली झालेली बंगालची सुभेदारी देऊन तोडरमलच्या मदतीस पाठवून दिले. त्याचबरोबर मुल्ला महंमद याझदी आणि मीर मुईझ ईलमुल्क यांनी आम जनतेत चालू केलेल्या धार्मिक असंतोषाच्या चळवळीचा बिमोड करण्यासाठी व या दोघांना पकडून दरबारात आणण्यासाठी आसफखान तुर्कोमनची जौनेपूरला रवानगी केली. ह्या हुकुमाची त्वरीत अंमलबजावणी होऊन या दोघांना बोटीतून राजधानीकडे पाठविल्यात आले. वाटेत इटाव्याजवळ बोट बुडून दोघांना जलसमाधी मिळाली. बोट बहुतेक मुद्दाम बुडवली असावी. मुईझ-उल-मुल्कचा भाऊ मीर अली अकबर याला झमानीयाहून बेड्या घालून आगून कैदेत टाकण्यात आले. बंडाचा बिमोड करण्यासाठी शक्य तो सर्व उपाय अकबराने योजले. शहाबाझ खानला मेवाडहून बोलावून आणून त्याला बंगाल-बिहारकडे पाठवून दिले (सुमारे ऑगस्ट १५८०). नंतर थोड्याच दिवसांनी बाबुई मानकाली, शहीमखान सरमूर आणि इतर अधिकाऱ्यांच्या हाताखाली आणखी कुमक पाठवली. ही मदत मोंगीरला पोहोचण्यापूर्वीच वेढ्यात सापडलेल्या फौजेची रसद तोडण्याच्या हेतूने मिर्झा शरफुद्दिन आणि मासूम खान फरानखुडी यांनी पाटण्याहून मोंगीरला जाणारा खुष्कीचा रस्ता आपल्या ताब्यात घेतला होता. त्यानंतर नदीच्या मार्गाने येणारी रसद तोडण्यासाठी नदीचाही कब्जा घेण्याचा त्यांचा प्रयत्न होता; पण यात त्यांना यश आले नाही. युद्धसामुग्री घेऊन चाललेला त्यांचा ३०० बोटींचा काफला बादशाही फौजेने हल्ला करून जप्त केला. यावेळपर्यंत बंडखोरांचा पुष्कळसा जोर कमी झाला होता; कारण यांचे समाधान करण्यासाठी अकबराने वजीर ख्वाजा शहा मन्सूर याला अर्थ-सचिवाच्या जागेवरून काढून टाकले होते. शहा मन्सूर अत्यंत अप्रिय झाला असून एका मोठ्या साम्राज्याची अर्थव्यवस्था योग्य तऱ्हेने हाताळण्याची समज, धूर्तता किंवा मनाचा मोठेपणा त्याच्याजवळ नव्हता. एखाद्या लहानशा वाकनीसाप्रमाणे त्याची वागणूक असे आणि सरकारी वसूल करताना खूप जुलूम-जबरदस्ती तो करीत

असे. वजीराच्या जागेवरून कमी केल्यावर अकबराने शहा मन्सूरला शहा कुली महरमच्या ताब्यात दिले. या गोष्टीमुळे शहा मन्सूरच्या त्रासाला कंटाळलेल्या अधिकारी वर्गातला असंतोष पुष्कळ कमी झाला.

मोंगीरचा वेढा दोन महिन्यांहूनही अधिक काळ चालू होता. अझीझ कोका आणि शहावाझ खान तोडरमलच्या मदतीला येत आहेत, असे ऐकताच कच खावून २५ एप्रिल रोजी मोंगीरचा वेढा उठवून बंडखोरांनी माघार घेतली. यात काहीतरी लष्करी डावपेच आहे, असे समजून बादशाही सैन्याने किल्यावरून खाली उतरून त्यांचा पाठलाग केला नाही. नंतर खरी परिस्थिती लक्षात येताच ते किल्ल्यावरून खाली उतरले. आणि सावधगिरीने बंडखोरांच्या मागे निघाले. इतक्यात त्यांना ख्वाजा शमसुद्दिन याच्या हाताखाली बिहारच्या डोंगराळ मुलुखातून आलेले १२०० घोडेस्वार येऊन मिळाले. याच वेळी मोंगीरचा वेढा मजबूत करण्यासाठी बंगालहून निघालेला मासूमखान काबुली मोंगीरजवळ येऊन पोचला. पण आता वेळ निघून गेली होती कारण तोपर्यन्त तोडरमलला मदत येऊन पोचली होती. चौधरी कृष्ण याच्याबरोबर बिहारमधील सैन्यासाठी फत्तेपूर सिक्रीहून पाठविलेला खजिना लुटण्यांचा प्रयत्न अरब बहादुर आणि इतर काही बंडखोरांनी केला. चौधरी कृष्णाने पटण्याच्या किल्टाचा आश्रय घेतला आणि बंडखोरांनी किल्टाला वेढा दिला. मासूमखान काबुलीचा रस्ता चुकवून तोडरमल मुंगीरहून पटण्याला आला आणि किल्टाला वेढा देऊन बसलेल्या अरब बहादुरचा पराभव करून त्याने त्याला पिटाळून लावले. किल्ल्याचा आणि तेथील खजिन्याचा ताबा तोडरमलने घेतला. प्रथमपासूनच फितूर असलेला मन्सूरखान फरानखुडी तोडरमलला सोडून जौनपूरकडे निघून गेला. वाटेत त्याने तिरहूतच्या बहादुरखानकडून हाजीपूरचा किल्ला आणि शहर जिंकून घेतले. राजचिन्हे धारण करून या बहादुरखानने तिरहूतपासून हाजीपूरपर्यन्तचा प्रांत आपल्या ताब्यात घेतला होता याचा उल्लेख आधी आलाच आहे.

मासूमखानविरूद्ध चढाई करण्यास ही योग्य वेळ आहे, असे तोडरमलने ठरवले; कारण मोंगीर सर करण्यात अपयश आल्यामुळे मासूमखान काबुलीने बादशाही फौजांपासून गया आणि हाजीपूरच्या डोंगराळ मुलखाकडे माघार घेण्यास सुरुवात केली होती. शेरगोटीजवळ दोन्ही सैन्यांमध्ये लढाईला आरंभ झाला. हा महिना सप्टेंबरचा असून इ. स. (१५८०) जमिनीवर सगळीकडे पाणीच पाणी झाले होते. मासूमखानने रात्रीच चढाई करून सुरुवातीला थोडेसे यश मिळवले, पण शेवटी त्याला पराभव पत्करावा लागला. शत्रूची छावणी सहाच मैलांवर

असूनसुद्धा बादशाही फौजेने त्यांचा पाठलाग केला नाही. दुसऱ्या दिवशी अझीझ कोका आपल्या हाताखालच्या सैन्यासह तोडरमलला येऊन मिळाला. चौसा-जवळ गंगापार केल्यावर अझीझ कोकाच्या मार्गात दलपत उज्जैनिया याच्या बंडखोर उठावामुळे अडथळा निर्माण झाला. दलपत हा राजा गजपतीचा नातेवाईक असून गजपतीची राजधानी जगदीशपूर ही बादशाही फौजांनी लुटली. अझीझ कोका आणि त्याच्या पाठोपाठ आलेला शहाबाझ खान यांच्यात मतभेद निर्माण झाल्यामुळे दलपतचे पारिपत्य करण्यात व्यत्यय येऊ लागला. तेव्हा त्या कामासाठी शहाबाझ खानला मागे ठेवून अझीझ कोका शेरगोटीला निघून गेला. तो आलेला पाहून बादशाही फौजेस फार आनंद झाला. लढाईचा विचार सोडून देऊन मासुमखान काबुलीच्या हाताखालील बंडखोर सैन्य बगाल-कडे पळून गेले. बिहारमधील उरल्या सुरल्या बंडखोरांचा निःपात करण्याचे आणि बिहारमद्धे सुव्यवस्था स्थापित करण्याचे काम आता सुरू झाले; पण अझीझ कोका व शहाबाझ खान यांच्यांमधील परस्पर द्वेष व मतभेदांमुळे लष्करी हालचालींची गती थंडावली. मासूमखान फरान खुडीने जौनपूरला बंडाचे निशाण उभारले होते. त्याचे पारिपत्य करण्यासाठी तारसूनखानची रवानगी करण्यात आली. मोंगीरच्या आसपासच्या भागात बंडखोरांचे पारिपत्य करून शांतता प्रस्थापित करण्यासाठी सादिकखानला मोंगीरला पाठविण्यात आले. अझीझ कोका आणि तोडरमल पाटणा आणि हाजीपूरकडे निघाले. दलपत आणि त्याच्या आश्रयाला येऊन राहिलेला अरब बहादुर या दोघांचा शहाबाज खानने पराभव केला. अझीझ कोका आणि तोडरमल व शहाबाज खान यांच्यांतील भांडणे आता इतकी विकोपाला गेली होती की, त्यांना एकमेकांबरोबर काम करणे अशक्य झाले. अझीझ कोका आणि तोडरमल तिरहूतकडे गेले आणि शहाबाजखान जौनपूरला गेला. काही दिवसांनंतर बंगालमधला प्रसिद्ध बंडखोर बहादुर बस्की (बंगी ?) भागलपूरजवळ झालेल्या बादशाही सैन्याबरोबर चक-मकीत ठार झाला.

## मासूम खान फरान खुडीचा पराभव

मिर्झा हकीम हिंदुस्थानच्या स्वारीवर निघाला आहे या बातमीमुळे धीर येऊन मासूम खान फरान खुडीने जौनपूरला आता उघड उघड बंड पुकारले. आतापर्यंत राजद्रोहाचे बेत त्याने आपल्या मनातच ठेवले होते. त्याच्या घातकी हालचालींची सुरुवातीला गय करून सलोख्याच्या धोरणाने त्याला आपल्या बाजूस वळविण्याच्या प्रयत्न अकबराने केला. त्याची बदली त्याने अवधला केली.

ाची कदर न करता मासूमने बंडाळी चालूच ठेवली. नंतर बादशहाने राजा
ीरबल आणि शहाकुली महरम यांना मासूमची समजूत काढण्यासाठी पाठवून
दिले; पण त्याने मैत्रीसाठी पुढे केलेला हात झुगारून दिला. दरम्यान बरोबर
ोठे सैन्य घेऊन शाहबाजखान अवधला मासूमवर चालून गेला. २२ जानेवारी
१५८१ रोजी हल्लीच्या फैजाबादपासून ५० मैलांवर असलेल्या सुलतानपूर
बलारी या गावाजवळच्या वृक्षाच्छादित मैदानात मासूम आणि शहाबाजखान
ांच्या सैन्यांत निकराची लढाई झाली; पण मधेच कच खाऊन शहाबाज-
ान तेथून ८० मैलांवर असलेल्या जौनपूरला वाटेत क्षणाचीही विश्रांती न
ेता पळून गेला. तरीसुद्धा या लढाईत शेवटी बादशाही फौजेला यश आले
ाणि मासूमखानने अयोध्येकडे माघार घेतली. बंडखोरांचा संपूर्ण बिमोड
ाला नाही हे पाहून मासूम खानने लढाईची पुन: तयारी करण्यास सुरुवात
ली. मागील लढाईच्या अनुभवाने शहाणा झालेला शहाबाजखान पुन:
वधवर चालून गेला आणि अयोध्येपासून १४ मैलांवर २ फेब्रुवारी रोजी
ासूमखानशी त्याने आणखी एकदा सामना दिला. त्यात मासूमखानचा पुन्हा
राभव होऊन तो माघार घेऊन आपल्या राजधानीस गेला. शहाबाजखानने
त्रूचा पाठलाग केला नाही, पण काही थोडे सैन्य राजधानीच्या उपनगरात
ूट करून छावणीत परत आले. मासूमखानचे शिपाई त्याला सोडून गेले,
व्हा राहिलेले थोडेसे शरीररक्षक बरोबर घेऊन तो शिवालिकच्या डोंगराळ
लखात पळून गेला. आपल्या कुटुंबातली मंडळी आणि खजिना त्याने
योध्येच्या किल्ल्यातच सोडून दिला. घरदार नसलेल्या भटक्यासारखी त्याची
वस्था झाली. विजयाच्या दुसऱ्या दिवशी शहाबाजखानने किल्ल्याचा आणि
हराचा ताबा घेतला. मासूमखानच्या कुटुंबातल्या मंडळींचा त्याच्या राज-
ोही कारवायांशी काहीच संबंध नसल्यामुळे त्यांना त्रास देऊ नये असे दयाळू
त:करणाच्या अकबराने शहाबाजखानला बजावले.

## लाहाबाद प्रांतातली नियाबतखानची बंडाळी

जौनपूर आणि अवधचे बंड अलाहाबादच्या आसपास पसरले. तेथे मीर
शीम निशापुरीचा मुलगा नियाबतखान याने करा मणिकपूरला वेढा दिला
ाणि इलियस खान लंगा याचा पराभव करून त्याला ठार मारले. इस्माईल
लीखान, वजीरखान आणि इतर काही अधिकारी त्याच्यावर चाल करून गेले;
व्हा करा आपल्या सैनिकांच्या हातात सोडून तो स्वत: अलाहाबाद जिल्ह्या-
ील अरेल या आपल्या फौजदारीच्या गावी निघून गेला. अरेल घेण्यासाठी

थोडीशी फौज बरोबर घेऊन वजीरखान निघाला आणि इस्माईल कुली-खानने नियाबत खानचा पाठलाग करण्यास सुरुवात केली. गंगेच्या तीरावर कांती गावाजवळ निकराची लढाई झाली. त्यात नियाबतखानचा पराभव होऊन तो अवधकडे पळून गेला. मासूम फरान खुर्दाचा पराभव झाल्यावर नियाबत पळून जाऊन अरब बहादुरला मिळाला आणि त्याने बरेलीवर हल्ला केला; पण तिथला फौजदार ऐन उल मुल्क याने त्याची समजूत काढून त्याला आपल्या बाजूस वळवून घेतले. नियाबतला कैद करून रंथमभोरच्या किल्ल्यात पाठविण्यात आले. तेथून पळून जाण्याचा अयशस्वी प्रयत्न केल्यामुळ त्याला फाशीची सजा देण्यात आली.

## मिर्झा हकीमची हिन्दुस्थानवर स्वारी : अकबर त्याच्या प्रतिकारास निघतो

बंगाल व बिहारमधले बंडखोर, खास करून मासूमखान काबुली आणि मासूमखान फरान खुर्डी यांनी वारंवार बोलावल्यावरून आणि आपला मामा फरीदुन याच्या चिथावणीस बळी पडून काबूलचा मिर्झा हकीम याने हिंदु-स्थानच्या स्वारीची तयार केली. १५८० सालच्या डिसेंबर महिन्यात नुरु-द्दिनच्या हाताखालील त्याच्या आघाडीच्या फौजेने सिंधु नदी ओलांडली. यावेळी सरहद्दीच्या प्रांताचा कारभार पाहाणारा मिर्झा युसफ खान याने पाठ-विलेल्या लहानशा तुकडीने नूरुद्दिनचा पराभव करून त्याला पिटाळून लावले. या घटनेमुळे वेळीच सावध होऊन अकबराने सिंधू नदीजवळचा सर्व प्रांत मानसिंगच्या ताब्यात दिला. त्या प्रांताच्या रक्षणाची उत्तम व्यवस्था मान-सिंगने ताबडतोब केली. नुरुद्दिनच्या पाठोपाठ मिर्झा हकीमने आपला प्रमुख लष्करी सेनानी शादमन याला पाठवून दिले आणि सिन्धु नदीवरील निल-बच्या किल्ल्याला त्याने वेढा दिला. मानसिंगचा भाऊ सुरतसिंग याने शादमनवर हल्ला करून त्याचा दणदणीत पराभव केला. ही गोष्ट शादमनच्या मनाला फार लागली असावी. कारण या पराभवानंतर थोड्याच दिवसांनी तो मरण पावला. यानंतर मिर्झा हकीम स्वत: स्वारीवर निघणार हे जाणून ६ फेब्रुवारी १५८१ रोजी सलीम आणि मुराद यांना बरोबर घेऊन अकबर फत्तेपूर सिक्रीहून निघाला. यावेळी त्याच्या हाताखाली ५०,००० घोडेस्वार, ५०० हत्ती आणि मोठे पायदळ अशी प्रचंड आणि सुसज्ज सेना होती. इतक्या मोठ्या सेनेचे आधिपत्य करण्याचा अकबराचा हा पहिलाच प्रसंग होता. आपल्या सैन्याला आणि लष्करी अधिकाऱ्यांना ८ महिन्यांचा पगार त्याने आगाऊ दिला. राजपुत्र दानियलला राजधानीचा मुख्य कारभारी नेमून

सुलतान ख्वाजा, शहा कुली महरम आणि शेख इब्राहिम यांची त्याचे सल्लागार म्हणून नेमणूक करण्यात आली. रायसिंग, जगन्नाथ, राजा गोपाळ इत्यादि आपल्या विश्वासातल्या सेनानींना त्यांच्या हाताखालील फौजांसकट अकबराने पुढे पाठवून दिले व 'मी येईपर्यंत शत्रूशी सामना देण्याचे टाळावे,' असा निरोप मानसिंग आणि पंजाबातील इतर अधिकाऱ्यांना पाठवला. अकबराच्या हाताखालील प्रचंड सेनेची योजनाबद्ध वाटचाल अत्यंत शिस्तीत सूरू झाली.

## ख्वाजा शहा मन्सूरला फाशी देण्यात येते

२८ फेब्रुवारी रोजी अकबर ठाणेश्वरला जाऊन पोहोचला. तेथे प्रसिद्ध शेख अब्दुल कुद्दस गंगोही याच्या नंतरचा ९० वर्षांचा मान्यवर शेख जलाल याची त्याच्या आश्रमात भेट घेऊन अकबर लाहोरला जाण्यास निघाला. वाटेत शहाबादजवळ कोट कछव्याला असताना त्याने वजीर ख्वाजा शहा मन्सूर याला राजद्रोहाबद्दल फाशीची शिक्षा फर्मावली. याच्यावरील आरोपांची चौकशी जवळ जवळ दोन महिने चालू होती आणि अकबराची त्याच्या हालचालींवर बारीक नजर होती. शादनमच्या जप्त झालेल्या कागदपत्रात मिर्झा हकीमने ख्वाजा शहा मन्सूरला आणि अकबराच्या दरबारातील इतर दोन सरदारांना लिहिलेली पत्रे सापडली. शहा मन्सूरने मिर्झा हकीमला हिंदुस्थानवर स्वारी करण्याबाबत लिहिलेल्या पत्राचे उत्तर यात होते. त्यात मिर्झा हकीमने शहा मन्सूरला दिलेल्या आपल्या मैत्रीचे आणि योग्य बिदागीचे आश्वासन होते. अकबराने या पत्राला विशेष महत्त्व दिले नाही आणि ते ख्वाजाला दाखविले पण नाही; पण दिल्लीपासून २८ मैल दूर असलेल्या सोनपत या गावी, मिर्झा हकीमचा वकील मालिक सनी मालकाशी भांडण झाल्याचा बहाणा करून फेब्रुवारी २२ ला बादशहाच्या छावणीत आला. उतरायला शहा मन्सूरकडे जाऊन त्याच्या मध्यस्थीने अकबराची मुलाखत घेण्याचा प्रयत्न त्याने केला. यामुळे अकबराच्या मनात असलेला शहा मन्सूर बद्दलचा संशय अधिकच दृढ झाला. शादनमच्या कागद पत्रात सापडलेले मिर्झा हकीमचे पत्र अकबराने आता शहा मन्सूरला दाखवले. त्याबद्दल योग्य खुलासा न करता आल्यामुळे शहा मन्सूरला कैद करण्यात आले. यानंतर काही दिवसांनी बादशाही छावणीवरच्या पोलिस अधिकाऱ्यांनी अंबाला जिल्ह्यातील शहाबाद गावी छापा घालून जप्त केलेली काही पत्रे अकबराला दाखवली. यावरून लाहोरपासून ६० मैलांवर असलेल्या फिरोजपूर गावचा शहा मन्सूरचा सिकदार शराफ बेग आणि त्या प्रांतातील इतर काही मंडळी यांचा मिर्झा हकीमशी पत्रव्यवहार सुरू असून त्यात मिर्झा हकीमला मदत देण्याचे अश्वासन होते असे

दिसून आले. अकबराच्या मनातले सर्व संशय आता पक्के झाले आणि दरबारातला एखादा अधिकारी जामीन राहण्यास तयार झाला तर शहा मन्सूरला कैदेत ठेवावे, नाही तर त्याला फाशी द्यावे असा त्याने आदेश दिला. शहा मन्सूर सरदार मंड-ळीत अप्रिय असल्यामुळे कुठलाही सरदार किंवा अधिकारी त्याचा नातेवाईक ख्वाजा हुसेनसुद्धा जामीन राहण्यास तयार झाला नाही. किंबहुना तो फाशी जावा अशीच या सर्वांची इच्छा होती. शहाबादजवळील कोछकटवा या गावी २८ फब्रुवारी १५८१ च्या सुमारास शहा मन्सूरला एका बाभळीच्या झाडावर टांगून फाशी देण्यात आले. या प्रसंगी हजर असलेला मॉनसेराट लिहितो, "या घटनेचे बादशहाच्या दरबारी मंडळींनी मोठे स्वागत केले आणि झालेल्या गोष्टीबद्दल आनंद व्यक्त केला. ( commentarius, 99 ).

शहा मन्सूर हा फार हुशार आणि कामसू अर्थसचिव होता. त्याला फाशी दिल्याबद्दल अकबराला नंतर फार वाईट वाटले; कारण त्याच्यासारखा हुशार माणूस मिळणे सोपी गोष्ट नव्हती. पण शहा मन्सूर हा स्वभावाने लोभी आणि हुकुमशहा असून त्याची स्वामिनिष्ठा संशयातीत नव्हती. त्याच्या राजद्रोहाचा पुरावा काहीसा संशयास्पद असला, तरी त्याला झाली ती फाशीची शिक्षा देण्यास पुरेसा होता. बादशाही फौजा काबूलला पोहोचल्यावरअसे आढळून आले की, ज्या पत्रांमुळे शहा मन्सूरला अखेरिस फाशी देण्यात आले, ती पत्रे बनावट होती; पण शादनमच्या संग्रही सापडलेले पत्र खरे होते यात शंका नाही. एरवीच्या शांत-तेच्या काळात अकबराने संशयाचा फायदा देऊन शहा मन्सूरला नक्कीच सोडून दिले असते; पण ही वेळ आणीबाणीची होती आणि शत्रूने पंजाबात प्रवेश करून लाहोरला वेढा दिला होता. तसेच शदमनच्या दप्तरी सापडलेल्या पत्राब-द्दल शंका घेण्यास काहीच जागा नव्हती. शत्रूला सहानुभूती दाखविणारे लोक बिहार-बंगालमधल्या बंडखोरांतच होते असे नव्हे, तर प्रत्यक्ष बादशहाच्या राजधानीत आणि दरबारातही त्यांचा भरणा होता. कायद्यानुसार गुन्ह्याची चौकशी करण्याची किंवा कुठलाही धोका पत्करण्याची ही वेळ नव्हती. एकंदरीत राजकीय परिस्थितीचा विचार करता शहा मन्सूरला झालेली शिक्षा योग्यच होती यात काही शंका नाही. यामुळे शत्रूशी संगनमत करू पाहाणाऱ्यांना किंवा ज्यांची स्वामिनिष्ठा डळमळू पाहात होती, अशांना दहशत बसली. अकबराविरुद्धचा कट मुळातच उखडला गेला. घडलेला इतिहास प्रत्यक्ष डोळ्यांनी पाहिलेला मॉनसेराट म्हणतो, "शहा मन्सूरला फाशी दिल्यामुळे बादशहाविरुद्धच्या कटाचा एकदम शेवट झाला."

शहा मन्सूरच्या फाशीमागे तोडरमलचे कारस्थान होते, असे मागण्याजोगा पुरेसा पुरावा उपलब्ध नाही; पण राजा तोडरमल बादशहाच्या वजिराचा द्वेष करीत असे हे निश्चित. बंगालमधून त्याने पाठविलेल्या खालित्याच्या आधारेच शहा मन्सूरला यापूर्वीही काही दिवस कैदेतून ठेवण्यात आले होते; कैदेतून तो सुटल्यानंतरही त्याच्याविरुद्ध कारस्थाने चालूच होती; पण पोलिस अधिकाऱ्यांना सापडलेलीबनावट पत्रे, शहाबाज खानचा भाऊ करमुल्ला याने काही उच्चपदस्थ अधिकाऱ्यांच्या आणि खास करून तोडरमलच्या सांगण्यावरून लिहिली होती, असे सांगतात. मन्सूरच्याकडून इजा पोहोचलेले इतरही सरदार त्याच्या विरुद्ध होते. स्वतःची राजद्रोही वागणूक आणि सहकाऱ्यांचे कारस्थान याला मन्सूर बळी पडला असावा असे मानण्यास हरकत नाही

## मिर्झा हकीमची काबूलला माघार

दरम्यान मिर्झा हकीम ६ फेब्रुवारी रोजी आपल्या बरोबर १५,००० उत्कृष्ट घोडदळ घेऊन लाहोरला आला. बादशहाच्या हुकुमानुसार त्याचा कोणीहि प्रतिकार केला नाही. मेहदी कासीम खानच्या बागेत आपला तळ देऊन मिर्झा हकीमने लाहोरला वेढा दिला. अकबराच्या हुकुमानुसार भगवन्त दास, मानसिंग, सैदखान इत्यादि सेनानींनी शत्रूशी सामना न करता लाहोरच्या किल्ल्यात स्वतःला कोंडून घेतले. पंजाबमधील रोहटास येथील किल्ल्याच्या संरक्षणाचा बंदोबस्त मिर्झा हकीमने केला, पण त्यानेही शत्रूविरुद्ध आघाडी उघडली नाही. पंजाबमधला एकही माणूस, शिपाई किंवा मौलवीसुद्धा अपेक्षेप्रमाणे आपल्याला येऊन मिळत नाही, हे पाहून मिर्झा हकीमची फार निराशा झाली. देशात सर्वत्र अशांतता माजली असून अकबराविरुद्ध तुला मदत करण्यास सर्व लोक तयार आहेत, अशा अर्थाचे निरोप मिर्झा हकीमकडे आले होते. अकबर सरहिंद जवळ येऊन पोहोचताच निराश झालेल्या मिर्झाने लाहोरचा वेढा उठवला आणि रावी नदी ओलांडून तो काबूलला पळून गेला. चिनाब आणि झेलम या नद्या पार करताना त्याच्या सैन्यातले ४,००० लोक बुडून मरण पावले. पळून जाण्याच्या धांदलीत मिर्झाची बोट उलटून कदाचित् तो बुडून जाईल या भीतीने अकबराने शत्रूचा पाठलाग न करण्याविषयी हुकूम दिला. पोटच्या पोरापेक्षाही भावाबद्दल अधिक स्नेह राखण्याचा हिंदू लोकांचा धर्म उदारधी बादशहाने आत्मसात केला होता. आपल्याशी शत्रुत्व राखणाऱ्या दुधभावाला कोणत्याही प्रकारे शारीरिक इजा व्हावी असे त्याला वाटत नव्हते.

'एक मुलगा गमावला तर त्याची जागा दुसरा मुलगा घेतो, पण भावाच्या बाबतीत तसे होत नाही,' असे तो म्हणाला. *

## मध्ययुगीन भारतातील पहिली खानेसुमारी

अकबराची बुद्धी इतकी सर्वगामी आणि त्याचा स्वभाव इतका शांत होता की लढाईसारख्या धामधुमीच्या काळात देखील इतर जरुरीची कामे करण्यास आणि काही वेळ मौजेत घालवण्याससुद्धा तो फुरसत काढत असे. राज्यकारभारातील दोषसुद्धा बारिक नजरेने–हुडकून काढून त्याबद्दल उपाय-योजना तो करत असे. बिहार आणि बंगालमधील आणि देशात इतर ठिकाणी बंडाळी जोरात असतांना त्याने 'बाज' आणि 'तमघा' हे व्यापारावरील दोन जाचक कर रद्द केले आणि आता आपल्या आयुष्यातील अत्यंत धोकादायक आणि कठिण स्वारीवर पंजाबकडे निघाला असताना १५८१ सालच्या मार्च महिन्यात सरहिन्दहून त्याने एक महत्त्वाचा हुकूम काढला. आपल्या राज्यातील लोकांची खानेसुमारी करण्याबद्दल हा हुकूम होता. प्रत्येक गावातील माणसांची शिरगणती करून त्यांच्या कामधंद्याबद्दल माहिती गोळा करण्याचे हुकूम सर्व जहागीरदार, शिकदार म्हणजे परगण्यावरचे अधिकारी आणि दरोगा यांना देण्यात आले. आपल्या राज्यातील माणसांची केवळ शिरगणती करण्याचा आणि

---

* अकबरनामा, भाग ३, पान ३४५–३४६; तबकत – इ – अकबरी भाग२१ पान ३५९; मुनतखान – इत– तवारीख भाग २, पान ९२३; माझीर -इ-रहिमी, भाग १, पान ८७९; Commentarous, पान ७०, ७२. अकबराच्या-भावाबद्दलच्या कल्पनांची तुलना तुलसीदासाच्या खालील कवितेशी करावी.

सुत बित नारी भुवन परिवारा,  
होहिं जाहिं जग बारहि बारा ।  
अस विचारि जिय जागहु ताता,  
मिलहि न जगत सहोदर भ्राता ।।

अकबराच्या मिर्झा हकीमवरील प्रेमाच्या संदर्भात Commentarius, पान १२३ पाहा. तसेच अकबराचे उद्गार, „ मिर्झा हकीम म्हणजे हुमायून बादशहाचे चालते बोलते स्मारक आहे. त्याने कितीही कृतघ्नता दाखवली, तरी मला त्याची गयच केली पाहिजे.'' (Ain, Vol. III. 2ed ed. p.p. 428–429).

राज्यातील एकूण लोकसंख्येचा अंदाज बांधण्याचा हेतू या खानेसुमारीच्या मागे नव्हता. प्रत्येक धंद्यावार माणसांचे गट पाडून प्रत्येकाला काही तरी रोजगार आहे अशी तजवीण करण्याचा आणि तसेच त्यांच्या जमाखर्चाची नोंदणी करण्याचा हा प्रयत्न होता. स्वतःचा चरितार्थ चालविण्याची साधने ज्यांच्याजवळ नव्हती, असे लोक म्हणजे मुख्यतः धार्मिक भिक्षू भिकारी आणि उनाडटप्पू हे होते. यांपैकी शेवटच्या म्हणजे उनाडटप्पू लोकांवर नजर ठेवावी असा हुकूम अकबराने दिला. खानेसुमारीचा हा हुकूम म्हणजे अकबराच्या राज्यकारभारातील एक महत्त्वाचा कायदा ठरतो. दुर्दैवाने या खानेसुमारीचे आकडे आणि त्यापासून काढलेले निष्कर्ष आता उपलब्ध नाहीत. त्यामुळे त्या काळच्या आर्थिक आणि सामाजिक परिस्थितीची माहिती करून देणारे एक महत्त्वाचे साधन काळाने गडप करून टाकले आहे.

## कटेहरचे बंड : अरब बहादुरचा पाडाव :

अकबर मिर्झा हकीमच्या विरुद्ध स्वारीवर असताना कटेहर (हल्लीचे रोहिलखंड) चे बंड झाले. मासूमखान फरानखुडी शिवालिकच्या डोंगरात पळून गेल्यावर अरब बहादुर नियाबत खान आणि शहा दाना यांनी संबळला बंडाचे निशाण उभारले; आणि लाहोरला मिर्झा हकीमला जाऊन मिळण्याची त्यांनी तयारी केली. त्यांनी तरेळीच्या किल्ल्याला वेढा दिला, पणतेथील फौजदार हकीम ऐन–उल–मुल्क याने त्यांचा पराभव केला. नंतर किल्ल्याहून माघार घेऊन बंडखोरांनी आसपासच्या भागात लुटालूट करण्यास सुरुवात केली. दरम्यान बदायुन, शमसाबाद, आमरोहा, सलीमपूर, लखनौ आणि संबळ येथील अधिकारी हकीम ऐन–उल–मुल्कच्या मदतीस आले. नियाबत खानला बंडखोरांच्या गटातून फोडण्याच्या कामात ऐन–उल–मुल्कला यश आले. तसेच बंडाच्या धामधुमीचा फायदा स्वतःसाठी करून घेण्यास टपलेले आणि बंडास चिथावणी देणारे कुमायुन जिल्हयातील राजे–राजा रामशहा व राजा मुकुटसेन इत्यादी–यांना पण हकीम ऐन–उल–मुल्कने आपल्या बाजूस वळविले. तरीसुद्धा अरब बहादूर आणि शहा दाना यांनी ऐन–उल–मुल्क बरोबर दोन हात केले; पण त्यात पराभव होऊन त्यांना पळून जावे लागले.

## अकबराची काबुलवर चाल

दरम्यान अकबर मच्छीवाड्याला सतलज ओलांडून दसुयाच्या मार्गाने कलानौरला आला. तेथे त्याने रावी नदी पार केली. चिनाब आणि झेलम नद्या

ओलांडून तो रोहटासला आला. रोहटासजवळच्या टेकडीवर असलेल्या बालनाथ तिलाच्या तीर्थास भेट देऊन उघड्या पायाने आणि केस मोकळे सोडून अकबराने मुख्य योग्याला आणि तीर्थस्थानाला अभिवादन केले. मंदिरात राहणाऱ्या योग्यांची आणि भिक्षूंची भेट घेण्याचा अकबराचा बेत होता. "थोडक्यात म्हणजे स्वत:च्या दैवी शक्तीचा विचार न करता, जेथे जेथे ईश्वराचे भक्त किंवा ईश्वरी साक्षात्कार झालेली मंडळी सापडतील, तेथे तेथे त्यांच्या सहवासात आणि प्रार्थनेस जमलेल्या लोकांसमवेत जगाचा स्वामी परमेश्वराची प्रार्थना करीत असे." असे अबुल फझलने लिहून ठेवले आहे. सिंधूच्या तीरावरून अकबरने एका निरोपाकरवी मिर्झा हकीमला स्वत:च्या भेटीस बोलावले. मिर्झा हकीमला माफी केल्याचा व जीवदान दिल्याच्या वचनाचा उल्लेख पण या निरोपात होता. स्वत: बादशहासमोर हजर न होता मिर्झा हकीमने आपला मुलगा आणि बहिण बख्तुन्निसा किंवा ख्वाजा हसन नक्षबंदी यांपैकी कोणालाही आपल्या चांगल्या वागणुकीची हमी देऊन बादशहाकडे पाठवून दिले तरी सुद्धा त्याला माफी करण्याची बादशहाची तयारी होती. पण यापैकी कुठलीच गोष्ट करण्यास मिर्झा कबूल झाला नाही. तेव्हा मानसिंगला सिंधू नदी ओलाडून पेशावरकडे चाल करून जाण्याचा हुकूम बादशहाने दिला; आणि त्याच्या पाठोपाठ एक बलिष्ठ फौज हाताखाली देऊन राजपुत्र मुरादची रवानगी केली. ( २७ जून १५८१ ). सिंधू नदी ओलांडल्यावर हे सैन्य युद्धाचा पवित्रा घेऊन पुढे चालू लागले. मिर्झा युसफखान, रायसिंग, राय दुर्गा, सूरजसिंग, मदन चव्हाण या आणि इतर सरदारांसमवेत राजपुत्र मुराद सैन्याच्या मध्यभागी होता. सैन्याच्या उजव्या बाजूस कुलीजखान व डाव्या बाजूस सय्यद अहमद बक्षी हे होते. आधीच पुढे गेलेला मानसिंग या सैन्याच्या आघाडीवर होता. ही प्रचंड सेना आपल्यावर चाल करून येत आहे हे पाहून घाबरलेला मिर्झा, इराणचा शहा किंवा अब्दुल्लखान उझबेक अशा शत्रूंकडे आश्रयाला जाईल. अशी भीती अकबराच्या मनात होती. त्यासाठी मिर्झा हकीमला शरण येण्याबद्दल आणखी एक मित्रत्वाचा निरोप पाठवून अकबराने जवळ जवळ दीड महिना सिंधू नदीच्या तीरावर तळ दिला. मिर्झा ऐकत नाही असे पाहून सिंधू नदीवर एक नावांचा पूल तयार करण्यास त्याने सांगितले. तो तयार होण्यास बरेच दिवस लागले. दरम्यान नदीच्या पूर्व तिरावर ( मे महिन्याच्या अखेरीस ) एका नव्या किल्ल्याचा पाया अकबराने घातला. किल्ल्याचे नाव अटक बनारस असे ठेवण्यात आले. सरहद्दीवरील प्रांतांत शांतता राखण्यासाठी आणि वायव्येकडून येणाऱ्या हल्ल्यांना तोंड देण्यासाठी हा किल्ला उपयोगी पडणार होता. मिर्झा हकीम ऐकत नाही असे

पाहून १२ जुलै रोजी अकबराने नदी ओलांडली. किल्ल्याचे काम पाहण्यासाठी आपला मुख्य इंजिनियर कासीमखान याला त्याने मागे ठेवले. स्वारीचा विचार सोडून देऊन मिर्झाला माफी करावी असा आपल्या अधिकाऱ्यांचा जवळ जवळ एकमुखी सल्ला अकबराने झुगारून दिला. १४ जुलैच्या सुमारास मिर्झाकडून माफीची याचना करणारे पत्र आले, पण तो स्वत: न आल्यामुळे आणि तो विश्वासास पात्र नसल्यामुळे हे पत्र बादशहाने विचारात घेतले नाही. मुरादला पेशावरहून पुढे जाण्याची आज्ञा देऊन दुसरे दिवशी बादशहा स्वत: काबूलच्या मार्गे निघाला. दोघांमधील भांडणाचा शेवट सलोख्याने करण्याच्या हेतूने बादशहाने पुन: एकदा काबूलला आपल्या एका वकिलाची रवानगी केली. मिर्झाने दुसरे एक माफीचे पत्र पाठवले, पण त्याचाही बादशहाने अस्वीकार केला. या स्वारीविषयी आपल्या सेनापतींचा पुन: एकदा सल्ला घेतला असता बादशहाला असे आढळून आले की, अबुल फझल शिवाय बाकी सर्व लोक स्वारी रद्द करावी या विचाराचे होते. त्यांचा सल्ला पुन्हा एकदा बाजूस सारून अकबर पेशावरला गेला. पेशावरला पोहोचल्यावर गोरखत्री येथील प्राचीन बुद्धलेण्यांना त्याने भेट दिली. तेथल्या मुख्य गुहेत रांगत जाऊन योगी लोकांची एकेकाळची तपस्येची जागा त्याने नीट पाहून घेतली. "केस मोकळे सोडून, आणि अकाशाकडे हात जोडून आणि नजर लावून" त्याने या योग्यांचे स्मरण केले. मिर्झा हकीम युद्धाची तयारी करीत आहे अशी या ठिकाणी बातमी येताच अकबर जमरुद, खैबर खिन्ड, डाका, जलालाबाद या मार्गे गंडमकला येऊन पोहोचला. सुरखानला पोहोचताच आघाडीवर गेलेल्या राजपुत्रमुरादने मिर्झा हकीमवर विजय मिळविल्याची बातमी त्याला मिळाली.

## मिर्झा हकीमचा पराभव आणि पलायन

मध्य अशियात पळून जावे की लढाई करावी अशा विचारात पडलेल्या मिर्झा हकीमने लढाई करण्याचे ठरविले. त्याचा सेनापती फरीदून याने आपली फौज चिनारतु जवळ लपवून ठेवली होती. त्या सैन्यासह ३० जुलै रोजी राजपुत्र मुरादच्या पिछाडीवर हल्ला करून तिथले काही सामान त्याने पळवले; पण पिछाडीच्या सैन्याने त्यांच्यावर हल्ला करताच अफगाण लोक पळून गेले. इतक्यात मिर्झा हकीम तेथे येऊन पोहोचला आणि दोन्ही सैन्यांत छोटीशी चकमक उडाली. या चकमकीत शेख दौलत आणि मथुरादास यांनी फार पराक्रम गाजवला. दिवस मावळताच दोन्ही सैन्ये आपापल्या छावणीत निघून गेली. सबंध रात्रीत किंवा दुसऱ्या दिवशी पण युद्धाला तोंड लागले नाही. बादशहाच्या सरदारांना

लालूच दाखवणारी पत्रे लिहून बादशहाच्या फौजेत वितुष्ट निर्माण करण्याचे मिर्झाचे प्रयत्न फसले. राजपुत्राच्या आघाडीवरील फौजेने त्याला मागे रेटले. दुसऱ्या दिवशी फरीदूरने बादशाही फौजेवर हल्ला चढविला. त्यात राजपुत्राच्या आघाडीच्या सेनेची थोडीशी हानी झाली पण माधोसिंग आणि सुरतसिंगयांना बरोबर घेऊन मानसिंग राजपुत्राच्या मदतीस धावून आला आणि आपल्या जवळचे हत्ती शत्रू–सैन्यावर सोडून त्यांना त्याने पराभूत केले. आपला थोरला मुलगा कैकोबाद याला बरोबर घेऊन मिर्झा घुरबनच्या डोंगरी मुलखात पळून गेला. मिर्झा आपल्या पिछाडीवर पुन्हा हल्ला करील या भीतीने मुरादने पळून जाणाऱ्या शत्रूचा पाठलाग केला नाही. बादशहाच्या फौजेतील तुराणी आणि इराणी शिपाई आपल्याला येऊन मिळतील आणि नंतर एकाकी राहिलेल्या रजपूत सैन्याचा पाडाव सर्वांनी मिळून करणे सोपे होईल अशा आशेवर काबूलची अफगाण फौज होती; पण याबाबतीतही त्यांची निराशाच झाली. मुराद आता सिया संग किंवा लोकांत महशूर असलेल्या सफेद संग या गावी गेला. थोड्याच दिवसांत अकबर स्वत: तेथे येऊन पोहोचला. काबूलचे आणि आसपासचे लोक आपली स्वामि निष्ठा जाहीर करण्यासाठी बादशहापुढे जमा झाले. आपले बालपण आणि नवतारुण्य घालवलेल्या या गावातील निरनिराळ्या स्थळांना भेट देऊन अकबराने काही दिवस तेथे मजेत घालवले. मिर्झा हकीम अत्यंत घाबरून गेला आहे आणि त्याचा पाठलाग करून त्याला लढाई देण्यास भाग पाडले तर तो फकीर होऊन तुराणला मध्य अशियात पळून जाण्याचा संभव आहे, अशी बातमी मिळताच त्याची समजूत काढून त्याला दरबारात घेऊन येण्यासाठी अकबराने लतीफ ख्वाजा आणि काझी अब्दुल लतीफ यांना पाठवून दिले. १० ऑगस्ट रोजी ( अबुल फझलच्या मते ९ ऑगस्ट ) बादशहाने काबूलच्या किल्ल्यात प्रवेश केला; आणि तेथे मोठा दरबार भरवून खाना दिला. त्याच्या तुलादानाचा वार्षिक समारंभ येथेच पार पडला. काबूलला अकबराचा मुक्काम २० दिवस होता.

## अकबर हिंदुस्थानात परत येतो : निरनिराळ्या ठिकाणी गांवचे काझी आणि सदर यांची नेमणूक

अफगाणिस्थान हातात पडल्यावर मिर्झा हकीमचे काय करावे हा प्रश्न अकबरापुढे उभा राहिला. त्याला पकडून ठार मारावे हा सल्ला बादशहाला रुचेना. मिर्झाला थोर मनाने माफी करून अकबराने त्याची बहीण बख्तुन्निसा हिच्यावर प्रांताचा कारभार सोपवला. २८ ऑगस्टच्या सुमारास काबूल खाली

करून, वाटेत बाबरच्या कबरीचे दर्शन घेऊन अकबर जलालाबादला परत आला. राजपुत्र सलीम, बादशहाचा जनानखाना आणि सैन्याची मुख्य छावणी जलालाबादला होती. बादशहाला पाहून सैन्याचा जीव खाली पडला. कारण मध्य आशियातील (तुरार) डोंगराळ मुलूख काबीज करण्याचा बादशहाचा विचार आहे. अशा अफवा पसरल्या होत्या. अफगाणिस्थान आणि तुराणमधील छुपे हल्ले करण्यात तरबेज असलेल्या रानटी व बंडखोर टोळयाशी युद्ध सुरू झाल्यास ते अनेक वर्षे चालू राहील, अशी भीती सर्वांना पडली होती. बिहार, बंगालमधील बंडखोरांचा बिमोड झाल्याची शुभवार्ता खैबरची खिंड ओलांडण्यापूर्वीच बादशहाच्या कानांवर आली. २२ सप्टेंबरला बादशहाने सिंधू नदी पार केली आणि तिथल्या सरहद्दीच्या प्रांतावर मानसिंगाची नेमणूक केली. बंगालमधील बंडाळीचा बिमोड करून परत बोलावलेल्या राजा तोडरमलने सिंधूच्या पूर्व किनाऱ्यावर बादशहाची भेट घेतली. तेथे त्याला वजीरकी मिळाली. लाहोरजवळील आपल्या छावणीतून काढलेल्या एका हुकुमान्वये मुख्य सदरची जागा कमी करून त्याऐवजी निरनिराळ्या भागांसाठी निरनिराळे सदर नेमून लोकांच्या चरितार्थासाठी (सायूरघेल) नेमणुका करून देण्याचे काम त्यांच्याकडे सोपवले. दिल्ली, माळवा आणि गुजराथ या प्रांतावर हकीम अब्दुल फाता; आग्रा, काल्पी आणि कलिन्जर येथे फैजी; हाजीपूर ते सारु (सर्जू) या मुलखावर हकीम हुमाम; बिहारमध्ये हकीम अली, बंगालमध्ये हकीम एन-उल-मुल्क आणि पंजाबमध्ये काझी अली बक्षी असे सदर नेमण्यात आले. राज्यातल्या मोठमोठ्या शहरांतून त्याने विद्वान आणि उदार धोरणी काजींची नेमणूक केली. पंजाबमधील सैन्याचा सरसेनापती राजा भगवन्त दास याचा पाहुणचार त्याच्या लाहोरच्या घरी स्वीकारून अकबराने त्याचा सन्मान केला. राजधानीला परत येत असताना मथुरेला भेट देऊन त्या क्षेत्रातला रहिवासी मथुरादास या आपल्या प्रमुख लष्करी अधिकाऱ्याच्या घरचा पाहुणचार स्वीकारून १ डिसेंबर १५८१ रोजी अकबर फत्तेपूर सिक्रीला परत आला. तेथे त्याचे लोकांनी प्रचंड स्वागत केले.

## मासूमखान फरान-खुडीला माफी

शहाबाझ खानच्या हातून पराभव पावून मासूमखान फरान-खुडी शिवालिकच्या डोंगराळ मुलुखात आश्रयाला गेला होता आणि तिथल्या जंगलात भ्रमंती करीत होता; त्याचा उल्लेख पूर्वी आलेलाच आहे. त्याचा एक अनुयायी मक्सूद याने आपली सर्व संपत्ती मासूमखानच्या हवाली केली. तिच्या जोरावर

पुष्कळ रंगरूट गोळा करून मासूमखानने अवध प्रांतातील बहारीच गाव लुटले. तिथला जिल्हाधिकारी फक्र अली खान याचा पराभव होऊन तो जिल्हा बंडखोरांच्या हातात पडला. शेजारच्या जिल्ह्यातले वझीरखान, मिहतरखान आणि इतर काही सरंजामदार यांनी आपल्या फौजा एकत्र करून शत्रूविरुद्ध चाल केली. दोन्ही सन्यांमये शरयू नदी आल्यामुळे दोन्हीकडून तोफखानी युद्धास सुरुवात झाली. मासूमचा पराभव होऊन तो पळून गेला आणि कल्याणपूरपर्यंत बादशाही फौजांनी त्याचा पाठलाग केला. तेथून जालूपाड्याला माघार घेऊन मासूमने मुहमदाबाद शहर लुटले. तो जौनपूरवर चाल करून येण्याची शक्यता आहे असे वाटल्यावरून तिरहूतहून शहमखान, काझीपूरहून पहाडखान आणि चांदपूरहून कासीमखान जौनपूरच्या रक्षणासाठी आले. यामुळे गोंधळलेला मासूमखान गावोगाव भटकू लागला. काबूलच्या स्वारीवरून परत येणाऱ्या विजयी बादशदाकडे खान-इ-आझम अझीझ कोकाच्या मध्यस्थीने मासूमखान फरानखुडीने क्षमेची याचना केली. नंतर फत्तेपूर सिक्रीला जाऊन शहराबाहेरील पीर घैबच्या कबरीजवळ मासूमखान राहू लागला. तेथे असताना अकबराची आई मरियम मकानी (हमीदा बेगम) हिच्या छत्राखाली तो आला. तिच्या मध्यस्थीमुळे २६ मार्च १५८२ रोजी बादशहाने मासूमखानला माफी केली. यानंतर तो फार दिवस जगला नाही. इ. स. १५८२ च्या जुलैमध्ये राजवाड्यातून परत येत असता त्याचा कोणीतरी खून केला.

## बहादुरचा शेवट

बंडखोरांचा दुसरा प्रमुख पुढारी सय्यद खान बदक्षीचा मुलगा बहादुर, याने राजचिन्हे धारण करून तिरहूत ही आपली राजधानी केली होती. राज्यातला पुष्कळसा भाग त्याने आपल्या ताब्यात घेतला होता आणि जुलुमाने वसूली करून लोकांना हैराण केले होते. गाझीखान बदक्षीची जहागीर बहादुरने बळकावलेल्या प्रांतातच होती. बहादुरचा काटा काढण्यास आता चांगला मोका मिळाला आहे असे पाहून गाझीखान बदक्षीने अझीझ कोकाची थोडीशी मदत घेऊन बहादुरवर चढाई केली. या युद्धात तो सपशेल पराभूत झाला. त्याच्या कुटुंबातली मंडळी गाझीखानच्या हातात सापडली. त्याला शरणचिठ्ठी देण्यास भाग पाडून गाझीखानने त्याला सुभेदार अझीझ कोकाच्या ताब्यात दिले. हातपायात बेड्या घालून अझीझकोकाने त्याची राजधानीला रवानगी केली. स्वामीद्रोह करून स्वत: राजचिन्हे धारण केल्याचा घोर अपराध केल्याबद्दल अकबराने त्याला फाशीची सजा फर्मावली.

## शहाबाझखानला नजरकैद

बादशहाच्या दरबारातली शिस्त किती कडक असे आणि ती मोडल्याचे परिणाम काय होत असत याचे उदाहरण म्हणून शहाबाझ खानला बादशहाने केलेल्या शिक्षेचा उल्लेख करता येण्यासारखा आहे. शहाबाझ खानने कित्येक वर्षे मुख्य वक्षीच्या (युद्धमंत्र्याच्या) मोठ्या हुद्यावर काम केले होते आणि राज्याच्या निरनिराळ्या भागांत त्याने केलेली लष्करी कामगिरी मह्शूर होती. १५८२ साली जानेवारीच्या सुरुवातीस बादशहा शिकारीसाठी नागरचेनला गेला होता. तेथे आपल्या शरीर-रक्षकांची रचना करताना बादशहाने शहाबाझ खानला मिर्झा अब्दुर रहीम (नंतर-खान-खानान) याच्या खालोखाल उभे केले. याबद्दल शहाबाझ खानने आपली नापसंती व्यक्त केली. यापूर्वी तो असाच उद्धटपणे वागला होता. याबद्दल शिक्षा म्हणुन त्याला कैद करून रायसाल दरबारीच्या ताब्यात देण्यात आले.

## हाजी बेगमचा मृत्यू

१७ जानेवारी १५८२ रोजी अकबराची सावत्र आई हाजी बेगम मरण पावली. ती वृत्तीने फार धार्मिक असून सर्व लोक तिला फार मान देत असत. मक्केहून परत आल्यावर बहुतेक सर्व वेळ ती हुमायुनची कबर बांधण्यत, तिची देखभाल करण्यात आणि दानधर्म करण्यात घालवत असे. तिचे अकबरावर फार प्रेम होते. अकबराची आई कोण हे ठाऊक नसलेले लोक पुष्कळदा तिलाच मरियम मकानी ( हमीदा बानू बेगम ) समजत असत. तिच्या मृत्यूमुळे अकबराला फार दु:ख झाले.

## बंगाल आणि बिहारमधील बंडाळीचा बिमोड :

बंगाल आणि बिहारमधील बंडाळी ही प्रादेशिक स्वरुपाची आहे असे अकबराचे मत बरोबर होते आणि त्या बंडाचा शेवट आता जवळ आला होता. बादशहाची कुठल्याही अडथळ्याशिवाय पूर्ण झालेली काबूलवरील स्वारी आणि ज्याचा बंडखोरांना फार आधार होता त्या मिर्झा हकीमचे पलायन यामुळे बंडखोरांच्या पुढाऱ्यांचा धीर खचून गेला. आणि आपला निश्चित पराभव होणार हे त्यांना कळून चुकले होते. पारशी नवरोझच्या समारंभानंतर अकबराने बंगालमधील बंडखोरांचे पारिपत्य करून बंडाचे मूळ संपूर्णपणें उखडून टाकण्यासाठी खान-इ-आझमची तिकडे रवानगी केली. तारसुन खान, शहमखान, शहा

कुली खान, महरम शेख फरीद इत्यादी सरदार त्याच्या मदतीस दिले. बिहार आणि अवधचे सादिकखान, मुहीबअली इत्यादी सरदारांना आपल्या सैन्यानिशी खान-इ-आझमला जाऊन मिळण्याचे हुकूम सुटले. खान-इ-आझम बंगालमध्ये नाही असे पाहून तेथील बंडखोर जब्बारी, खबीता आणि तारसन दिवाणा यांनी बिहारमध्ये एकत्र येऊन हाजीपूर आणि इतर काही शहरांचा ताबा घेतला होता. बहादुर कुरु आणि कुतलू अफगाण यांच्या साहाय्यार्थ मासूमखान काबुली टंड्याकडे निघाला होता. पाटण्याजवळ दोन्ही सैन्यांत अनेक चकमकी होऊन बंडखोर खबीता मारला गेला आणि अल्पसंख्य असूनसुद्धा बादशाही फौजांनी विजय मिळवला. खबिताचे मुंडके फत्तेपूर सिक्रीला रवाना करण्यात आले. नूर महम्मद नावाचा दुसरा एक बंडखोरे बिहारमध्ये सारणला आला व ख्वाजा अबदुल गफूरच्या मदतीने तो प्रांत त्याने लुटला. दरम्यान खान-इ-आझमच्या हाताखालील फौज बोटींच्या तराफ्यावरून गंगापार करून आली आणि बंडखोरांनी तिरहूतकडे पळ काढला. खासी जातीच्या टोळ्यांबरोबर झालेल्या चकमकीत अब्दुल गफूर मारला गेला. खान-इ-आझमच्या सैन्याने नूर महंमदला चंपारण-जवळ गाठून ठार केले.

खान–इ–आझम फत्तेपूर सिक्रीहून परत येण्यापूर्वीच बिहारमधील बंड संपले होते. फक्त बंगाल प्रांत अजून परत जिन्कायचा राहिला होता. पावसाळी संपल्यावर अलाहाबाद, अवध आणि बिहारमधील फौजा हाजीपूरला एकत्र आल्या. त्यांच्याशी संधान साधून खान-इ-आझम तेलिया गढीच्या मार्गाने बंगालकडे निघाला. त्याचवेळी तारसुन खान आणि शेख इब्राहिम गंगा उतरून बंगालकडे निघाले. वाटेतील जंगल, पाणी, चिखल यांमुळे त्यांना मार्ग बदलावा लागला आणि मोंघीरला दोन्ही सेना एकमेंकाला मिळाल्या. दरम्यान मासूमखान काबुलीने कुतलू, जब्बारी, मिर्झा बैग आणि इतर काकशालमंडळींबरोबर हातमिळवणी केली होती. तेलियागढीची खिन्ड बादशाही फौजेच्या हातात पडली आणि कटिगंजजवळ सुमारे महिनाभर दोन्ही सैन्ये एकमेकांस तोंड देऊन उभी होती. लहानमोठ्या चकमकी रोज चालू होत्या आणि तोफांचा माराही रात्रंदिवस सुरू होता. या लढाईत फत्तेबादहून बोटींचा काफला घेऊन आलेला प्रबळ बंडखोर पुढारी काझीझादा तोफेचा गोळा लागून मरण पावला. त्याची जागा घेतलेला काळा पहाडही नंतर मारला गेला. मासूमखान काबुली आणि काकशाल यांच्यांत आता भांडणाला सुरुवात झाली. या संधीचा फायदा घेऊन बादशहाच्या बाजूने काकशाल मंडळींबरोबर वाटाघाटीस सुरुवात झाली. बंडखोरांची बाजू सोडून खालदिन खान–इ–आझमला प्रथम येऊन मिळाला.

त्याच्या पाठोपाठ महंमद बेग काकशाल, जब्बारी, आणि इतर मंडळी बादशहाच्या फौजेस येऊन मिळाली. स्वतःची प्रतिष्ठा राखण्यासाठी म्हणून ही मंडळी नावापुरतीच प्रथम आपापल्या घरी जाऊन नंतर खान–इ-आझमला मिळाली. नंतरच्या लढाईत बादशाही सेनेचा विजय होऊन मासूमखान आपल्या कुटुंबाच्या रक्षणासाठी आणि काकशालांचा सूड घेण्याच्या हेतून घोराघाटला निघून गेला; पण तारसुन खान ४००० फौजेनिशी काकशालांच्या मदतीस धावून गेला. त्यामुळे नामोहरम होऊन मासूमखानने पळ काढला आणि काही वेळ बादशाही सैन्याने त्याचा पाठलाग केला.

या विजयानंतर बंगालची हवा मानवत नसल्याने खान–इ–आझमने रजेची मागणी केली. ती मान्य होऊन शहाबाझ खानला बंगालच्या मोहिमेवर नेमण्यात आले. तत्पूर्वी मासूम खान पळून गेलेला पाहून अजून कामावर असलेल्या खान–इ–आझमने वजीरखानला ओरिसामध्ये ठाण देऊन बसलेल्या कुतलू लोहानी या शेवटच्या बंडखोरांविरुद्ध पाठवून दिले. मदारण, मिदनापूर आणि इतर काही भाग ओरिसाला जोडून त्याची जहागीर मिळाल्यास आपण शरण येण्यास तयार आहोत अशा अर्थाची बोलणी कुतलूने सुरू केली. त्याच्याबरोबर वाटाघाटीसाठी गेलेल्या शेख फरीदला कैद करून ओलीस ठेवून घेण्याचा प्रयत्न त्याने केला; पण त्याच्या हातातून निसटून शेख फरीद परत आला. सादिक खान, अमरदाद, शहा कुलीखान महरम यांनी प्रथम कतलूच्या हाताखालील बहादुर कुन्हुवर हल्ला करून नंतर कुतलूकडे आपला मोर्चा वळवला. कुतलू आणि बहादुर दोघेही पराभूत होऊन पळून गेले. खान-इ-आझमच्या बदली आलेल्या शहाबाझ खानने मासूम खान काबुली विरुद्ध चढाई करून घोराघाट जवळ त्याचा अनेक वेळा पराभव केला व १५० बंडखोरांना ताब्यात घेतले. ताजपूर आणि पूर्णिया जिंकून टंड्यावर हल्ला करण्याच्या उद्देशाने जब्बारींची हालचाल सुरू होती. पण शेख फरीद आपल्यावर चाल करून येत आहे असे दिसताच तो पळून गेला. ताजपूर आणि पूर्णिया पुनः बादशाही फौजेच्या ताब्यात आले. मासूमखान काबुली बंगालमधील आग्नेयेकडील कठिण प्रदेशात ईसा खान नावाच्या प्रबळ जमीनदाराचा आश्रय घेऊन राहिला होता. तारसुन खान त्याच्यावर चालून गेला, पण शत्रूच्या हातात सापडून मारला गेला. पुष्कळ प्रयत्न करून सुद्धा मासूम आणि ईसा यांना पकडण्यात शाहबाझ खानला यश आले नाही आणि हात हालवीत त्याला परत यावे लागले. मासूम आणि ईसाने बादशाही प्रांतात हल्ले चालूच ठेवले आणि कित्येक वेळा ते मालड्यापर्यंत येऊन ठेपले; पण प्रत्येक वेळी त्यांचा प्रतिकार करून त्यांना हुसका-

वून लावण्यात आले. शरीराने आणि मनाने पण थकलेला मासूम काबुली इ. स. १५९९ मध्ये मरण पावला पण त्यापूर्वी अनेक वर्षे बंगालला त्याच्यापासून कुठलाच धोका उरला नव्हता.

## अकबराचा विजय : निधर्मी राज्याची फत्ते

इ. स. १५८०–८३ या काळातले बंड म्हणजे अकबरावर आणि सर्व मुघल साम्राज्यावर आलेले मोठे संकट होते. बंगाल, बिहार या दोन प्रातातच हे बंड झाले असा समज करून घेणे बरोबर नाही. या दोन प्रांतांशिवाय बहुतेक सर्व ओरिसा प्रांत, गाझीपूर आणि बनारस हे जिल्हे आणि अलाहाबाद, अवध आणि कटिहार (बुंदेल खंड) हे प्रांत या बंडाने व्यापले होते. दरबारातली पुष्कळ उच्च–पदस्थ मंडळी या कटात सामील होती आणि अकबराला ठार मारून त्याचा सावत्र भाऊ काबूलचा मिर्झा हकीम याला हिंदुस्थानच्या गादीवर बसवण्याचा त्यांचा बेत होता. बंगालमध्ये तर त्याच्या नावाने खुतबा वाचला होता आणि पंजाबवर स्वारी करून त्याने लाहोरला वेढा दिला होता. जवळजवळ चार वर्षे ही बंडाळी चालू होती आणि अकबराची सर्व बुद्धिमत्ता, राजकीय डावपेचांतले चातुर्य, अक्कलहुशारी आणि धारिष्टच यांची या चार वर्षांत झाली इतकी परीक्षा यापूर्वी किंवा नंतर कधीच झाली नाही. परिस्थितीचा योग्य अदमास घेऊन हिन्दुस्थानवर स्वारी करून येणारा मिर्झा हकीम हा आपला खरा शत्रू आहे हे ओळखून अकबर स्वत: जातीने त्याचे पारिपत्य करण्यासाठी आपली प्रचंड फौज घेऊन निघाला. बंगाल–बिहार-मधील बंडाळी इतकी धोकादायक नाही हे ओळखून तिकडे त्याने आपल्या सरदारांना पाठवून दिले. आपल्या सावत्र भावाशी, अधिकाऱ्यांशी आणि बंडखोरांशी वागताना पण त्याचे निर्धाराचे पण सबुरीचे व उदार धोरण पदोपदी दिसून आले. सुदैवाने मिर्झा हकीम हा सामान्य अकलेचा व दारुड्या असून धैर्य, शहाणपण किंवा चारित्र्य यात कुठल्याही तऱ्हेने अकबराची बरोबरी करणे त्याला अशक्यप्राय होते. आपल्या स्वामीनिष्ठ रजपुत आणि इराणी सरदारांच्या सहाय्याने मिर्झा हकीमला देशाबाहेर घालवून देऊन अकबराने राज्यातील बंडाचा बिमोड केला. बहुतेक सर्व मुसलमान जमात या बंडापासून दूर राहिली होती आणि योग्य पण कडक उपाय योजून अकबराने परिस्थितीवर पूर्ण कबजा मिळवला होता. मुसलमानी धर्मावर आधारलेले इस्लामी राज्य विरुद्ध सर्व धर्मांना सारखीच मोकळीक देणारे धोरण आणि राजसत्ता मोठी की सरदार मंडळी आणि धर्मगुरु यांची सत्ता मोठी असा तात्त्विक

लढा या सर्व बंडाळीमागे होता. यात बादशहाचा व निधर्मी राज्यपद्धतीचा जय झाला. परदेशी आणि देशद्रोही दरबारी मंडळी आणि धर्मांध मौलवी यांच्यावर मात करून सर्वधर्मसमभावाचे आपले उदार धोरण अंमलात आणण्यास अकबर आता संपूर्णपणे मोकळा होता.

---

# प्रकरण १४ वे

## एका नव्या युगाचा प्रारंभ : दिन-इ-इलाही

### विजयोत्सव

राज्याच्या पंचांगात पारशी नवरोझचा दिवस अकबराने आपल्या राज्याच्या सत्ताविसाव्या वर्षी दाखल केला. त्या दिवसाचा समारंभ आणि बादशहाला मिळालेल्या दोन विजयांचा उत्सव एकाच दिवशी पार पडला. दरबाराचा दिवाणखाना आणि अंगणाभोवताली दुतर्फा असलेल्या कमानदार छताच्या १२० ओऱ्यांच्या भिंती व मोठमोठे स्तंभ मौल्यवान रेशमी आणि जरतारी कापडांनी सजविण्यात आले. दरबारातल्या प्रमुख सरदारांकडे हे काम सोपविण्यात आले होते. त्यांनी जरतारी वेलबुट्टीचे उंची कापड, उत्तोमोत्तम रत्ने व इतर मौल्यवान वस्तू या कामासाठी वापरल्या. जेथे हा विजयोत्सव झाला, तो फत्तेपूर सिक्रीचा राजवाडा आणि इतर सरकारी व खाजगी इमारती, तसेच आग्र्याच्या सरकारी वास्तू आणि बाजारपेठा या सर्व शृंगारण्यात आल्या. सार्वजनिक खेळ, भपकेदार देखावे, नाटके आणि मिरवणुका ११ मार्च, १५८२ पासून १८ दिवस चालू होत्या. हा उत्सव प्रत्यक्ष डोळ्यांनी पाहिलेला मॉनसेराट लिहितो, "उत्तमोत्तम वस्त्रालंकार आणि इतर वैभवाच्या वस्तू, नाना तऱ्हेचे अद्‌भुत खेळ आणि त्यापायी खर्च झालेला अलोट पैसा, हे सर्व लक्षात घेता हा उत्सव इतक्या प्रचंड प्रमाणात झाला की, तसा सोहळा ३० वर्षांत कोणी पाहिला नव्हता, असे लोक म्हणू लागले." आपला राजमुकुट आणि इतर राजचिन्हे धारण करून अकबर एका पायऱ्या असलेल्या उंच सोनेरी सिंहासनावर आरूढ झाला. काबूलच्या स्वारीत आणि बंगाल, बिहारमधील बंडाळी मोडण्याच्या कामात विशेष पराक्रम गाजवलेल्या सरदारांची नजराणे देऊन त्याने योग्य संभावना केली. तसेच "राज्यातल्या सर्व लोकांनी नाचगाणी करून आपला आनंद प्रदर्शित करावा" अशी सूचना दिली. राजवाड्यात येऊन प्रत्यक्ष उत्सवाचा समारंभ पाहण्याची मुभा स्त्रियांना देण्यात आली आणि दूरदूरच्या प्रांतांतून आलेल्या लोकांना मद्य आणि मेजवान्या देण्यात आल्या. भेटीस आलेल्या लोकांत पुष्कळ 'योगी' असून त्यांनी बादशहाच्या स्तुतिपर पद्ये गाऊन आणि नाचून आपला आनंद व्यक्त केला.

## काही खास सुधारणा

एका खास दरबारात गुलामीची पद्धत रद्द केल्याचे जाहीर करून अकबराने हजारो गुलामांना मुक्त केले. राजघराण्यातील नोकरवर्ग गुलामीतून मुक्त झाला आणि गुलामाऐवजी त्यांना 'चेले' म्हणण्यास सुरुवात झाली. राज्यात करावयाच्या सुधारणा आणि आम जनतेची स्थिती सुधारण्यासाठी करावयाच्या योजना याबद्दल युवराज आणि इतर प्रमुख व्यक्तींकडून सूचना मागवण्यात आल्या. युवराज सलीमने सुचविले की, बालविवाहाला बंदी करून बारा वर्षाखालील कुणालाही लग्न करण्याची परवानगी देऊ नये. प्रांताच्या सुभेदारांनी स्वतःच्या जबाबदारीवर कोणालाही मृत्यूची सजा न देता असे सर्व खटले बादशहाकडे पाठवून त्याबाबतीत त्याचा निकाल मान्य करावा, अशी सूचना खान–इ– आझम अझीझ कोका याने केली. पक्षी, सरपटणारे प्राणी, मासे यांना योग्य सरंक्षण देऊन त्यांची अनियंत्रित शिकार थांबवावी, असे अब्दुल रहीम खान खानान याने सुचविले. राजवाड्यातून गरिबांना रोज भिक्षा द्यावी आणि गरजू लोकांची यादी दर आठवड्याला अधिकारी वर्गाने दाखल करावी, असे तोडरमलने सुचविले. महत्त्वाच्या घडामोडींचे दैनिक वार्तापत्र प्रसिद्ध करावे, असे महंमद युसफ खानचे मत पडले. हुशार आणि निःपक्षपाती अधिकारी सर्व महत्त्वाच्या ठिकाणी नेमून अन्याय झालेल्या लोकांची आणि न्याय मागण्यास आलेल्या लोकांची माहिती पुरवण्याचे काम त्यांच्याकडे द्यावे, असा विचार बिर-बलाने मांडला. याच अधिकाऱ्यांनी अकस्मात आलेल्या नैसर्गिक किंवा इतर आपत्तींची माहिती पुरवावी, असे पण बिरबलाने सुचविले. प्रवाशांच्या सोईसाठी राज्यातील सर्व हमरस्त्यांवर सराया बांधाव्यात, अशी सुधारणा कासीमखानने सुचविली. गरजू आणि संकटात सापडलेल्या माणसांना दरबारात आणण्यासाठी हुशार व अनुभवी माणसे नेमावी, असे शेख जमालने सुचविले. रोजच्या उपयोगातल्या वस्तूंच्या किमती ठरवून द्याव्या, असे फैजीने सुचविले. लोकांच्यासाठी इस्पितळ बांधावे अशी हकीम अबुल फतेहची सूचना होती. गावोवगाच्या कुटुंबांची यादी करून त्यांच्या धंद्यांची माहिती तिथल्या दरोग्यान मिळवून त्यांच्या उत्पन्नावर आणि खर्चावर नजर ठेवावी आणि त्यांच्यामधील गुंड, उपद्रवी आणि बेकार लोकांना गावाबाहेर काढावे; असे अबुल फझलने सुचविले. या सर्व सूचना मान्य करून त्या अंमलात आणण्यासाठी योग्य ती यंत्रणा अकबराने उभी केली.

## तोडरमलची मुख्य प्रधान ( वकील ) म्हणून नेमणूक :

आपल्या वजीरकीचे ( अर्थसचीवाचे ) काम उत्तम तऱ्हेने पार पाडून तोडरसलने आपल्या विषयी बादशहाचे मत फार चांगले करून घेतले होते. बादशहाने आता त्याची मुख्य प्रधानाच्या ( वकील ) उच्च पदावर नेमणक केली. ही मुसलमानी राज्यातली एक युगप्रवर्तक घटना समजली पाहिज. हिंदुस्थानात मुसलमानी अंमल सुरु झाल्यापासून एकाही हिंदूला (विशिष्ट परिस्थितीतले हेमूचे उदाहरण सोडल्यास ) राज्यातल्या मुख्यमंत्र्याची जागा तर राहोच, पण एखाद्या साध्या मंत्र्याचीही जागा देण्यात आली नव्हती. तोडरमलच्या या नेमणुकीने मुसलमानी आमदानीतले एक नवे पर्व सुरू झाले, असे म्हणण्यास हरकत नाही. कारण यामुळे हिन्दू जातीबद्दलचा भेदभाव दूर करण्यात आला, इतकेच नव्हे, तर राज्यातला कोठलाही नागरिक आपल्या हुशारीने उच्चतम पदास जाऊन पोहोचू शकतो हे स्पष्ट झाले. मुलकी कारभारातील तोडरमलच्या ज्ञानाला तोड नव्हती. सचोटीत आणि कष्ट करण्यात त्याचा हात धरणारा कोणी नव्हता. यामुळे मुख्य दिवाणाच्या ( अश्रफी दिवाण ) उच्च पदावर त्याची नेमणूक होऊन सचोटी आणि राज्यकारभारातील कौशल्य या बाबतीत त्याने मोठे नाव मिळवले होते. या सर्व गोष्टी लक्षात घेऊन साम्राजातील सर्वांत श्रेष्ठ अधिकारावर त्याची नेमणूक करण्यात आली. दिवाण म्हणून काम करताना त्याच्या अधिकारावर अर्थात बंधने होती. प्रतिस्पर्ध्यांच्या हेवादाव्यामुळे हवे होते ते करून दाखवण्यात त्याच्या मार्गात अनेक अडचणी येत असत. आता बादशहाची देखरेख आणि सत्ता या खेरीज त्याच्या अधिकारावर दुसरा कोणताच अंकुश राहिला नव्हता. अत्यंत एकनिष्ठ पद्धतीने राजा तोडरमलने आपली सर्व बुद्धी साम्राज्याच्या कारभारावर केंद्रित केली. राजकारभारात आपले सर्व लक्ष घालून त्याने "आर्थिक आणि इतर खात्यात राज्यकारभाराची एक नमुनेदार घडी बसवून दिली" असे अबुल फझल म्हणतो. कोणाचीही भीड न ठेवता कायद्यांचे योग्य तऱ्हेने पालन करून त्याने "अजरामर कीर्ती मिळवली."

## तोडरमलने केलेल्या सुधारणा :

मुख्य प्रधान झाल्यावर तोडरमलने बादशहाच्या संमतीने अनेक सुधारणा अंमलात आणल्या. या मुख्यतः जमीनमहसुलाच्या बाबतीत असून त्यांत शेतकरी आणि राजा या दोघांचे हितसंबंध सुरक्षित ठेवण्याची तरतूद होती. जहागीरदार आणि कमाविसदार यांनी आपल्या अधिकाराचा गैरवापर करून शेतकऱ्याकडून नेमून दिलेल्या पेक्षा जादा वसुली केली, तर तेवढी रक्कम वसूल झालेल्या साऱ्याच्या

हिशेबात जास्त दाखवावी. शेतकऱ्यावर जुलूमजबरदस्ती करून जादा सारा वसूल करणाऱ्या कमाविसदारांना दंड करण्यात येऊन ती रक्कम महिन्याच्या हिशेबात दाखवावी. पीक–पाण्याबद्दलची सर्व माहिती गोळा करून शेतकऱ्यांना योग्य ते संरक्षण देण्याचे काम कमाविसदारांकडे होते. तसेच खालसा जमिनीवरच्या अधिकाऱ्याच्या हाताखाली एकच हुशार कारकून ( बिटीक्ची ) ठेवावा असे ठरले. दोन दोन कारकून ठेवण्याची जुनी पद्धत योग्य नसल्याचे आढळून आल्याने ती बंद करण्यात आली. खालसा प्रांतातील सर्व जमिनीची, शेती वाढविण्याच्या दृष्टीने संपूर्ण आकारणी करून हलक्या जमिनींच्या प्रतीप्रमाणे साऱ्याची लहान मोठी रक्कम ठरवून देण्यात आली. उदाहरणार्थ, चार वर्षे पडीत असलेल्या जमिनीवर पहिल्या वर्षी ठरलेल्या आकारणीच्या निम्मा सारा घ्यावा, दुसऱ्या वर्षी पाऊणपट व तिसऱ्या वर्षी संपूर्ण आकारणी करावी. दोन दोन वर्षांच्या पडीत जमिनीवर पहिल्या वर्षी तीन चतुर्थांश व दुसऱ्या वर्षी पूर्ण साऱ्याची आकारणी करावी. गरीब शेतकऱ्यांना तगाई देऊन त्याची वसूली हळू हळू करावी. सचोटीने मेहनत करून जे अधिकारी पिकाखालच्या जमिनीत वाढ करतील, त्यांना बढत्या बक्षिसे द्यावी आणि हुकूम न पाळणाऱ्या अधिकाऱ्यांना शिक्षा करावी. उभ्या पिकाची मोजणी करण्यासाठी आणि तिथल्या उत्पन्नाची प्रत आणि जात ठरवण्यासाठी निरनिराळ्या प्रांतांत मोजणी करणारे अधिकारी नेमण्यात आले. हे काम कसे करावे याबद्दल तपशीलवार सूचना देण्यात आल्या होत्या. रोज येणाऱ्या वसुलाची नोंद करून त्याचा तपशील दर महिन्याला पाठवावा लागे. नासाडी झालेल्या पिकांची बातमी प्रत्येक मोसमात परगण्यावरच्या अधिकाऱ्याला पाठवावी लागे. तसेच प्रांतावरील सुभेदार, जिल्हा अधिकारी, कमाविसदार आणि खंडकरी यांनी कायदा मोडण्याऱ्या जमीनदारांना आणि शेतकऱ्यांना शिक्षा करावी. हे करीत असताना जखमी झालेल्या शिपायांना नुकसान–भरपाई देऊन ती रक्कम कायदे मोडणाऱ्या जमीनदारांकडून वसूल करावी. तसेच हे करीत असताना खंडकऱ्यांच्या पिकांची नासाडी झाली, तर त्याचीही नुकसान–भरपाई करण्याची तरतूद करण्यात आली. अशा तऱ्हेने वसूल केलेली रक्कम शेतकऱ्यांच्या खात्यात जमा केलेली दाखवावी. धाकदपटशा न दाखवता शेतकऱ्यांनी सारा वेळच्या वेळी भरण्यासारखी परिस्थिती निर्माण करण्यात यावी. बदमाश शेतकऱ्यांच्या पिकावर नजर ठेऊन तिथल्या सारा–वसुलीस पटवाऱ्याने मदत करावी. कमाविसदाराने आपल्या व पटवाऱ्याच्या सहीनिशी वसूल झालेल्या साऱ्याचा तक्ता वर पाठवून द्यावा. रूढ असलेल्या चलनामध्ये सारा आकारावा असे ठरले असले तरी तो राज्यात

चालू असलेल्या जुन्या नाण्यातही घेता यावा म्हणून नाण्याचे परस्पर कोष्टक ठरवून देण्यात आले होते. एका रुपयाची किंमत ४० दाम आणि लाल जलाली नावाच्या सोन्याच्या नाण्याची किंमत ४०० दाम ठरवून देण्यात आली. वसुली-खाते आणि मोजणीखाते यांनी केलेल्या कामाची हकीगत नियमितपणे दरबा-रात पाठवून द्यावी लागे; यामुळे मध्यवर्ती सरकारला प्रत्येक अधिकारी आणि त्याच्या हाताखालचे लोक यांच्या कामाची तपशीलवार माहिती मिळत असे. वसुली आणि मोजणी खात्यातील अधिकाऱ्यांच्या वेतन-श्रेणीत पण आता बदल करण्यात आला. पिकाखालच्या जमिनीसाठी प्रत्येक मोजणीदारला एका बिघ्यामागे एक दाम आणि संबंध दिवस काम करणाऱ्याला २४ दाम असे वेतन ठरवून देण्यात आले. अमीनाला ४ दाम, लेखनिकाला २ दाम, आणि तीन नोकरांना मिळून तीन दाम याप्रमाणे वेतन ठरवून देण्यात आले. रब्बी पिकाखालच्या २५० बिघा जमिनीची आणि हिवाळ्यातला दिवस लहान असल्याने खरीप पिकाखा-लच्या २०० बिघा जमिनीची मोजणी रोज झाली पाहिजे असे ठरवण्यात आले. या सर्व सुधारणा मान्य होऊन त्यांची त्वरित अंमलबजावणी करण्यात आली.

## जालाला देहान्त शिक्षा

जाला किंवा जालाबी या नावाचा एक चाबुकस्वार घोड्यावर बसण्यात फार पटाईत असल्यामुळे अकबराची त्याच्यावर फार मर्जी होती. जालाबीइतका उत्कृष्ट घोडेस्वार दुसरा नाही असा सर्वत्र समज होता. एका घोड्याच्या व्या-पाऱ्याचा हा मुलगा असून आडदांड वागणुकीचा होता; पण तो स्वत:च्या धंद्यात तरबेज असल्याने अकबराचा त्याच्यावर विश्वास होता. जाला वाईट चालीचा असून एका बाईला आपल्या नादी लावून तिच्या नवऱ्याचा त्याने खून केला आहे असे आढळून येताच बादशहाच्या हुकुमावरून त्याला कैद करण्यात आले आणि त्याच्या गुन्ह्याची चौकशी सुरू झाली. गुन्हा शाबीत होताच १० जुलै १५८० रोजी त्याला फाशी देण्यात आले. अकबराच्या सलगीचा, मेहेरबानीचा त्याला यावेळी कुठलाही फायदा करून घेता आला नाही. बादशहाच्या मर्जीतल्या माणसाला झालेली ही कडक शिक्षा पाहून बादशहाच्या मर्जीतल्या इतर जुलमी माणसांनी योग्य तो धडा घेतला आणि एकंदर दरबारातच या घटनेचा इष्ट परिणाम झाला.

## फत्तेपूर सिक्रीचा तलाव फुटला :

शेख सलीम चिस्तीच्या कबरीच्या उत्तरेस एक मोठी मजबूत धरणाची भिंत उभी करून अकबराने एक जलाशय निर्माण केला होता. २८ जुलै

१५८२ रोजी दरबारातले काही लोक मौजेखातर धरणावर आले होते; त्यांच्यात अकबर पण होता. सोंगट्या, बुद्धिबळे, पत्ते इत्यादी नाना तऱ्हेचे खेळ खेळण्यात ही मंडळी गर्क असताना दुपारी एकाएकी धरण फुटून धरणाखालची गरीब लोकांची घरे व बरीचशी गरीब माणसे वाहून गेली. सुदैवाने बादशहा, राजपुत्र आणि इतर दरबारी लोक बचावले. धाधावर नजर ठेवणारा मादादी (मादावी) या नावाचा माणूस मात्र वाहून गेला. यातून वाचल्याबद्दल अकबराने पुष्कळ दानधर्म केला आणि सौर पंचांगाप्रमाणे दर महिन्यातल्या या दिवशी (१८ तारखेला) त्याने मांसभक्षण वर्ज्य केले. आता त्याने आपली तुला पूर्वीप्रमाणे वर्षातून एक वेळा करण्याऐवजी दोनदा करण्याचे ठरवले. असे करण्याचे ज्या महिन्यात ठरवले तो फारसी महिना अबन हा होता. यापुढे या महिन्यात मांस खाण्याचे अकबराने वर्ज्य केले.

तसेच फारसी पंचांगाप्रमाणे आपला ज्या महिन्यात जन्म झाला, त्या महिन्यात प्राणिहत्या करू नये असा आदेश अकबराने आपल्या खास अनुयायांना दिला. 'आपले पोट म्हणजे जीवंत प्राण्यांना मूठमाती देण्याचे स्थान समजू नये' असे त्यांना सांगण्यात आले. या वर्षापासून सौर पंचांगाप्रमाणे राजपुत्रांचे आणि त्यांच्या मुलांचे तुलादान करण्याचे नक्की करून त्याच्या तारखा निश्चित करण्यात आल्या.

## मुक्यांचे घर किंवा गुंगा–महाल

मनुष्यप्राण्याने अगदी प्रथम वापरलेली भाषा कोणती व सुरुवातीची ती भाषा कशी होती, हे जाणून घेण्याची उत्कंठा बादशहाला लागून राहिली. हे शोधून काढण्यासाठी १५७८ साली त्याने नुकत्याच जन्म पावलेल्या जवळ जवळ २० मुलांना मुक्या दायांच्या ताब्यात देऊन फत्तेपूर सिक्रीहून दूर असलेल्या अगदी एकीकडच्या घरात ठेवले. कोणालाही त्यांच्याबरोबर संपर्क साधण्याची परवानगी नव्हती. या घराला गुंगा–महाल असे नाव देण्यात आले. १० ऑगस्ट १५८२ रोजी अकबराने गुंगामहालला भेट दिली. तिथली मुले आता ४ वर्षांची झाली होती; पण त्यांपैकी एकालाही बोलता येत नव्हते. तोंडातून ते फक्त काहीतरी आवाज काढीत असत. 'शब्दोच्चार ही ईश्वरी देणगी नसून माणसाच्या परस्पर सहवासातून भाषेचा जन्म झाला असावा अशी अकबराची खात्री होती,' असे अबूल फझलने म्हणून ठेवले आहे. या प्रयोगावरून अकबराचे मत खरे ठरले. पण या बाबतीत अकबराचे स्वत:चे

मन साशंक असावे असे वाटते. कारण तसे नसते तर त्याने हा अमानुष प्रयोग केलाच नसता.

**अकबराचा आजार :**

इ. स. १५८२ च्या सुरुवातीस अकबर आजारी पडला. त्याच्या पोटात दुखू लागले आणि आपल्या विश्वासू सल्लागारांच्या आग्रहावरून त्याने औषध घेण्यास सुरुवात केली. औषधपाणी युनानी पद्धतीचे असून प्रकृतीस आराम पडण्यास बराच वेळ लागला. तीन दिवस अकबर अन्नाला शिवला नाही आणि आजारातून बरा होण्यास त्याला १ महिना ६ दिवस लागले. अकबराच्या या आजारामुळे दरबारातील लोक आणि इतर प्रजाजन घाबरून गेले होते.

**दिन–इ–इलाही कशासाठी ?**

हिंदुस्थानातले बहुसंख्य हिंदू लोक. त्यांचा प्राचीन आणि परिपक्व धर्म आणि जनमानसात खोलवर रुजलेली हिंदू संस्कृती ही लक्षात घेता ईस्लाम हा हिंदुस्थानचा राष्ट्रधर्म होणे अशक्य आहे, असे अकबराला अनेक वर्षांपासून वाटत होते. इ. स. १२०६ मध्ये दिल्लीवर सुलतानी अंमल सुरू झाल्यापासून ईस्लामला राजधर्माचे सर्व महत्त्व आणि प्रतिष्ठा प्राप्त झाली होती; पण त्यामुळे देशामध्ये मुसलमान आणि मुसलमानेतर असे दोन तट पडून दोन प्रतींचे नागरिकत्त्व अस्तित्वात आले. मुसलमान हे पहिल्या प्रतीचे आणि नागरिकत्वाचे सर्व हक्क उपभोगण्यास पात्र आणि हिंदु हे दुसऱ्या प्रतीचे म्हणजे हीन दर्जाचे नागरिक असा भेदभाव निर्माण झाला. या विसंगतीमुळे उत्पन्न झालेले तंटे कायमचे नाहीसे करावे असे अकबराला वाटत असे. त्यासाठी हिंदुस्थानातल्या सर्व लोकांना मान्य होईल; सर्वांना सारखीच प्रतिष्ठा मिळवून देईल, असा आणि आपल्या स्वतःच्या धार्मिक भावनांना पोषक अशा एखाद्या धर्मसंप्रदायाच्या शोधात अकबर होता. त्यासाठी हिंदु, जैन, झोरोष्ट्री, ख्रिस्ती आणि ईस्लाम या सर्व धर्मांचा अभ्यास करून त्यांची शिकवण व चालीरीती या संबंधीची माहिती करून घेऊन या निरनिराळ्या धर्मांनुसार वागणाऱ्या लोकांवर त्यांचा काय परिणाम होतो त्याची सुक्ष्म पाहणी त्याने केली. अनेक वैयक्तिक कष्ट सहन करून ७ वर्षांपर्यन्त अगदी एकाग्र चित्ताने अकबराने या विषयी चिन्तन केले. त्यावरून त्याला असे आढळून आले की, प्रत्येक धर्मात सत्याचा काही अंश आहे आणि त्या धर्माला अनुसरून वागणारे पापभीरू लोक त्या

धर्मात असतात, पण प्रत्येक धर्मात अकबराला स्वत:ला न रुचणाऱ्या, न पट–णाऱ्या चालीरीती आणि कुठल्यातरी एका महान तत्त्वाचा अभाव आढळला. यामुळे उपरनिर्दिष्ट कोणत्याच धर्माचा संपूर्ण पगडा त्याच्यावर बसला नाही आणि त्यामुळे त्यातल्या एकाही धर्माला राजधर्म किंवा राष्ट्रधर्म असे उच्च-पद देणे त्याला योग्य वाटेना. एक हिंदु धर्म सोडल्यास आपापल्या धर्मातील उणीवा ध्यानात न घेता, आपल्या धर्माखेरीज इतर सर्व धर्म टाकाऊ आहेत अशी सर्व धर्मांची पक्की समजूत होती हे पण त्याला दिसत होते. या भिन्न भिन्न धर्मातल्या चालीरीती इतक्या परस्पर विरुद्ध होत्या की त्यामुळे त्यांच्या-मध्ये संघर्ष होणे अपरिहार्य होते. हा महत्त्वाचा पण गुंतागुंतीचा प्रश्न योग्य रीतीने सुटल्याखेरीज राष्ट्राची एकी आणि प्रगती होणार नाही, असे अकबराला अनेक वर्षांपासून वाटत होते.

## दिन-ए–इलाहिच्या शोधात

प्रचलित धर्मातली सर्व उत्तमोत्तम तत्त्वे एकत्र करून त्या धर्मातले दोष बाजूला काढावे आणि नंतर या उत्तमोत्तम तत्त्वांच्या आधारे एक नवा धर्म प्रस्थापित करावा असे अकबराला वाटू लागले. असे केल्याने जातीजातींतील संघर्ष नाहीसे होऊन, देशात एकी प्रस्थापित होऊन राष्ट्राच्या प्रगतीची वाट मोकळी होईल असा त्याचा विचार असावा. पण हा नवा धर्म लोक कसा मान्य करणार हा खरा प्रश्न होता. लोकांवर हा धर्म जबरदस्तीने लादण्यास अकबराची बिलकूल तयारी नव्हती. १५७९ साली महझरच्या बाबतीत केल्याप्रमाणे लोकांना आपल्या विश्वासात घेऊन त्या गोष्टीचा विचार करावा असे त्याने ठरवले. यासाठी १५८२ च्या मार्च महिन्यात आपले सरदार व अधिकारी, निरनिराळ्या पंथांचे धर्मगुरु आणि उलेमा या सर्वांना अनेक दिवस आपल्या समक्ष एकत्र बोलावून, सर्व देशाला एकच धर्म असावा की नाही आणि प्रचलित धर्मांपैकी कोणता धर्म राष्ट्रधर्म होण्यास योग्य आहे याबद्दल चर्चा सुरू केली. या मंडळींच्या सभा रात्री भरत असत. अकबराच्या दरबारात आलेल्या पहिल्या जेजुइट शिष्ट मंडळाचा इतिहास लिहिणारा मॉनसेराट याने या चर्चेचा अहवाल लिहून ठेवला आहे. यावरून आपल्या दरबारातले वरिष्ठ अधिकारी आणि उलेमा यांची संमती मिळवावी हा अकबराचा उद्देश उघड दिसून येतो. निरनिराळ्या धर्मां-तील लोकांनाच आपापल्या धर्मातील दोष दाखविण्यास प्रवृत्त करून नंतर आपल्या नव्या धर्माची कल्पना पसंतीसाठी सभेपुढे मांडावी असा त्याचा बेत

होता. हा नवा धर्म मान्य करून घेण्यासाठी अकबराने किती कसून प्रयत्न केला हे मॉनसेराटच्या 'कॉमेन्टेरिअस' या ग्रंथावरून दिसून येते. 'ईश्वराप्रत' नेणारा खरा धर्म कोणत्या लोकांत रुढ आहे याचा अकबर सतत विचार करीत असे. याचा सोक्षमोक्ष करून घेण्यासाठी त्याने खालील युक्ती योजली. एक दिवस रात्री त्याने सर्व सरदार मंडळी, हिंदु आणि मुसलमानांचे धर्मगुरु आणि ख्रिस्ती पाद्री यांना खास महालात बोलावून घेतले. सर्व सरदारांना त्यांच्या हुद्याप्रमाणे उभे करून आणि सर्व धर्मगुरूंना आपल्यासमोर आपापल्या जागी त्यांच्या इतमामाप्रमाणे बसवून त्यांना अनेक मुद्यांवर बादशहाने निरनिराळे प्रश्न विचारले. सर्व चर्चा संपल्यावर सर्वांना उद्देशून बादशहाने छोटेसे भाषण केले. तो म्हणाला, " निरनिराळ्या धर्मांच्या निरनिराळ्या चालीरीती आणि भिन्न भिन्न मार्ग आहेत. कारण हिंदु, मुसलमान, पार्शी, यहूदी आणि ख्रिस्ती या सर्व धर्मांच्या शिकवणुकीत फरक आहे. आपला धर्म इतर सर्व धर्मांपेक्षा चांगला आहे असे या निरनिराळ्या धर्मांचे लोक मानतात. इतकेच नव्हे, तर इतर धर्मातल्या लोकांना आपल्या धर्मात ओढून घेण्याची खटपट करतात. धर्मांतर करण्यास तयार नसलेल्यांबद्दल त्यांना तिरस्कार वाटतो आणि अशा लोकांना ते आपला शत्रू समजतात. या त्यांच्या वागण्यामुळे माझ्या मनांत अनेक शंकाकुशंका आणि काळजी निर्माण झाली आहे. एका ठराविक दिवशी सर्व पंडितांनी आपले धर्मग्रंथ एके ठिकाणी आणावेत आणि त्यांवरील चर्चा मला ऐकू द्यावी. असे केल्याने सर्वांत चांगला आणि प्रभावी धर्म कोणता हे प्रत्येकाला ठरवता येईल.

दुसऱ्या दिवशी रात्री सर्व लोक धर्मसभत एकत्र जमल्यावर अकबर ख्रिस्ती धर्मगुरूंना म्हणाला, " काल मी केलेल्या सूचनांचा आपण आज विचार करावा आणि त्याला तुमच्यापासून सुरुवात व्हावी असे मला वाटते. आपण दाखवलेला मार्ग मी स्वीकारावा अशी वेळोवेळीं तुम्ही केलेली विनंती मी मान्य करावी अशी ईश्वरी प्रेरणा मला झाली आहे आणि याबद्दलचे खात्रीलायक आश्वासन मी आपल्याला देतो." हे बोलत असताना अकबराचे थोरले दोन मुलगे त्याच्याजवळ बसले होते आणि इतर दरबारी मंडळी त्याच्या भोवती उभी होती, असे मॉनसेराट म्हणतो. यानंतरच्या चर्चेचा परिणाम अकबराला वाटत होता तसाच झाला. चर्चेमध्ये प्रत्येकाने इतर धर्मातले दोष दाखवून दिले आणि त्यामुळे कुठलाच धर्म राष्ट्रीय धर्म म्हणून स्वीकारण्याच्या लायकीचा नाही हे सिद्ध झाले.

**दिन–ए–इलाहिची घोषणा**

आपले विचार उघड करून सांगण्यास अकबराला आता पूर्ण मोकळीक मिळाली आणि यानंतर काही दिवसांनी आपल्या दरबारातली मंडळी आणि उलेमा यांना उद्देशून तो म्हणाला, " एकछत्री राज्यातील लोकांमध्ये भेदभाव आणि भांडणे असावीत हे योग्य नाही. एकाच मुघल साम्राज्यात एकमेकांशी आणि एकमेकांविरुद्ध विसंगत असणारे निरनिराळे धार्मिक कायदे असणे योग्य नाही. अशामुळे जितके धर्म तितके गट साम्राज्यात पडले आहेत."

" यासाठी या निरनिराळ्या सर्वांना एका धर्मछत्राखाली आणण्याची आवश्यकता आहे. पण हा नवा धर्म एक असूनहि सर्वांचा असला पाहिजे. सर्व धर्मांतील उत्तमोत्तम तत्त्वे एकत्र केल्यास या नव्या धर्माला ते शक्य होईल. असे केल्याने ईश्वराबद्दलचा मान आणि आदर कायम राखून लोकांमध्ये शांती आणि साम्राज्याची सुरक्षा निश्चित केल्यासारखे होईल."

" आता येथे जमलेल्या सर्व मंडळींनी या बाबतीतले आपले मत विचारपूर्वक पुढे मांडावे. तसे केल्याशिवाय मी येथून हलणार नाही."

" बादशहाचे हे भाषण ऐकल्यावर जमलेली सर्व मंडळी आणि विशेषत: बादशहा हाच ईश्वर मानून त्याचा शब्द हाच कायदा असे मानणारी मंडळी म्हणाली, " आपल्या प्रखर बुद्धिमत्तेने आणि सार्वभौमत्वाने ईश्वराचा जणु प्रेषितच ठरलेल्या बादशहाने एक देव व त्यानुसार आचरण्याचे निरनिराळे विधी याग, नियम, समारंभ व इतर सर्व गोष्टी आपल्या साम्राज्यासाठी नेमून द्याव्यात हे योग्यच आहे. असे केल्याने सर्व लोकांच्यासाठी एक सर्वोत्कृष्ट धर्म निर्माण होईल."

अशा तऱ्हेने धर्मसभेचे काम संपवून बादशहाने तेथल्या एका वृद्ध धर्मगुरुला (शेख) " सर्व राज्यासाठी दरबारातून एक नवा धर्म प्रसृत करण्यात येईल आणि तो सर्वांनी उत्तम समजून आदराने मान्य करावा " ० अशी ग्वाही सर्व साम्राज्यात देण्यास सांगितले. सभेत जमलेल्या लोकांपैकी एकानेच म्हणजे अंबरचा राजा भगवन्तदास याने या सूचनेस विरोध केला. तो म्हणाला, ' हिंदु आणि मुसलमान या दोघांचेही धर्म वाईट आहेत, हे जरी कबूल केले, तरी हा नवा धर्म काय आहे हे मला समजावून सांगा म्हणज मला त्यावर विश्वास

---

० Bartoli, p.p.75–77. V. A. Smith–Akbar the Great Mogul p. p. 211–212.

ठेवणे शक्य होईल.' हे ऐकून राजा थोडा वेळ विचारात पडला आणि भगवन्त–दासने नवा धर्म स्वीकारण्याचा आग्रह त्याने सोडून दिला" असे बदायुनी म्हणतो. ० 'भगवन्तदासचा विरोध हा फक्त त्याच्या पुरताच मर्यादित होता' असे वुल्स्ले हेग, व्हिन्सेंट स्मिथ आणि इतर आधुनिक इतिहासकार मानतात ते बरोबर आहे असे वाटत नाही. हा विरोध सर्व रजपूत सरदारांचा आणि हिंदु समाजाचा होता. कारण एका बिरबलाशिवाय दुसरा कोणताही नाव घेण्यासारखा हिंदु या धर्मात सामील करून घेण्यात अकबराला यश आले नाही. हिंदूंचा अचानक विरोध लक्षात घेऊन दिन–ए–इलाहिचा प्रचार व अंमल सर्व राज्यात सुरू करण्याचे अकबराने टाळले असावे असे वाटते.

यामुळे अकबराला बादशहा आणि धर्मगुरू असे मानणाऱ्या लोकांपुरताच हा धर्म सुरुवातीपासून शेवटपर्यन्त मर्यादित राहिला. ० दिन–ए-इलाहिचा प्रचार अजिबात बंद झाला नाही तरी त्याची सक्तीने अंमलबजावणी करणे अकबराने टाळले, यात त्याचा शहाणपणा दिसून येतो. या बाबतीतले अबुल फझलचे मौन लक्षात घेता अकबराचा मूळचा बेत सफल झाला नाही असे दिसून येते.

---

० मुनतखान–उत्–तवारीख, भाग २, पान ३१३, ११ डिसेंबर १५८७ रोजी आपला विरोध प्रदर्शित करताना मानसिंग म्हणाला, "नवीन धर्माचे अनुयायित्व म्हणजे स्वतःचा जीव देण्याची तयारी असा अर्थ असल्यास मी जन्मभर हातावर शीर घेऊनच वागलो आहे. यासाठी आणखी नव्या पुराव्याची काय गरज आहे ? पण याचा अर्थ एखाद्या नव्या धर्माचा स्वीकार करणे असा असल्यास मी हिंदु आहे हे मला स्पष्ट केले पाहिजे. तुमची आज्ञा झाल्यास इस्लामी धर्म स्वीकारण्याचीही माझी तयारी आहे, पण या दोन धर्मांखेरीज एखादा धर्म अस्तित्वात आहे हे मानण्यास माझी तयारी नाही."

० डॉ. आर. पी. त्रीपाठी (Rise and fall of the mughal empire vol.1; p. 286) म्हणतात की, अकबराच्या काही चाहत्यांनी आपला एक स्वतंत्र संघ स्थापन करून अकबराला आपला गुरु मानण्यास सुरुवात केली, जणू काही अकबराचे या बाबतीतले धोरण तटस्थपणाचे होते. मॉनसेराटने प्रत्यक्ष पाहून लिहिलेल्या खऱ्या गोष्टींवर ते विश्वास ठेवत नाहीत. डॉ. एम्. एल्. रॉय, चौधरी (दिन–ए-इलाहि, पान २७६) हे पण मॉनसेराटचा पुरावा दूषित म्हणून बाजूला काढतात.

## दीक्षा–समारंभ

या नव्या धर्माची दीक्षा देण्यासंबंधी अबुल फझल असे लिहितो की, दीक्षा देण्यापूर्वी अकबर प्रत्येक माणसाचा उपजत भलेपणा आणि नव्या धर्माबद्दलची कळकळ याची पूर्ण खात्री करून घेत असे. 'स्वत:ची खात्री झाल्याशिवाय धर्मासंबधी इतर लोकांना मी मार्गदर्शन कसे करावे?' पण एखाद्या माणसाची विशेष आस्था दिसून आल्यास अकबर त्याला या नव्या धर्माची दीक्षा देत असे. हा दीक्षा-समारंभ नेहमी रविवारी होत असे. आठवडयाच्या इतर दिवसांपेक्षा रविवारी सूर्य जास्तीत जास्त तेजाने तळपतो असा समज असल्याने अकबर रविवार हा फार शुभ दिवस मानत असे. दीक्षा-समारंभ खालील पद्धतीने होत असे.—

या नव्या धर्माचा मुख्य धर्म-गुरु अबुल फझल होता. त्याच्याकडे जाऊन प्रथम नव्या धर्माची दीक्षा घेणारा साधक स्वत:च्या निर्मळ वर्तणुकीची आणि शुद्ध हेतूची खात्री करून देई. यानंतर अबुल फझल त्याची व अकबराची गाठ घालून देई. या भेटीमध्ये 'मी माझ्या गर्व, लोभ इत्यादी सर्व दुष्ट प्रवृत्तींवर ताबा मिळविला आहे असे सांगून दीक्षा घेणारा माणूस डोक्यावरचा फेटा हातात घेऊन अकबराच्या पाया पडत असे. नंतर हात पसरून त्याला आपल्या हाताने उठवून अकबर त्याचे शिरस्त्राण पुन: त्याच्या डोक्यावर ठेवत असे. नंतर बादशहा या माणसाला अंगठीसारखी एक वाटोळी सोन्याची वस्तू ( शास्त ) देत असे. त्यावर ईश्वराचे नाव आणि बादशहाची 'अल्ला हो अकबर' ही मुद्रा कोरलेली असे. पवित्र शास्त आणि पवित्र दृष्टी यांची कधी फारकत होत नाही हे दाखविण्याचा यात हेतू होता, असे अबुल फझलने म्हटले आहे. धर्मात दाखल झालेली प्रत्येक व्यक्ती, रेशमात गुंडाळलेली आणि रत्नात मढविलेली अकबराची सोन्याची प्रतिमा आपल्या फेटयावर धारण करत असे.०

## दिन–ए–इलाहिची मूलतत्त्वे:

दिन-ए-इलाहि याचे सरकारी नाव तौहिद-ए-इलाहि किंवा एकेश्वरी वाद असे होते. एकाच परमेश्वरावर विश्वास हे त्याचे मुख्य तत्त्व होते. सुलाह–इ–

---

० ऐन–इ–अकबरी, भाग १ ( २ री आवृत्ती ), पान १७४–१७५; मुनताखाब–उत्–तवारीख. भाग २, पान ३३८,३५६.

बिकानेरचा माहाराजा गंगासिंग स्वत:च्या पागोटयावर ६ व्या जॉर्ज राजाचे लहानसे चित्र लावून ठेवी ते प्रस्तुत लेखकाने पाहिलेले आहे.

कुल म्हणजे सर्वत्र शांती आणि समभाव हे या धर्माचे ब्रीदवाक्य होते. मंदीर, मशीद किंवा दुसरी एखादी प्रार्थनेची जागा, तसेच एखादा विशिष्ट धर्मग्रंथ यात नव्हता. धर्मातल्या प्रत्येक माणसाला सकाळी, दुपारी आणि संध्याकाळी प्रार्थना करावी लागे. मुसलमानी धर्मतील नमाजाच्या पद्धतीची आखून दिलेली प्रार्थना यात बहुधा नसावी. या धर्माचा मुख्य आधार आणि प्रेषित अकबर होता. या धर्माचा हा मुख्य पुढारी असून एक परिपूर्ण पुरुष (इन्सान-इ-कामील) अशा दृष्टीने इतर लोक त्याच्याकडे पाहत असत व त्याचे अनुकरण करीत असत.

या धर्मातील लोकांनी दहा गोष्टींचे व्रत पाळावयाचे असे. (१) औदार्य आणि परोपकारी वृत्ती (२) वाईट कृत्य करणाऱ्याबद्दल क्षमाशीलता आणि रागाचा प्रतिकार सौजन्याने करणे (३) ऐहिक वासनापासून निवृत्ती (४) संसारातील बंधने तोडून परलोकासाठी शिदोरी गोळा करणे (५) स्वतःच्या कृत्याचा काय परिणाम होईल याबद्दल सतत विचार (६) चांगली आणि श्रेष्ठ कृत्ये करण्याची इच्छा (७) हलक्या अवाजात केलेले सौम्य आणि मधुर भाषण (८) स्वतःच्या आवडी निवडी बाजूला ठेवून इतर धर्मबांधवांच्या इच्छांना मान देणे (९) सर्व प्राणिमात्रांपासून अलग होऊन एकाच परमेश्वराच्या ठायी रत होणे. (१०)आत्म्यामध्ये परमेश्वर प्रीती निर्माण करून शेवटी त्याच्याशी एकरूप होणे.

## दिन-ए-इलाहिची विधि संहिता:

या धर्मातील लोकांची एकमेकांना नमस्कार करण्याची एक विशिष्ट पद्धत होती. सलाम–ए–अलाईक आणि वलाईकुम–इ–सलाम हे शब्द भेटीत न वापरता अल्ला–हो–अकबर किंवा जाल–ए–जलालु हे शब्द या धर्मातले लोक वापरत असत. " परमेश्वराची आठवण सतत जागृत राहण्यास आणि आपण कोठून आलो याची जाणीव करुन देण्यास याचा उपयोग होतो, असा समज होता." माणूस मेल्यानंतर त्याच्या स्मरणार्थ मोठा खाना देण्याऐवजी जीवंत असतांनाच प्रत्येकाने मोठी मेजवानी देऊन आपल्या आखेरच्या प्रवासाची वेगमी करून ठेवावी, अशी पद्धत होती. वाढदिवसाला मोठी मेजवानी देऊन दानधर्म करावा, मांसाहार शक्यतोवर टाळून, जन्म झालेल्या महिन्यात तो मुळीच करू नये. वयात न आलेल्या मुलींशी किंवा वांझ, म्हाताऱ्या वा गरोदर बायांशी संबंध ठेवू नये. असे विधी या धर्मातील लोकांसाठी होते.

## अनुयायी मिळविण्यात सक्तीचा अभाव

या धर्मातल्या मंडळींचे दोन प्रकार असत. १८, १९ माणसांचा पहिला गट असून त्यात बिरबल हा एकच हिंदु होता. त्यांची स्वामिनिष्ठा इतकी प्रखर होती की बादशहासाठी स्वतःची मालमत्ता, जीव, धर्म आणि अब्रू या सर्वांचा त्याग करण्यास त्यांची तयारी होती. बादशहासाठी स्वामीनिष्ठा दाखवण्याचे हे चार प्रकार दिन–ए–इलाहिच्या पूर्वीपासूनच जाहीर झाले होते. पण या गटातील सर्व लोकांना ते लागू होते. दुसऱ्या गटातल्या लोकांची संख्या खूप मोठी असून दर रविवारी १०–१०/१२–१२ लोकांना याची दीक्षा देण्यात येत असे. धर्मगुरु म्हणून स्वतःवर पडणाऱ्या जबाबदारीची अकबराला पूर्ण, जाणीव होती. आपल्या शिष्याला वैयक्तिक नोकराप्रमाणे न वागवता परमे–श्वराच्या सेवेची दिशा दाखवून देणे हे गुरूचे काम आहे, असे तो म्हणत असे. तो सांगे, " प्रत्येक व्यक्तीच्या आत्म्याची परिस्थिती समजावून घेऊन ती सुधारण्याचा प्रयत्न करणे हे धर्मगुरूचे खरे काम आहे. एखाद्या हबशासारखे केस वाढवून, जीर्ण वस्त्रे नेसून किंवा प्रवचने करून हे काम होण्यासारखे नाही." या नव्या धर्माचे अनुयायी मिळवण्यात अकबराने सक्तीचा वापर कधीच केला नाही. तसे केले असते तर त्याला हवे तेवढे अनुयायी मिळाले असते, हे त्याचा टीकाकार बदायुनी सुद्धा कबूल करतो. नव्या धर्माला विरोध केल्याबद्दल भगवन्तदास किंवा मानसिंग यांना त्याने कुठलीच शिक्षा केली नाही. उलटपक्षी हे सरदार अकबराच्या विश्वासास अधिकाधिक पात्र ठरून राज्यात एकापेक्षा एक उच्च पदाला चढले.

## दिन–ए–इलाहिचे स्वरूप

दिन–ए–इलाहिच्या स्वरुपाबद्दल अनेक मतभेद आहेत. त्याकाळाचे व आधुनिक युरोपिय लेखक त्याला 'धर्म' अशी संज्ञा देतात. इतिहासकार बदायुनीचे तसेच मत आहे. दरबारचा इतिहासकार अबुल फझल याने या बाबतीत मौन धारण केलेले दिसते. दिन–ए– इलाहि हा धर्म नसून त्यासाठी एक नवी धर्मसंस्था उभारण्याचा पण अकबराचा विचार नव्हता असे बहुतेक सर्व आधुनिक हिंदी लेखक मानतात. या बाबतीत अकबराचा मूळ हेतू काय होता आणि तो सफल झाला असता तर त्याने काय केले असते या विषयी अनुमान करणे फार कठीण आहे. हिंदु, मुसलमान किंवा खिस्ती धर्मातल्या साधुपुरुषांपेक्षा स्वतःमध्ये अधिक दैवी सामर्थ्य आहे, असे अकबराला वाटत असावे. स्वतःला धर्मगुरू मानून लोकांची दुखणी बरी करणे आणि आपल्यास–

मोर विनीत होऊन लोकांनी केलेल्या प्रार्थना ही कामे त्याने अंगावर घेतली. आपण परमेश्वराचे जणु काही प्रेषितच आहोत असा पवित्रा त्याने घेतला. दिन–ए–इलाहि हा सर्व राष्ट्राचा एकमेव धर्म व्हावा अशी त्याची प्रथमपासून इच्छा होती. पण राजकीय, सामाजिक आणि धार्मिक बाबतीत एकाच तऱ्हेचे विचार करणाऱ्या मंडळींचा एक गट निर्माण करण्यापलिकडे त्याने काही साधले नाही. या धर्माची दीक्षा घेऊन त्याचा प्रचार करणारे लोक नव्हते. प्रार्थनेसाठी नक्की केलेल्या जागा किंवा मंदिरे नव्हती. धर्माचा मुख्य ग्रंथ किंवा प्रार्थनेचे मंत्रही नव्हते, अकबराला राजकीय किंवा धार्मिक बाबतीत पुढारी मानणाऱ्या आणि सर्व धर्मपंथात सत्याचा काही भाग आहे असे मानणाऱ्या हिंदुस्थानातल्या उदारमतवादी लोकांना एकत्र आणण्याचा यात हेतू होता. या धर्मामुळे राजकीय परिस्थितीवर काही परिणाम झाल्याचे दिसत नाही; कारण हा धर्म मानणाऱ्या लोकांची संख्या थोड्या हजारावर गेली नाही आणि एक बिरबल वगळला तर त्यातले सारे लोक मुसलमान होते. प्रमुख हिंदूंना या धर्मात दाखल करून घ्यावे असे अकबराला फार वाटे. आणि या धर्मात येऊ पाहाणाऱ्या मुसलमान लोकांबद्दल त्याला फारशी आस्था नव्हती, असे बदायुनी म्हणतो. अकबराची ही इच्छा कधीच सफल झाली नाही; कारण भगवन्तदास, मानसिग आणि तोडरमल यांच्यासारख्या हिंदुसरदा–रांनी या धर्मात येण्यास स्पष्ट नकार दिला. पण या धर्मामुळे बादशहाभोवती एक ईश्वरी वलय निर्माण केले जाऊन प्रखर स्वामिभक्तीची प्रेरणा लोकांमध्ये निर्माण झाली. अकबराच्या मृत्यूनंतर हा पंथ जरी मोडला नाही तरी जवळ–जवळ नामशेष झाला. अकबराप्रमाणेच जहांगीरने पण काही लोकांना दीक्षा देऊन शास्त आणि आपली प्रतिमा दिल्याचा दाखला आढळतो. पण मूळ पंथा–तला ध्येयवाद जहांगीरच्या काळात संपूर्णपणे नाहीसा झालेला आणि सर्व समारंभाला केवळ औपचारिक स्वरूप आलेले दिसते.

## अकबराने इस्लामी धर्माचा छळ केला काय?

अकबराच्या धर्मसहिष्णुतेचाच (सुलाह्-इ-कुल) दिन–ए–इलाहि मध्येच पुनरुच्चार आढळतो. तरीसुद्धा अब्दुल कादीर बदायुनी, जेजुइट मिशनरी लोक, व्हिन्सेंट स्मिथ आणि वुलस्ले हेग यांच्यासारखे युरोपीय इतिहासकार यांनी 'अकबराचा इस्लामी धर्मावर रोष असून त्याने त्याचा छळ केला,' असे म्हटले आहे. आपल्या म्हणण्याच्या समर्थनार्थ बदायुनीने अनेक उदाहरणांची यादी दाखल केली आहे. त्यांचा सारांश खालीलप्रमाणे—

१) अकबराने इस्लामी प्रार्थनेला बंदी केली.
२) प्रार्थनेच्या वेळेस रेशमी वस्त्रे व अलंकार घालण्याची सक्ती केली.
३) सार्वजनिक प्रार्थनांना बंदी घालून प्रार्थनेसाठी लोकांना सभागृहात बोलावण्याची पद्धत बंद केली.
४) रमझानसारख्या इस्लामी उपवासास बंदी केली.
५) हेदजाजचा यात्रेला जाण्याविषयी नापसंती दर्शवली.
६) मुसलमानी समारंभ बंद केले.
७) स्वतःला किंवा आपल्या मुलांना अहंमद किंवा महंमद ही नावे ठेवण्यास बंदी केली.
८) मशिदींचे तबेले करून ते हिंदू चौकीदारांकडे दिले.
९) मशिदींच्या मालमत्तेची अकबराने लूट केली.
१०) दाढी काढण्यास परवानगी दिली.
११) डुकराचे आणि वाघाचे मांस खाण्यास परवानगी दिली.
१२) लोकांना प्रार्थनेस बोलावण्यासाठी बांधलेले मनोरे तोडून टाकले.
१३) मोडकळीस आलेल्या मशिदींची दुरुस्ती केली नाही.
१४) गाई आणि इतर जनावरे मारण्यास बंदी असलेल्या दिवशी गोवध किंवा इतर प्राणिहत्या करणाऱ्यांना देहान्ताची सजा दिली.
१५) इस्लामी धर्माचे आदेश रद्द ठरवले.

हिंदुस्थानातल्या आधुनिक काळातल्या अनेक विद्वानांनी या आरोपांची यावेळचे पुरावे पाहून कसून चौकशी केली आहे आणि ते सर्व अज्ञान किंवा द्वेष बुद्धीवर आधारित आणि बिन बुडाचे आहेत, असे आपले मत दिले आहे. वरील आरोपांपैकी १ ल्या व दुसऱ्यातली विसंगती उघड आहे. इ. स. १५८० नंतर इस्लामी धर्माप्रमाणे दिवसातून ५ वेळा प्रार्थना करण्याचे अकबराने सोडून दिले, हे जरी खरे असले तरी ही त्याची वैयक्तिक बाब होती. आणि याबाबतीत त्याने कुणावरही सक्तीने बंदी घातली नाही. तसेच मुसलमानी धर्मानुसार प्रार्थना केल्याबद्दल त्याने कोणाला शिक्षा केल्याचाही दाखला नाही. मीर फते उल्ला शिराझी, शेख अरिफ हुसेन, मुसा, अबुल घोष आणि दरबारातले इतर अनेक मुसलमान रोज इस्लामी धर्माप्रमाणे प्रार्थना करीत असत असे बदायुनीनेच म्हटल्याचे प्रो. शर्मा यांनी दाखवून दिले आहे. प्रार्थनेच्या

वेळी रेशमी कपडे घालण्याची किंवा रमझानचा उपास न पाळण्याचा आदेश दिल्याचा दाखला पण कुठे आढळत नाही. या सर्व बाबतीत अकबराविषयी हेतुपुरस्पर गैरसमज केलेला आढळून येतो किंवा त्याचे धोरण टीकाकारांना समजले नाही असे म्हणावे लागते. महंमद किंवा अहंमद ही नावे ठेवण्यास त्याची हरकत होती हे खरे, पण त्याचा अर्थ या नावांबद्दल त्याला तिरस्कार होता असा नसून महंमद पैगंबर किंवा तत्सम मोठ्या व्यक्तींची नावे इतरेजनांनी धारण करावी हे त्याला मान्य नव्हते. याविषयी तो म्हणतो, "थोर व्यक्तींची नावे लोक आपल्या मुलांना देतात यात चांगला शकुन व्हावा असा भाव बराच असला तरी त्यामुळे या मोठ्या व्यक्तींचा अनादरच होतो. सर्वांत मोठी लक्षात घेण्यासारखी गोष्ट म्हणजे पुनर्जन्मावर विश्वास नसलेल्या इस्लामी धर्मगुरुंत ही पद्धत प्रामुख्याने दिसून येते" दुसऱ्या एका ठिकाणी तो म्हणतो, "डुक्कर घाणेरडे जनावर असल्यामुळे त्याचे मांस खाण्यास बंदी केली असे मानले, तर वाघ आणि सिंह यांचे मांस खाण्यास तशी बंदी नसावी." खरी गोष्ट अशी आहे की याबाबतीत अकबराने आपली मतेच केवळ प्रदर्शित केली, पण त्याने डुकराचे मांस खावे असा हुकूम काढला किंवा महंमद व अहंमद ही नावे ठेवण्यास बंदी केली असे बदायुनीप्रमाणे म्हणणे म्हणजे सत्याचा विपर्यास करणे आहे. बदायुनीच्या सर्व आरोपांची शहानिशा करणे व्यर्थ आहे. त्यांचा खोटेपणा पुष्कळ लेखकांनी दाखवून दिला आहे. सर्व साधकबाधक प्रमाणांचा कसून अभ्यास केल्यावर प्रस्तुत लेखकाचे असे ठाम मत झाले आहे की, इतर धर्मांप्रमाणेच मुसलमानी धर्माबद्दल अकबराचे धोरण सहिष्णुतेचे होते. इस्लाम हा एक नामशेष झालेला धर्म नसून अकबराच्या काळात हिंदुस्थानात सगळीकडे त्याने आपले पाय रोवले होते. या बाबतीत जेजुइट लोकांचे लिखाणही अतिरंजित असून खरे मानण्यासारखे नाही.

वरील सर्व विवेचन खरे असल्यास बदायुनी आणि त्याच्यासारखी इतर मंडळी, अकबराने इस्लामी धर्माचा छळ केला, असे का म्हणतात हा प्रश्न शिल्लक राहतो. इस्लामी धर्माला राष्ट्र धर्माच्या उच्च आणि आजपर्यंतच्या सर्वश्रेष्ठ पदावरून खाली ओढून त्याला इतर धर्मांच्या पंक्तीला आणून बसविणे यात इस्लामी धर्मावर आणि त्याच्या अनुयायांवर फार मोठा अन्याय झाला असे बदायुनी सारख्या धर्मांध मुल्लाला वाटणे साहजिक आहे. त्याच्या मते सर्व चांगल्या गोष्टी इस्लामी धर्मात असून बाकी सर्व धर्म वाईट होते. भारतीय समाजात सुधारणा करून त्यात हिंदु, जैन आणि पारशी धर्मांतील उत्तम उत्तम तत्त्वे दाखल करण्याचा प्रयत्न अकबराने केला, यात इस्लामी

धर्माचा फार मोठा अपमान झाल्यासारखे बदायुनीला वाटले. आपल्या प्रसिद्ध पुस्तकात बदायुनीने जे लिहून ठेवले आहे ते त्याच्या सदसद्विवेक बुद्धीने कदाचित् बरोबर असेल, पण म्हणून ते खरे आहे असे मानण्याची काही जरुरी नाही. किबहुना बदायुनीचा आरोप सर्वस्वी चुकीचा आहे असेच म्हणावे लागते. हिंदुस्थान हा मुख्यतः हिंदूंचा देश आहे, हिंदु धर्म हा इस्लामी धर्माइतकाच चांगला आहे आणि या देशातले कुठलेही राज्य सुस्थिर, निःपक्षपाती आणि न्यायावर आधारलेले होण्यास त्यात येथील लोकांच्या धर्मभावनेचे प्रतिबिंब दिसले पाहिजे, हा विचार बदायुनिला पटणे अगदी अशक्य होते.+ सर्व धर्म समभावानेविषयी अकबराचे सुंदर विचार त्याच्या सांगण्यावरून काश्मीरावरील एका मंदीरवर कोरण्यासाठी अबुल फझलने लिहून दिलेल्या खालील उताऱ्यात सापडतात.

" हे परमेश्वरा, अनेक भाषांतून तुझी महती गाणारे, आणि अनेक मंदिरातून तुला शोधणारे लोक मी पाहातो. एकच ईश्वर आहे असे मानणारे मुसलमान आणि अनेक देवांची भक्ती करणारे लोक तुझ्याच शोधात असल्याचे दिसतात. तू एकमेव व अन्यनसाधारण आहेस असे सर्व धर्म म्हणतात. मशिदीतले लोक प्रार्थना म्हणतात. आणि ख्रिस्ती देवळातले लोक घंटानाद करून तुझ्याबद्दल प्रेम व्यक्त करतात. ख्रिस्ती आणि हिंदु देवळात आणि मशिदीत मी कधी कधी जातो, पण सर्व ठिकाणी मी तुलाच शोधत असतो. नुसत्या जुन्या धर्मनीतीचा आणि चालीरीतींचा अभिमान शहाणे लोक धरीत नाहीत, कारण तुझ्या खऱ्या इस्लामी पडद्यामागे ते दिसत नाहीत. पाखंडाला पाखंडमत आणि सनातन्याला त्याचा धर्म लखलाभ असो. पण गुलाबकळीच्या पानाचा सुगंध अत्तर विकणाऱ्याच्या हृदयात साठवलेला असतो."

## बाजारभावाचे नियंत्रण

अशा धार्मिक बाबतीत गढून गेला असला तरी अकबराचे राज्यकारभार सुधारण्याच्या बाबतीत कधीच दुर्लक्ष झाले नाही. किबहुना धार्मिक आणि राजकीय सुधारणा हातात हात घालूनच होत होत्या. मालाच्या खरेदी-विक्रीत

---

+ आधुनिक वाचकांना बहुतेक सर्व हिंदू पंतप्रधान जवाहरलाल नेहरूंना मुसलमानधार्जिणे मानतात हे ठाऊक आहे. त्यांना अकबराची सर्व धर्मसहिष्णुता आणि त्याला बदायुनी हिंदूंचा पक्षपाती का म्हणतो हे समजण्यास अडचण पडू नये.

अनेक अनिष्ट प्रकार होतात आणि त्यामुळे व्यापाऱ्यांचे नुकसान होते असे दिसून येताच मालाच्या किंमतीवर व एकंदर बाजारपेठेवर नियंत्रण घालण्यासाठी एक स्वतंत्र सरकारी यंत्रणा त्याने उभी केली. ( जुलै, ऑगस्ट १५८२ ) विशिष्ट मालाच्या किंमतीचे नियंत्रण करणारी निरनिराळी खाती उघडण्यात आली. मिर्झा खान हा किताब धारण करणाऱ्या अब्दूल रहीमकडे घोड्यांच्या व्यापारावर देखरेख करण्याचे काम आले, तोडरमलकडे हत्ती आणि कडधान्ये झैनखान कोकाकडे तेल, शहा कुली खान महरमकडे फळे आणि मेवामिठाई, सादिकखानकडे सोने व चांदी, ऐतिमखान गुजरातीकडे रत्ने, शहाबाझ खानकडे सोनेरी धाग्याचे कापड, मिर्झा युसफखानकडे उंट, शरीफखानकडे शेळ्या-मेंढ्या, गाझीखान बदक्षीकडे मीठ, मखसूस खानकडे हत्यारे, कासीम खानकडे सुवासिक तेले, हकीम अबुल फतेहकडे मद्य व तत्सम पदार्थ, ख्वाजा अबदुस समदकडे कातड्याचे जिन्नस, नौरंगखानकडे रंग, बिरबलकडे म्हशी व इतर जनावरे, शेख जमालकडे औषधे, नकीब खानकडे पुस्तके, लतीफ ख्वाजाकडे शिकारीचे प्राणी, हबीबुल्लाकडे साखर आणि अबुल फझलकडे लोकरी कापड अशी कामाची विभागणी करण्यात आली. माल विकणाऱ्याकडून एक टक्का आणि विकत घेणाऱ्याकडून अर्धा टक्का दलाली घेण्याची मुभा या लोकांना देण्यात आली. यातला निम्मा पैसा स्वत:कडे ठेऊन बाकीचा त्यांनी सरकारात जमा करावयाचा असे.

लग्नसमारंभावर छोटासा कर बसविण्यात आला. तो दोन्ही पक्षांना द्यावा लागत असे. हे काम बाकीखानकडे सोपवण्यात आले. आणि त्याला तुईबेगी म्हणजे विवाहाधिकारी हा किताब देण्यात आला. दोन्ही पक्षांकडून वसूल झालेल्या करातले ५ टक्के त्याला मिळत असत.

## अकबर बिरबलाच्या घरी भेटीस जातो.

जानेवारी १५८३ मध्ये बिरबलाच्या घरी भेटीस जाऊन अकबराने त्याचा सत्कार केला. बिरबलासाठी दगडी महाल उभारण्याची आज्ञा अकबराने दिली. तो पुरा झाल्यावर आपल्या आवडत्या सरदाराची फार दिवसांची इच्छा पुरी करण्यासाठी अकबराने तेथे जाऊन त्याचा पाहुणचार घेतला. या नव्या घराची वास्तु शांत त्याने केली असावी असे म्हटले तरी चालेल. बिरबलाने मोठ्या थाटाची मेजवानी देऊन अकबराचा पाहुणचार केला. जनानखान्याच्या इतक्या जवळ असणारी वास्तु एका राजकुटुंबाच्या बाहेरील व्यक्तीस कशी दिली, अशी शंका पुष्कळ अलिकडील विद्वान काढतात; पण बिरबलासाठी अकबराने दगडी

महाल बांधून घेतले असे अबुल फझल म्हणतो आणि जोधबाईच्या राजवाड्या-मागील दगडी इमारत फत्तेपूर सिक्रीत नाही. इ. स. १५८० मध्ये पोर्तुगीज धर्मगुरूंना बादशहाने राजमहालात ठेवून घेतले होते, असे मॉन्सेराट म्हणतो. यावरून बादशाही राजमहालाच्या वायव्येस फत्तेपूर सिक्रीमध्ये असलेला दोन घुमटांचा महाल हा बादशहाने राजा बिरबलासाठी बांधला यात शंका नाही.

**भगवन्तदासला पंजाबचा सुभेदार नेमण्यात येते**

याच सुमारास (जानेवारी १५८३) राजा भगवन्तदासला पंजाबची सुभेदारी देऊन तेथील फौजेचा सरसेनापती नेमण्यात आले. अकबराने अनेक मानचिन्हे भगवन्तदासला दिली आणि काबूलहून परत येताना लाहोरला त्याच्या घरी त्याने पाहुणचार घेतला होता.

**फते-उल्ला शिराझीचे दरबारात आगमन**

याच सुमारास इराणमधील प्रसिद्ध पंडित आणि वैज्ञानिक फते-उला शिराझी दरबारात येऊन दाखल झाला, आणि अकबराने त्याचे आनंदाने स्वागत केले. त्याची किर्ती यापूर्वीच बादशहाच्या कानावर आली होती आणि जुलै १५८२ मध्येच दक्षिणेतून दरबारात येण्यासाठी अकबराचे आमंत्रण त्याला गेले होते. पण यावेळी फते–उल्ला विजापूरच्या आदिलशहाच्या पदरी होता. आदिलशहाच्या मृत्यूनंतर गादीवर आलेल्या राजाकडे फते–उल्लाला फत्तेपूर सिक्रीला पाठवून देण्याची मागणी अकबराने केली. फते–उल्ला हा मोठा पंडीत असून हुशार वैज्ञानिक होता. अकबराने त्याची दानधर्माच्या खात्यावर सदर म्हणून नेमणूक केली. "ज्ञानसाधनेची सर्व जुनी पुस्तके नाहीशी झाली असती तरी फतेउल्लाने स्वतःच्या हिंमतीवर ज्ञानाचा पाया पुन्हा घालून नाहीशा झालेल्या पुस्तकांची उणीव भासू दिली नसती," असे अबुल फझल म्हणतो. अकबराचे शिष्यत्व पत्करून फते–उल्लाने दिन—ए—इलाहि पंथाची दीक्षा घेतली. "सर्व सृष्टीमध्ये एक तत्त्व बघणाऱ्या आणि त्या सृष्टीच्या विविधतेला शोभा देणाऱ्या या बहुढंगी राजाच्या नोकरीत मी जर आलो नसतो तर ईश्वराचे ज्ञान करून देणारा मार्ग मला कधीच सापडला नसता," असे फते उल्ला नेहमी म्हणत असे.

**अकबर एका सती जाणाऱ्या स्त्रीला वाचवतो**

१५८३ साली अकबराने एका हिंदु स्त्रीला नवऱ्याबरोबर सती जाण्या-पासून बचावले. ही स्त्री म्हणजे जयमलची विधवा पत्नी असून जोधपूरच्या राजा

मालदेवची नात होती. बंगालच्या स्वारीवर जात असताना चौसा येथे जयमल मृत्यू पावला आणि त्याचा मृत देह आग्ऱ्याला त्याच्या कुटुंबियांकडे आणण्यात आला. त्याची विधवा स्त्री – मोटा राजा उदेसिंगची मुलगी ही सती जाण्यास तयार नव्हती व तिचे इतर नातेवाईक आणि खास करून मुलगा उदयसिंग यांनी पूर्वापार प्रथेप्रमाणे सती जाऊन तिने आपल्या कुळाचे नाव राखावे असा आग्रह धरला. ही बातमी अकबराला पहाटेच्या वेळी जनानखान्यातून कळली. ती कळताच तो एकटाच, घोड्यावर स्वार होऊन ज्या ठिकाणी सती देण्याची तयारी चालली होती तेथे येऊन दाखल झाला. स्त्रियांना बळजबरीने मृत नवऱ्याच्या चित्तेवर ठेवून जाळणे, याला अकबराने आपल्या राजवटीच्या सुरुवातीसच बंदी घातली होती. या प्रसंगाची विधवा स्त्री ही कछवा घराण्यातली असून त्या घराण्याशी अकबराचे नाते होते. अर्थातच अकबराने या गोष्टीत जातीने लक्ष घातले. अंबरच्या राजा भारमलचा पुतण्या रूपसी याचा जयमल हा मुलगा होता. अशा तऱ्हेने भगवन्तदासशी त्याचे चुलत भावाचे नाते होते.या स्त्रीच्या बहिणीशीच पुढे जहांगीरचा विवाह झाला. अकबर एकाएकी घोड्यावर बसून नाहीसा झाला असे पाहून राजवाड्यात एकच गडबड उडाली. एखाद्या विशेष शिकारीची किंवा लढाईची बातमी आल्यामुळे तो असा एकटाच निघून गेला असावा असे लोकांना वाटले. त्याच्या खाजगी तैनातीतले काही लोक ताबडतोब घोड्यावर बसून तो होता तेथे येऊन पोहोचले. आपण अगदी ऐनवेळी येऊन दाखल झाल्यामुळे या विधवा स्त्रीचा जीव वाचला, हे अकबरास दिसून आले. तिच्या नातेवाईकांवर तो इतका रागावला की त्यांना फाशी द्यावी असे त्याला एकदा वाटले. पण तसे न करता त्याने जयमलचा मुलगा आणि त्याचे अनुयायी यांना काही दिवस कैदेत ठेवून नंतर सोडून दिले. यावेळी अकबराची नुकतीच चाळीशी उलटून गेली होती, तरी देखील त्याने ऐन तारुण्यातली तडफ तेथे दाखवली.

### ऐतिमद खानला गुजराथचा सुभेदार नेमले

इ. स. १५७३ मध्ये ऐतिमद खानला, तो गुजराथचा असल्याने, गुजराथची सुभेदारी देण्याचे नक्की केले होते, याचा उल्लेख यापूर्वीच आलाच आहे; पण गुजराथी बंडखोरांशी दूरचा विचार न करता संगनमत केल्यामुळे त्याला कैदेत जावे लागले. तरीही ऐतिमद खानला पश्चात्ताप झाला आहे असे पाहाताच आपल्या वचनाला जागून इ. स. १५८३ मध्ये अकबराने त्याला गुजराथची

सुभेदारी दिली. त्याच्या मंत्र्यांचा या नेमणुकीला विरोध होता. कारण ऐतिमदखान मनाने आणि शरीराने पण थकलेला आहे, असे त्यांनी बादशहाच्या निदर्शनास आणून दिले. ऐतिमद खानच्या मदतीला हुशार अधिकारी देऊन ही उणीव भरून काढता येईल असे अकबराने ठरविले. यासाठी मीर अबुतुरब याला अमीन आणि ख्वाजा अबुल कासीम याला दिवाण नेमण्यात आले. इतिहासकार निझामुद्दिन अहमद याला अमीन म्हणून नेमले. महंमद हुसेन आणि शेख अबुल मुझफ्फर हे व यांच्यासारखे इतर हुशार अधिकारी पण अहमदाबादल सुभेदाराबरोबर पाठविण्यात आले. याच्या आधीचा सुभेदार शिहाबुद्दिन अहमद-खान याला दरबारात परत बोलावून घेण्यात आले.

## मध्यवर्ती कारभाराची पुनर्रचना

इ. स. १५८३ मध्ये मध्यवर्ती राज्यकारभाराची पुनर्रचना करून अकबराने प्रत्येक खाते एकेका हुशार आणि कुशल अधिकाऱ्याकडे दिले. युवराज सलीम याच्याकडे फौजदारी खटल्याचा निवाडा आणि लग्नांची व जन्मांची नोंद करण्याचे काम सोपविण्यात आले. त्याच्या मदतीला फैजी, फते उल्ला आणि नंतर खान खानान हा किताब मिळालेला अब्दुर रहीम यांचे एक मंडळ नेमण्यात आले. बादशाही छावणीच्या जागा आणि विश्रामस्थाने यांची व्यवस्था राजपुत्र मुरादकडे देण्यात आली; आणि त्याच्या मदतीला रायसाल दरबारी, करमुल्ला, ख्वाजा अब्दुस समद आणि महंमद अली खजान्ची यांची नेमणूक केली. धर्मविषयक खाते राजपुत्र दानियलकडे सोपवून त्याच्या मदतीसाठी गाझी खान बदक्षी, राय सुर्जन आणि अबुल फझल यांना नेमले. निरनिराळ्या संस्थांना मदत देणारे, तसेच तनखा आणि धर्मादाय खाते सुलतान ख्वाजाकडे देण्यात येऊन त्याच्या मदतीला हकीम अबुल फते, मीर अबु तुरब आणि मुख्य काझी व मुफ्ती यांची नेमणूक केली. शेतीची वाढ करण्याच्या खात्यावर राजा तोडरमलची नेमणूक करण्यात येऊन खालसाकडील अधिकारी नेमण्याचा व काढून टाकण्याचा अधिकार त्याला देण्यात आला. ख्वाजा ह्या ह्या, राय दुर्गा आणि यार अली यांची त्याचे मदतनीस म्हणून नेमणूक झाली. सैन्याचा सर्व कारभार शहाबाझ खानकडे सोपवण्यात आला. सैन्यातील शिपाई आणि अधिकारी यांचा पगार वाटण्याचे काम त्याच्याकडे असून जाफर बेग आणि अली दोस्त खान हे त्याच्या मदतीस देण्यात आले. व्यापारी मालाच्या आणि खरेदीच्या किमतीवरच्या नियंत्रणाचे काम झैन खान कोकाकडे देण्यात आले. बाजारात येणाऱ्या मालाच्या किमतीवर देखरेख ठेवण्याचे त्याचे मुख्य काम

होते आणि यासाठी इस्माईल कुली खान, पायंडा खान आणि हाजी हबीब उल्ला यांची त्याचे मदतनीस म्हणून नेमणूक करण्यात आली. जगन्नाथ लून करण आणि सालीह अकील यांच्या मदतीने कुलीजखानकडे रस्ते आणि शस्त्रास्त्रे यांवर देखरेख करण्याचे काम सोपविण्यात आले. बेवारशी मालमत्तेवर देखरेख ठेवण्याचे आणि त्याची योग्य विल्हेवाट लावण्याचे काम शरीफखान-कडे देण्यात आले आणि या खात्यामध्ये त्याच्या मदतीस राजा आस्करन, नकीब खान आणि अब्दुर रहमान यांची नेमणूक झाली. जडजवाहीर आणि इतर खनिज संपत्ती खरीदणे आणि विकणे या कामावर ऐतीमद खान गुजराथी याची नेमणूक झाली. बाकी खान, जगमल, हाकीम ऐन उल् मुल्क आणि नियामतखान यांना त्याचे मदतनीस म्हणून नेमण्यात आले. सार्वजनिक बांध-काम खात्यावर नौरंग खानची नेमणूक करून त्याच्या हाताखाली कासीम खान मासूम खान आणि लतीफ ख्वाजा यांची नेमणूक करण्यात आली. मुलकी न्याय खात्यावर राजा बिरबलची नेमणूक करून दाखल केलेल्या तक्रारींची चौकशी करून आणि फिर्यादींना भेटून त्याबाबत योग्य न्याय देण्याचे काम त्याच्यावर सोपव-ण्यात आले. कासीम अली खान, हाकीम हुमाम आणि शमशेर खान कोतवाल यांची त्यांच्या हाताखाली नेमणूक झाली. अबुल फझलला पण बिरबलच्या खात्यातच नेमले.

अकबराने निरनिराळ्या वेळी काढलेले हुकूम ध्यानात धरून या सर्व अधिकाऱ्यांनी लोकांना सुख लागेल अशा रीतीने आपापली कामे करावयाची होती. स्वतःच्या खात्याबद्दल बारीक चौकशी करून त्याबाबत फक्त साक्षीपु-राव्यावर विश्वास ठेवू नये असे त्यांना बजावण्यात आले. "जुलूमजबरदस्ती करणाऱ्या आणि लाचलुचपत घेणाऱ्या उच्चपदस्थ माणसासमोर मूर्ख आणि असहाय्य शोषित प्रजेचा काही निभाव लागत नसे. यासाठी कुठल्याही प्रश्नाची चौकशी करण्यात हलगर्जीपणा होऊ नये, लाच मिळण्याच्या लोभाने (पारा) न्यायबुद्धी ढळू नये आणि नुकसानीच्या भीतीने भ्याड वृत्तीस वाव मिळून सत्य झाकले जाऊ नये." या नव्या पद्धतीने राज्यकारभारात खूप सुधारणा झाली, असे अबुल फझल म्हणतो.

## गुजराथमधील बंडाचा बिमोड

१५८३ साली गुजराथमध्ये पुन: बंड उद्भवले. स्थानिक अधिकाऱ्यांच्या कारभारात पुष्कळ घोटाळे निर्माण झाले. कारकीर्दीच्या सुरुवातीस कार्यक्षमते-बद्दल वाहवा मिळवलेला सुभेदार शहाबुद्दिन अहमदखान आणि त्याचा

नायब कुतुबुद्दिन अहमदखान यांनी वाईट कारभार करणाऱ्या अधिकाऱ्यांचे योग्य ते पारिपत्य केले नाही व जनावरांना डाग देण्याचे हुकूम पण योग्य रीतीने अंमलात आणले नाहीत. ऐतिमद खानच्या हातात सूत्रे गेल्यावर कारभार अधिकच बिघडला. यामुळे लोकांत असंतोष माजून मुघल राज्याचा अधिकार अजूनही मान्य नसणाऱ्या लोकांनी तिसऱ्या मुझफ्फरला परत बोलावून आपले वडिलार्जित राज्य परत ताब्यात घेण्याची विनंती केली ( सप्टेंबर १५८३ ). मुघलांच्या कैदेतून पळून जाऊन तो राजपिपल्याच्या आश्रयाला जाऊन राहिला होता. भडोचचा फौजदार कुतुबुद्दिन हा त्याच्या विरुद्ध चालून गेला. पण मुझफ्फर प्रथम जुनागडला आणि नंतर राजकोटजवळील समुद्र काठच्या लोनी काठी या वन्य जातीच्या आश्रयाने खेंरडी येथे जाऊन राहिला. तेथून तो परत फिरला आणि बरेचसे बदक्षी आणि तुराणी त्याला फितुर झाले. शियाबुद्दिन अहमदखानच्या विरुद्ध झालेल्या कटात याच लोकांनी भाग घेतला होता. प्रांताच्या बदललेल्या राजवटीचा फायदा घेऊन उमर हाजीला आपला पुढारी करून ते सुलतान मुझफ्फरला जाऊन मिळाले. उमर हाजीला आणि त्याच्या अनुयायांना त्यांच्या जहागिरी परत करून त्यांच्याबरोबर समझोता करावा असा सल्ला ऐतिमद खानला देण्यात आला; पण तो त्याने मानला नाही. तेवढ्यात एका प्रबल सैन्यानिशी मुझफर अहमदाबादवर चालून येत आहे अशी बातमी आली. यावेळी शहाबुद्दिन अहमद साबरमतीच्या तीरावर उस्मानपूरला बादशहाच्या दरबारात परत जाण्याच्या मार्गावर होता. बंडाचा बिमोड करण्यासाठी त्याची मदत ऐतिमद खानने मागितली. दरम्यान मुझफरने अहमदाबादवर हल्ला चढविला होता आणि शहर त्याच्या हातात पडण्याच्या बेतात होते. इतक्या उशीरा जागे होऊन ऐतिमद खान आणि शिहाबुद्दिन अहमद हे दोघे सुभेदार एकमेकांना मदत करण्यास तयार झाले. पण आता वेळ निघून गेली होती. बंडखोरांनी शदाबुद्दिनला वेढून टाकले. घोड्यावरून पडल्यामुळे त्याचा जीव धोक्यात आला, पण त्याच्या अनुयायांनी त्याला उचलून सुरक्षित स्थळी नेऊन ठेवले. शियाबुद्दिन, ऐतिमद, निझाम उद्दिन अहमद खान इत्यादी सरदार आता एकत्र झाले आणि पाटणला जवळ जवळ ३०० लोक गोळा करून मुझफरविरुद्ध सामना देण्याची तयारी त्यांनी केली. दरम्यान मुझ्झफ्फरने अहमदाबाद काबीज केले होते ( सप्टेंबर २४ ) आणि ११ वर्षांच्या हद्दपारीनंतर सुलतान हा किताब धारण करून तो पुन: गुजराथच्या गादीवर चढला होता.

या बंडाची बातमी समजताच अकबराने मिर्झाखानच्या हाताखाली फौज

देउन त्याला गुजराथकडे बंदोबस्ताकरता पाठविले. त्याच्या हाताखाली सय्यद कासीम, सय्यद हाशीम, राय दुर्गा, राय लून करण, मेदनी राय आणि इतर हुशार अधिकारी देण्यात आले. माळव्यातल्या सैन्याला मिर्झा खानला जाऊन मिळण्याचा आदेश देण्यात आला. परंतु मिर्झाखान गुजराथमध्ये पोहोचण्यापूर्वीच बडोदा आणि भडोचचा सुभेदार कुतुबुद्दिनखान हा पराभव पावून सारवालजवळ २ नोव्हेंबर १५८३ रोजी बंडखोरांच्या हातून कपटाने मारला गेला. या विजया-नंतर मुझफ्फरने भडोचच्या किल्ल्याला वेढा दिला आणि तिथल्या शिबंदीने काही प्रतिकार न करता किल्ला त्याच्या स्वाधीन केला. नंतर खंबायत पण बंडखोरांच्या हातात पडले. इतके होईपर्यंत मिर्झाखान गुजराथला येऊन पोहोचला होता. ३१ डिसेंबर १५८३ रोजी त्याने पाटणला मुक्काम केला आणि आपल्या अधिकाऱ्यांशी मसलत करून शत्रूवर तावडतोब चाल करून जाण्याचे ठरवले. मिर्झा खान चालून येतो असे समजताच मुझफ्फर अहमदाबादच्या रक्षणासाठी तावडतोब निघून आला (जानेवारी १५८४) आणि अहमदाबादपासून ३ मैलांवर सरखेज येथे त्याने मुघल सैन्यावर चढाई केली. माळव्याची फौज येण्यापूर्वीच मुघल फौजेचा पाडाव करावा असा त्याचा त्यात हेतू होता. दिवस मावळण्याच्या बेतात होता आणि बादशाही फौजा लढाई करण्यास विशेष उत्सुक नव्हत्या. तरीसुध्दा २५ जानेवारी रोजी त्यांना बंडखोरांच्या आपल्यापेक्षा सुसज्ज मोठ्या सैन्याबरोबर सामना करावा लागला. बंडखोरांचे सैन्य मोठे असून सुध्दा मिर्झाखानने त्यांचा पराभव केला आणि महेंदीरी नदीच्या बाजूने मुजफ्फर पळून गेला. मुघल सैन्याचा हा विजय अगदी अनपेक्षित होता, कारण बादशहाच्या बाजूला फक्त १०,००० सैन्य होते तर मुझफ्फरकडे ४०,००० घोडेस्वार आणि एक लाख पायदळ होते. रात्र पडल्यामुळे बादशाही फौजेने शत्रूचा पठलाग केला नाही.

रणांगणातून पळून गेल्यावर मुजफ्फर खंबायतला गेला आणि तेथील श्रीमंत व्यापाऱ्यांकडून त्याने खंडणी वसूल केली. तेथील पुष्कळ गुजराथी त्याच्या निशाणाखाली एकत्र आले. दरम्यान माळव्याची फौज येऊन मिर्झाखानला मिळाली होती. सैन्याच्या काही तुकड्या आता अहमदाबादच्या रक्षणासाठी तिकडे रवाना करण्यात आल्या आणि राहिलेले सैन्य घेऊन मिर्झा खान स्वतः मुझफ्फरचे पारिपत्य करण्यासाठी खंबायतला निघाला. बादशाही फौज खंबायतपासून २० मैलांच्या अंतरावर आलेली पाहून मुझफ्फरचे धाबे दणाणले आणि तो बाघडला पळून गेला. बंडखोरांच्या एका तुकडीबरोबर चकमक होऊन त्यात बादशाही फौजा विजयी झाल्या. यानंतर नर्मदा नदी ओलांडून राजपिपळ्याचे मुख्य शहर नांदोड

येथे मुझफ्फर आश्रयाला जाऊन राहिला; पण ती जागा विशेष सुरक्षित न वाटल्यामुळे तो जहानिया किंवा कोहिचंपा या गावी पळून गेला. डोंगरातल्या एका सुरक्षित स्थळी ही जागा असून तापी नदी त्याच्या दक्षिण बाजूने वाहात होती. इतके होईपर्यन्त बादशहाची फौज नांदोडला येऊन पोहोचली होती १० मार्च १५८९ रोजी नांदोड सोडल्यावर दुसऱ्या एका बंडखोर जमावाशी त्यांची लढाई झाली. त्यात बंडखोरांचा सर्वस्वी पराभव झाला त्यांचे २००० लोक मारले जाऊन ५०० लोकांना कैद करण्यात आले. या बातमीने खूष होऊन अकबराने मिर्झा खानला ५००० ची मनसबदारी आणि खान-इ-खानान हा किताब दिला.

मुझफ्फरच्या सैन्याची आता दाणादाण झाली आणि मुझफ्फर परत खंबायतला पळून गेला. त्याच्या गैरहजेरीचा फायदा घेऊन खान-इ-खानानने आपल्या फौजेची एक तुकडी भडोचकडे पाठवली, आणि त्या तुकडीने भडोच विनासायास जिंकून घेतले. तुरळक चकमकी झाल्यानंतर मुझफ्फर प्रथम सोरठला आणि नंतर काठेवाडला पळून गेला. अशा तऱ्हेने खान-इ-खानानने सबंध गुजराथ प्रांत पुन्हा जिंकून घेतला. यानंतर मुघल सरदार रजा घेऊन दरबारला भेट देण्यासाठी दिल्लीला गेला असताना धाडशी मुझफ्फर पुन: गुजराथमध्ये आला आणि पुन: एकदा त्याला काठेवाडमध्ये हाकून देण्यात आले. पण जुलै १५९१ मध्ये गुजराथचा नवा सुभेदार अझीम कोका याने ध्रोलच्या (भुचर मोरी) लढाईत त्याचा संपूर्ण पाडाव करीपर्यन्त मुझफ्फरचा त्रास चालूच राहिला. यानंतर लवकरच तो मुघल सैन्याच्या हातात सापडला आणि २४ डिसेंबर १५९२ रोजी त्याने आत्महत्त्या केली. मुझफरच्या मृत्यूनंतर त्याचा मुलगा बहादुर याने पुन: एकदा बंडाचा प्रयत्न केला, पण जोधपूरच्या सूरजसिंगने त्याचा सहज पराभव करून त्याला ठार मारले.

**अकबर बिरबलावर औषधोपचार करतो:**

८ ऑक्टोबर १५८३ रोजी इद-उल्-फितर निमित्त अकबराने मोठी मेजवानी दिली. गाणेबजावणे आणि नाना तऱ्हेचे खेळ यावेळी करण्यात आले. याच-वेळी पोलो खेळत असता राजा बिरबल एकाएकी घोड्यावरून पडून बेशुद्ध झाला. त्याच्याजवळ जाऊन अकबराने त्याला आपल्या श्वासाने सावध केले आणि याबद्दल बिरबलाने बादशहाचे आभार मानले.

**अकबराचे राज्यविस्ताराचे महत्वाकांक्षी बेत : अलाहाबादच्या किल्ल्याचा पाया:**

प्रयागजवळील त्रिवेणीच्या संगमावर चार मजबूत किल्ले बांधण्याची अकबराची फार इच्छा होती. तसेच तेथे एक शहर वसवून ते एक मजबूत

—१९

लष्करी ठाणे बनवावे असा त्याचा विचार होता. अलाहाबाद येथे आपल्या सैन्याची मुख्य छावणी ठेवून पूर्वेकडील ओरिसा आणि आसाम हे दोन प्रांत जिंकून घेण्याचा त्याचा बेत होता; तसेच गोंडवनाचे जंगल ओलांडून दक्षिणेत प्रवेश करावा आणि सर्व दक्षिण देश कावीज करावा अशी त्यची महत्त्वाकांक्षा होती. या भागात यावेळी सर्वत्र अंदाधुंदी होती, आणि 'न्यायी राजाची तिथे फार जरूर होती, असे अबुल फझल म्हणतो. या सर्वांवर कळस म्हणून आपला दुधभाऊ काबुलचा मिर्झा हकीम याचे पारिपत्य करून आणि दूरचे नातेवाईक बदक्शानचे सुलेमान आणि शहारुख यांना शरण येण्यास भाग पाडून आपल्या पूर्वजांचा ट्रॅन्सऑक्सियाना हा प्रदेश जिंकून घ्यावा असे त्याच्या मनात होते. पण मध्य आशिया जिंकून घेण्याचे मनसुबे कागदोपत्रीच राहिले. दक्षिण देशातला काही भागच अकबराच्या अंमलाखाली आला आणि आसाम त्याच्या अधिकाराच्या कक्षेत कधीच आला नाही. वरील प्रचंड मोहीमांची सर्व तयारी करून अकबर ऑक्टोबरच्या मध्यास फत्तेपूर सिक्रीहून निघाला. आग्र्याजवळील बरोली या गावाहून अकबर आणि त्याच्या खास तैनातीतील मंडळी ३०० बोटींतून निघाली आणि सैन्यचा मुख्य भाग खुष्कीच्या मार्गाने निघाला. एटाव्याला झैन खान कोका आणि काल्पीजवळ मतालिब खान यांनी त्याची सरबराई केली. अकबरपूरजवळ बिरबलच्या घरी त्याचा पाहुणचार घेऊन अकबर बोटीने प्रयागला पोहोचला, आणि तेथे त्याने चार महिने मुक्काम केला. तेथे गंगायमुनेच्या संगमावर किल्याचा आणि शहराचा पाया त्याने घातला (नोव्हेंबर १५८३). एकंदर चार किल्ले बांधण्याची ही योजना असून प्रत्येक किल्ल्यामध्ये राहण्यासाठी सुंदर घरे आणि बागबगीचे तयार होणार होते; पण प्रत्यक्षात एकच किल्ला बांधून झाला आणि त्यात बादशहासाठी खास राजवाडा आणि इतर अधिकारी आणि सैन्यातील लोक यांच्यासाठी घरे बांधण्यात आली. तांबड्या रेतीच्या दगडांनी हा किल्ला बांधलेला असून त्याची बांधणी फार लवकर पुरी करण्यात आली. सरदार मंडळींनी आणि इतर अधिकारी लोकांनी पण स्वत:साठी घरे बांधली आणि थोड्याच दिवसांत एक मोठे शहर वसवले गेले. याचेच नाव अलाहाबास किंवा अलाहाबाद. मुर्तझा हुसेन खान बिलग्रामीच्या म्हणण्याप्रमाणे किल्ला, त्यात राहण्यासाठी बांधलेली घरे आणि बागबगीचे यांसाठी दोन कोटी रुपये ( दाम) खर्च आला.

गंगेच्या पुरापासून गावाचे आणि शेतीभातीचे रक्षण करण्यासाठी अकबराने २ मैल लांब, १२० फूट रुंद आणि १४ हात उंच भिंत बांधली.

## भाठ्याचा राजा रामचंद्र यावर दरबारात हजर होण्याची सक्ती

अलाहाबादच्या छावणीत मुक्काम असताना अकबराने भाठ्याचा राजा रामचंद्र याला दरबारात हजर होण्याचा आदेश दिला. राजाने नाखुशीने शरण येऊन बादशहाचे मांडलिकत्व १५६३ सालीच मान्य केले होते, पण अजूनपर्यंत तो स्वत: दरबारात कधीच हजर झाला नव्हता. आपल्याऐवजी आपल्या थोरल्या मुलाला त्याने आग्र्याला पाठवून दिले होते. नव्यानेच वसलेल्या अलाहाबाद शहरी अकबराचा मुक्काम होता. तेथून भाठा फार दूर नसल्यामुळे राजा रामचंद्रला जबरदस्तीने दरबारात आणण्यासाठी अकबराने आपल्या सैन्याची एक तुकडी तिकडे रवाना केली. राजा रामचंद्र निवृत्त वृत्तीने राहात असल्यामुळे तो बादशहाच्या भेटीस अजूनपर्यंत आला नव्हता, असे त्याच्या मुलाने सांगितले. तसेच दरबारातले एक दोन ओळखीचे सरदार राजाकडे पाठविल्यास तो जरूर बादशहाच्या भेटीला येईल असे पण तो म्हणाला. हुकूम मोडणाऱ्यावर शेवटचा उपाय शस्त्र उगारणे हा आहे असे अकबर मानत असे; म्हणून राजाच्या ओळखीतले झैनखान कोका आणि बिरबल यांची भाठ्याला रवानगी करण्यात आली. दरम्यान अकबर फत्तेपूर सिक्रीला परत निघाला होता. तेथपर्यन्त प्रवास करून राजा फेब्रुवारी १५८४ मध्ये बादशहाच्या भेटीस हजर झाला. त्याने बादशहाला दिलेल्या मौल्यवान नजराण्यात १२० हत्ती आणि थोडी माणके होती; त्यातल्या एकाची किंमत ५०,००० रुपये होती असे म्हणतात. अकबराने राजाचा किल्ला आणि प्रांत त्याला परत देऊन देणगीदाखल १०१ घोडे दिले. भाठ्याला परत आल्यावर थोड्याच दिवसात राजा रामचंद्र मरण पावला. साहित्य आणि कलेचा हा मोठा आश्रयदाता असून तानसेन आणि बिरबलसारखे प्रसिद्ध लोक त्याच्या पदरी होते. असे सांगतात की त्याने एकदा तानसेनला एक कोट चांदीची नाणी बक्षिस दिली होती. त्याला सोडून अकबराच्या दरबारात दाखल होण्यास तानसेन मोठ्या कष्टाने कबूल झाला.

## दुष्काळी वर्ष

१५८३ साली दुष्काळ पडून वस्तूंच्या किंमती खूप वाढल्या, असे अबुल फझल म्हणतो. याबद्दल कागदोपत्री काही दाखले सापडत नाहीत. दुष्काळामुळे पुष्कळ लोकांना चरितार्थ चालविणे अशक्य झाले, एवढाच त्रोटक उल्लेख अबुल फझलच्या लिहिण्यात आढळतो.

## ईश्वरी कालखंडाची सुरूवात

राज्याला २९ वे वर्ष लागल्यावर त्या निमित्ताने ११ मार्च १५८४ रोजी दर वर्षीप्रमाणे मोठे समारंभ आणि मेजवान्या झाल्या. याच वर्षी अकबराने नव्या म्हणजे 'ईश्वरी कालखंडाची' सुरूवात केली. पारशी सौर पंचांगावर हे आश्रारित असून ११ मार्च १५५६, म्हणजे अकबर गादीवर आल्यानंतर आलेल्या पहिल्या नवरोझच्या सणापासून या नव्या युगाची सुरूवात झाली, असे मानण्यात आले. ही सुधारणा महत्त्वाची गणली पाहिजे; कारण आजपर्यन्त चालू असलेल्या हिजरी पंचांगामुळे लोकांची व सरकारची फार गैरसोय होत असे. हिजरी वर्ष हे चांद्रमासावर अवलंबून असल्यामुळे ते सौर वर्षापेक्षा १०–११ दिवसांनी कमी असते आणि त्यामुळे शेतकापणीची वेळ आणि पंचांगाची वेळ यांचा मेळ कधीच बसत नाही. १०–११ दिवस कमी असल्यामुळे २९ सौर वर्षांत ३० हिजरी वर्षे बसत असत. यामुळे शेतकऱ्यांना २९ ऐवजी ३० वर्षांचा सारा द्यावा लागे. ही गैरसोय दूर करून शेतकऱ्यावर उघड उघड होणारा अन्याय थांबवावा असा अकबराचा हेतू होता. शिवाय हिंदुस्थानात हिजरी, पारशी, विक्रमी, फसली असे निरनिराळे कालगणनेचे प्रकार सुरू होते. त्यामुळे खूप घोटाळा माजे. हा घोटाळा दूर करण्यासाठी सर्व सरकारी कामकाजात अकबराने फारसी पद्धतीचे सौर पंचांग सुरू केले. हे पंचांग उलुघ बेग याच्या नावाशी निगडित असून त्याला गुर्गणी पंचांग असे म्हणत असत. त्यातल्या महिन्यांची सर्व नावे फारसी होती. या पंचांगाला इलाही पंचांग असे नाव अकबराने दिले. मुसलमानी हिजरी पंचांग बंद करून त्या जागी फारसी पंचांग सुरू करण्यासाठीच अकबराने असे केले, असा गैरसमज आहे. इलाही पंचांगा– बरोबरच सामाजिक आणि धार्मिक विधींसाठी आणि सरकारी कागदोपत्रींसुद्धा हिजरी पंचांग चालूच होते.

## चित्रकार दसवंतचा मृत्यू

इ. स. १५८४ मध्ये चित्रकार दसवंत मरण पावला. पालखी वाहणाऱ्या कहार जातीतल्या एकाचा तो मुलगा होता. सुरुवातीला राजवाड्यात तो एक साधा नोकर म्हणून होता; पण उपजतच कलाकार असल्यामुळे फत्तेपूर सिक्रीतील राजवाड्याच्या भिंतींवर तो चित्रे काढू लागला. ती पाहून अकबराने त्याला चित्रकाराचा दर्जा दिला आणि ख्वाजा अब्दुस समद याच्या हाताखाली याला शिकावयास ठेवले. "थोड्याच दिवसांत तो अप्रतिम चित्रकार होऊन

त्या काळच्या चित्रकारांत अग्रणी ठरला." पुढे अबुल फझल लिहितो, "याची चित्रे हेरातच्या शहा हुसेन मिर्झाच्या पदरी असलेल्या बेहजादच्या किंवा चिनी चित्रकारांच्या तोलाची होती." एक दिवस अत्यंत वाईट मनःस्थितीत असताना दसवंतने एका खंजिराने स्वतःला जखम करून घेतली आणि दोन दिवसांनी तो मरण पावला.

## हत्तीच्या हल्ल्यापासून अकबर बिरबलाचें रक्षण करतो

एकदा पोलोचा खेळ चालू असताना एका मस्त हत्तीने बिरबलवर हल्ला करून त्याचा प्राण धोक्यात आणला. या मस्तवाल हत्तीच्या सवयी सर्वांना माहीत असून यापूर्वी त्याने अनेक लोकांचे प्राण घेतले होते. प्रथम तो एका पादचाऱ्यावर चालून गेला. आणि नंतर त्याला बाजूस ठेऊन त्याने बिरबलाकडे आपला मोर्चा वळवला. त्याच्या सोंडेने बिरबल मरण्याच्या बेतात होता. हे पाहताच अकबर आपल्या घोड्याला टाच मारून त्या दोघांच्या मध्ये जाऊन उभा राहिला. रागावलेला हत्ती मग अकबराकडे वळला, पण सुदैवाने त्याने अकबरावर हल्ला चढविला नाही. उलट तो शांतपणे एका बाजूस उभा राहिला. अशा तऱ्हेने बिरबलाचे प्राण वाचले. एवढा मदोन्मत्त हत्ती अकबरासमोर शांतपणे उभा राहिला याचे लोकांना फार आश्चर्य वाटले.

## काही प्रमुख व्यक्तींचा मृत्यू

गाझी खान बदक्षी हा १५ जुलै १५८४ च्या सुमामास अयोध्येला मरण पावला. तो मोठा विद्वान असून युद्धकलेत निष्णात होता. दिन–ए–इलाहि या नवीन धर्माची त्याने दीक्षा घेतली होती आणि अकबराचे त्याच्यावर फार प्रेम होते. तो मोठा संवेदनशील असून मनाचा कनवाळू होता. यानंतर दहाच दिवसांनी फत्तेपूर सिक्रीला सुलतान ख्वाजा नक्षा बंदी या अकबराच्या दुसऱ्या एका प्रसिद्ध मित्राचे व अधिकाऱ्याचे निधन झाले. हा पण दिन–ए–इलाहि पंथातला असून सुफी पंथाकडे त्याचा ओढा होता. ४ सप्टेंबर १५८४ रोजी अधमखानचा मोठा भाऊ बाकी खान मरण पावला. हा साधारण बुद्धीचा असला, तरी अकबराची प्रसिद्ध दाई महाम अनघा हिचा मुलगा असल्यामुळे सर्व लोक त्याला मानत असत. मरण पावलेल्या या तिन्ही गृहस्थांच्या कुटुंबांची तरतूद अकबराने केली.

## अकबर बिरबलावर पुन: एकदा अनुग्रह करतो

बिरबलाच्या घरी पाहुणचारास जाऊन अकबरान पुन: एकदा त्याचा सन्मान केला. बादशहाच्या आगमनाप्रित्यर्थ बिरबलाने मोठी मेजवानी दिली.

## राजपुत्र सलीमचे लग्न

१३ फेब्रुवारी १५८५ रोजी त्या वेळचा पंजाबचा सुभेदार अंबरचा राजा भगवन्तदास याची मुलगी मानबाई हिच्याशी राजपुत्र सलीमचे लग्न झाले. या लग्नाची बोलणी मुलीच्या आईबापांनी सुरू केली, असे अबुल फझल म्हणतो. बादशहासकट राज्यातली सर्व मोठी मोठी मंडळी राजा भगवन्तदासच्या निवासस्थानी गेली आणि तेथे हा लग्नसोहळा मोठ्या समारंभाने आणि थाटात पार पडला. हिंदु आणि इस्लामी या दोन्ही पद्धतीचे समारंभ यावेळी करण्यात आले. प्रथम काजीसमोर दोघांचा निका लागून मुलीला दोन कोट टांका देणगी किंवा मेहेर म्हणून देण्याचे ठरले. यानंतर हिंदू पद्धतीप्रमाणे अग्नीला प्रदक्षिणा घालणे, इत्यादि समारंभ झाले. शंभर हत्ती, अनेक घोडे, हिंदी, हबशी आणि किरगीझ दासदासी, नाना आकाराची रत्नजडित सोन्याची भांडी, नाना तऱ्हेची रत्ने आणि मौल्यवान वस्तू अशी अगणित संपत्ती भगवन्तदासने हुंड्याप्रित्यर्थ दिली.

मुलाकडच्या सरदारांना त्यांच्या इभ्रतीप्रमाणे भगवन्तदासने सोनेरी खोगीर चढवलेले फारसी, तुर्की, अरबी घोडे आणि इतर वस्तू दिल्या. राजाच्याकडून नवरानवरी बादशहाच्या छावणीवर येत असता त्यांच्यावर सोन्याची नाणी आणि रत्ने अकबराने उधळली. या निमित्ताने अनेक मेजवान्या आणि नाना तऱ्हेचे आनंदोत्सव झाले.

अनेक दृष्टींनी हे लग्न फार महत्त्वाचे होते. मुलाच्या मानाने मुलीचे कुटुंब खालच्या दर्जाचे असल्यास मुलीला नवऱ्या मुलाच्या घरी घेऊन जात आणि तेथे त्यांचे लग्न होत असे. याला डोला लग्न असे म्हणत असत. राजपुत्र सलीमचा विवाह अशा पद्धतीने झाला नाही. स्वत: बादशहा, नवरा मुलगा आणि दरबारातली इतर सरदार मंडळी मुलीच्या बापाच्या म्हणजे भगवन्तदासच्या घरी जाऊन तेथे हा लग्नसमारंभ पार पडला. दुसरी महत्त्वाची गोष्ट म्हणजे हिंदू आणि मुसलमान या दोन्ही धर्मविधींचा या लग्नात उपयोग करण्यात आला. हिंदू पद्धतीप्रमाणे कन्यादान करून भगवन्तदास आणि त्याची राणी यांनी आपली मुलगी बादशहाकडे दिली. हिंदुचा विश्वास संपादन करण्यासाठी त्यांच्या विशिष्ट

रीतीरिवाजांना मान देण्याचा अकबराचा हेतू यात दिसून येतो. दोन्ही जमातींत सलोखा घडवून आणण्याचे त्याचे धोरण आणि त्यासाठी चाललेले त्याचे प्रयत्न पण यात दिसून येतात. दोघा वधूवरांना हे लग्न फार सुखाचे ठरले. आपल्या मोहक व्यक्तिमत्त्वाने आणि पति-निष्ठेने मानबाईने राजपुत्र सलीमचे अपार प्रेम संपादन केले. इ. स. १६०४ मध्ये तिचा अकाली मृत्यू झाल्यावर सलीमने चार दिवस पाणीसुद्धा घेतले नाही. तिच्या मृत्यूबद्दलचे आपले दु:ख व्यक्त करताना सलीम लिहितो, "तिच्या गुणांचे आणि सौजन्याचे मी कसे वर्णन करावे! ती फार समजूतदार असून तिचे माझ्यावर इतके प्रेम होते की आपले हजार भाऊ आणि पुत्र यांचा तिने माझ्या एका केसासाठी सुद्धा बळी दिला असता." तिच्यापासून जहांगीरला दोन अपत्ये झाली. त्यांपैकी सुलतान उन्निसा बेगम ही वयाच्या ६० व्या वर्षी शेवटपर्यंत कुमारिका राहूनच मरण पावली. त्याचे दुसरे अपत्य म्हणजे सर्वांचा अत्यंत लाडका पण दुर्दैवी राजपुत्र खुश्रु. ६ ऑगस्ट १५८७ रोजी याचा जन्म झाला आणि २९ जानेवारी १६२२ रोजी तो मोठ्या दु:खद परिस्थितीत मरण पावला.

## १५८५ साली नवरोजच्या निमित्ताने दिलेली मानचिन्हे.

नेहमीप्रमाणे, १५८५ सालच्या मार्च महिन्यात अकबराच्या राज्याला २९ वर्षे पुरी झाल्यावर, नवरोझचा उत्सव करण्यात आला. या निमित्ताने पुष्कळ अधिकाऱ्यांना बढत्या मिळाल्या. शहाबुद्दिन अहमदखान याला माळव्याचा सुभेदार नेमले राजा भगवन्तदास याला ५००० ची, तोडरमलला ४,००० ची, झैनखान कोका आणि मीर युसफखान यांना २५०० ची, अब्दुल मतालिबखान याला १५०० ची, राजा अस्करन याला १००० ची, हकीम अब्दुल फात याला ७०० ची, शेख फरीद याला ८०० ची, मीर जमाल उद्दिन याला ६०० ची, बहराम उल-मुल्क याला ५०० ची आणि अबुल फझल याला १०० ची अशा वरच्या दर्जाच्या मनसबी देण्यात आल्या. अमीर फत्ते उल्ला शिराझी याला अमीन उल-मुल्क असा किताब देण्यात येऊन त्याच्या सहाय्याने राज्याचा आर्थिक कारभार चालवावा असे राजा तोडरमलला सांगण्यात आले. मुझफ्फर खान तुर्बाती याने सुरू केलेल्या पण अजून अर्धवट राहिलेल्या आर्थिक व्यवस्थेतील सुधारणा पुऱ्या करण्याचे काम या दोघांच्याकडे देण्यात आले. या सुधारणा मुख्यत्वे मुलकी खात्यातल्या होत्या.

## भरघोस धान्योत्पत्ती आणि जमीनसाऱ्यात घट

१५८४ चे साल हे फार भरभराटीचे ठरले. खरीप आणि रब्बी या दोन्ही मोसमांत फार चांगले पीक आले. धान्याच्या किमती इतक्या उतरल्या की शेतकऱ्यांना—खास करून अलाहाबाद, अवध आणि दिल्ली या भागांतील शेतकऱ्यांना साऱ्याची रक्कम रोख भरणे फार मुष्किलीचे झाले. तेव्हा धान्याच्या उतरलेल्या किंमतींच्या मानाने शेतसारा कमी करावा असा हुकूम अकबराने काढला. केवळ खालसा मधल्या जमिनीवरील शेतसाऱ्यातच ७,०७,४७,०६२ इतक्या दामाची सूट मिळाली. अशा तऱ्हेने शेतकऱ्यांची अडचण दूर झाली.

# प्रकरण १५ वे

## सुरक्षित सरहद्दीचा शोध, सरहद्दीवरील टोळ्यांचा बंदोबस्त काश्मीर, बलुचिस्तान, सिंध आणि कंदाहारवर विजय :

### अब्दुल्लाखान उझबेक बदक्शान घेतो:

तुरणचा उझबेक राजा दुसरा अब्दुल्ला याने १५८४ सनाच्या सुरूवातीस कुठल्याही तऱ्हेची लढाई न करता बदक्शानचा ताबा घेतला व सुलेमान मिर्झा व त्याचा नातू शहारुख मिर्झा यांना काबूलला हाकून दिले. आपसातील भांडणामुळे या दोघा मिर्झांनी आपल्या राज्याचा कारभार आणि त्याचे रक्षण याकडे दुर्लक्ष केले होते. उझबेक पुढारी अब्दुल्ला आणि तैमुरी यांच्यामध्ये वंशपरंपरागत वैर होते. मिर्झांमधील भांडणाचा फायदा घेऊन अब्दुल्ला बद्कशानवर चालून आला आणि त्याने त्यावर ताबा मिळवला. या लष्करी हल्ल्यामुळे काबूलचा मिर्झा हकीम याच्या मनात स्वतःच्या राज्याच्या सुरक्षिततेबद्दल भीती निर्माण होऊन त्याने अकबराकडे मदतीची याचना केली. इतक्यात बदक्शानहून पळून आलेले सुलेमान आणि शहारुख हे काबूलला येऊन पोहोचले. त्यामुळे आपल्या राज्यावर स्वारी होईल अशी भीती वाटून हकीमने अकबराकडे पुन्हा एकदा मदत मागितली. आपल्या दूध-भावाला मदतीचे आश्वासन देऊन 'तू खंबीर आणि स्वामीनिष्ठ राहिल्यास तुला उझबेकांपासून भिण्याचे काही कारण नाही,' असे त्याने मिर्झा हकीमला कळवले.

### शहारुखचे मुघल दरबारात आगमन:

बदक्शानहून काबूलकडे पळून येत असताना वाटेतला बर्फमय प्रदेश, भयंकर थंडी आणि वाटेत शत्रूला जाऊन मिळालेले अनुयायी, यांमुळे सुलेमान आणि शहारुख यांचे फार हाल झाले. काबूलच्या उत्तरेस पंजशीर येथे ते कसेबसे जिवानिशी येऊन पोहोचले. मिर्झा हकीमने सुलेमानचे स्वागत करून त्याच्या खर्चासाठी एक गाव लावून दिले; पण शहारुखला कैद करून शादमान

हझाराच्या देखरेखीखाली ठेऊन दिले आणि हिंदुस्थानात पळून जाण्याची संधी त्याला देऊ नये अशी ताकीद हझाऱ्याला देण्यात आली. इतक्यात बादक्शान आपल्या अधिकाऱ्यांच्या हातात सोडून अब्दुल्लाखान बुखाऱ्याला परत गेला आहे, असे सुलेमानला समजले. हे ऐकून आपले गेलेले वडिलोपार्जित राज्य परत मिळ– वण्याचा प्रयत्न करण्याचे त्याने ठरवले आणि ऐमाक्सच्या मदतीने बदक्शान पुन: जिंकून घेऊन तिथल्या अधिकाऱ्यांना कंठस्नान घातले; पण अब्दुल्ला एक मोठी फौज घेऊन परत आला आणि सुलेमानला त्याने काबूलच्या मार्गे फिरून एकदा पिटाळून लावले. त्याचा पाठलाग करीत अब्दुल्ला काबूलच्या सरहद्दी पर्यन्त आला आणि तो प्रांत उध्वस्त करण्यास त्याने सुरुवात केली. दरम्यान कैदेतून निसटलेला शहारुख अनेक हाल अपेष्टा सहन करीत करीत खैबरखिंडी– पर्यन्त येऊन पोहोचला आणि अकबराचे संरक्षण आणि आसरा मागणे त्याला भाग पडले. सरहद्दीचा सुभेदार मानसिंग याने मिर्झांना बादशहाच्या मैत्रीचा निरोप पाठवला. पूर्वीच्या आपल्या वाईट वर्तणुकीची शरम वाटल्यामुळे सुलेमानने या मैत्रीचा स्वीकार केला नाही. शहारुख मात्र अनेक हाल अपेष्टा सोसून आणि वाटेतील पहाडी टोळ्यांचा त्रास सहन करून खैबरची खिंड ओलांडून सिंधू नदीपर्यन्त येऊन पोहोचला. त्याचे खूप आदरातिथ्य करून (ऑक्टोबर) बरोबर संरक्षणासाठी शिपाई देऊन राजा मानसिंगने त्याची दरबाराकडे रवानगी केली. राजधानीबाहेर एका मुक्कामावर जाऊन राजपुत्र दानियलने त्याचे स्वागत केले. ३ जानेवारी १५८५ रोजी फत्तेपूर सिक्रीच्या दरबारात अकबराने त्याची भेट घेतली आणि त्याला एक मोठी मनसबदारी देऊन आपल्या नोकरीत ठेवून घेतले.

## पहिले इंग्रज व्यापारी मंडळ

शहारुख मिर्झा आल्यानंतर थोड्याच महिन्यांनी फत्तपूर सिक्रीला जॉन न्युबेरी, राल्फ फिच आणि विल्यम लीडस् या तीन इंग्रज व्यापाऱ्यांना अकबराने प्रथमच दरबारात भेट दिली. हिंदुस्थानात आलेले हे पहिलेच इंग्रज लोक नव्हते. हा मान त्यांच्यापूर्वी टॉमस स्टीव्हन्स किंवा स्टीफन्स ह्या इंग्रजी जेजुइट पाद्रयाचा आहे. तो ऑक्टोबर १५७९ मध्ये गोव्यास येऊन पोहोचला होता. हिंदुस्थानात ४० वर्षे राहून खिस्ती धर्मोपदेशकाचे काम त्याने केले; पण स्टीफन्स अकबराच्या दरबारात किंवा राज्यात कधीच आला नाही आणि १६१९ मध्ये तो गोव्याला मरण पावला. १५८५ साली अकबराच्या दरबारात आलेले हे तिघेच पहिले इंग्रज होते. या व्यापाऱ्यांचा पुढारी न्युबेरी याने इंग्रजांची राणी पहिली एलि–

झाबेथ (१५५८ ते १६०३) हिने बादशहास लिहिलेला खलिता आणला होता आणि त्यात या व्यापाऱ्यांना आपणास योग्य वाटतील त्या सवलती द्याव्या असे लिहिले होते. हे पत्र १५८३ साली लिहिलेले असून कुठल्याही इंग्रज राजाने हिंदुस्थानातल्या आपल्या समकालीन राजाला लिहिलेले पहिले पत्र होय. 'अत्यंत बलवान आणि अजिंक्य, कंबायाचा राजा लॉर्ड झेलबदिन एकेबार' असा या पत्रात अकबराचा उल्लेख केलेला आहे. यावरून अकबराची कीर्ती इ. स. १५८३ मध्ये तरी इंग्लंडला पोहोचली होती हे सिद्ध होते. ह्या तिघांपैकी राल्फ फिच हा एकटाच् इ. स. १५९१ मध्ये लंडनला सुखरूप परत गेला. त्याने लिहून ठेवलेली आपल्या प्रवासाची हकीगत अत्यंत त्रोटक आणि जुजबी आहे. निरिक्षणशक्तीचा आणि लेखनशक्तीचा अभाव असल्यामुळे अकबराच्या दरबारात आपले कसे स्वागत झाले याबद्दल तो काहीच लिहीत नाही. तसेच बादशहा अकबर, त्याचा दरबार, त्याची राज्यपद्धती किंवा राज्यातील लोकांची स्थिती याबद्दलही तो काही लिहीत नाही. हिंदुस्थानात येताना या प्रवाशावर बरीच संकटे आली. ओरमझला ते पोर्तुगीज लोकांच्या हातात सापडले आणि गोव्यात त्यांना कैदेत ठेवण्यात आले. तेथून आपली सुटका करून घेऊन ते दख्खनमध्ये येऊन पोहोचले. तेथून ते प्रथम आग्रा आणि नंतर फत्तेपूर सिक्रीला १५८५ सालच्या जुलै किंवा ऑगस्ट महिन्यात येऊन पोहोचले. यावेळी अकबर पंजाबला जाण्याच्या तयारीत होता. या तिघांतला रत्नपारखी लीडस् याला अकबराने आपल्या पदरी नोकरीस ठेवून घेतले. बाकी दोघेजण २८ सप्टेंबर १५८५ पर्यन्त फत्तेपूर सिक्रीलाच राहिले. नंतर न्युबेरी लाहोरच्या मार्गे लंडनला जाण्यास निघाला. इराण, आलेप्पो किंवा इस्तंबूलच्या मार्गाने लंडनला पोहोचण्याचा त्याचा विचार होता. या पलिकडे त्याच्याबद्दल काहीच माहिती उपलब्ध नाही. फिच मात्र प्रथम बंगाल, तेथून पेगू आणि नंतर आलेप्पोला गेला. आलेप्पोहून जलमार्गाने इ. स. १५९१ च्या मे महिन्यात तो लंडनला जाऊन पोहोचला.

## अकबर पंजाबला जाण्यास निघतो

बदक्शानचा पाडाव झाल्यानंतर काबूलच्या कारभारात खूपच घोटाळे निर्माण झाले. अब्दुल्ला खान उझबेकच्या स्वारीची भीती काबूलला सतत वाटत होती अब्दुल्ला खान हा महत्त्वाकांक्षी आणि लढाऊ वृत्तीचा राजा असून त्याने बोखारा, बाल्ख, ताश्कंद जिंकून घेऊन जवळ जवळ सबंध तुर्कस्तानवर आपली सत्ता प्रस्थापित केली होती. तसेच उझबेक जमातीच्या टोळ्यांना एकत्र करून त्याने त्यांचे एक प्रबळ राष्ट्र बनवले होते. काबूलच्या राजाची प्रकृती बिघडल्यानंतर

आक्रमक वृत्तीच्या शेजाऱ्याची भीती अधिकच वाढली असली पाहिजे. दुर्दैवान ३० जुलै ( नव्या पंचांगाप्रमाणे ९ ऑगस्ट ) १५८५ रोजी मिर्झा हकीम वयाच्या केवळ ३१ व्या वर्षी दारूच्या व्यसनामुळे मरण पावला. त्याच्या मृत्यूमुळे सर्व अफगाणिस्थानात अस्थिर वातावरण निर्माण झाले. त्याच्या अनुयायांत दोन गट होते, त्यांपैकी एका गटाचा पुढारी मिर्झा हकीमचा मामा फरिदुन खान हा असून अब्दुल्ला खानला अफगाणिस्थानचा ताबा घेण्यास बोलवावे असे त्याच्या मनात होते. या बातमीमुळे बेचैन होऊन अकबराने वाली वेग झुअल कादर आणि फत्ते उल्ला यांना काबूलला पाठवून दिले. तुराणला पळून जाण्याचा वेडेपणा मिर्झा हकीमच्या मुलाने करू नये असा बंदोबस्त करण्याचा आदेश त्यांना देण्यात आला. त्याचवेळी सरहद्दप्रांताचा सुभेदार मानसिंग याला आपल्या फौजेनिशीं काबूलला जाऊन तिथला राज्यकारभार आणि मयत मिर्झाचे कुटुंब आपल्या ताब्यात घेण्याचा हुकुम सुटला. हकीम मरण्यापूर्वी काही महिने आपल्या वायव्य सरहद्दीवर जाण्याची अकबराची तयारी सुरू होती. तेथे जाण्यात त्याचे मुख्य चार उद्देश होते. मरणासन्न झालेला आपला दूधाभाऊ खरोखरच मेल्यास काबूलचा ताबा घेणे, सरहद्दीवरील बंडखोर टोळ्यांचे पारिपत्य करणे, हिंदी साम्राज्याचा भाग असलेल्या अफगाणिस्थानवर अब्दुल्लाखान उझबेकची स्वारी न होऊ देणे, आजपर्यन्त दरबारात हजर न झालेल्य काश्मीरच्या राजाचा पराभव करून काश्मीरवर ताबा मिळवणे, असे त्याचे बेत होते. थोडक्यात म्हणजे आपल्या उत्तरेकडील आणि वायव्येकडील सरहद्दींचे संरक्षण करून त्या बाजूने उझबेकांची स्वारी होणार नाही अशी व्यवस्था करणे, हा त्याचा मुख्य उद्देश होता. २७ ऑगस्ट १५८५ रोजी तो उत्तरेच्या मार्गाने निघाला आणि सराई आवाद या गावाजवळ राजा तोडरमलने बांधलेल्या एका तलावाच्या काठी त्याने आपली छावणी दिली. त्याच्या सन्मानार्थ तोडरमलने फार मोठा समारंभ आयोजित केला. शेख इब्राहिम आणि इतर काही अधिकारी यांना आपल्या गैरहजेरीत राजधनीचा बंदोस्त राखण्यासाठी फत्तेपूर सिक्रीला परत पाठवून अकबर स्वतः दिल्ली, सोनपत आणि पानिपत या मार्गे ठाणेश्वरला ऑक्टोबरमध्ये येऊन पोहोचला. तेथे मानसिंग हा पेशावरला पोहोचला असून भीतीने पळून गेलेला एक शहाबेग सोडून दिल्यास बाकी बहुतेक सर्व अफगाण त्याला शरण आले असल्याची बातमी अकबराला मिळाली. दरम्यान आगेकूच करीत ऑक्टोबर १५८५ मध्ये अकबर कलानौरला येऊन पोहोचला.

## काश्मीरच्या राजाला दरबारात हजर राहण्याचे फर्मान:

कलानैरला असताना अकबराने सैन्याची एक तुकडी काश्मीरचा राजा युसुफ खान याला आपल्या समोर घेऊन येण्यासाठी काश्मीरला रवाना केली. १५८० साली अकबराचे आशिर्वाद घेऊन युसुफ खान आपल्या वंशपरंपरागत गादीवर चढला होता; पण फत्तेपूर सिक्रीपासून श्रीनगर फार लांब आहे. अशी सबब सांगून त्याने स्वत: दरबारात येऊन बादशहाला मुजरा करण्याचे टाळले होते. १५८१ साली याने आपला तिसरा मुलगा हैदर याचीच फक्त दरबारात रवानगी केली होती. आता पंजाबात मुक्काम असल्यामुळे अकबराने युसुफखानला स्वत:पुढे हजर होण्यास फर्मावले. यामुळे फेब्रुवारी १५८५ पासून बादशहाच्या दरबारात येऊन राहिलेला युसुफचा मुलगा याकुब हा घाबरून जाऊन बादशहाची परवानगी न घेता काश्मीरला पळून गेला. काश्मीरहून युसुफखानला आणण्यासाठी सैन्याची तुकडी रवाना करण्याचे हेच कारण होते.

## मानसिंग हकीमच्या मुलांना बादशहाच्या छावणीवर घेऊन येतो:

दरम्यान अकबर रोहटासला येऊन पोहोचला. तेथे बालनाथची टेकडी चढून त्याने तिथल्या योग्यांची भेट घेतली. तेथून काबूलला जाणारा रस्ता दुरुस्त करून तो गाड्यांच्या वाहतुकीला योग्य होईल असा करण्यासाठी एंजिनिअर कासीमखानला पुढे पाठविण्यात आले. राजधानीहून निघून मरियम मकानी रोहटासला अकबराला येऊन मिळाली. रोहटासहून निघून डिसेंबर ७ रोजी अकबर रावळपिंडीला जाऊन पोहोचला. रौशानिया अफगाण लोकांनी अडवून धरलेली खैबरची खिंड पुन: मोकळी करण्यात आली आणि जलालाबादच्या मार्गाने बादशहाची फौज पुढे निघाली. मानसिंगने काबूल अधीच जिंकून घेतले होते. तिथला कारभार आपला मुलगा जगत्सिंग याच्यावर सोपवून मानसिंग हकीमचे दोन मुलगे कैकोबाद आणि आफ्रासियाब आणि काबूलचे प्रसिद्ध नागरिक यांना घेउन अकबराला सामोरा गेला. हकीमचे हे दोन्ही मुलगे अनुक्रमे १५ व १४ वर्षांचे होते. (इकबालनाम्याप्रमाणे ते ११ व ४ वर्षांचे होते). रावळपिंडीस मानसिंगने बादशहाची भेट घेतली आणि हकीमच्या दोन्ही पुत्रांना बादशहासमोर हजर केले. बादशहाने प्रेमाने त्यांचे स्वागत केले (डिसेंबर ७). प्रथम हकीम आणि नंतर त्याचे कुटुंब आणि अनुयायी यांना खोटा सल्ला देणारा दंगेखोर फरिदुन याला झैनखान कोकाच्या ताब्यात देण्यात आले. प्रसिद्ध चित्रकार फरुखबेगसह इतर प्रतिष्ठित मंडळींना भेटीस बोलावून

बादशहाने सर्वांचे स्वागत केले. हसन अब्दाल येथे बादशहाने कमर्गा शिकार केली. काश्मीरचा युसुफखान स्वतः दरबारात येण्यास तयार नाही आणि आपला मुलगा याकुब यालाही तिकडे पाठवत नाही ही बातमी अकबराल तेथेच मिळाली.

## काश्मीर, स्वातबाजौर आणि बलुचिस्तान पादाक्रांत करण्यासाठी अकबर सैन्य रवाना करतो:

आपली सरहद्द सुरक्षित राखण्याच्या हेतूने आणि युसुफखानचे दुटप्पी धोरण लक्षात घेऊन २० डिसेंबर १५८५ रोजी हसन अब्दल येथील आपल्या छावणीवरून अकबराने एक मोठी फौज काश्मीर पादाक्रांत करन्यासाठी रवाना केली. या फौजेचे नामधारी आधिपत्य बदक्शानच्या शहारुख मिर्झाकडे होते; पण खरा सेनापती भगवन्तदास होता. शहाकुली महरम, माधोसिंग आणि मुबारक खान यांच्यासारखे झुंजार सरदार भगवंतदासाच्या हाताखाली देण्यात आले व स्वारीवरील सैन्याचा बक्षी म्हणून मुबारकखानची नेमणूक करण्यात आली. याच दिवशी अकबराने आपल्या आणखी दोन सेना दोन दिशांनी रवाना केल्या. झैन खान कोकाच्या हाताखालील फौज स्वात व बाजौर यांचा कब्जा घेण्यासाठी निघाली. काबूलकडे जाणाऱ्या बादशहाच्या मार्गात अडथळा आणणाऱ्या युसुफ झाओ जमातीचे पारिपत्य करण्याचे काम या सेनेकडे सोपवण्यात आले. हसन खान बटनी, राजा मुकुंद मान, जनेश बहादूर, आस्करन पंचानन, हिरा प्रधान, रामचंद्र इत्यादि प्रमुख सरदारांना झैनखानला जाऊन मिळण्याचे हुकूम सुटले. या सैन्याच्या बक्षीचे काम अरबखान जहानी याच्याकडे सोपवण्यात आले. इस्माईल कुलीखान याच्या हाताखालची दुसरी फौज बलुचिस्तानचा पाडाव करण्यासाठी रवाना करण्यात आली. हशीम खानला या सैन्याचा बक्षी नेमन्यात आले. रायसिंग, अतुल कासीम टामकीन आणि इतर काही सेनानी या फौजेबरोबर होते.

## मानसिंगला काबुलची सुभेदारी : रौशानियांचा पाडाव

याचवेळी काबूलच्या सुभेदारीवर मानसिंगची नेमणूक करून एका प्रबळ सेनेनिशी त्याची तिकडे रवानगी करण्यात आली. हिंदुस्थानी फौजेतले सय्यद बमीद बोखारी, बख्तीयार बेग, माह कुली बेग हाजी बेग इत्यादी अधिकाऱ्यांना मानसिंगबरोबर पाठवण्यात आले. खैबरच्या खिंडीत धुमाकूळ घालून हिन्दुस्थान

आणि अफगाणिस्थान यांच्यामधील रस्ता धोक्यात आणणाऱ्या रौशानियांचे जाता जाता पारिपत्य करण्याचे खास काम मानसिंगवर सोपवण्यात आले होते. २३ डिसेंबर रोजी अकबर अटक बनारसला आला आणि दुसऱ्या दिवशी मानसिंग आणि झैनखान कोका यांना बोलावून घेऊन त्यांनी करावयाच्या कामाबद्दलच्या खास सूचना अकबराने त्यांना दिल्या. काबूलमध्ये गोंधळ माजविण्यास मुख्य कारण असलेल्या फरिदुनला मक्केस हद्दपार करण्यात आले. काबूलमधील इतर प्रतिष्ठित नागरिकांचे योग्य स्वागत करून त्यांचा सन्मान करण्यात आला. त्या प्रांतातील घाबरून गेलेल्या लोकांवर याचा फार चांगला परिणाम झाला. अली मस्जीदचा कब्जा घेऊन तिथल्या टेकडीवरील किल्ला रात्रीच्या अंधारात रौशानिया टोळीने हस्तगत केला होता. त्यांचा मानसिंगाने पराभव केला. किल्ला खाली करून दुसऱ्या ठिकाणी निघून जाणे त्यांना भाग पडले; पण तेथेही त्यांचा पराभव करून त्याहि जागेतून त्यांना हाकून देण्यात आले.

रौशानिया किंवा इलुमिनाटी यांचा मुघल इतिहासकारांनी तुच्छतेने तारिकी किंवा काळे लोक असा उल्लेख केलेला आहे. सरहद्द प्रांतामधील टोळयांतली ही एक कडवी, धर्मांध जमात असून बायाझिद नावाचा एक अफगाण त्यांचा पुढारी होता. १५२५ साली जलंदरला याचा जन्म झाला. १५५९ च्या सुमारास सरहद्द प्रांतात जाऊन तिथे त्याने आपले घर केले. तेथे 'आपण ईश्वराचे प्रेषित आहो' असा बहाणा करून त्याने सरहद्दीवरील लोकांना आपल्या नव्या धर्मात दाखल करून घेतले आणि खैर-उल-बयान नावाचे एक पुस्तक पण लिहिले. त्याने पीर रौशन ही पदवी धारण केली आणि म्हणून त्याच्या अनुयायांना रौशानिया असे म्हणू लागले. पीराचा ईश्वरी अंश आणि त्याचे कधीही भंग न पावणारे पावित्र्य हे या पंथातले मुख्य तत्त्व असून या पंथातल्या सर्वांवर पीराची एकमेव सत्ता होती. पीराच्या आज्ञेचे निमूटपणे पालन करणे आणि तसे न केल्यास मृत्यूस सादर होणे असा या पंथाचा खाक्या होता. "कुराणाचा अव्हेर करून सर्व चराचर दृष्टीत एकच ईश्वर आहे आणि सर्व त्याचीच रूपे आहेत; कुठल्याही तऱ्हेची पूजाअर्चा किंवा धर्मासाठी देहदंड या ईश्वरास मान्य नसून त्याचा प्रेषित हाच त्याचे जगातील अत्यंत परिपूर्ण रूप आहे आणि त्याच्या सर्व आज्ञा मन: पूर्वक पाळणे हाच खरा धर्म आहे, या धर्मातील लोकांना काफिरांचा जमीन-जुमला ताब्यात घेण्याचा पूर्ण हक्क असून सरते शेवटी सर्व जगावर अधिराज्य मिळविण्याची ग्वाही या धर्माअन्वये रौशनने दिलेली होती" लुटालूट आणि डाकेगिरी हे रौशानियांच्या मते एक धर्मकृत्य

होते. रौशनची आगलावी शिकवणूक व खून आणि लुटालूट याला त्याच्या धर्माने दिलेली मान्यता, यामुळे पेशावरजवळच्या दऱ्याखोऱ्यात राहणारे मोहंमद, घारीबेल, खलील आणि महंमूद झाई इत्यादी टोळयांतले अनेक लोक त्याला येऊन मिळाले कारण त्यांचा मुख्य धंदा लूटमार आणि दरोडेखोरी हाच होता. रौशनच्या चळवळीतला धोका ओळखून काबूलच्या मिर्झा हकीमने त्याला आपल्यासमोर बोलावून घेतले; पण रौशनने 'मी इस्लामविरोधी नाही' अशी मिर्झा हकीमची मोठ्या शिताफीने समजूत करून दिली आणि स्वतःची सुटका करून घेतली. रौशनने आपली चळवळ आता तीराह, सफेत कोह या भागात सुरू केली आणि आपल्या हाताखाली एक बेशिस्त पण मोठी फौज उभी करून मुघलांच्या ताब्यातून सरहद्दीवरील पठाणांची सुटका करण्याची चळवळ त्याने सुरू केली. यामुळे काबूलच्या सरकारशी त्याला सामना द्यावा लागला आणि त्यात तो पराभूत झाला. १५८५ साली रौशन मरण पावला. यानंतर काही काळ त्याचा मुलगा ओमार हा या लोकांचा पुढारी झाला; पण सरतेशेवटी त्याचा १४ वर्षांचा सर्वांत धाकटा मुलगा जलाला हा या लोकांचा पुढारी झाला. हा लहान असला तरी लढण्यात चांगला तरबेज असून पुढाऱ्याचे गुण त्याच्यात होते. १५८१ साली अकबर काबूलच्या स्वारीवरून परत येत असता जलालाला पकडून त्याच्यासमोर उभे करण्यात आले होते. बादशहाने त्याचा योग्य तो पाहुणचार केला, पण दरबारी जीवन त्याच्यासारख्या माण–साला मानवण्यासारखे नव्हते, त्यामुळे लवकरच तो दरबारातून पळून गेला आणि खैबर प्रांतात राहणाऱ्या उर्कझाई, आफ्रिडी, बंगश इत्यादि रानटी टोळयांना एकत्र करून त्याने मुघलांना हैराण केले. काबूल आणि हिंदुस्थानमधील रस्ता अडवून तिथून जाणारे व्यापारी आणि प्रवासी यांना लुटून त्यांचे खून पाडले आणि बादशाही फौजांबरोबर निकराचा लढा दिला.

## स्वात आणि बाजौर वरची मोहीम

स्वात आणि बाजौर येथल्या डोंगराळ प्रदेशात राहणाऱ्या युसफझाई टोळयां-विरुद्ध मोहीम आता जोरात सुरू करण्यात आली. लष्करीदृष्ट्या हा ६० मैल लांबीचा आणि ३० ते ४० मैल रुंदीचा डोंगराळ मुलूख अतिशय महत्त्वाचा आहे. याच्या दोन बाजूंना सिंधू नदी असून, दुसऱ्या दोन बाजूंना काबूल नदी आणि उत्तरेकडील डोंगराळ मुलूख आहे. यातला काही भाग पठारासारखा आहे; पण बहुतेक सर्व प्रदेश छोट्या छोट्या टेकड्या, घळी आणि सुंदर दऱ्याखोऱ्यांनी व्यापलेला आहे. बादशाही फौजेचा सेनापती झैन खान कोका या प्रांताच्या

पश्चिमेकडील बाजौर येथे आला. सैन्याची दुसरी तुकडी पेशावर आणि स्वात नदीमधले सामा पठार ओलांडून मंदार टोळचांच्या निवास्थानाकडे निघाली. शेख फरीद याच्या हाताखाली अकबराने आणखी एक फौज तिकडे पाठवली. या प्रांतावर चढाई केल्यानंतर परत येऊन या तुकडीने असा सल्ला दिला की सपाट प्रदेशावर शत्रूचा नायनाट करण्यासाठी अत्यंत प्रबळ सैन्य मदतीला पाठविणे फार जरूर आहे; कारण तसे केल्याशिवाय वरील डोंगराळ मुलूख काबीज करून घेण सर्वस्वी अशक्य आहे. या सल्यानुसार अकबराने सैद खान गख्खरच्या हाताखाली आणखी काही फौज तिकडे रवाना केली आणि झैन खान कोकाच्या मदतीला एक मोठे सैन्य पाठविण्याचे ठरवले. दुर्दैवाने या सैन्याचे अधिपत्य बिरबलासारख्या दरबारातल्या कवीला आणि विनोदी मुलकी अधिकाऱ्याला देण्यात आले. खरे पाहता या सैन्यावर एखाद्या कसलेल्या लष्करी अधिकाऱ्याची नेमणूक करावयास पाहिजे होती, पण त्यावेळची एकंदर परिस्थिती पाहता अकबराची या चुकीच्या नेमणुकीबद्दलची जबाबदारी अंशत: कमी होते. कुठल्याही तऱ्हेचा लष्करी पराक्रम करून न दाखवता बिरबल आणि अबुल फझल यांनी बादशहाची फार मर्जी संपादन केली होती. हा दरबारात व दरबाराबाहेर एक मोठा चर्चेचा विषय झालेला होता. या मूर्ख टीकाकारांची तोंडे बंद करण्यासाठी आणि आपल्याला मिळालेली बढती योग्यच होती हे सिद्ध करण्यासाठी हे दोघेही लढाईवर जाण्यास फार उत्सुक होते. युसुफ झाईंच्या विरुद्ध निघालेल्या सैन्याचे आधिपत्य आपणास देण्याची त्यांनी बादशहाला विनंती केली. दोघांनाही न दुखवता निर्णय घेण्याच्या उद्देशाने अकबराने चिठ्ठ्या टाकून या दोघांपैकी एकाची निवड करण्याचे ठरविले. याचा निकाल बिरबलाच्या बाजूने झाला. म्हणून २२ जानेवारी १५८६ रोजी बिरबलला सैन्यात दाखल होण्याची परवानगी मिळाली. दानिष्कोलच्या वाटेने झैन खान बाजौरात शिरला व तिथला ताबा घेऊन तो पूर्वेला स्वातच्या दिशेने निघाला स्वातला टोळीतले ४०,००० लोक राहात होते. त्यांना अनेक वेळा तोंड देऊन झैन खानने स्वात नदीच्या उत्तर तीरावर चकदरा येथे एक किल्ला बांधला. याच वेळी बिरबल आणि हकीम अब्दुल फते अटकहून पेशावर आणि स्वात नदीमधल्या समाहा पठाराच्या मार्गाने उत्तरेकडे जाण्यास निघाले. दुर्दैवाने बिरबल आणि झैन खान यांच्यामध्ये भांडणे सुरू झाली. हकीम अब्दुल फते याच्याशी पण बिरबलाचे पटेना. कारण या दोघांपेक्षाही आपला अधिकार आणि प्रतिष्ठा मोठी आहे असे तो समजत असे. मालखंडच्या खिंडीत दोन्ही सैन्ये एकमेकांना येवून मिळाली; पण सेनानायकांच्या आपसातील भांडणांमुळे पुढील कारवाईत व्यत्यय

आला. सरतेशेवटी चकदऱ्याच्या किल्ल्याजवळ एकत्र जमून पुढील हालचालीबद्दल सर्वांनी मिळून सल्लामसलत करण्याचे ठरले. जिंकून घेतलेल्या प्रदेशाचे रक्षण करण्यासाठी मी मागे राहतो आणि बिरबल आणि हकीम यांनी काराकार आणि बुनेर यांचे पारिपत्य करण्याचे काम अंगावर घ्यावे असे झैन खानने सुचवले. किंवा बिरबल आणि हकीम यांनी शरण आलेल्या टोळ्यांवर लक्ष ठेवून तिथल्या प्रांतावर देखरेख ठेवावी आणि त्याने स्वत: कराकार आणि बुनेर मधील टोळ्यांचे पारिपत्य करण्यासाठी जावे असाही पर्याय त्याने सुचवला. बिरबलने त्याचा हा सल्ला मानला नाही. पहाडी मुलखातल्या टोळ्यांना चांगला धडा शिकवावा, पण त्यांचा प्रदेश ताब्यात घेवू नये अशा तऱ्हेचा आदेश त्यांना मिळाला होता, असे बिरबलाचे म्हणणे होते. युद्धाचे डावपेच माहीत नसलेल्या हकीमच्या व बिरबलच्या असे लक्षात आले नाही की, पहाडी मुलखातल्या दंगेखोर टोळ्यांचे पारिपत्य करण्यासाठी त्यांच्या घरादारांचा कब्जा घेणे अनिवार्य होते. बिरबलचे बादशहाजवळ असलेले वजन ध्यानात घेवून झैन खानने आपल्या सर्वस्वी योग्य सूचनेचा विशेष आग्रह धरला नाही. परिणामी १२ फेब्रुवारी १५८६ रोजी तिन्ही सेनापती चकदऱ्याचा किल्ला सोडून कराकारकडे निघाले. दुसऱ्या दिवशी तिथल्या खिंडीजवळ त्यांची आणि शत्रूची लढाई झाली. पहिल्या चकमकीत बादशाही फौजेचा विजय होऊन हजारो टोळीवाले त्यांच्या ताब्यात सापडले; पण शत्रूने त्यांच्यावर पाठीमागून हल्ला केला आणि तो सबंध दिवस, रात्र व दुसऱ्या दिवशी पण युद्ध चालू राहिले. बादशाही फौजांचा विजय झाला, असे दिसत असले तरी या चकमकीत त्यांची अतोनात हानी झाली. होते त्याच ठिकाणी तटबंदी उभारून तेथून शत्रूला तोंड द्यावे, कारण त्या ठिकाणी पाणी भरपूर असून आपल्याजवळ पुरेसा धान्यसाठा पण आहे ही झैन खानची शहाणपणाची सूचना पुन: एकदा अमान्य करण्यात आली आणि शत्रूला सामना देण्यासाठी बादशाही सैन्य पुढे निघाले. आपले प्रचंड सैन्य पाहून शत्रूवर चांगलाच वचक बसेल आणि हातात सापडलेल्या अनेक टोळीवाल्यांना ओलीस धरता येईल, या गोष्टी झैन खानने मोठ्या आग्रहाने प्रतिपादन केल्या; ही पण सूचना बिरबलाने मान्य केली नाही आणि डोंगराळ मुलुखातल्या अत्यंत बिकट वाटेने १६ तारखेला बादशाही फौजा पुढे निघाल्या. रात्री शत्रू अचानक छापा घालण्याचा संभव आहे, अशी धोक्याची सूचना बिरबलला देण्यात आली होती आणि म्हणून ही घळी रात्र पडण्यापूर्वीच ओलांडून जाण्याचा त्याचा आटोकाट प्रयत्न होता; पण एका अरुंद तोंडाच्या खिंडीशी येता येताच सूर्यास्त झाला. बादशाही सेनेवर अफगाणांच्या टोळ्या एखाद्या टोळधाडीप्रमाणे प्रथम मागून आणि नंतर सर्व बाजूंनी तुटून

पडल्या. दगडधोंड्यांचा आणि हत्यारांचा मुघल सैन्यावर मारा होवू लागला. आजूबाजूच्या रस्त्यांची माहिती नसलेले आणि गोंधळून गेलेले बादशाही सैन्य खिंडीचा माथा सोडून खाली सपाट जमिनीकडे धावत सुटले. यामुळे सैन्याची उभी फळी अस्ताव्यस्त होवून सर्वत्र अधिकच गोंधळ माजला. अनेक जण पळत असतानाच मारले गेले. बाकीचे सैन्य रात्रीच्या वेळी रस्ता चुकून एका घळीजवळ येवून पोहोचलो आणि तेथे युसफ झाई टोळ्यांनी त्यांच्यातल्या ८००० सैनिकांची कत्तल केली. जिवानिशी पळून जाणाऱ्या बिरबलासकट बारा वरिष्ठ अधिकारी यात मारले गेले. झैन खान कोका आणि हकीम अबुल फते हे मात्र जिवानिशी सुटले आणि बादशाही छावणीवर सुखरूप जाऊन पोहोचले.

## अकबराचा शोक

या अनर्थाची बातमी दुसऱ्या दिवशी बादशाही छावणीत पोहोचली आणि ती ऐकून अकबराला अतिशय दुःख झाले. याबद्दल अबुल फझल लिहितो, "स्वामिनिष्ठ नोकरांचा मृत्यू–त्यातल्या त्यात धार्मिक बाबीतला त्याचा सहकारी असलेला बिरबल मारला गेल्यामुळे बादशहाला अतिशय वाईट वाटले. दोन दिवस त्याने अन्नपाण्याला स्पर्शसुद्धा केला नाही." याच संबंधात बदायुनी लिहितो, "बिरबलाच्या मृत्यूमुळे बादशहाला जितके दुःख झाले तितके दुसऱ्या कुठल्याही सरदाराच्या मृत्यूमुळे झाले नाही." "घळीमध्ये पडलेला बिरबलाचा मृत देह आणून त्याला अग्नीसुद्धा देता आली नाही ही अत्यंत दुःखद घटना आहे" असे बादशहा म्हणाला. बिरबलाचा विश्वासघात केल्याबद्दल बादशहाने झैन खान कोका व हकीम अबुल फतेला दोष दिला.

## बिरबलाची कारकीर्द–

युसुफ झाओंच्या युद्धात मारला गेलेला बिरबल हा अकबराचा रोजच्या बैठकीतला एक अत्यंत आवडता सोबती होता. अकबराच्या दरबारातील नवरत्नांपैकी हा एक असून अकबरावर त्याचे अबूल फझल पेक्षाही जास्त वजन होते. त्याची उपजत बुद्धी, समजूतदारपणा, स्वामीनिष्ठा आणि बादशहाची मेहेरबानी यामुळे तो साध्या कारकुनीतून फार उच्च पदाला चढला. त्याचे मुळचे नाव महेशदास असे असून त्याचा जन्म काल्पी येथे १५२८ च्या आसपास झाला होता. जातीने तो ब्रम्ह भट्ट असून एक अगदी सामान्य प्रतीचा कवी म्हणून त्याने आपल्या जीवनास सुरुवात केली. अकबराची भेट होण्यापूर्वी काही

दिवस भाठ्याचा राजा रामचंद्रकडे आणि अंबरच्या दरबारात त्याने नोकरी केली होती. अकबराच्या दरबारात आल्यावर बादशहाची मर्जी आणि विश्वास संपादन करून तो फार झपाट्याने वर चढला. विशेष शिकलेला नसला, तरी त्याची उपजत बुद्धी फार उच्च दर्जाची होती. तो मोठा गोष्टी–वेल्हाळ असून विनोदप्रचूर संभाषण आणि हजरजबाबीपणा यात त्याचा हात धरणारा आणि बादशहाला खूष ठेवणारा दरबारात एकही हिंदू किंवा मुसलमान सरदार नव्हता. त्याची काव्य–प्रतिभा उच्च दर्जाची असून त्याने सांगितलेल्या अनेक गोष्टी, कहाण्या आणि विनोदवचने ही आजतागायतसुद्धा प्रचलित आहेत. हिंदीतला कविराय म्हणजे राजकवी हा पहिला किताब त्याला बहाल करण्यात आला आणि काही दिवसांनी कांग्रा जिल्ह्यातील नागरकोट हे गाव जहागीर म्हणून त्याला देण्यात आले. त्यानंतर सुभेदारीची वस्त्रे, राजा हा किताब आणि बुंदेलखंडमध्ये कलिन्जरची जहागीर त्याला देण्यात आली. अखेरीस २००० ची मनसबदारी पण त्याला मिळाली. बादशहाच्या नोकरीत खास अधिकाराची अशी जागा त्याला दिलेली नव्हती, असा चुकीचा समज आहे. १५८३ साली न्यायखात्यावर त्याची नेमणूक होऊन अर्ज दाखल करणे, त्याची छाननी करणे आणि न्याय मागण्यासाठी आलेल्या लोकांना बादशहा समोर उभे करणे हे काम त्याच्याकडे सोपविलेले होते. काही जिनसांच्या खरेदी-विक्रीचे कामही त्याच्याकडे होते आणि हिन्दू राजांकडे वकील म्हणून अनेक वेळा त्याची नेमणूक झाली होती; पण त्याचे मुख्य काम अकबराची सोबत करणे हेच होते.

अकबराच्या दिन-ए-इलाहि पंथाचा हा एकमेव प्रसिद्ध हिन्दू अनुयायी होता. बहुतेक सर्व हिन्दूप्रमाणे तो सूर्याची उपासना करणारा असून अकबराच्या सूर्योपासनेला तोच कारण होता, असे म्हटले जाते. सर्व धार्मिक चर्चांमध्ये प्रामुख्याने भाग घेऊन अकबराची राहणी आणि विचार हिन्दू धर्माला अनुकूल करण्यामध्ये त्याचा फार मोठा वाटा होता. त्याच्या मृत्यूमळे अकबराला फार दु:ख झाले आणि हिन्दू धर्माप्रमाणे अग्नी देण्यासाठी त्याचे मृत शरीर सापडले नाही याबद्दल बादशहाला फार हळहळ वाटली. फार उदार असल्या बद्दल बिरबलाची ख्याती होती. दान मागण्यास आलेल्या याचकांना–विशेषतः ते कवी असल्यास तो फार मोठ्या रकमा देत असे. ब्रम्हदास या टोपण नावा-खाली त्याने स्वत: अनेक कविता, दोहे आणि विनोद प्रचुर म्हणी लिहून ठेवल्या आहेत. त्याचा थोरला मुलगा लाला याला अकबराने आपल्या नोकरीत ठेउन घेवून मनसबदार केले. ही घटना अकबराच्या राज्याला ४५ वर्षे पुरी होवून गेल्यावर ४६ व्या वर्षांत झाली.

## युसुफझाओं विरुद्ध दुसरी मोहीम:

वरील पराभवाची दु:खद वार्ता समजताच अकबराने राजा तोडरमलच्या हाताखाली एक मोठी फौज युसुफझाओंचे पारिपत्य करण्यासाठी रवाना केली ही फौज सिंधू आणि काबुल या दोन्ही नद्या एकाच दिवशी पार करून गेली झैनखान कोका, अबुल फते आणि काझी अली यांनासुद्धा या फौजेला जाऊन मिळण्याचा आदेश देण्यात आला. टोळीवाल्यांना नामशेष करण्याचा अकबराचा हेतू नव्हता, हे केवळ अशक्यप्राय होते. तसेच पिढ्यान्‌पिढ्या अंगवळणी पडलेली वाटमारी पण सोडून देणे त्या टोळ्यांना भाग पाडणे अशक्य होते. अकबर हे पूर्णपणे जाणून होता, म्हणून त्याने साम आणि दंड हे दोन्ही उपाय टोळीवाल्यांच्या विरुद्ध योजले. टोळीवाल्यांची कत्तल करण्याचा प्रयत्न सोडून देऊन त्यांना शरण येण्यास भाग पाडावे असा अकबराचा हुकूम होता. या योजनेनुसार या मोहिमेत तोडरमल बरोबर असलेला मानसिंग टोळीवाल्यांच्या विरुद्ध बुनेरच्या मार्गाने निघाला. ओहिन्द (उदबंध) येथे एक किल्ला बांधून त्याच्या आश्रयाने त्याने शत्रूवर हल्ले चढविण्यास सुरुवात केली. त्याचवेळी तोडरमलने लुगार टेकड्याजवळ आपली छावणी उभी केली. शत्रूचा दोन्ही बाजूने कोंडमारा करून आणि त्यांची रसद तोडून त्यांना शरण येण्यास भाग पाडण्याचा हा डावपेच होता. ही योजना यशस्वी झाली. डोंगराळ मुलुखात लूट मारून अफगाणांवर हल्ले चढवून त्यांना कैद करण्याचा रोजचा कार्यक्रम सुरू झाला. रसद तुटल्यामुळे आणि रोगराई उद्‌भवल्यामुळे टोळीवाल्यांचे फार हाल झाले. पुन:पुन: पराभूत होऊन त्यांच्यातले अनेक लोक मारले गेले. अनेकांना कैद करून त्यांना इराण व तुराणकडे पाठवून देण्यात आले. राहिलेल्यांचे पुढारी प्रेतावर घालण्याचे कापड गळ्याभोवती गुंडाळून इस्माईल खान पुढे हजर झाले आणि स्वात, बाजौर आणि बुनेर या भागांत काही काळ तरी शांतता प्रस्थापित झाली.

## तुराणचे शिष्ट—मंडळ

दरम्यान तुराणाचे एक शिष्टमंडळ मानसिंगच्या संरक्षणाखाली खैबरची खिंड सुरक्षितपणे ओलांडून बादशहाच्या छावणीत आले. अब्दुल्लाखानने उत्त-मोत्तम वस्तू नजराणा म्हणून बादशहाकडे पाठविल्या होत्या. त्यांत निवडक कबुतरे आणि त्यांना शिकवणारा हबीब हे पण होते. अबुल फझल असे सांगतो की, अकबराच्या सैन्यातील बांधणी खात्याने खैरबखिंडीतला रस्ता साफ करून तो गाड्यांच्या वाहतुकीस खुला केला आहे आणि काबुलला जाण्याच्या विचारात

अकबर आहे, असे जाहीर होताच तुराणचा अब्दुल्ला खान याला फार काळजी वाटू लागली. त्याने आपल्या पदरचा प्रसिद्ध सय्यद कुरेश याला अनेक घोडे, उंट, खेचरे, शिकारीचे प्राणी, अंगावर घालावयाचे झगे आणि राज्यातल्या इतर दुर्मिळ वस्तू बरोबर घेऊन बादशहाच्या दरबारी पाठवून दिले. मध्य आशियाबद्दल अकबराचे धोरण समजावून घेवून त्याच्याशी सलोखा करण्याच्या हेतूने आलेल्या या वकिलास अकबराची भेट होण्यासाठी काही दिवस थांबावे लागले; कारण यावेळी बादशहा बिरबलाच्या मृत्यूचे सुतक पाळत होता. १ मार्च १५८६ रोजी अटक येथे बादशहाने त्याची भेट घेतली आणि त्याच्या सन्मानार्थ एक खाना दिला. अब्दुल्ला खानचे पत्र आणि त्याने पाठविलेला नजराणा वकिलाने बादशहापुढे सादर केला. अकबराने या वकिलाला आपल्या दरबारात पुष्कळ दिवस ठेवून घेतले आणि २३ ऑगस्टला अकबर लाहोरच्या मुक्कामात असताना त्याला स्वदेशी परत जाण्याची परवानगी देण्यात आली. त्याच्याबरोबर हकीम हुमाम या चतुर मुत्सद्याला पाठविण्यात आले. अकबराचे शांततामय धोरण अब्दुल्लाखानला समजावून घेण्याचे काम हकीम हुमामकडे देऊन त्याचे बेत आणि धोरण समजावून घेण्याचे सांगण्यात आले होते. हकीम हुमाम आणि त्याच्या अनुयायांबरोबर बादशाहाचे एक पत्र आणि भेटीदाखल दिलेल्या वस्तू होत्या. अब्दुल्लाचा बाप सिकंदर खान १५८३ सालीच मेला होता. त्याबद्दल आपला शोक प्रदर्शित करणारा निरोप पण बादशहाने पाठविला. हे पत्र अलंकारिक फारशी भाषेत लिहिलेले असून त्यात मामुली बाबींचाच उल्लेख करण्यात आला होता. मी इस्लामी धर्मापासून चळलो आहे अशा तऱ्हेच्या अफवा केवळ माझी बदनामी करणाऱ्या आहेत, असेही अकबराने या पत्रात लिहिले होते. तुर्कस्थानच्या चढाईपासून इराणचे रक्षण करण्यासाठी एक मोठी फौज पाठविण्याची आपली इच्छा आहे आणि त्यात उझबेगच्या राजाने आपल्याला सहाय्य द्यावे असेही या पत्रात लिहिले होते. या मोहिमेच्या तयारीत गुंतल्यामुळे (ही मोहीम कधीच हाती घेण्यात आली नाही) हेदजजला जाणाऱ्या यात्रेकरूंना त्रास देणाऱ्या पोर्तुगीजांचे पारिपत्य मला करता येत नाही, असाही उल्लेख त्यात होता. शहारुख मिर्झावर आलेले संकट आणि त्यामुळे बदक्शान सोडून देऊन त्याला हिंदुस्थानला पळून यावे लागले, या घटनेबद्दल अब्दुल्लाने केलेला बचावात्मक खुलासा अकबराने मान्य केला.

## टोळयांची पुन्हा चळवळ आणि ती हाणून पाडण्याचा मुघलांचा प्रयत्न

रौशानियांचा पुढारी जलाल याच्या नेतृत्वाखाली टोळयांची बंडखोरी

पुन: सुरू झाली. वायव्येकडील प्रदेशातील इतर जमातींतही ही बंडखोरी आता पसरली होती. युसुफझाई आणि रौशानियांच्या खेरीज पेशावरच्या १०,००० मोहंमद आणि घुरी कुटुंबात विभागलेल्या टोळयांनी पण आता जलालाच्या हाताखाली असलेल्या रौशानियांबरोबर हात मिळवणी केली. पेशावरचा फौजदार हमीम बोखारीला त्यांनी मारून टाकले आणि किल्ल्याला वेढा दिला. १५८६ सालच्या नोव्हेंबर महिन्याच्या अखेरीस झैन खानला त्यांचे पारिपत्य करण्याची आज्ञा झाली. काबूलमध्ये असलेल्या मानसिंगला पण बदक्शानच्या मिर्झा सुलेमानला बादशहाच्या दरबारात आणीत असताना सप्टेंबर १५८६ मध्ये जलालाबादपासून २० मैलांवर असलेल्या पेश बुलाक या गावी मानसिंग आजारी पडला आणि दीड महिना त्याला अंथरुणात पडून राहावे लागले. मानसिंग आजारी पडला आहे असे कळताच रौशानियांनी पेशावरचा वेढा उठवून त्याच्यावर हल्ला करण्याची तयारी केली. पेशावर आणि तीरामधील रस्त्याची मोर्चेबंदी करून त्यांनी दगडाचे ढीगच्या ढीग रचून ठेवले. आता युसुफझाओी रौशानियांना येऊन मिळाले आणि अशा तऱ्हेने हे बंड ४ टोळयांमध्ये पसरले. सुदैवाने मानसिंग लवकरच बरा झाला; आणि आपला मुलगा हिंमतसिंग याला सुलेमान मिर्झाच्या रक्षणासाठी ठेऊन त्याने बंडखोरांशी सामना देण्याची तयारी केली. दरम्यान बादशहाच्या दरबारातून पण अधिक कुमक आली आणि अली मस्जीद जवळ मानसिंगाने शत्रूबरोबर यशस्वी सामना दिला. अवघड वाट आणि टोळयांतले असंख्य लोक यांना न जुमानता त्याने सुलेमानला पेशावरला सुखरूप पोहोचवले. याचवेळी झैनखान कोका जादा कुमक घेऊन हजर झाला. तरीसुद्धा टोळीवाल्यांच्या डोंगराळ मुलखातल्या वस्तीत शिरण्याचे मानसिंगला जमले नाही. काही काळ तो खिडींजवळील जमरुद या गावी छावणी देऊन राहिला. यामुळे बादशहाची त्याच्यावर इतराजी झाली आणि पेशावरच्या मार्गे टोळीवाल्यांच्या मुलुखात शिरण्याची आज्ञा त्याला देण्यात आली. त्याचवेळीं १८ एप्रिल १५८७ रोजी मुत्तलिब खानच्या हाताखाली आणखी एक फौज टोळीवाल्यांचा पाडाव करण्यासाठी पाठवून देण्यात आली. पेशावरच्या दक्षिणेस खाप्रा डोंगरी रांगाच्या शेवटी असलेल्या कोपारा (चौपारा) येथे सिंधू नदी पार करून इसाखेलच्या खेड्याजवळ ही फौज आली. ती फौज दार समंदला पोहोचल्यावर जलाला रात्री हल्ला करणार आहे अशी अफवा उठली; पण त्याचा काही फायदा न झाल्यामुळे जलालाने दोन्ही बाजूंकडून बादशाही फौजांवर हल्ला करण्याचा प्रयत्न केला आणि ऑगस्ट महिन्याच्या सुरुवातीस लढाईला तोंड लागले. दुसऱ्याच एका मार्गाने जलाला मुघल छावणी-

जवळ आला आणि मुघल सैन्य आपल्या राहुटचा उभारीत असतानाच त्याने त्यांच्यावर हल्ला चढवला; पण त्यात फार मोठी प्राणहानी होऊन तो पराभूत झाला. याचा परिणाम म्हणजे आफ्रिडी आणि उर्कझाओी टोळचा शरण आल्या. मुघल सैन्याने आता युसुफझांओी टोळचांचे जाण्यायेण्याचे दळणवळणाचे मार्ग रोखून धरण्यास सुरुवात केली. त्यातल्या पुष्कळांना ठार मारण्यात आले आणि पुष्कळांना कैद करून गुलाम म्हणून विकण्यात आले. इतके हाल सहन करून सुद्धा युसुफझाओींनी वाटमारी करण्याचा, प्रवाशांना त्रास देण्याचा आपला क्रम चालूच ठेवला. त्यामुळे डोंगरी टोळचांचे पारिपत्य करण्यासाठीं खास पाठविलेला झैनखान कोका स्वात आणि बाजौरला येऊन पोहोचला. जलालाला पकडण्याचे जोरात प्रयत्न करण्यात आले, आणि त्यासाठीं फौजेच्या निरनिराळचा तुकडचांना निरनिराळचा दिशांनी रौशानिया आणि युसुफझाओी टोळचांनी व्यापलेल्या प्रदेशावर एकत्र होण्यासाठी पाठविण्यात आले. बाजौरमधील नवाला खिंडीत मोर्चे वांधून बंड ब्रोरांनी लढण्यानी तयारी केली. झैनखान कोकाने या जागी हल्ला चढविताच जलाला तीरांला पळून गेला. याला इस्माईल कुली खानचा बेसावधपणा कारण असल्यामुळे त्याची कानउघडणी करण्यात आली; त्याच्या जागी असफखानची नेमणूक झाली. नंतर दीर्घकाळ चालू राहिलेल्या मोहिमेत जलालाचा बाप समजला जाणारा मुल्ला इब्राहिम याला पकडण्यात आले; आणि जलाला स्वत: मोठचा बिकट परिस्थितीत सापडला. एका ठिकाणाहून दुसऱ्या ठिकाणी आपला मुक्काम हलवता हलवता सरते शेवटी त्याला आपले घरदार सोडून तुराणला पळून जावे लागले. ४ ऑक्टोबर १५८८ रोजो अफगाणांनी जलालाचे कुटुंब बादशहाच्या स्वाधीन केले आणि आफ्रिकी आणि उर्कझाओींना स्वत:च्या वागणुकीची खात्री देण्यासाठी ओलीस माणसे ठेवावी लागली. खैबर भागात शांतता राखण्याचे पण त्यांनी कबूल केले. याचवेळी झैनखानने स्वात जिंकून घेतले; पण आपल्या मायभूमीचे रक्षण करण्यासाठी अफगाणी टोळचांनी आपल्या पराक्रमाची शर्थ केली. त्या भागात अनेक किल्ले बांधून आणि ठिकठिकाणी भक्कम शिबंदी ठेऊन झैनखानने व्यापाऱ्यांचा आणि प्रवाश्यांचा वहातुकीचा रस्ता सुरक्षित करून दिला.

पण जलाल काही स्वस्थ बसला नव्हता. इ. १५९२ च्या सुरुवातीस तो तुराणहून परत आला आणि तीरा येथे आफ्रिडी आणि उर्कझाओी या रानटी टोळचांना आपल्या निशाणाखाली एकत्र करून त्याने पुन: बंडास सुरुवात केली. रौशानियाचे बंड मोडून काढण्यासाठी अकबराला १९ मार्चला काबूलची आणि सरहद्दीवरची फौज कासीमखान आणि आसफखान यांच्या

हाताखाली देऊन तिकडे पाठविणे भाग पडले. नंतर लवकरच स्वात आणि बाजौर येथे जाण्यासाठी झैनखान कोकाची रवानगी करण्यात आली. जलालाच्या चिथावणीला बळी पडून काकीयानी आणि महमुदझाओी टोळया युसुफझाअींना तेथे येऊन मिळाल्या होत्या. काफिरीस्तानमध्ये सर्व बंडखोर एकत्र झाले होते आणि आणिबाणीच्या वेळेस उपयोगी पडावा असा एक किल्ला पण त्यांनी बांधला होता. आपल्या पिछाडीच्या संरक्षणासाठी जागोजागी किल्ले बांधून आणि त्या बाजूने हल्ला होणार नाही असा बंदोबस्त करून झैनखानने शत्रुसमुदायावर हल्ला चढवला. अशा तऱ्हेने जीवावर उदार होऊन लढणाऱ्या अफगाणांवर त्याने खूपच दबाव आणला. चांदकारीच्या त्यांच्या किल्ल्यातून त्यांना हाकून देऊन झैनखानने तो किल्ला आपल्या ताब्यात घेतला. जलालाचा पण पराभव होऊन तो पळून गेला आणि कासीमखान दरबारात परत आला.

सरहद्दीवरील झैनखान कोकाच्या कामगिरीबद्दल सिंधू नदीच्या उत्तर तीरापासून हिंदुकुश पर्यन्तचा सर्व प्रांत त्याच्या ताब्यात देण्यात आला. तसेच तेथले सर्व सैन्य आणि सैन्यातले अधिकारी यांच्यावर पण त्याची मुख्य सेनापती म्हणून नेमणूक करण्यात आली. स्वात आणि बाजौर येथे युसुफझाअींच्या हालचालींवर लक्ष ठेवण्यासाठी शिबंदी ठेऊन रौशानियांशी लढा देण्यासाठी तो तीराच्या मार्गाने निघाला. बंगशहुन आसफखान आणि काबूलची फौज घेऊन कासीमखान त्याला येउन मिळाले आणि इलमच्या खिडीजवळ घनघोर लढाई झाली. आफ्रिकी आणि तुर्कझाओी टोळया शरण आल्या आणि जलाला काफिरीस्ताला पळून गेला; पण जलालाचा नातेवाईक वहादत अली काफीरीस्तानमध्ये कानशालीच्या किल्ल्यात ठाण मांडून बसला. झैनखानने कानशालीवर स्वारी केली आणि तेथे झालेल्या घनघोर लढाईत कानशालीचा किल्ला काबीज करून वहादत अलीला तेथून हाकून दिले (मे १५९३). राहिलेल्या शत्रूंचे पारिपत्य करण्याचे काम काही दिवस चालू राहिले; नंतर काफिरी लोक आणि बहादत अली दोघेही शरण आले आणि काशघर आणि बदक्शानच्या हद्दीपर्यन्तचा सर्व मुलुख बादशाही फौजेने जिंकून घेतला. इतक्यात झैनखान कोका दरबारात परत गेला आहे हे कळताच जलाला परत फिरला आणि तीराच्या मार्गाने अगदी जलद चाल करून तो झैनखान कोकाच्या छावणी जवळून पसार झाला. त्याला मार्गातच अडवून धरण्याचे झैनखान कोकाचे प्रयत्न फसले आणि जलाल त्याच्या हातातून निसटून तीराला जाऊन पोहचला; पण तिथल्या लोकांनी त्याला आश्रय देण्याचे

नाकबूल केल्यामुळे भांबावलेल्या मन:स्थितीत बन्नूच्या नैऋत्येस कानीगाराम् येथे तो पळून गेला.

काबूलवर नेमणूक झालेल्या कासीमखानचा बदक्शानमधून आलेल्या काही निर्वासितांनी, महंमद झमनच्या चिथावणीवरून १५९४ साली खून केला; पण त्याचा भाऊ हाशीम बेग याने परिस्थिती काबूत आणून हाताला लागतील तेवढ्या बदक्शानींना ठार केले. एवढ्या मोठ्या सरदाराचा खून झालेला ऐकून रौशानिया पुन: बंडाला प्रवृत्त झाले आणि त्यांनी पुन्हा एकदा खैबरची खिंड रोखून धरली. काबूलचा नवा सुभेदार कुलीजखान याने प्रथम तेथ शांतता प्रस्थापित केली आणि नंतर एका आडवाटेने तो तीरावर चालून गेला. त्याला वाटेतच थोपवून धरण्याचा प्रयत्न जलालाने केला, पण तो यशस्वी झाला नाही. कुलीजखानने बंडखोरांना उभारलेली एक छोटीशी गढी उध्वस्त करून टाकली. तीरा प्रांताच्या मध्यभागी अहनपोश येथे कुलीजखानने आपला तळ दिला. पण चारी बाजूंनी शत्रूने त्याला सळो की पळो करून सोडले. धान्यसामुग्रीच्या अभावामुळे त्याच्या सैन्याचे फार हाल झाले. या त्रासाला कंटाळून कुलीजखान काबुलला परत गेला. रौशानियांचे पारिपत्य करण्याचे काम यानंतर त्याच्याकडून काढून घेऊन ते हसन बेगकडे देण्यात आले. १५९७ सालच्या सुरुवातीस झैन खान कोकाची काबूलचा सुभेदार म्हणून पुन: नेमणूक करून त्याला तिकडे पाठविण्यात आले. दरम्यान २४ जानेवारी १५९८ रोजी तुराणचा अब्दुल्ला खान उझबेक मरण पावला. हिंदुकुश पर्वत तुराण आणि मुघल साम्राज्यामधली सरहद्द असावी हे त्याने १५९४ साली मान्य केले होते. त्याच्या मृत्यूमुळे रौशानीयाच्या हालचाली पुष्कळच ढिल्या पडल्या. तीरावर पुन्हा कब्जा करून झैनखान कोकाने त्या भागात सगळीकडे आपली शिबंदी ठेवून दिली. नंतर जलाल कोह सफेद येथे पळून गेला. पण इ. स. १६०० मध्ये एका व्यापाऱ्याचा वेष घेऊन तो गझनी येथे पुन: दाखल झाला. शरीफखानची फौज त्याच्यावर चालून गेली; पण त्यात त्यांना अपयश आले असे वाटून शदमन हजाराने त्याच्यावर हल्ला करून त्याला पिटाळून लावले. रहतारच्या डोंगराळ मुलुखाचा आता जलालाने आश्रय घेतला. तेथे मुराद बेग त्याच्यावर चालून गेला आणि जलालाला ठार करण्यात आले. अशा तऱ्हेने रौशनियांचे बंड जवळ जवळ संपुष्टात आले. जलालाचा मुलगा अहद दाद याने आफ्रिडी, पन्नी, उर्कझाई आणि सुरी टोळयांच्या मदतीने तीरामध्ये थोडीशी गडबड केली, पण ही स्थानिक स्वरुपाची असून तखद बेगचे तिचा सहज निकाल लावला.

## मानसिंगची बिहारला बदली

सरहद्दीवरील टोळ्यांविरुद्ध सुरू झालेल्या मोहीमेच्या जवळ जवळ आरंभीच मानसिंगची काबूलहून बिहारला बदली करण्यात आली. काबूलचा त्याचा कारभार कडक असला तरी सर्व दृष्टींनी योग्य नव्हता. त्याच्या जागी त्याचा दत्तक पिता भगवन्तदास याची काबूलला नेमणूक झाली (एप्रिल १५८६). पण प्रकृती खराब झाल्यामुळे भगवन्तदास काबूलला जावू शकला नाही आणि मानसिंगला पुन्हा काबूलला पाठविण्यात आले. तेथे मानसिंगच्या कडक अंमलास पुन: सुरुवात झाली आणि त्याने घालून दिलेल्या शिस्तीमुळे अफगाण लोक फार अस्वस्थ झाले. मानसिंगला स्वत:ला हे काम व अफगाणिस्तानची थंडी बिलकूल आवडत नसे; म्हणून अखेरीस डिसेंबर १५८७ मध्ये त्याची बिहारला बदली करण्यात आली आणि झैन खान कोकाला त्याच्या जागी काबूलचा सुभेदार नेमले. अफगाणांबद्दल उदार धोरण आणि साऱ्यात सवलती याचा अवलंब करून कोकाने त्या प्रांतात शांतता प्रस्थापित केली आणि तिथला कारभार चांगल्या रीतीने चालवला.

## काश्मीरवर विजय

या सर्व काळात काश्मीरची मोहीम अगदी आस्तेकदम चालू होती. शहारुख मिर्झा आणि राजा भगवन्तदास यांच्या हाताखाली पाठविलेली फौज काश्मीर खोऱ्याच्या तोंडाशी असलेल्या बारामुल्ला गावाच्या पश्चिमेस ४० मैलांवर बुलियास खिंडीपर्यन्त येवून पोहोचली. खिंडीतला रस्ता युसुफखानने अडवून धरला आहे असे पाहून त्यांनी त्याच्याबरोबर लढाई करण्याचे ठरविले; पण लढाईचा निकाल कोणाच्याच बाजूने लागला नाही. काश्मीर मधली भयंकर थंडी, पाऊस, बर्फ आणि सामुग्रीचा अभाव यामुळे भगवन्तदासला खुद्द काश्मीरमध्ये प्रवेश करणे दुरापास्त झाले. भगवंतदासने यानंतर युसुफखानला असा निरोप पाठविला की दुष्काळ आणि संकटे यांना न जुमानता रजपूत लोक वाटेल तो त्याग करून काश्मीरमध्ये शिरतील आणि तसे झाल्यास काश्मीरच्या खोऱ्याची धुळधाण होईल. यामुळे घाबरून जावून सलोख्याची बोलणी करण्यासाठी युसुफखान भगवंतदासला येवून भेटला. पण या गोष्टीला संमती नसलेल्या काश्मीरी सरदारांनी याकूबला आपला पुढारी नेमून मुघल सैन्यावर चढाई केली, आणि त्यांचा जबर पराभव केला. परिणामी २२ फेब्रुवारी १५८६ रोजी भगवंतदासने युसुफखानशी तह केला. तहाच्या अटी खालीलप्रमाणे होत्या—

१) केशराखाली असलेली सर्व जमीन, शालींवरचा आणि टांकसाळीवरचा कर बादशाही खजिन्यात जमा करून काश्मीरच्या राजाने मुघलांचे अधिपत्य मान्य करावे.

२) स्थानिक राज्यावर काश्मीरच्या राजाचाच ताबा राहावा.

वरील तीन खात्यांवर आपले अधिकारी नेमून युसुफखानला संरक्षणाची हमी देऊन २८ मार्च १५८६ रोजी त्याच्यासह भगवंतदास दरबारात परत आला. या तहास मान्यता न देता अकबराने मोहिमेतील पुढाऱ्यांना दोष दिला. भगवंतदास आणि इतर अधिकारी यांना काही दिवस दरबारात येण्याची बंदी करून युसुफखानला नजर–कैदेत ठेवले. आता एंजिनिअर कासीमखान, हत्ती दळाचा मुख्य फत्तेखान आणि इतर काही अधिकारी यांची काश्मीरच्या स्वारीवर खानगी करण्यात आली. युसुफखानशी तह केलेला आणि त्याला संरक्षणाची हमी दिलेला भगवंतदास यामुळे फार पेचात सापडला आणि स्वतःच्या शब्दाचा मान राखण्यासाठी त्याने आपल्या शरीरात खंजीर खुपसून घेतला; पण त्याच्या उपचाराची अकबराने ताबडतोब व्यवस्था केली आणि काही दिवसांनी भगवंतदास बराही झाला. दरम्यान काश्मीरच्या मोहिमेवर निघालेली फौज २८ जून १५८६ रोजी लाहोरहून निघाली आणि मोठ्या कष्टाचा प्रवास संपवून १ सप्टेंबर रोजी भिभारची खिंड पार करून गेली.

आपला बाप नाहीसा झाला असे समजून याकूबने शहा इस्माईल असा किताब धारण करून आपल्या देशाच्या रक्षणाची तयारी केली; पण तो शिया पंथाचा कट्टर अभिमानी असून त्याने चालवलेल्या सुन्नी पंथानुयायांच्या छळामुळे काश्मीरमध्ये यादवी–युद्धास सुरुवात झाली. मुघल सैन्य सरहद्दीजवळ येताच, सुन्नीपंथाचा पुढारी अली शेर मक्री याने त्यांच्याकडे स्वागतपर संदेश पाठविला आणि अनेक काश्मिरी मुघल सैन्याला जाऊन मिळाले. भिभारच्या मार्गाने राजेरीला पोहोचल्यावर कासीमला असे समजले की याकूब डोंगराळ मुलुखात पळून गेला आहे; पण ही बातमी चुकीची आहे हे नंतर समजून आले. कारण आघाडीची फौज कपरतलाच्या खिंडीजवळ येताच खिंडीची नाकेबंदी केल्याचे त्यांना आढळून आले. दुर्दैवाने याच वेळेस तेथे बर्फही पडला. लवकरच काश्मीरची फौज तेथे आली आणि तिथे झालेल्या चकमकीत मुघल सैन्याची फार हानी झाली. त्यांचा पुढारी जय तवाचीबाशी जखमी होऊन त्याला कैद करून शामस् चककडे नेण्यात आले. या पराभवाने घाबरून न जाता कासीमखान तसाच पुढे निघाला आणि १० ऑक्टोबर रोजी युद्धास सज्ज झाला. स्वारी करून येणाऱ्या बादशाही फौजांवर हल्ला करणाऱ्या फौजेचा शामस चक पुढारी

होता. त्याला पराभव पत्करावा लागला. खिंड ओलांडून कासीमखानने आपल्या सैन्यातला काही भाग श्रीनगरवर हल्ला करण्यासाठी पुढे पाठवून दिला. ६ ऑक्टोबर रोजी अकबराच्या नावाने खुतबा वाचून कासीमखानने मोठ्या थाटात शहरात प्रवेश केला, पण कासीमखानच्या जुलमी अंमलामुळे काश्मीरचे बंड आणखी काही वर्षे चालू राहिले. गनिमी काव्याचा अवलंब करून याकूबने मुघल सैन्यात दुफळी पाडण्याचा प्रयत्न केला. थंडीच्या दिवसात लष्करी कार-वाई करणे कठीण आहे असे वाटून कासीमखानने आपली बदली दुसऱ्या कुठल्या प्रांतात करावी अशी विनंती केल्यावरून त्याच्या जागी मिर्झा युसुफखानची नेमणूक करण्यात आली. २० फेब्रुवारी १५८८ रोजी कासीमखान दरबारात परत आला. आपल्या समजुतीच्या पण खंबीर धोरणाने सुभेदार मिर्झा युसुफने बंडखोरांचा पाडाव करून काश्मीरमध्ये शांतता प्रस्थापित केली. जुलै १५७९ च्या अखेरीस अकबर श्रीनगरहून लाहोरला परत येत असताना किश्तवारच्या डोंगरात पळून गेलेला याकूब त्याला शरण आला. अकबराने त्याला माफी करून नजरकैदेत ठेवले. तेथून त्याने पळून जाण्याचा प्रयत्न केल्यामुळे ऑक्टोबर १५९० मध्ये त्याची रवानगी बिहारमध्ये करण्यात आली व तेथे त्याला एक जहागीर देण्यात आली.

काश्मीरचे बंड संपल्यावर तिथला एके काळचा राजा युसुफखान याची अक-बराने सुटका केली आणि त्याची प्रेमाने मुलाखत घेतली. ५०० चा मनसबदार करून बिहारमधल्या एका जिल्ह्याची जहागीर त्याला देण्यात आली आणि त्याची तिकडे रवानगी झाली. अबुल फझल लिहितो, "सारासार विचाराने बुद्धीला चालना देऊन युसुफखानने आपल्या प्रजेचे पालन करावे अशी वाद-शहाची इच्छा होती. तो शहाण्यासारखा वागू लागला आहे असे समजताच काश्मीरचा सुंदर प्रांत त्याच्या ताब्यात देण्यात येईल." ओरिसामध्ये राजा मानसिंगच्या हाताखाली लढून युसुफखानने त्याचा विश्वास संपादन केला

काश्मीर हे साम्राज्यात दाखल करण्यात येऊन तो काबूल प्रांताचा एक भाग (सरकार) करण्यात आला. याची येथे नोंद करायला हवी. युसुफखानला काश्मीर कधीच परत मिळाले नाही, ही गोष्ट येथे नमूद करण्यासारखी आहे. युसुफखान आणि त्याचा मुलगा याकूब यांना अत्यंत वाईट तऱ्हेने वागवण्यात येऊन त्यांचा अतिशय शोचनीय रीतीने अंत झाला, असे अकबराचा टीकाकार बदायुनी याने आकसाने केलेले विधान वस्तुस्थितीला धरून नाही; पण काश्मी-रच्या या सर्वच घडामोडी अकबराच्या उदार धोरणाला साजेशा नव्हत्या आणि त्यामुळे मन अस्वस्थ झाल्याशिवाय राहात नाही. आपल्या विश्वासू सेनापतीने

दिलेला शब्द झिडकारून काश्मीरच्या राजाला त्याने काही काळ कुठलेहि कारण न देता कैदेत ठेवले. भरभराटीत असलेल्या एका स्वायत्त देशाच्या राजाला एक छोटीशी जहागीर देऊन अकबराने त्याचा अपमानच केला. या बाबतीत हे पण मान्य केले पाहिजे की युसुफखानची वागणूक सरळ आणि संशयातीत नव्हती आणि अकबरापुढे स्वत: हजर होऊन त्याचे वर्चस्व मान्य करण्यास त्याने दिलेला नकार, हे अकबराच्या रागाचे एक मोठे कारण होते. कुठल्याही मांडलिकाच्या किंवा स्वतंत्र राजाच्या बाबतीतसुद्धा अकबराने हे कधीच सहन केले नाही. या व्यतिरिक्त साम्राज्याला सुरक्षित सरहद्द मिळवून देण्याच्या आणि अडीअडचणीत त्याचे योग्य सरंक्षण करण्याच्या अकबराच्या धोरणानुसार काश्मीर साम्राज्यात विलीन होणे अपरिहार्य होते. ०

काश्मीरच्या शिया राजाबद्दल बदायुनीच्या सहानुभूतीचे कारण ते अकबराचे शत्रू होते याशिवाय दुसरे काही असू शकत नाही. अकबराच्या हुकुमावरून याकूबला ठार मारण्यात आले किंवा अकबराने पाठवलेला विषारी पोशाख चढवल्याने तो मृत्यू पावला या शंकेला काही आधार सापडला नाही.

## तिबेट मुघल वर्चस्वाखाली

काश्मीरवरच्या विजयाचा उत्तर पंजाबमधील डोंगराळ मुलुखाच्या काही अंशी स्वतंत्र व दुराग्रही राजावर फार परिणाम झाला. त्यातच अकबराचे लाहोरमधील दीर्घ काळ वास्तव्य आणि तेथून त्याने लढविलेल्या राजकीय डावपेचांची भर पडली. नागरकोटचा राजा विधीचंद्र, जम्मूचा परशुराम, माऊचा बसू, जैस्वालचा अनुराधा, घालूरचा राजा तीला, मांनकोटचा प्रताप आणि इतर लहानमोठ्या राजांनी अकबराकडे नजराणे पाठवून शरणागती पत्करली (१५९०).

तसेच बाल्टीस्तान आणि लडाख यांच्यासहित छोटया आणि मोठ्या तिबेटने बादशहाचे अधिराज्य मान्य केले. हुमायूनच्या कारकीर्दीत ही दोन्ही

---

०ऐने अकबरी भाग ३, पाने ४९६, ५०२–५०६, ५२१–५२३, ५२५ ५२८, ५७७, ५८२

तबकत–इ–अकबरी– भाग २, पाने ४०१, ४०३–४०४

मुन्तखाब–उत्त–तवारीख भाग २, पाने ३४८, ३५२–३५४

फिरिस्ता भाग २ पान ३६७,

राज्ये मिर्झा हैदर दोघालत याने जिंकून घेतली होती. इ. स. १५४१ पासून १५५१ पर्यंत त्याने बादशहाच्या नावाने काश्मीरवर राज्य केले. आणि मुल्ला कासीम याजकडे छोटया तिबेटचा आणि मुल्ला हसन याच्याकडे मोठया तिबेटचा कारभार सोपवला

इ. स. १५८९ मध्ये अकबराने जेव्हा काश्मीरला प्रथम भेट दिली त्यावेळी या दोन देशांच्या राजांनी घाबरून जाऊन बादशहाकडे नजराणे पाठवून त्याचे स्वामित्व मान्य केले. अकबराने त्यांचे मांडलिकत्व मान्य करून त्यांना धीराचे आणि सांत्वनपर निरोप देण्यासाठी आपले वकील त्यांच्याकडे रवाना केले. छोटया तिबेटचा राजा अली रायकडे महंमद बेगला पाठविण्यात आले. आणि मोठया तिबेटकडे मुल्ला तलीब इस्फहानी आणि मिहीतर यारी यांची रवानगी करण्यात आली. हे परत फिरले तेव्हा तिबेटच्या या दोन्ही भागांतले वकील बादशहाकडे नजराणे घेऊन त्यांच्याबरोबर आले. स्वतःचे राज्य सुरक्षित राखण्यासाठी छोटया तिबेटच्या अली रायने आपली मुलगी राजपुत्र सलीमला देऊ केली. मुलीला लाहोरला आणून १ जानेवारी १५९२ रोजी हा लग्नसमारंभ पार पडला. इ. स. १५९७ मध्ये अकबराने काश्मीरला तिसरी भेट दिली त्यावेळी तिबेट खालसा करून साम्राजाल्या जोडण्याचा त्याचा विचार होता. पण पुरेशी रसद नसल्यामुळे त्याला हा विचार सोडून द्यावा लागला. अकबराला या दोन राज्यांवरील सरंजामी सत्तेतच समाधान मानून घ्यावे लागले.

## बलुचिस्तानचा पाडाव

निरनिराळ्या आघाडयांवरील मोठया लढायांत गुतलेला असून सुद्धा अकबराने नव वर्षाचा सण नेहमीच्या थाटात साजरा केला. ११ मार्च १५८६ रोजी या उत्सवास सुरुवात झाली. २८ मार्च रोजी या निमित्ताने बादशहाने मोठी मेजवानी दिली. याच दिवशी काश्मीरच्या राजाला घेऊन राजा भगवंतदास दरबारात हजर झाला. मेजवानीच्या दिवशीच बलुचिस्तानच्या स्वारीवर गेलेले सैन्य तिथल्या गाझी खान, इब्राहिम खान, बहादुर खान, नसरत खान आणि चिता इत्यादि प्रसिद्ध बलुची पुढाऱ्यांना घेवून दरबारात आले. बादशहाच्या स्वारीला काही काळ तोंड दिल्यावर बलुची लोक शरण आले आणि दरबारात हजर होण्यास तयार झाले. बादशहाने त्यांची मुलाखत घेतली आणि बलुचिस्तानला राज्यातले एक मांडलिक संस्थान करून तिथला कारभार त्या लोकांच्या हातात राहू दिला.

## दक्षिणेवर स्वारी

ऑगस्ट १५६४ मध्येच दक्षिण हिंदुस्थान जिंकून घेण्याची तयारी अकबराने केली होती, याचा उल्लेख यापूर्वी ११ व्या प्रकरणात आलाच आहे. इ. स. १५७६—७७ मधील खानदेशवरील स्वारी जरी यशस्वी झाली नाही तरी परिणामी तिथल्या छोटयाशा राज्यावर मुघलांची अधिसत्ता त्यावेळी प्रस्थापित झाली. अशा तऱ्हेने विंध्य प्रदेशाच्या दक्षिणेकडील देश जिंकून घेण्याचा मार्ग मोकळा झाला. यानंतर दक्षिणेतल्या निरनिराळया राजांनी बादशहाला वेळोवेळी नजराणे पाठविले आणि त्यांच्यापासून भांडून निघालेल्या अनेक नातेवाईकांनी आणि सरदारांनी बादशहाच्या दरबारात काही वेळा आश्रय पण घेतला. दक्षिण हिंदुस्थानवर स्वारी करण्यास बादशहाला ही एक चांगली सबब झाली.

इ. स. १५८५ मध्ये दक्षिणेकडील राज्यात हस्तक्षेप करण्याची उत्तम संधि अकबराला मिळाली. अहमदनगरच्या निझाम उल् मुल्कचे राज्य उलथून टाकण्याचा डाव वऱ्हाडचा खुदावंद खान आणि मीर मुर्तझा यांनी रचला. पण त्यात त्यांना यश आले नाही. निझाम उल् मुल्कचा मुख्य वजीर सलाबत खान याने त्यांना पराभूत केले. त्यानंतर बादशहाची मदत मागण्यासाठी हे दोघे मुघल दरबारात हजर झाले. माळव्याचा सुभेदार खान–इ–आझम याला दक्षिणेकडे जाऊन वऱ्हाड पादाक्रांत करण्याचा हुकूम अकबराने दिला. मीर मुर्तझा, खुदावंद खान, तीरंदाज खान, चकतई खान आणि इतर काही दक्षिणेकडील सरदारांना या सैन्याबरोबर जाण्याचा आदेश मिळाला. ३०० लढाऊ हत्ती, आणि उत्तम तोफखाना बरोबर देऊन इतर अनेक सेनानींना खान–इ आझमच्या मदतीला पाठविण्यात आले. आझाद उद्दौला हा किताब धारण करणारा मीर फतेउल्ला शिराझी खान–इ–आझम बरोबर असून स्वारीमधील राजकीय आणि परराष्ट्रीय डावपेच सांभाळण्याची जबाबदारी त्याच्यावर सोपविण्यात आली.

खान–इ–आझम आणि शहाबुद्दिन अहंमद खान यांच्यामधील भांडणांमुळे दक्षिणेच्या सरहद्दिवरील हंडिया येथे बादशाही फौजा ६ महिने खोळंबून राहिल्या. फतेउल्ला शिराझीने मध्यस्थी करून ही भांडणे मिटवली; पण या भांडणांची माहिती मिळताच अशीरगड आणि बऱ्हाणपूरचा राजा अलीखान शत्रूला जाऊन मिळाला आणि दक्षिणेकडील राजांबरोबर संगनमत करून त्याने मुघल सैन्याच्या प्रवासात अडथळे आणले. राजा अलीखानला आपल्या बाजूला

वळवून घेण्याचा प्रयत्न फतेउल्लाने केला पण त्यात त्याला यश आले नाही. तेव्हा तो गुजराथकडे परत फिरला आणि तिथला सुभेदार खान खानान कडे त्याने जादा सैन्याची मागणी केली. दरम्यान खान–इ–आझम वऱ्हाडवर चालून गेला होता. तिथली राजधानी एलिचपूर येथे लूटमार करून त्याने त्या शहराची धूळधाण केली, पण नंतर त्याला दक्षिणेकडल्या एका मोठ्या फौजेशी सामना देण्याचा प्रसंग आला. तेव्हा तो शत्रूला पाठीवर घेऊन नंदुरबा–रकडे वळला. याच वेळी खान–इ–खानानने इतिहासकार निझाम उद्दिन अहंम-दच्या हाताखाली एक फौज पाठवून दिली आणि स्वत: जातीने लवकरच हजर होण्याचे आश्वासन दिले. माळवा आणि गुजराथमधील फौजा एकत्र होऊन दक्षिणेकडील सेनेबरोबर सामना देण्याची तयारी त्यांनी केली. इतक्यात पावसाळा सुरू झाल्यामुळे स्वारीचा विचार तहकूब करून खान–इ–आझम माळव्याकडे परत फिरला. अशा तऱ्हेने दक्षिण देश जिंकून घेण्याचा मुघलांचा दुसरा प्रयत्न फसला.

**अकबराचा लाहोरचा मुक्काम : काही विशेष घडामोडी :**

१५८६ साली एप्रिलच्या तिसऱ्या आठवड्यात अटकमधील आपली छावणी गुंडाळून अकबर लाहोरकडे जाण्यास निघाला. तेथे तो ता. २७ मे रोजी येऊन पोचला. लाहोरमध्ये राजा भगवंतदासच्या घरी अकबराचा मुक्काम होता. त्यापूर्वी काही दिवस बादशहाने भगवंतदासची काबूलवर नेमणूक केली होती, पण काश्मीरच्या राजाला नजरकैदेत ठेवून आपला शब्द खोटा पाडला असे वाटून त्याने अफगणिस्तानातील आपल्या अधिकाराबद्दल बादशहाकडे खुलासा मागितला. याबद्दल बादशहाने दोष लावताच, त्याने आत्महत्त्या करण्याचा प्रयत्न केला. परिणामी त्याच्या जागी मानसिंगची नेमणूक करण्यात आली. बादशहाची छावणी झेलमला असताना, २५ एप्रिल १५८६ रोजी राजपुत्र सलीमला मान-बाईच्या पोटी एक मुलगी झाली. यामुळें सर्वत्र आनंदी आनंद झाला. लाहोरला बिकानेरच्या रायसिंगच्या मुलीबरोबर २६ जून रोजी सलीमचे दुसरे लग्न झाले. आपला बाप, भाऊ, आणि दरबारातली इतर बडी मंडळी यांच्या बरोबर राजपुत्र सलीम रायसिंगच्या घरी गेला आणि तेथे हा लग्नसमारंभ पार पडला. मागील वर्षाप्रमाणेच १५८६ साली अकबराने दिल्ली, अलाहाद आणि अवध या प्रांतांतील वसुलीचा सहावा हिस्सा माफ केला. १५८६ सालची फसल फार चांगली असल्यामुळे धान्याचे भाव खूप उतरले होते. त्यामुळे शेतकऱ्यांना नगदी सारा देणे कठीण झाले. या भागातील केवळ खालसा जमिनीवर दिलेल्या

सारामाफीची रक्कम ४,०५,६०,५९६ दाम झाली. कसण्यासाठी खंडाने दिलेल्या जमिनीवर पण अशीच सूट देण्यात आली. अशा तऱ्हेने शेतकऱ्यांची अडचण दूर झाली. १५८८ साली सुद्धा धान्याचे भाव खालीच राहिले. ही परिस्थिती लक्षात घेऊन बादशहाने आग्रा आणि दिल्ली मधील रब्बीच्या वसुलाचा सहावा भाग, आग्रा आणि अवध येथील खरीप उत्पन्नावर २२.२ टक्के आणि दिल्लीच्या उत्पन्नावर २५ टक्के अशी सूट दिली. यामुळे केवळ खालसा जमिनीच्या वसुलीत १९,३२,८०,१७५ दामांची खोट आली. जहागिरीच्या उत्पन्नावर पण याचप्रमाणें सूट देण्यात आली.

बदक्शान येथे अब्देरचा पराभव पावलेला मिर्झा सुलेमान याला घेऊन मानसिंग दरबारात आला. २४ फेब्रुवारी १५८७ रोजी बादशहाने त्याची मुलाखत घेतली. याच वर्षीच्या सुरुवातीला दरबारात हजर केल्या जाणाऱ्या प्रत्येक माणसाने आपापल्या ऐपतीप्रमाणे आपल्या वयाइतके दाम, रुपये किंवा सोन्याच्या मोहरा खजिन्यात भराव्या असा हुकूम बादशहाने काढला. अशा तऱ्हेने जमा झालेल्या रकमेचा विनियोग लोकांच्या सुखासाठी विहिरी आणि तलाव खोदणे, सराया बांधणे, बागबगीचे लावणे अशा कामांसाठी करण्यात आला.

५ मे १५८७ रोजी १७ वर्षांच्या राजपुत्र मुरादचे लग्न अझीझ कोकाच्या मुलीशी झाले. २८ जुलैला रात्री दरबारातून परत जात असताना राजा तोडरमलवर त्याच्याच जातीच्या एका खत्रीने आकसाने तलवारीने वार केला. सुदैवाने तोडरमलला झालेली जखम फारशी गंभीर स्वरुपाची नव्हती आणि थोड्याच दिवसात तोडरमल बरा झाला.

भक्करचा सेनानी सादिकखान याने सिंधमधील सेहवानच्या किल्ल्याला वेढा दिला होता. यात त्याला यश न मिळाल्याची बातमी दरबारात याच वेळी आली. तिथला राजा जानी बेग याने निकराचा सामना दिल्यामुळे सादिकला सेहवानचा वेढा उठवावा लागला. त्यानंतर नसीरपूर घेण्याचे पण त्याचे प्रयत्न फसले.

## सरहिन्द आणि उज्जैनला महापूर

सप्टेंबर १५८६ मध्ये पंजाबच्या काही भागांत अतिवृष्टी झाली. ३ दिवस आणि ३ रात्री (I. O. च्या हस्तलिखिताप्रमाणे ३० दिवस) सारखा पाऊस पडत होता. त्यामुळे सरहिन्द गाव आणि आसपासचा मुलूख पाण्याखाली बुडून

गेला. उत्तरेकडील डोंगराळ मुलखातून जोरात वाहात येणारे पाणी आणि पाऊस यामुळे पुराला भीषण स्वरूप आले. शहरामध्ये ९ फूट आणि शहराबाहेर १५ फूट पाणी होते. पुरात जवळ जवळ २००० घरे पडली आणि किल्ल्याची ४५० फूट भिंत वाहून गेली. सरहिन्दच्या फळबागा आणि बगीचे फार प्रसिद्ध होते. जुन्या शाहीबागेतील १५०० फुटांची जागा आणि नव्या बागेतील ३०० फुटांची जागा वाहून गेली आणि एकंदर मालमत्तेचे मोठे नुकसान झाले. १०० माणसे आणि २००० जनावरे पुरात बुडून मेली. वाहतुकीत अनेक अडथळे निर्माण होऊन दिल्लीचा रस्ता काही काळ बंद झाला.

यानंतर जवळ जवळ तीन वर्षांनी माळव्यात उज्जैनवर अशीच पुराची आपत्ती कोसळली. १५८० मध्ये जून महिन्याच्या अखेरीस तेथे ३ दिवस सारखा पाऊस पडत होता. क्षिप्रा नदीला मोठा पूर येऊन गावातले दोन्ही तलाव भरून वाहू लागले. १७०० घरे आणि अनेक जनावरे वाहून गेली. सुदैवाने मनुष्यहानी फारशी झाली नाही.

## ठठ्ठ्याच्या वकिलाची दरबारात भेट : राजा बसूची शरणागती

७ नोव्हेंबर १५८६ रोजी सिंधमधील ठठ्ठ्याचा राजा मिर्झा पायिन्डा महंमद अर्घून याच्याकडून खलिता आणि नजराणा घेऊन त्याचा वकील सय्यद जलाल बादशहाच्या दरबारात आला. ठठ्ठ्याचा राजा अर्घून आणि राज्याचा सर्व कारभार चालवणारा त्याचा मुलगा मिर्झा जानी बेग या दोघांनी स्वतः हजर राहणे शक्य नसल्यामुळे दिलगिरी प्रदर्शित केली. बादशहाने वकिलाचे आपलेपणाने स्वागत केले. याच वेळी (१६ नोव्हेंबर) माऊ उर्फ नूर्पुरचा राजा वसू याने स्वतः येऊन दरबारात हजेरी दिली. अकबराचे मांडलिकत्व याने यापूर्वीच मान्य केले होते पण सरहद्द प्रांतात बादशाही फौजांची पीछेहाट होताच तो बंडास प्रवृत्त झाला होता. त्याच्या विरुद्ध बादशाही फौज रवाना करण्यात आली; पण राजा तोडरमलचा सल्ला योग्य मानून राजा बसूने बंडाचा विचार सोडून दिला आणि तो जातीने दरबारात हजर झाला.

## प्रांतांच्या वहिवाटीची नवी व्यवस्था

लाहोरच्या मुक्कामात असताना निरनिराळ्या प्रांतांच्या कारभारात काही बदल करण्याचे अकबराने मनात आले. प्रत्येक प्रांताला दोन सुभेदार आणि त्यानुसार प्रत्येक प्रांताच्या सुभेदाराच्या हाताखाली एक नायब सुभेदार असे

बाराही प्रांतांत नेमण्यात आले. या अभिनव सुधारणेबद्दल लिहितांना अबुल फझल म्हणतो की, एका सुभेदाराला जर दरबारात हजर राहावे लागले किंवा तो आजारी पडला तर प्रांताच्या दैनंदिन कारभारात काही व्यत्यय येऊ नये म्हणून ही सुधारणा करण्यात आली; पण सुभेदाराच्या हातात अनियंत्रित सत्ता राहू न देण्यासाठी आणि त्याच्या कारभारावर त्याच्या प्रतिस्पर्ध्याने नजर ठेवण्या-साठी ही व्यवस्था करण्यात आली असावी असे वाटते. प्रत्यक्षात या सुधारणेचा काय परिणाम झाला हे कळण्यास मार्ग नाही; पण त्यामुळे राज्यकारभारात तेढ उत्पन्न होऊन पुनः जुनीच पद्धत म्हणजे प्रत्येक प्रांतावर एकच सुभेदार नेम-ण्याची रीत सुरू झाली. दुसरी सुधारणा म्हणजे प्रत्येक प्रांतासाठी एक एक दिवाण आणि बक्षी यांची नेमणूक करण्यात आली. लक्षात येण्यासारखी गोष्ट म्हणजे लाहोर अथवा पंजाबसारख्या महत्त्वाच्या सुभ्यावर राजा भगवंतदास आणि राय रायसिंग हे दोघे हिंदू सुभेदार जोडीने नेमण्यात आले. तसेच ज्याची राजधानी मुसलमानांचे सर्वांत मोठे यात्रेचे ठिकाण होते, त्या अजमेर प्रांतावर जगन्नाथ आणि राय दुर्गा या दोघा हिंदूंची नेमणूक करण्यात आली. अफगणि-स्तानवर एक हिंदू आणि एक मुसलमान म्हणजे मानसिंग आणि झैन खान यांना नेमण्यात आले. आग्रा प्रांतावर आणि त्यात असलेल्या साम्राज्याच्या राजधानीवर शेख इब्राहिम आणि राजा अस्करन यांना नेमण्यात आले.

## खुश्रूचा जन्म आणि इतर काही घटना

१५८७ साली ६ ऑगस्ट रोजी अकबराचा पहिला नातू — राजपुत्र सलीम आणि त्याची बायको, अंतरच्या राजा भगवंतदासची मुलगी मानबाई, यांचा मुलगा—सुलतान खुश्रू याचा जन्म झाला. मानबाईला आता शहा—बेगम हा किताब देण्यात आला. खुश्रू हा लहानपणी दिसायला मोठा गोजिरवाणा आणि हुशार होता; पण त्याचे पुढील आयुष्य दुर्दैवी घटनांनी भरलेले आणि मृत्यूही शोचनीय ठरला.

३० मे १५८८ रोजी अकबराचा तिसरा मुलगा दानीयल याचे लग्न सुलतान ख्वाजाच्या मुलीबरोबर झाले आणि त्याच साली ऑगस्ट महिन्यात राजपुत्र मुरादचा पहिला मुलगा सुलतान रुस्तम याचा जन्म झाला.

## तानसेनचा मृत्यू

२६ एप्रिल १५८९ रोजी म्हणजे अकबराची काश्मीरला पहिली भेट

देण्यास निघण्याच्या दोनच दिवस अगोदर लाहोरला मिया तानसेन मरण पावला. त्याचा दफन विधी शाही थाटाने करण्यात आला आणि अकबराच्या सांगण्यावरून सर्व प्रमुख गायक प्रेतयात्रेत सामील झाले आणि वाटेत त्यांनी लग्नात म्हणतात तशी गाणी म्हटली. अकबराच्या दरबारातील नवरत्नांपैकी तानसेन एक असून त्याच्या सारखा गणारा हजार वर्षांत हिंदुस्थानात कोणी झाला नाही असे अबुल फझलचे मत होते. "संगीत नष्ट झाले" अशा शब्दांनी अकबराने तानसेनच्या मृत्यूचा उल्लेख केला.

तानसेनचे मूळचे नाव, त्याचे आईबाप आणि बालपण याबद्दल फारशी माहिती उपलब्ध नाही. ग्वाल्हेरपासून २८ मैलांवर असलेल्या बेहाट या गावी इ. स. १५३१–३२ च्या दरम्यान एका ब्राम्हण कुटुंबात त्याचा जन्म झाला असे म्हणतात. राजा मानसिंग तोमार (इ. स. १४८६ ते १५१८) याने स्थापन केलेल्या ग्वाल्हेरच्या शाळेत तानसेनचे सुरुवातीचे संगीत शिक्षण झाले, यात शंका नाही. मुघलांनी ग्वाल्हेर जिंकून घेतल्यावर अनेक वर्षे या घराण्याची संगीत शाळा तेथे चालू होती असे दिसते. वृंदावनचा साधु आणि प्रसिद्धि संगीतकार हरिदास याच्याकडून तानसेनला संगिताचे शिक्षण मिळाले असे मानतात. कलावाङमयाचा मोठा आश्रयदाता भाठ्याचा राजा रामचंद्र याच्या नोकरीत राहून तानसेनने मोठी कीर्ती मिळवली. राजा रामचंद्रचे त्याच्यावर अत्यंत प्रेम असून त्याने त्याला अनेक पदव्या आणि मोठी संपत्ती बहाल केली. तानसेन ही पदवी त्याला येथेच मिळाली असावी. आणि याच नावाने तो पुढे प्रसिद्धीस आला. इ. स. १५६२ मध्ये त्याची कीर्ती मुघल दरबारात पोहोचली आणि अकबराने तानसेनला मुघल दरबारात पाठवून देण्यास राजा रामचंद्रला सांगितले. अत्यंत विमनस्क अवस्थेत तानसेन आपल्या आश्रयदात्याला सोडून निघाला. इ. स. १५६२ पासून त्याच्या मृत्यूपर्यंत (एप्रिल, १५८९) म्हणजे २७ वर्षे तो सम्राट अकबराच्या दरबाराचे एक भूषण होऊन राहिला होता. प्रमुख दरबारी गायक अशी प्रसिद्धी आणि मानाची जागा त्याला मिळाली.

ध्रुपद आणि दीपक राग गाण्यात तानसेनचा हातखंडा असून या दोन्ही गायन-पद्धती त्याने वैभवाच्या शिखरावर चढविल्या. त्यावेळेला प्रचलित असलेल्या रागांत त्याने थोडेफार बदल केले. १२ नव्या रागांची रचना त्याने केली असे सांगतात. तानसेन जसा उत्तम गायक तसा उत्तम कवी पण होता. हिंदूंची दैवते, मुसलमान साधु आणि फकीर व राजा रामचंद्र आणि अकबर यांच्या स्तुतीपर त्याने अनेक कवने केली. हिंदुस्थानी संगिताला एक नवे वळण देऊन त्या संगितातला एक अनन्यसाधारण उत्कृष्ट कलाकार अशी कीर्ती तानसेनने

मिळवली. प्रथम लाहोरला दफन झाले असले तरी त्याचा मृतदेह नंतर ग्वाल्हेरला नेऊन तिथला मुसलमान फकीर शेख महंमद घोष याच्या कबरस्तानाजवळ त्याला मूठमाती देण्यात आली. त्याच्या कबरीवर अकबराने एक सुंदर इमारत बांधली आणि हिंदुस्थानातले सर्व संगीत-कलाकार तेथे दर्शनासाठी जाऊ लागले.

## अकबराची काश्मीरला पहिली भेट

२८ एप्रिल १५८९ रोजी भगवंतदास, तोडरमल आणि कुलीजखान यांना राज्याचा कारभार पाहण्यासाठी लाहोरला मागे ठेवून अकबर प्रथमच काश्मीरला जाण्यास निघाला. वाटेतले रस्ते दुरुस्त करून घेण्यासाठी कासीम-खानच्या हाताखाली एंजिनिअरांची मोठी तुकडी आणि दोन हजार बेलदार पुढे पाठविण्यात आले. भिंभारला आल्यावर अकबर कधी घोड्यावरून तर कधी पायी भोवतालच्या निसर्गाचे सौंदर्य पाहाण्यास जात असे. भिंभारहून त्याने मूर्तीझा निझामशहाचा धाकटा भाऊ बऱ्हाणउद्दिन याला अहमदनगरच्या स्वारीवर पाठवून दिले. माळव्याचा सुभेदार खान-इ-आझम याने त्याला मदत करावी आणि खानदेशचा राजा अलीखान याने सहकार्य द्यावे असा हुकूम सुटला. पण या स्वारीत अपयश पदरी घेऊन बऱ्हाणउद्दिनला परत यावे लागले. दरम्यान सराई जोगी आणि नवशिराकच्या मार्गे अकबर राजोरीला येऊन पोहोचला. रस्त्यावर सगळीकडे बर्फ पडला असून पाऊसही पडत होता. पीरपंजालच्या रस्त्याने ८२०० फूट उंचीवर असलेल्या रतनपंजावरून अकबर बहराम गहऱ्याला येऊन पोहोचला. तेथे काश्मीरचा सुभेदार मिर्झा युसुफखान हा बादशहाच्या स्वागतासाठी हजर होता. नंतर पीर पंजालची डोंगरपट्टी ओलांडून बर्फाच्छादित प्रदेशातून भयंकर थंडीमध्ये बादशहाच्या लवाजम्याचा पायी प्रवास सुरू झाला; पण सर्व गोष्टींचा विचार करून अकबराने केलेल्या कडेकोट बंदोबस्तामुळे या लोकांवर कोणतीही मोठी आपत्ती कोसळली नाही. चढण्यास अत्यंत कठीण असा नारी बर्रारीचा घाट ओलांडून गेल्यावर या मंडळींना ८॥ मैलांच्या अंतरात ४४ पूल ओलांडून जावे लागले. नंतर त्यांनी हीरापूरला आपली छावणी दिली. सुपियांच्या पश्चिमेस १॥ मैलांवर असलेल्या दीवार किंवा दग्राम या गावी एक मजेदार प्रसंग घडला. रस्ता अत्यंत खराब असल्यामुळे राजाचा जनाना मागे नवशिऱ्याला राहिला आहे अशी बातमी राजपुत्र सलीमने दिली. हे ऐकून अकबर अतिशय रागावला. राजपुत्राशी भेट बंद करून त्याने याबद्दल खान खानानला पण दोषी धरले. आपला घोडा तयार करण्यास सांगून थोड्या लोकानिशी आपण स्वतः मागे जाऊन जनाना घेऊन येण्याचे त्याने ठरविले.

जगन्नाथ, रामदास, नकीबखान इत्यादी थोडयाशाच लोकांना त्याने बरोबर येण्याची परवानगी दिली. सलीम घाबरून जाऊन आपल्या तंबूत जाऊन बसला आणि खाणेपिणे पण त्याने वर्ज्य केले. आपल्या निष्ठांवत अधिकाऱ्यांच्या विनंतीस मान देऊन बादशहा हीरापूरहून परत फिरला आणि खान खानानला जनाना आणण्यासाठी पाठवून देण्यात आले. अकबर आणि त्याच्या बरोबरची मंडळी ५ जून १५८९ रोजी श्रीनगरला येवून पोहोचली आणि तिथल्या लोकांनी मोठ्या आंनदाने त्यांचे स्वागत केले. काश्मीरच्या अधिपतींच्या राजवाडयात अकबराने मुक्काम केला. १९४ मैलांचा हा प्रवास २४ टप्प्यांत पुरा झाला.

काश्मीरमध्ये अकबर एकंदर ३६ दिवस राहिला. तिथला तलाव, बगीचे, व इतर प्रेक्षणीय स्थळे व करमणुकीत त्याने पुष्कळ वेळ घालवला. इतके करूनसुद्धा राज्यकारभाराकडे त्याचे दुर्लक्ष झाले नाही. काश्मीरच्या खोऱ्यातले विद्वान, साधु पुरुष, तत्त्वचिंतक अशा सर्व प्रसिद्ध लोकांच्या त्याने भेटी घेतल्या व तिथल्या अर्थव्यवस्थेची, खास करून शेतसारा पद्धतीची माहिती करून घेतली. प्रत्यक्ष जागेवर केलेल्या पाहाणीवरून त्याने जमिनीच्या साऱ्यामध्ये एकदम खूप मोठी वाढ केली, पण याचा भार लोकांना असह्य झाल्यामुळे नंतर सारा कमी करण्यात आला. अकबराच्या काश्मीरमधील वास्तव्यामुळे भिऊन गेलेल्या छोटया मोठया तिबेटच्या राजांनी नजराणे पाठवून त्याला खूष करण्याचा प्रयत्न केला. त्या राजांकडे अकबराने आपले वकील पाठविले. ९ जुलै रोजी अकबर आजारी पडला; पण थोडयाच दिवसांत त्याची प्रकृती पूर्ववत झाली. ११ जुलैला तो काश्मीरहून श्रीनगरच्या मार्गाने लाहोरकडे परत जाण्यास निघाला. काश्मीरच्या आधीच्या राजाचा—युसुफखानचा मुलगा याकुब किस्तवारच्या डोंगराळ मुलुखात जाऊन राहिला होता. तो आता अकबरास शरण आला. त्याला अकबराने माफी केली. लाहोरच्या मार्गावर असतानाच फत्ते उल्ला शिराझी पैगंबरवासी झाल्याची बातमी त्याला मिळाली. ती ऐकून बादशहाला फार दुःख झाले. पोर्तुगीज लोकांनी शिराझीला कैद केले असते तर माझे सर्व साम्राज्य आणि संपत्ती मी त्याच्या सुटकेसाठी देवून टाकली असती, असे अकबर म्हणाला. दरबारातला दुसरा मोठा अधिकारी, हकीम अबुल फत्ते, १८ ऑगस्ट १५८९ रोजी थोडयाच दिवसांच्या आजारानंतर छावणीतच मरण पावला. याचेही अकबराला फार दुःख झाले, कारण अबुल फते हा मोठा देखणा, सुविद्य आणि स्वामीनिष्ठ अधिकारी होता. हसन अब्दल येथे त्याला मूठमाती देण्यात आली.

३१ ऑगस्ट रोजी अटक येथें सिंधू नदीवरचा पूल ओलांडून अकबर काबूलकडे वळला. यामुळे अगदी थकून जावून लाहोरला जाण्यास उत्सुक असलेल्या त्याच्या बरोबरच्या मंडळींची फार निराशा झाली. ११ सप्टेंबर रोजी अकबराने खैबरची खिण्ड ओलांडली. तेथे आपल्या छावणीचा ताबा राजपुत्र मुरादकडें सोपवून थोडेसे सहकारी बरोबर घेवून अकबर पुढे निघाला आणि ३ ऑक्टोबर रोजी अफगणिस्तानच्या राजधानीला पोहोचला. रस्त्यात अनेक गावांतले लोक कुर्निसात करण्यासाठी, स्वतःच्या आकांक्षा पुऱ्या करून घेण्यासाठी त्याच्याकडे आले. सबंध रस्त्यावर दोन्ही बाजूंनी तुर्की आणि ताजिक लोक नजराणें घेवून त्याला सामोरे आले. काबूलमध्ये अकबराचा मुक्काम ४८ दिवस होता. तिथल्या राज्यकारभाराची नीट व्यवस्था लावून १९ नोव्हेंबर १५८९ रोजी तो लाहोरला जाण्यास निघाला.

## तोडरमलचा मृत्यू

माझे आता वय झाले आहे, शरीर थकले आहे, तेव्हा सेवानिवृत होवून, राहिलेले दिवस हरिद्वाराला गंगेच्या काठी घालवण्यास परवानगी असावी, अशा अर्थाचे तोडरमलचे पत्र काबूलला असतानाच अकबराला मिळाले. प्रथम बादशहाने त्याला सेवानिवृत्त होण्याची परवानगी दिली; पण थोडयाच दिवसांत त्याने आपला विचार बदलला आणि "जनसेवेसारखी (गांजलेल्यांचे सांत्वन करण्यासारखी,) ईश्वराची दुसरी सेवा नाही, तेव्हा सेवानिवृत्तीचा विचार सोडून देवून आपण अखेरपर्यंत लोकसेवेतच काळ काढावा आणि अशा तऱ्हेने परलोकीची तरतूद करावी" अशा अर्थाचे पत्र बादशहाने तोडरमलला लिहिले. बादशहाची आज्ञा शिरसावंद्य मानून तोडरमल वाटेतूनच परत फिरला, पण त्याची प्रकृती अतिशय क्षीण झाली होती. ८ नोव्हेंबर १५८९ रोजी लाहोर येथे तो मरण पावला.

उत्तर प्रदेशातील हल्लीच्या सीतापूर जिल्ह्यातल्या लहरपूर गावच्या एका खत्री कुटुंबात तोडरमलचा जन्म झाला . प्रसिद्ध शेरशहाच्या हाताखाली त्याने प्रथम नोकरीस सुरवात केली. असा लौकीक समज आहे. सूर राजघराण्याचा अंत झाल्यानंतर अकबराकडे तो एक साधा कारकून म्हणून कामास राहिला. हे खरे असल्यास अकबर गादीवर बसल्यानंतर थोडयाच दिवसांत तो बादशहाच्या नोकरीत आला असावा. कारण १५६२ मध्येच तो एक मोठा अधिकारी झालेला होता. (प्रकरण ४ पहा) असामान्य कर्तुत्व राज्यकारभाराची खडा न खडा माहिती आणि खास करून आर्थिक बाबतीतले संपूर्ण ज्ञान, तसेच स्वामीनिष्ठा

आणि कार्यतत्परता यांमुळे तो फार झपाट्याने वर चढला. १५७२ साली नव्यानेच जिंकून घेतलेल्या गुजराथ प्रांतावर दिवाण म्हणून त्याची नेमणूक झाली. हीच त्याची पहिली महत्त्वाची नेमणूक, तेथे नवीन सारा पद्धती अंमलात आणण्याचे काम त्याच्याकडे आले. त्याचे काम बादशहाला आवडले आणि लवकरच त्याची वजीर म्हणून नेमणूक करण्यात आली. अखेरीस १५८२ साली राज्याच्या पंतप्रधानाची साम्राज्यातील सर्वांत मोठी आणि महत्त्वाची जागा त्याला मिळाली. तोडरमल नुसताच हुशार मुलकी अधिकारी नसून उत्तम योद्धा आणि लष्करी डावपेचात तरबेज होता. अनेक युद्धात त्याने जातीने भाग घेतला आणि अनेक राजकीय मुत्सद्देगिरीच्या कामगिऱ्यांवर त्याची नेमणूक करण्यात आली. मुनीम खानचा नायब सुभेदार म्हणून बंगालमधल्या स्वारीत त्याने केलेली कामगिरी विशेष उल्लेखनिय आहे. अकबराचा त्याच्यावर संपूर्ण विश्वास होता. जमीन महसुलाच्या कारभाराबाबत त्याने आपले नाव अजरामर करुन ठेवले आहे आणि त्याच्या तोडीचा या कारभारातील तज्ज्ञ सापडणे विरळा. अबुल फझलचे आणि त्याचे विशेष सूत नव्हते, तरी सुद्धा अबुल फझलने त्याच्या सचोटीचा आणि हुशारीचा मोठ्या गौरवाने उल्लेख केला आहे. तो म्हणतो, " ऋज्जुता, सचोटी, धैर्य, सार्वजनिक कामाची आणि हिन्दुस्थानच्या राज्यकारभाराची माहिती याबाबतीत तोडरमल या काळात अद्वितीय होता. रूढीग्रस्त, हेकेखोर आणि हटवादी नसता, तर तो आध्यात्मिक बाबतीतही फार थोर ठरला असता. त्याच्या मृत्युमुळे निष्काम काम करणारा एकजण नाहीसा झाला आणि राज्यकारभारातल्या व्यवहाराला एक प्रकारचे शैथिल्य आले. " अकबराला अर्थातच् त्याच्या मृत्युमुळे फार दु:ख झाले. कारण सचोटी, स्वामिनिष्ठा, हुशारी, शौर्य, कर्तव्यबुद्धी, अनेक विविध कामे हाताळण्याची शैली या सर्वांमध्ये तोडरमलची बरोबरी करणारा एकही मुलकी आणि लष्करी अधिकारी बादशहाच्या दरबारात नव्हता. इतके असूनसुद्धा तो स्वतंत्रपणे विचार करणारा असून खाजगी जीवनात हिन्दूंचे आचार विचार कटाक्षाने पाळत असे.

तोडरमलनंतर थोड्याच दिवसांनी अकबराच्या मर्जीतला दुसरा एक मोठा सरदार मरण पावला. राजा तोडरमलच्या स्मशानयात्रेबरोबर भगवंतदास होता. तेथे थंडीची बाधा होऊन परत आल्यावर त्याला ओकाऱ्या होऊन मूत्रावरोध झाला. १४ नोव्हेंबर १५८९ रोजी लाहोर येथे तो मरण पावला.

**भगवन्तदासचा मृत्यु**

राजा भगवंतदास हा अंबरचा भारमलचा मुलगा असून त्याची बहीण ही अकबराची पट्टराणी होती. १५६२ पासून अखेरपर्यंत तो बादशहाचा सहचर होता

आणि गुजराथ ते काबूल आणि काश्मीरपर्यंत झालेल्या अनेक स्वाऱ्यात त्याने मोठे शौर्य गाजविले होते. परौंखा आणि सारनाल येथे त्याने स्वतःचा जीव पण धोक्यात घातला होता. हुशारी आणि स्वामीनिष्ठा या दोन गुणांमुळे ५००० ची मनसबदारी आणि अमीर-उल्-उम्रा हा किताब त्याने मिळविला. बादशाही नोकरीतली ही दुसरी अत्यंत मोठी अधिकाराची जागा असून त्याच्यावर पंतप्रधान हा एकच अधिकारी असे. लाहोरचा सुभेदार म्हणून काही वर्षे काम केल्यानंतर काश्मीरला जाण्यापूर्वी बादशहाने तोडरमल आणि कुलीजखान यांच्या बरोबर राज्याचा मध्यवर्ती कारभार पाहण्यासाठी त्याची नेमणूक केली. शौर्य, मुत्सदेगिरी आणि चोख न्यायीपणा यांचा त्याच्यावर वरदहस्त होता असे अबुल फझल म्हणतो. साम्राज्यातील अत्यंत विश्वासू सरदारांपैकी तो एक होता. त्याच्या मृत्यूमुळे अकबराला फार दुःख झाले आणि दुःखवटयाचा एक खलीता त्याने मानसिंगाकडे पाठवून दिला. त्याला "राजा" ही पदवी बहाल करून त्याने त्याच्याकडे एक खिलात (दरबारी पोषाख) एक सुंदर फर्मान, बहुमोल देणग्या आणि एक उमदा घोडा पाठवून दिला. खुद्द राजपुत्र सलीमला अंबरला सांत्वनपर भेटीसाठी पाठवून अकबराने कछवा घराण्याबद्दलचे आपले प्रेम प्रदर्शित केले.

## सिन्धचा पाडाव

कंदाहारवर बादशहाचा अनेक दिवस डोळा होता, पण सिंधवर संपूर्ण तावा मिळविल्या खेरीज कंदाहारचा कब्जा घेणे फार कठीण आहे हे अकबराचे लक्षात आले होते. यासाठी सिंध आणि कंदाहार या दोन्हींवर एकाच वेळी चाल करून जाण्याचा बेत त्याने आखला. भक्करवर त्याचा ताबा होताच. आता ठठ्ठा काबीज करून सिंधचा राहिलेला भाग आपल्या अंमलाखाली आणण्याची योजना त्याने आखली. ठठ्ठाचा राजा मिर्झा जानी बेग अर्घुन याने स्वतः दरबारात बादशहासमोर हजर होण्याचे टाळले होते. ठरलेल्या योजनेप्रमाणे कंदाहारच्या स्वारीवर नेमणूक झालेला अब्दुल रहिम खान खानान हा प्रथम ठठ्ठावर चालून गेला. तो भक्करजवळ येऊन पोहोचला तेव्हा "तू कंदाहारच्या स्वारीवर जा, मी तुला मदतीला माझी फौज देतो." असे मिर्झा जानी बेगने त्याला सुचविले. पण खान खानानचा उद्देश सिंध प्रथम जिंकून घेण्याचा असल्यामुळे त्याने ही सुचना फेटाळून लावली. आणि ठठ्ठाचा मार्ग सुरक्षित राखणारी साखीची खिन्ड आपल्या ताब्यात घेतली. नंतर त्याने सिन्धू नदीच्या तीरावर मनछार तलावाच्या जवळील सेवान येथील एका उंचवटयावर असलेल्या किल्ल्यास वेढा दिला. ही जाग

युद्धाच्या दृष्टीने अत्यंत महत्त्वाची असल्यामुळे एक काफीला घेऊन नदी मार्गाने जानी बेग सेवानच्या मदतीसाठी आला. त्याच्या काफील्यात काही युरोपीय खलाशी आणि गोलंदाज होते; पण जानी बेगचा पराभव झाला आणि सेवान बादशाही फौजांच्या हातात पडले. (नोव्हेंबर १५९०).

सुरुवातीच्या या विजयानंतर खानानने ठठ्ठ्याला वेढा देण्याची तयारी केली पण आता पावसाळा डोक्यावर आला होता आणि जवळ पुरेशी रसद पण नव्हती पावसळा सुरू होण्यापूर्वी सिन्धची स्वारी संपवावी म्हणून त्याने बादशहा जवळ अधिक मदतीची मागणी केली. त्याप्रमाणे अकबराने रायसिंगला ठठ्ठ्याकडे पाठ-वून दिले. पण धान्याच्या तुटवड्यामुळे व पावसाळी मोसम असल्यामुळे खान खानानला वेढा उठवून जूनला (June) माघार घ्यावी लागली. पावसाळ्याचा आणि मुघलांच्या अडचणींचा फायदा घेऊन सेवान परत घेण्याचा प्रयत्न मिर्झा जानी बेगने करून पाहिला पण त्यात त्याला यश आले नाही. एक हातघाईची लढाई होऊन त्यात तो पराभूत झाला आणि सिन्धू नदीवर आपण स्वत: बांध-लेल्या आमपूर किंवा आलपूर येथील किल्ल्याच्या आश्रयाला तो पळून गेला. त्या भागावर स्वारी करून खान खानानने तिथल्या किल्ल्याला वेढा दिला. हा वेढा बरेच दिवस चालू होता. शेवटी स्वत:च्या छावणीत मोठी रोगाची साथ सुरू झाल्याने आणि आवश्यक वस्तूंची टंचाई भासू लागल्यामुळे जानीबेग शरण येऊन अकबरापुढे हजर होण्यास तयार झाला. स्वत:च्या मुलीचे लग्न त्याने खान खानानचा मुलगा ईरीज याज बरोबर लावून दिले; पण नंतर तहाच्या अटी अंमलात आणण्यात आणि सेवानच्या बाजूचा मुलूख खानाच्या ताब्यात देण्यात मिर्झा जानी बेगने अळंटळं सुरू केली. तसेच दरबारात स्वत: हजर होणे पण त्याने मुद्दाम लांबणीलर टाकले. ते पाहून खानाने आपल्या सैन्याचे तीन भाग करून एक जलमार्गाने व एक खुष्कीने ठठ्ठाकडे पाठवून दिला आणि ठठ्ठ्यावर तिन्ही बाजूने चाल करुन त्याला वेढा देण्याची योजना त्याने आखली. या फौजांनी नसीरपूर जिंकून घेतले आणि ठठ्यापासून तीन मैलांवरच जानी बेगची छावणी लुटली. पुन: एकदा शरण येऊन जानी बेगने ठठ्याचां किल्ला खानाच्या स्वाधीन केला व आपण स्वत: खान खानान बरोबर लाहोरला गेला. अशा रितीने बादशहाचा जन्म झालेल्या छोट्याशा अमरकोट सह सर्व सिन्ध प्रांत साम्राज्याला जोडण्यात आला. आक्टोंबर १५९३ मध्ये जानी बेगची मुलाखत घेऊन त्याला बादशहाने ३००० ची मनसबदारी आणि मुलतानची सुभेदारी दिली. त्याच वर्षी जुलै महिन्यात अकबराने ठठ्ठाचा किल्ला जान बेगला परत दिला. पण सिंधच्या इतर भागात मुघल अधिकाऱ्यांचा अंमल सुरू होता. दिन-ए-एलाहीची दीक्षा

घेऊन जानी बेगने बादशहाची मर्जी संपादन केली. अशीरगडचा अभेद्य किल्ला पडल्यानंतर थोड्याच दिवसांनी २३ जानेवारी १६०१ रोजी तो अशीरगडला मरण पावला.

## अकबर कंदाहार जिंकून घेतो

कंदाहारचा किल्ला इराणच्या साह्याने हुमायूनने प्रथम जिंकून घेतला होता; पण आपल्या कारकीर्दीच्या सुरुवातीसच अकबराला तो इराणच्या शहाला द्यावा लागला. याबद्दलचा उल्लेख पूर्वी आलेलाच आहे. तो परत जिंकून घेण्याचे सामर्थ्य आता आपल्याजवळ आहे असे वाटून अकबराने कंदाहारकडे आपली नजर वळवली. हिंदुस्थान आणि इराण यांच्यामधील हमरस्त्यावर असलेले कंदाहार, या दोन मोठ्या साम्राज्यांमधील, एक वादाचे स्थळ होते. हिंदुस्थानच्या सरहद्दीच्या रक्षणासाठी आणि बाहेरील जगाबरोबरचा व्यापार सुरक्षित रितीने चालण्यासाठी कंदाहारचा ताबा घेणे आवश्यक होते. तसेच हा हा किल्ला उझबेकांच्या हातांत सापडू नये याबद्दलही अकबर फार दक्ष होता. उझबेकांचा राजा अब्दुल्ला खान याचा कंदाहारवर फार दिवसांपासून डोळा होता. बादशहाच्या सुदैवाने याचवेळी इराणची राजसत्ता डळमळीत झाली होती. सुलतान हुसेन मिर्झाचे दोन मुलगे—मुझफ्फर हुसेन मिर्झा आणि रुस्तुम हुसेन मिर्झा यांच्या ताब्यात कंदाहार आणि त्या भोवतालचा मुलूख असून त्या दोघांनी इराणच्या शहाविरुद्ध बंड पुकारले होते, कंदाहारचा ताबा मुझफ्फर हुसेनकडे असून झमीन दावर रुस्तुम मिर्झाकडे होते. अकबराच्या सुदैवाने याच वेळी या दोघा भावांत भांडणास सुरुवात झाली. मुझफ्फरचा पराभव करून रुस्तुमने कंदाहारच्या किल्ल्याला वेढा देऊन त्याला ४० दिवस तेथे अडकवून ठेवले. दोघांमध्ये वरवर सलोखा झाला, तरी आतल्या आत भांडण सुरूच होते. काही दिवसांनंतर मुझफ्फर झमीन दावरवर चाल करून गेला पण तेथे पराभव पत्करुन त्याला परत कंदाहारला यावे लागले. सरतेशेवटी मुझफ्फरने झमीन दावरचा कब्जा घेतला आणि रुस्तुम हेरातला निघून गेला. तिथून त्याने किलातवर स्वारी केली. याच सुमारास अकबराने खान खानाच्या हाताखाली सैन्य देऊन कंदाहार काबीज करण्यासाठी त्याला पाठवून दिले. यावेळी गझनीचा सुभेदार शरीफ खान याला मध्यस्थी घालून रुस्तुम लाहोरला गेला. दसऱ्याच्या दिवशी ( ऑक्टोबर १५९३ ) अकबराने त्याची मुलाखत घेतली व त्याला ५००० ची मनसबदारी देऊन मिर्झा जानी बेगच्या जागी मुलतानचा सुभेदार नेमले.

बादशहाची फौज जवळ येत आहे असे पाहून मुझफ्फर मिर्झा पण घाबरला. अकबराकडे माफीची याचना करण्याकरता त्याने आपली आई व वडील मुलगा बेराम मिर्झा यांची अकबराकडे रवानगी केली ( मार्च १९९४ ). शहाबेग कंदाहारला पोहोचताच मुझफ्फरने किल्ला त्याच्या स्वाधीन केला आणि आपले २००० किझिलबाश सैन्य बरोबर घेऊन तो करावेग आणि महंमद बेग यांच्या समवेत लाहोरला आला. झमीन दावरचा जिल्हा आणि कंदाहारच्या खालच्या गार्मसरिचा भाग यावेळी उझबेकांच्या ताब्यात होता. हे दोन्ही प्रदेश थोडयाशा चकमकीनंतर बादशाही फौजांनी जिंकून घेतले. उझबेक नंतर हिरातला पळून गेले मुझफ्फर हुसेन मिर्झाचे प्रेमाने स्वागत करून अकबराने त्याला ५००० ची मनसबदारी दिली आणि संबळच्या प्रांतावर त्याची नेमणूक करण्यात आली. या सर्व स्वाऱ्यांचा परिणाम असा झाला की बादशहाच्या साम्राज्याची वायव्य सरहद्द आता हिंदुकुशपर्यन्त जाऊन पोहोचली. ट्रान्स ऑक्सियानाचा अधिपती अब्दुलाखान उझबेक याने बादशहाचे साम्राज्य आणि तुराण यांमधील हिंदुकुशच्या सरहद्दीला १५९४ मध्ये मान्यता दिली.

## सिबीवर कब्जा

कंदाहारवरची मोहीम चालू असतानाच अकबराने बलुचिस्तानमधील क्वेटाच्या ईशान्येस असलेला सिनीचा किल्ला जिंकून घेण्याची तजवीज केली. हा प्रसिद्ध किल्ला कंदाहारच्या रस्त्यावर असून कंदाहार जिंकून आपल्या ताब्यात ठेवू पाहणाऱ्या बादशहास तो ताब्यात घेणे आवश्यक होते. फेब्रुवारी १५९५ च्या सुरुवातीस अकबराने धाडलेल्या सैन्याने सिनी जिंकले. किल्ल्याच्या संरक्षणास ठेवलेली अफगाण फौज बाहेर येऊन लढाईस तयार झाली. त्यांचा पराभव झाला. आणि ते किल्ल्याच्या आश्रयास निघून गेले. नंतर अकबराच्या फौजांनी किल्यास चहूबाजूंनी वेढा दिला. अफगाणांनी शरणागती पत्करून किल्ला बादशाही फौजांच्या स्वाधीन केला. या विजयाने " कंदाहार, कच्छ आणि मेकरान पर्यन्तचा सर्व मुलूख अकबराच्या राज्यात दाखल करून घेण्यात आला. "

## इराणचा वकील

अकबर कंदाहारवर स्वारी करण्याची तयारी करीत आहे हे दिसताच इराणचा शहा चिंताग्रस्त झाला. त्याने यादगार सुलतान शामलु याला बरोबर मोठा नजराणा देऊन लाहोरला अकबराच्या दरबारी पाठवून दिले. १६ मे

१५९१ रोजी बादशहाने त्याची मुलाखत घेतली. हा वकील पाठवण्यात इराणच्या शहाचे दोन हेतू होते. उझबेकाने जबरदस्ती करून ताब्यात घेतलेले खोरासान परत जिंकून घेण्यासाठी त्याला अकबराची मदत हवी होती. दुसरा हेतू कंदाहार मुघलांच्या हातात पडू न देणे हा होता. खुरासानला फौज पाठविण्याची कल्पना अकबरास रुचली नाही; कारण ट्रान्स ऑक्सीयानाचा अब्दुल्लाखान उझबेग याच्याबरोबरचे त्याचे सबंध मैत्रीचे असून दोघांनी अनेक वेळा परस्परांकडे वकीलामार्फत नजराणे व भेटी पाठविल्या होत्या. तसेच राजपुत्र असतांना शहा अब्बासने आपल्या बापाविरुद्ध हिरातमध्ये बंड उभारले होते, आणि बादशहाकडे मदतीची याचना केली होती. ही मागणी पण बादशहाने मान्य केली नाही; कारण स्वत:च्या बापाविरुद्ध बंड करून उठणाऱ्या मुलास मदत करणे त्याला योग्य वाटले नसावे. एकंदरीत पाहता या इराणी वकिलातीचा राजकीय दृष्टचा काही फायदा झाला नाही.

—o—

# प्रकरण १६ वे

## बिहारमध्ये मानसिंग : ओरिसा, सौराष्ट्र आणि जुनागडवर विजय

### राजा मानसिंगाची बिहारमधील कारकीर्द

इ. ड. १५५७ मध्ये मानसिंगची काबूलहून बिहारला बदली झाली आणि आपल्या हुशारीने बिहारचा कारभार त्याने अत्यंत यशस्वी करून दाखविला. बिहारमधील बलशाली जमिनदारांना बादशाही सत्तेखाली आणणे हे त्याचे मुख्य काम होते; आणि त्यात तो खूपच यशस्वी झाला. प्रथम त्याने गिधोरवर स्वारी केली. तिथला राजा पुरणमल याने सुरवातीस प्रतिकार केला पण त्याला अखेरीस पराभव पत्करणे भाग पडले. आपल्या जवळचे उत्कृष्ट हत्ती आणि इतर मोलाच्या वस्तू त्याने मानसिंगाला दिल्या आणि त्या बादशहाकडे पाठवून देण्यात आल्या. आपल्या मुलीचे लग्न त्याने मानसिंगच्या चंद्रभान नावाच्या भावाबरोबर लावून दिले. यानंतर खरगपूरचा राजा संग्रामसिंग काही विरोध न करता मानसिंगाला शरण आला आणि आपल्या जवळच्या अनेक किमती वस्तू त्याने मानसिंगाला दिल्या या विजयानंतर मानसिंग पाटण्याला परत गेला. नंतर थोड्याच दिवसानी गया जिल्ह्यातल्या अनंत चेरूवर स्वारी करून मानसिंगाने त्याचा पराभव केला. मानसिंग इकडे गुंतला असताना बंगालमधील बंडखोर सुलतान कुली कालमाक आणि कचेरा यांनी पूर्व बिहारवर स्वारी केली. घोराघाटच्या मार्गाने येऊन त्याने पूर्णिया आणि ताजपूर लुटले आणि दरभंग्यांवर चाल केली. तिथला फौजदार फारुख खान याचा शत्रूच्या मोठ्या संख्येपुढे निभाव न लागल्याने तो पाटण्याला निघून आला, पण मानसिंगचा मुलगा जगत्सिंग शत्रूवर चालून गेला. आणि तो हाजीपूरला पोचला. तेव्हा बंडखोरांनी तेथून पलायन केले. त्यांचा पाठलाग करीत असता पुष्कळ लूट जगत्सिंगच्या हातात सापडली. मानसिंगने ५४ हत्ती आणि इतर मौल्यवान चिजा दरबारात पाठवून दिल्या. मानसिंगच्या खंबीर पण समजूदार धोरणामुळे बिहार मध्ये शांतता प्रस्थापित झाली.

## मुघलसत्तेपूर्वीचा ओरिसा

इतर अनेक स्वाऱ्या झाल्या, तरी इ. स. १५६८ पर्यन्त ओरिसावर मुघलांची स्वारी झाली नव्हती. त्यासाली बंगालचा अफगाण सुलतान बायाझिद—सुलेमान कुराणीचा मुलगा—याने आपल्या प्रबळ सैन्यानिशी ओरिसावर स्वारी केली. यावेळी मुकुंदराज उर्फ परमानंद तेथील राजा (इ. स. १५५० ते १५६८) हा होता. नरसिंगदेवला पदच्युत करून तो गादीवर चढला होता. नरसिंगदेवने आपल्या बापावर म्हणजे प्रतापदेवावर विषप्रयोग करून गादी बळकावली होती. परमानंद विषयासक्त आणि उधळल्या स्वभावाचा असून आपल्या राज्याचे संरक्षण आणि कारभार या दोन्हीं बाबींकडे त्याचे दुर्लक्ष होते. मुघल दरबारातून पळून आलेल्या इस्कंदर उझबेकला मदतीला घेऊन बायाझिद झारखंडच्या बाजूने ओरिसाच्या सीमेवर येऊन पोचला. आपले आवडते अधिकारी जिहात राय आणि दुर्गापुंज यांना थोड सैन्य देऊन शत्रूला पिटाळून लावण्यासाठी परमानंदने सहरद्दीवर पाठवून दिले. हे दोघे जण बायाझिदला फितूर होऊन परमानंद विरुद्ध उलटले. नंतर झालेल्या लढाईत परमानंद लढता लढता मरण पावला आणि सर्व प्रदेश दुर्गापुंजच्या हाती पडला. सुलेमानने दुर्गापुंजला पकडून ठार मारले. अशा तऱ्हेने ओरिसाचे स्वातंत्र्य गेले आणि बंगालच्या सुलेमान कराणीच्या राज्याचा तो एक भाग झाला (इ. स. १५६८).

सुलेमान १५७२ साली मरण पावला. नंतर लवकरच अकबराने मुनीम खान-इ- खानानची बंगालच्या स्वारीवर रवानगी केली. तिथला सुलतान दाऊन ओरिसाला पळून गेला. त्यामुळे ओरिसाचा बराच मुलूख खान-इ-खानाने आपल्या ताब्यात घेतला. खान-इ-खांनान आता बंगालचा सुभेदार झाला होता त्याने आणि त्याच्यानंतर खान-इ-जहानने ओरिसाचा बराच मुलूख जिकून घेतला, याबद्दल माहिती पूर्वीच्या प्रकरणात आलीच आहे.

इ. स. १५८० ते १५८३ या बंडाच्या काळात फतलु खान लोहानी या नावाच्या बंगालमधील बंडखोराने ओरिसावर कब्जा मिळविला. राजा मानसिगने ओरिसावर स्वारी केली, त्यावेळी हा प्रांत या अफगाग राजाच्या अधिपत्याखाली होता.

## मानसिंगची ओरिसावर स्वारी

बिहारच्या कारभाराची योग्य व्यवस्था लावल्यावर इ. स. १५८८ च्या अखेरीस मानसिंग ओरिसाच्या स्वारीवर निघाला. झारखंडच्या मार्गाने जाऊन

बंगालच्या सुभेदार सैदखानसाठी काही दिवस तो भागलपूरला थांबला, पण सैदरखानला या स्वारीबद्दल विशेष उत्साह नव्हता आणि पावसाळ्याचे दिवस जवळ आल्यामुळे स्वारीचा बेत काही दिवस पुढे ढकलावा लागला. इ. स. १५८९ च्या वसंत ऋतुत मानसिंगने पुन्हा एकदा स्वारीची तयारी केली आणि बरद्वानच्या मार्गाने तो ओरिसाकडे निघाला. पहाडखानच्या हाताखाली छोटीशी बंगाली फौज आपल्या तोफखान्यासह राजाला येऊन मिळाली आणि हल्लीच्या हुबळी जिल्ह्यातील जहानाबाद येथे दोन्ही सैन्यांनी तळ दिला. समजुतीची बोलणी करुन ओरिसामधील प्रमुख जमिनदारांना आपल्या बाजूला वळविण्यात मानसिगला थोडे फार यश आले. दरम्यान मुघल सैन्याला थोपवून धरण्यासाठी कतलु खान लोहानी सरळ धारपूरला आला. तसेच मानसिंग विरुद्ध दुसरी आघाडी उघडण्यासाठी त्याने बहादूर कुरूला बरोबर सैन्य देऊन जलेसार (जेलासोर) जिल्ह्यातील रायपूर येथे पाठवून दिले. मानसिगने आपला मुलगा जगत्-सिंग याला बहादूर विरुद्ध पाठवुन दिले. समोरा समोर युद्ध न करता, आपण शरण येण्यास तयार आहोत असा बहाणा करून, बहादूर रायपूरच्या किल्ल्यात जाऊन बसला. युद्धाच्या डावपेचाची फारशी माहितो नसल्यामुळे जगत्सिंग या युक्तीने फसला. बहादूरने आता कतलुला आपल्या मदतीसाठी बोलावून घेतले आणि घाईने रायपूरला येऊन तो जगत्सिंगावर तुटून पडला. या अनपेक्षित हल्ल्यामुळे जगत्सिंगाचा पराभव झाला. या वेळच्या लढाईत भिका राठोड महेश दास आणि नारू चरण यांसारखे अनेक प्राख्यात लढवय्ये धारातीर्थी पडले आणि खुद्द जगत्सिंगपण मारला गेला अशी अफवा उठली. सुदैवाने हमीर नावाचा एका स्वामिनिष्ठ जमीनदार जगत्सिंगला घेऊन बांकुरा जिल्ह्यातील भीषणगड (विष्णुपुर) या आपल्या मुख्य गावी सुखरूप येऊन पोहोचला. अशा तऱ्हेने या पहिल्या चकमकीत मुघल सैन्याला मोठा पराभव पत्कारावा पत्करावा लागला.

## नासीर बरोबर तह

झाल्या प्रकाराबद्दल खेद करत न बसता मानसिंगाने आपल्या अधिकाऱ्यांना एकत्र बोलावून ओरिसाविरुद्ध करावयाच्या पुढील कारवाईबद्दल त्यांच्याशी चर्चा केली. सलीमाबादपर्यंत मागे जाऊन पूर्ण तयारी झाल्यावर ओरिसावर परत स्वारी करावी असे या अधिकाऱ्यांचे मत पडले; पण असे केल्याने शत्रू अधिक शेफारून जाईल असे वाटून मानसिगाने या सूचनेला विरोध केला. त्याने

कतलु खान विरुद्ध ताबडतोब चाल करून जाण्याचे ठरविले. सुदैवाने ही मोहीम सुरु होण्यापूर्वीच कतलुखान मरण पावला आणि ख्वाजा ईसाच्या हाताखालील अफगाणी सन्याने कतलचा मुलगा नासीर याला आपला पुढारी नेमले. एका आठ वड्यातच ख्वाजा ईसा आणि नासीर यांनी तहाची बोलणी सुरू केली आणि राजा मानसिंगने या तहाच्या अटी मान्य केल्या. नासीरखानने अकबराचे अधि-पत्य मान्य करून त्याच्या नावाने खुतबा वाचला. जगन्नाथच्या मंदीरासह पुरी जिल्ह्या खालसा करण्यात येऊन त्याचा बंदोबस्त बादशहाच्या खाजगी अधि-काऱ्याकडे सोपविण्यात आला. अशी तडजोड झाली या तहानंतर कतलूचा नासीर मानसिंगच्या भेटीस आला आणि १५० हत्ती आणि इतर मौल्यवान चिजा त्याने त्याला भेट दिल्या. (१५८९)

## नासीर तहाच्या अटी मोडतो : ओरिसावर अखेरचा विजय

हा तह म्हणजे तात्पुरता युद्धविरामच ठरला. अकबराला तो मनापासून पसंत नव्हता आणि अफगाण सैन्याने जबरदस्तीने त्याला संमती दिली होती. ख्वाजा ईसा जिवंत असेपर्यंत ते स्वस्थ राहिले, पण तो मेल्यावर त्यांनी जगन्ना-थचे मंदीर उध्वस्त केले आणि हमीरचे मुख्य शहर बिषणगड (विष्णुपुर)— जेथे जगत्सिंगने आसरा घेतला होता— ते पण लुटले: यामुळे मानसिंग अतिशय संतापला आणि बादशहाची परवानगी घेऊन त्याने अफगाणांविरुद्ध पुन्हा मोहिम सुरू केली. आपल्या सैन्याची त्याने तीन भागांत विभागणी केली स्वतःच्या हाताखालची फौज घेऊन २ नोव्हेंबर १५५१ रोजी तो बोटी-तून गंगेच्या मार्गे निघाला. तुलकखानच्या हाताखालील दुसरी फौज खुष्कीच्या मार्गाने निघाली आणि काश्मीरचा भूतपूर्व राजा युसुफ खानच्या हाताखाली तिसरी फौज झारखंडच्या वाटेने निघाली. बंगालचा सुभेदार सैद-खान आजारी असल्यामुळे मानसिंगच्या फौजेला तो जरा उशीरा येऊन मिळाला. त्याच्या बरोबर १५०० घोडेस्वार आणि ६००० पायदळ होते. मुघल फौज ओरिसात शिरताच अफगाणांनी धूर्तपणे तहाच्या बोलण्यास सुरुवात केली. अफगाणांचा पुरता अनुभव आलेला असल्याने मानसिंगने बोलणी फेटाळून लावली. तहाची बोलणी चालू ठेवावी असा आग्रह धरून बंगालच्या सुभेदार सैदखानने दूर अंतरावर छावणो देऊन मानसिंगला मदत देण्याचे नाकबूल केले. त्याला न जुमानता मानसिंगाने युद्धाची तयारी केली. मिदनापूरच्या जंगलात सुवर्णरेखा नदीच्या पलिकडल्या बाजूस अफगाणांची छावणी होती आणि दोन्ही

सैन्यांत लहानमोठ्या चकमकी सुरू होत्या. त्यांत अफगाणांची बहुधा पीछेहाट झाली. दरम्यान मानसिंगच्या आघाडीच्या तुकडीने नदीकाठची एक टेकडी काबीज करून घेतली, त्यामुळे अफगाणांना नदी ओलांडणे भाग पडले. सुवर्ण-रेखा नदीच्या उत्तर तीरावर जेलासोरपासून १२ मैलावर असलेल्या बिनापूर ( मालनापूर ) गावी दोन्ही सैन्यांत मोठी लढाई झाली. शत्रूचे सैन्य मोठ्या शर्थीने लढले, पण शेवटी पराभव पत्करून त्यांना पळून जावे लागले. शत्रूचा पाठलाग करीत मानसिंग जेलासोरपर्यंत गेला; पण शूर मानसिंगाबद्दल द्वेषबुद्धी बाळगणारा सैदखान याचवेळी त्याला सोडून बंगालमध्ये निघून गेला. परंतु पहाड खान, बाबु–इ–मनकली आणि इतर काही सेनानी सैदखानपासून अलग होऊन आपल्या हाताखालील फौजेनिशी राजाला येऊन मिळाले आणि त्यांनी अफगाणांच्या पाठलागाला परत सुरुवात केली. नसीर आणि कुतलुखानचे इतर मुलगे, राजा मनु, खेमकरण आणि पुरुषोत्तम इत्यादी आपल्या अनुयायांसह ३०० हत्ती घेऊन, कटकच्या दक्षिणेस ३ मैलांवर असलेल्या सारंगगडच्या किल्ल्याच्या आश्रयास जाऊन राहिले. सारंगगडवर चालून जाऊन मानसिंगाने तो किल्ला युद्ध न करता काबीज केला. येथे शत्रूने काहीच प्रतिकार केला नाही. मानसिंग चाल करून येत आहे असे पहाताच ते पळून गेले. यानंतर आलचा किल्ला पण मानसिंगच्या हातात पडला. युसुफ खानच्या हातात कटक सोपवून मानसिंगने जगन्नाथची यात्रा केली. सेरायनच्या राजा रामचंद्रला पण शरण येण्यास त्याने भाग पाडले. एकदा हातातून गेलेले जेलासोर पुन: मुघलांच्या हातात पडले; आणि सारंगगडला आश्रय घेऊन राहिलेले अफगाण आता मानसिंगला शरण आले ( इ. स. १५९२ ). अशा तऱ्हेने सर्व ओरिसा प्रांत मानसिंगच्या हातात पडला.

## ओरिसातल्या जमीनदारांचे पारिपत्य

मानसिंगाने आता ओरिसातल्या बलिष्ठ जमीदारांविरुद्ध मोहीम सुरू केली. ओरिसातला सेरायन आणि खुर्डयाचा प्रसिद्ध राजा रामचंद्र याचे मुघलांशी काही काळ सख्य होते. तिकडे दुर्लक्ष करून मानसिंगाने त्याच्या-विरुद्ध आपले सैन्य रवाना केले. त्याने सहजपाल, खारागड, कालुपाश, कहनान, लोनगड, भूनमल इत्यादी ठिकाणे काबीज केली. रामचंद्र खुडर्याच्या किल्ल्यात आश्रयासाठी जाऊन राहिला. रामचंद्रसारख्या मित्राविरुद्ध इतकी कडक उपाय-योजना केल्याबद्दल अकबर मानसिंगावर रागावला. तेव्हा मानसिगने आपले

सैन्य परत बोलावून झाल्या प्रकाराबद्दल आपला खेद प्रदर्शित केला. रामचंद्र यानंतर मानसिंगच्या भेटीला आला तेव्हा त्याचे आदराने स्वागत झाले.

मानसिंगाच्या कडक धोरणामुळे ओरिसामध्ये काहीशी अस्वस्थता निर्माण झाली. अफगाण लोक शरण आल्यानंतर त्यांच्यातल्या ख्वाजा सुलेमान ख्वाजा उस्मान आणि हबीब हैबतराव इत्यादी सरदारांना बंगालमधील खलिफाबाद जिल्ह्यात मानसिंगाने प्रथम जहागिरी दिल्या; पण नंतर आपला बेत बदलून त्याने या सर्वांना आपल्यासमोर हजर होण्यास फर्माविले. त्यामुळे चिडून जाऊन त्यांनी खरगपूरजवळ बादशाही फौजेवर हल्ला चढविला, आणि सात-गावपर्यंत प्रदेश लुटण्यास सुरुवात केली. त्यांच्याविरुद्ध राजाने आपला मुलगा हिंमतसिंग याला पाठविले. हा लढा पुष्कळ दिवस चालू राहिला. आणि त्याला सार्वत्रिक बंडाईचे स्वरूप आले. यात अनेक मोठे जमीनदार अफगाणांना जाऊन मिळाले; पण मानसिंगाने अखेरीस ओरिसा आणि तेलंगणच्या हद्दीवरचा शत्रूच्या ताब्यातला मानपूरचा किल्ला हस्तगत केला आणि बंडाचा शेवट केला.

## अकबरनगरचा पाया घातला जातो

ओरिसाच्या विजयाचे बक्षिस म्हणून मानसिंगला ओरिसा आणि बंगाल या दोन्ही प्रांतांची सुभेदारी देण्यात आली. आपल्या राजधानीची जागा सुरक्षित असावी म्हणून त्याने आकमहाल या जुन्या गावाजवळ राजमहाल हे नवे शहर वसवले आणि त्याला अकबरनगर असे नाव दिले; पण लोकांमध्ये राजमहाल हेच त्याचे नाव रूढ झाले. बंगालची राजधानी राजमहालला हलवल्यानंतर लवकरच ईसाखानच्या मुलुखावर मानसिंगाने स्वारी केली आणि शेरगडजवळ एक किल्ला बांधून त्याला राजपुत्र सलीमच्या नावाने सलीमनगर असे नाव दिले.

## मानसिंग बसना पुनः जिंकून घेतो : बंडखोरांचा पराभव

यानंतर बसनचा किल्ला पुन्हा जिंकून घेण्यासाठी मानसिंगाने दुर्जनसिंगाच्या हाताखाली एक फौज रवाना केली. तिथल्या अधिकाऱ्यांच्या निष्काळजीपणामुळे हा किल्ला अफगाणांच्या हातात पडला होता. अनेक दिव-सांच्या लढाईनंतर हा किल्ला मुघलांनी जिंकला. यात सुलेमान मारला गेला आणि केदार राय जखमी होऊन ईसाखानकडे पळून गेला (२० जून १५९६)

इ. स. १५९६ च्या पावसाळ्यात मानसिंग फार आजारी झाला. इतका की तो जगतो की मरतो असे त्याच्या हकीमांना वाटू लागले. यामुळे बंगालच्या बंडखोरांचे पुढारी ईसाखान आणि मासुमखान काबुली यांनी पुन: आपल्या हालचालींस सुरुवात केली. मानसिंग जेथे आजारी पडला होता. त्या घोराघाटपासून २४ मैलांवर ते येऊन ठेवले. पण सुदैवाने तेथे नदीचे पाणी कमी झाल्यामुळे त्यांच्या बोटींचा पुढील मार्ग खुंटला आणि त्यांना परत फिरावे लागले. मानसिंग बरा झाल्यावर त्याने आपला मुलगा हिंमतसिंग याला अफगाणांचे पारिपत्य करण्यास पाठवून दिले. त्यांना पिटाळून लावून त्याने पुष्कळ लूट जमा केली.

## कुचबिहार मुघल सत्तेखाली

कुचबिहारचा प्रदेश ४०० मैल लांब आणि ८० ते २०० मैल रुंद असून त्याच्या पूर्वेस ब्रम्हपुत्रा नदी, उत्तरेस तिबेट आणि आसाम, दक्षिणेस घोराघाट आणि पश्चिमेस तिरहुत आहे. पुष्कळ लोकवस्ती असलेल्या या प्रदेशावर यावेळी राजा लक्ष्मीनारायण याचे आधिपत्य असून त्याच्याजवळ ४००० घोडेस्वार, ७०० हत्ती, २ लाख पायदळ आणि १००० लढाऊ बोटी होत्या. लक्ष्मीनारायणचा गादीवरचा हक्क त्याचा चुलतभाऊ पाटकनवर उर्फ राघवदेव याला मान्य नसून तो अकबराशी मैत्री जोडण्याची खटपट करीत होता. मानसिंगाने लक्ष्मीनारायणाशी तह करून त्याच्याकडून अकबराचे आधिपत्य मान्य करून घेतले. तो जातीने मानसिंगला भेटायला आला आणि त्याने आपल्या बहिणीचे मानसिंगाशी लग्न लावून दिले. अशा तऱ्हेने कुचबिहार मुघल साम्राज्याचा एक भाग झाला. यानंतर थोड्या दिवसांनी राघवदेवाने लक्ष्मीनारायणवर स्वारी केली; तेव्हा एका किल्ल्याचा आश्रय घेऊन त्याने मानसिंगास आपल्या मदतीस बोलाविले. मानसिंगाने एक मोठी फौज राघवदेवाविरुद्ध पाठवून ३ मे १५९७ रोजी त्याचा पराभव केला.

## दुर्जनसिंगचा मृत्यू

मानसिंगाचे आक्रमक धोरण आणि त्याने कुचबिहारच्या राजाला दिलेले संरक्षण यामुळे बंगालमधले बंडखोर घाबरून जाऊन त्यांच्यापैकी ईसाखान हा राघवदेवला जाऊन मिळाला. त्याच्याशी लढण्यासाठी मानसिंगाला एक सैन्य रवाना करावे लागले. त्याचवेळी आपला मुलगा दुर्जनसिंग याच्याबरोबर थोडे

सैन्य देऊन जलमार्गाने जाऊन शत्रूच्या घरादारांची नासधूस करण्यासाठी त्याला पाठवून दिले. पण ईसाखान आणि मासूमखान काबुली यांनी पुष्कळ लढाऊ जहाजांनिशी त्यांच्यावर हल्ला चढवून मुघल सैन्याची मोठी कत्तल केली. त्यात दुर्जनसिंग मारला गेला.

**मासूम खान काबुली आणि ईसा यांचा शेवट :–**

**बंगालमध्ये शांतता :–**

बंगालचा प्रमुख बंडखोर मासूम खान काबुली १० मे १५९९ रोजी मरण पावला. त्यामुळे बंडखोरांमध्ये काही काळ शांतता प्रस्थापित झाली. बंगालचा प्रश्न आता सुटला आहे असे वाटून मानसिंगाने थोडे दिवस सुट्टी घेऊन आग्र्याला बादशहाच्या भेटीस जाण्याचे ठरविले. आग्र्याला बादशहाची भेट घेऊन त्याला त्याने अनेक मौल्यवान वस्तू नजर केल्या. त्यांत ५० उत्कृष्ट हिरे होते. सप्टेंबर १५९९ च्या अखेरीस दुसरा प्रसिद्ध बंडखोर ईसा हा पण मरण पावला. यानंतर मानसिंगचा मुक्काम बहुतेक अजमेरलाच असे. आणि तेथून आपल्या प्रतिनिधी करवी तो बंगालचा कारभार पहात असे. बंगालचा नवा नायब सुभेदार महासिंग हा पोरवयाचा असून तो मानसिगचा नातू आणि मानसिंगच्या मरण पावलेल्या मुलाचा जगत्सिंगचा मुलगा होता. बंगाल वर राज्य करणे काही सोपे काम नव्हते. मानसिंगच्या गैर हजेरीचा फायदा घेऊन उस्मान, सजावल आणि इतर अफगाण बंडखोरांनी पुन्हा युद्धास सुरुवात केली. मे १६०० मध्ये महासिग आणि त्याचा चुलता प्रतापसिग यांचा भाद्रकच्या लढाईत पराभव करून बंडखोरांनी बंगालचा काही भाग काबीज केला. त्यामुळे मानसिंगला बंगालमध्ये जाणे भाग पडले. प्रदीर्घ मोहिमेनंतर शेरपूर आताई–जवळ अफगाणांची दाणादाण करून ( फेब्रुवारी १६०१ ) त्याने बसना आणि जेसोर जवळील महेशपूर पर्यंत त्यांचा पाठलाग केला. अफगाणांविरुद्ध त्याने आपली मोहीम चालूच ठेवली. सरते शेवटी मासूमखान काबूलीचा मुलगा शुजा आणि लाछीन काकशालचा मुलगा सैद त्याला शरण आले. त्यांच्याशी व त्यांच्या अनुयांयाशी समझोता करून मानसिंगने बंगालचे बंड संपुष्टात आणले.

**पूर्व बंगालवर विजय**

**डाक्क्याला मानसिंगचे मुख्य ठाणे :–**

या विजयानंतर मानसिंग डाक्क्यावर चालून गेला आणि तिथला राज केदार राय याला शरण येण्यास भाग पाडले. अकरा आणि माल्डचामध्ये बंड

करून उठलेल्या जलाला विरुद्ध त्याने आपला नातू महासिंग आणि ख्वाजा अबर अनसारी यांची रवानगी केली. महासिंगाने महानदी ओलांडली आणि पलिकडल्या तिरावर ५०० घोडेस्वार आणि ५००० पायदळासह तळ देऊन असलेल्या जलालावर हल्ला करून त्याला पराभूत केले. नंतर पूर्णियाचा प्रांत उध्वस्त करू लागलेल्या ख्वाझी मुनीमवर तो चालून गेला. जंगलाचा आश्रय घेऊन ख्वाझीने एका मोक्याच्या जागी महासिंगावर हल्ला चढविला; पण शेवटी पराभूत होऊन तो मारला गेला. याच सुमारास उस्मान अफगाण ब्रह्मपुत्रा पार करून आला आणि भवालच्या सरकारी ठाणेदाराला त्याने तेथून हाकलून दिले. तेव्हा भवालला जाऊन मानसिंगने शत्रूला पिटाळून लावले. तेथे शांतता प्रस्थापित करून तो डाक्क्याला परत आला, आणि तेथेच त्याने आपला मुक्काम ठेवला. त्यानंतर विक्रमपूर आणि सान्हणपूर येथील ईसा आणि केदारचाही त्याने पराभव केला. नद्यांनी आणि जंगलांनी भरलेल्या या प्रदेशात युद्ध करणे सोपे काम नव्हते. पण आपल्या फौजेचे सर्व बळ एकवटून मानसिंगाने तेथे विजय प्राप्त करून घेतला. दाऊद आणि इतर अफगाण सोनारगावला पळून गेले. (इ. स. १६०२) इ. स. १६०३ मध्ये पूर्व बंगालमध्ये पुन: अशांतता पसरली. माघ देशाच्या राज्याने (आराकान) परमहानी (वर्मभट्टी) च्या किल्ल्यावर हल्ला चढविला आणि किल्ल्यावरील शिबंदीच्या मदतीसाठी मानसिंगाने इब्राहिम बेग अतका आणि इतर काही अधिकाऱ्यांना पाठवून दिले. हल्ला अयशस्वी झाला असे पाहून शत्रूने नदीवरल्या आपल्या बोटीतून गोळीबार सुरू केला. याच वेळी दुसरा एक बलिष्ठ राजा केदार आपला मोठा काफिला घेऊन त्याला येऊन मिळाला त्या दोघांनी मिळून श्रीनगरच्या मुघल ठाण्यावर हल्ला चढविला; पण मानसिंग जागरूक असल्यामुळे त्याने एक छोटेसे सैन्य त्यांच्याविरूद्ध पाठवून विक्रमपूर येथे त्यांचा पराभव केला. केदार जखमी होऊन मुघलांच्या हाती सापडला व नंतर काही दिवसांनी मरण पावला. उस्मान विरुद्ध मोहिमेच्या तयारीत असलेला मानसिंग माघ राजाविरूद्ध चालून गेला. पण तो राजा लढाई न करताच आपल्या प्रांतात निघून गेला. यानंतर मानसिंग उस्मानवर चालून गेला; पण तो ही लढाई न करताच पळून गेला. मानसिंग नंतर डाक्क्याला परत आला. (१६०४) बंगालमध्ये आता शांतता प्रस्थापित झाली.

## जुनागेड, सौराष्ट्र आणि द्वारकेवर विजय

मानसिंग ओरिसाच्या स्वारीवर गुंतला असताना पश्चिमेकडे सबंध काठेवाड प्रांत अकबराच्या सत्तेखाली आणून साम्राज्याची हद्द समुद्रापर्यंत नेऊन

भिडविण्याचे प्रयत्न सुरू होते. सुभेदार अब्दुल रहीम खान-इ-खानान याला गुजराथहून परत बोलावून (इ. स. १५८९) त्याची जागा खान-इ-आझम कोकाला मिळेपर्यंत (जून १५९०) मध्यंतरीच्या काळात नवानगरच्या जाम सत्रसालने तिसऱ्या मुझफ्फरबरोबर संगनमतकरून जुनागड आणि सौराष्ट्र मधला दौलत खान (अमीन खान घुरीचा मुलगा) आणि कच्छचा राजा खेनगार यांच्या मदतीने मुघलांच्या विरुद्ध एक मोठी संयुक्त आघाडी उभी केली. यांच्या सर्व सैन्याचे नेतृत्व मुझफ्फरने आपल्याकडे घेतले. गुजराथची सुभेदारी पत्करल्यावर अझीझ कोकाने या आघाडी विरुद्ध कारवाई करण्याचे ठरवले, पण नवरंग खानच्या हाताखालील त्याची आघाडीची तुकडी मोर्वीच्या पुढे जाण्यास तयार होईना. उलट त्यांनीच शत्रू पक्षाबरोबर समझोत्याची बोलणी सुरू केली. त्याचा अव्हेर करून शत्रूने लढावयाचे ठविले. तेव्हा पावसाळ्याच्या ऐन भरात साबरमती ओलांडून १० जुलै १५९१ रोजी शत्रू बरोबर सामना करण्याचे अझीझ कोकाने ठरविले. १८ जुलैला ध्रोल गावाजवळ दोन्ही सैन्यात निकाराची लढाई झाली. विरुद्ध पक्षाचे रजपूत सैन्य फार शौर्याने लढले तरी सुद्धा बादशाही फौजेचा विजय झाला. हे युद्ध इतके निकाचे झाले की त्यात जाम साहेबाचा सर्वात मोठा मुलगा अजोजी आणि प्रधान जसा हे २००० शिपायांसकट मारले गेले. मुघलांच्या बाजूचे शंभर लोक मारले गेले आणि पाचशे जखमी झाले. जाम आणि मुझफ्फर रणांगणातून पळून गेले. लढाईनंतर अझीझ कोका नवानगरला गेला आणि तेथे त्याने पुष्कळ लूट हस्तगत केली. त्याच वेळी जुना गडचा किल्ला ताब्यात घेण्यासाठी त्याने थोडेसे सन्य रवाना केले. जुनागडचा सुलतान दौलतखान याच वेळी लढाईत झालेल्या जखमांनी मरण पावला, तरी सुद्धा किल्ला मुघलांच्या हातात पडला नाही. तेव्हा काही काळ विश्रांती घेऊन आणि आपल्या सैन्याची पुनः नीट जमवाजमव करून कोकाने पुन्हा मोहिम सुरू केली. सोमनाथ, गोध्रा, मंगळूर, पंडुवा, आणि पोरबंदर इत्यादी १६ महत्त्वाची ठाणी त्याने जिंकून घेतली यानंतर जुनागड किल्ल्यावर त्याने चाल केली. फारसे प्रयास न पडताच किल्ला त्याच्या हातात पडला; कारण किल्ल्यात लागलेल्या आगीमध्ये पुष्कळ युद्ध-साहित्य जळून खाक झाले. आणि किल्ल्यावरचा मुख्य युरोपियन गोलंदाज गोंधळून जऊन किल्ल्याभोवतालच्या खंदकात जाऊन पडला. तरीसुद्धा किल्ल्यावरच्या लोकांनी युद्ध चालूच ठेवले, आणि दीड दीड मण वजनाचे गोळे मुघल सैन्यावर किल्ल्यावरून पडू लागले, सरते शेवटी ३ महिन्याच्या निकाराच्या लढाईनंतर २७ ऑगस्ट १५९२ रोजी किल्ला मुघलांना शरण आला. किल्ल्यावरील शिबंदीला अभय देण्यात आले, आणि दौलतखानचे दोन मुलगे– ७ वर्षांचा मिया खान आणि

१२ वर्षांचा ताज खान यांच्यासकट किल्ल्यावरील फौज किल्ला खाली करून निघून गेली.

जुनागड जिंकल्यानंतर अझीझ कोकाच्या सैन्याने मुझफ्फरचा पाठलाग केला आणि द्वारका काही प्रतिकार न होताच मुघलांच्या हातात पडली. मुझफ्फर एका ठिकाणाहून दुसऱ्या ठिकाणी पळत सुटला आणि सरतेशेवटी कच्छच्या सामुद्रधुनीत बेटावर ऊर्फ शंखोधर (शंकुधार) येथे जाऊन राहिला. तेथे पण त्याला फार दिवस रहाता आले नाही आणि शेवटी पराभूत होऊन तो कच्छला पळून गेला. भूजचा राजा राव भारमलकडे तो आश्रयास असताना भारमलने डिसेंबर १५५३ मध्ये त्याला कपटाने मुघलांच्या स्वाधीन केले. असे म्हणतात की, दुसऱ्या दिवशी सकाळी धुमडका गावात मुझफ्फरने वस्तऱ्याने आपला गळा कापून घेतला. गुजराथ पुन: शांत झाले. आणि कच्छच्या रणाराहित सर्व काठेवाड द्वीपकल्प साम्राज्यात अंतर्भूत झाले.

## ५ कठिकाणच्या स्थानिक बंडाळ्या चालूच

या प्रचंड साम्राज्यात लहानसहान बंडाळ्या नेहमी सुरू असत. कारभारातील शिथिलता किंवा गैरसावधपणा, तसेच एखादी नैसर्गिक आपत्ती यांचा फायदा घेऊन पुष्कळ स्थानिक पुढारी बंडाचा झेंडा उभारीत. या सर्वांचा तपशील देणे कंटाळवाणे होईल. येथे एकच मोठे उदाहरण देतो. फेब्रुवारी १५९० मध्ये अकबर एका हत्तीणीवर बसला असताना बरोबरच्या माजलेल्या हत्तीने तिच्यावर हल्ला केला. अकबर खाली पडून त्याच्या तोंडाला मोठी इजा झाली व तो बेशुद्ध झाला. जखम मोठी असून त्यात अकबर मरण्याचाही संभव आहे अशी अफवा उठली. यामुळे साम्राज्याच्या दूरच्या भागात बंडाळी माजली आणि पुष्कळ परगण्यांत लुटालूट झाली. अलवर जिल्ह्यातला बैरात परगणा शेखावत रजपुतांनी लुटला. पंजाबमधील हल्लीच्या गुरगाव जिल्ह्यातील रेवाडी येथे पण लुटालूट झाली. बैरातचा कमाविसदार शहाबाज खान हा असहाय्यपणे कोईलला (अलीगडला) पळून गेला. दय्याला– (दीपाया)च्या हाताखाली जमलेल्या काही लोकांनी मिरजजवळच्या प्रांतात घुसून धुमाकूळ घातला. शहाकुलीला सैन्य घेऊन या बंडखोरांच्या विरुद्ध पाठविण्यात आले आणि त्याने तेथे लवकरच शांतता प्रस्थापित केली.

**भाठ्याचे बंड**

भाटा किंवा वाघेलखंड येथे अशीच बंडाळी झाली. राजधानीपासून अकबर अनेक दिवस दूर असल्याची संधी साधून भाठ्याच्या राजाने (रेवा) आपले स्वातंत्र्य जाहीर करण्याचे ठरविले. बंधू ( बंधोगड ) राजधानी असलेल्या या राज्याचा विस्तार बराच मोठा होता. उत्तरेस गंगा आणि यमुना, ईशान्येस अलाहाबाद प्रांत आणि पूर्वेस प्रसिद्ध रातंभोर किल्ल्याच्या आसपासचा प्रदेश, अशी या राज्याची हद्द होती. त्याच्या दक्षिणेस आणि नैर्ऋत्येस गराकटंगा ( गोंडवन ) आणि वायव्येस कलिंजरचा किल्ला होता. या राज्याची दक्षिणोत्तर लांबी १५२ मैल असून पूर्वपश्चिम रुंदी १४४ मैल होती पूर्वेस आणि पश्चिमेस काही छोटी छोटी राज्ये भाठ्याचे आधिपत्य स्वीकारून होती. बंधूच्या प्रसिद्ध किल्ल्याभोवती ३ मैल लांबवर पसरलेल्या छोटचा छोटचा टकडचा आणि पहाड होते आणि त्यांमधील लांब खिचोळचा कडयांची लांबी १६ मैल होती. शहराच्या उत्तरेस एक उंच दगडी तट असून त्याला चार दरवाजे होते. किल्ल्याच्या मध्यभागी असलेल्या राजवाडयाभोवती एका पुढे एक असे ४ तट होते. गावामध्ये एक सुंदर तळे आणि मोठे मंदीर होते. राजवाडयाच्या सर्व बाजूला राजाचे नातेवाईक व अनुयायी यांची घरे होती. कुठल्याही मुसलमान राजाला हा किल्ला सर करता आला नव्हता. अल्लाउद्दिन खिलजीलासुद्धा याच्या तटापुढे हार खाऊन परत फिरावे लागले होते.

भाठ्याचा राजा रामचंद्रने अकबराचे सार्वभौमत्व मान्य केले होते; पण बरेच दिवस मुघल दरबारात हजर होऊन बादशहाला कुर्निसात करण्याचे त्याने टाळले होते. फेब्रुवारी १५८४ मध्ये मुघल दरबारात अककरासमोर हजर होणे त्याला भाग पडले याचा उल्लेख पूर्वी आलेलाच आहे व त्यानंतर लौकरच तो मरण पावला. त्याच्यानंतर गादीवर आलेला त्याचा मुलगा बलभद्र याने अकबराच्या दरबारात डिसेंबर १५९२ मध्ये हजेरी दिली आणि भाठ्याच्या राज्यपदी त्याची रीतसर नेमणूक झाली.

त्यानंतर काही वर्षांनी तो पण मरण पावला. त्याचा लहान नातू विक्रमजित याने अकबराचे वर्चस्व झुगारून दिले आणि स्वतंत्र राजा म्हणून आपली कारकीर्द सुरू केली. त्यामुळे १५९४ च्या सुरुवातीस बादशहाने राय तिपुरदासच्या हाताखाली मोठी फौज देऊन बंडखोर विक्रमजित्चा पाडाव करून त्याच्या राज्यातील बंधूची राजधानी आणि प्रमुख किल्ला हस्तगत करून

घेण्यासाठी तिकडे रवाना केले. ही मोहीम दोन वर्षांहून अधिक काळ चालू होती. राय तिपुरदासला सुरुवातीला शूर बाघेला शिपायांशी सामना करावा लागला आणि विक्रमजितचा मुलूख जबरदस्तीने ताब्यात घ्यावा लागला. नंतर त्याने बंधूला वेढा घातला. हा किल्ला अजिंक्य समजला जात असून जोरजबरदस्ती करून तो जिंकून घेणे अशक्य होते. पण 'एखादा मोठा सरदार विक्रमजित्‌ला विनंती करण्यासाठी आला आणि विक्रमजित्‌च्या जीविताची आणि त्याला परत राज्य मिळण्याची बादशहाने हमी दिली आणि भाठ्याहून दरबारात आणि परत भाठ्याला सुखरूप आणण्याची जबाबदारी पत्करली, तर विक्रमजित् दरबारात हजर होण्यास तयार आहे असे किल्ल्यातल्या शिबंदीने कळवले. या अटी मान्य करून अकबराने इस्माईल कुली खानला बंधूला पाठविले. अर्थात् किल्ला आपल्याच ताब्यात राहील असा किल्ल्यावरील लोकांचा समज होता. पण किल्ला प्रथम खाली करा नंतर तो तरुण राजाच्या ताब्यात देण्यात येईल असा आग्रह अकबराने धरला. किल्ल्यावरील शिबंदीने ते न ऐकल्यामुळे वेढा चालूच राहिला. मुघलांनी आजूबाजूचा प्रदेश काबीज करून रसद तोडली त्यामुळे किल्ल्यावरील लोकांचे हाल होऊ लागले. तसेच तिपुरदासने किल्ल्यावरील काही लोकांत फितुरी माजवल्याचे दिसते. कारण अबुल फझल म्हणतो की, "उदार देणग्यांमुळेच किल्ला बादशहाच्या ताब्यात आला." ८ महिने आणि २० दिवसांच्या वेढ्यानंतर ८ जुलै १५९७ रोजी जवळची रसद संपल्यामुळे किल्ल्यावरील लोक वाटाघाटीस तयार झाले. किल्ला खाली केल्यावर पुष्कळशी लूट मुघलांच्या हातात पडली. ती राजा विक्रमजित्‌ला परत देण्यात आली नाही. एप्रिल १६०१ मध्ये रामचंद्रचा दुसरा एक नातू दुर्योधन याला राजाची वस्त्रे देऊन बंधूचा किल्ला त्याच्याकडे सोपवण्यात आला. भारतीचंद नावाच्या एका गृहस्थाला या लहान राजाचा पालक नेमण्यात आले. ⊡

## इतर ठिकाणची बंडाळी

सन १६००–१६०१ मध्ये अकबर दक्षिणेत असताना पंजाबच्या बारी दुआबमधील माओचा राजा बासू, जम्मूचा राजा आणि वायव्य प्रांतातील इतर

⊡ अकबरनामा भाग ३ रा. पाने– ६३०, ६४९ ते ७११, ७२ वुलस्ले (केम्ब्रीज हिस्ट्री ऑफ इंडिया) भाग ४ था याने या राजाचे नाव 'रा असे चुकीचे आहे.

काही छोट्या राजांनी बादशाही सत्तेविरुद्ध बंड पुकारले. त्यांचे पारिपत्य करण्यासाठी रोहटास आणि लाहोरहून मोठे सैन्य पाठवावे लागले. पंजाबच्या डोंगरी मुलुखातील लखनपूर, जसरोता, मामकोट, रामगड आणि कोबस्ट इथल्या राजांनी पण १६०२ मध्ये बादशहाविरुद्ध बंड पुकारले. त्यांचे पारिपत्य करण्यासाठी मोठी फौज तिकडे पाठवल्यानंतरच ते शरण आले.

अकबराचे चरित्र लिहिणारा जर्मन कौंट फॉन नोबेर असे म्हणतो की, "हिंदुस्थानी प्रजा गरीब आणि आज्ञा धारक आहे;" पण अकबरासारख्या एका बलिष्ठ सम्राटाच्या राज्यात झालेली वरील बंडाळी पाहता त्याचे म्हणणे सत्याला धरून आहे असे वाटत नाही.

—०—

# प्रकरण १७ वे

## नवीन समाजव्यवस्थेचा पाया : अघेरचे ख्रिस्ती आणि जैन धर्म प्रचारक

### अकबराची नवीन राज्य व्यवस्था

इ. स, १५८३ पर्यंत अकबराने आपल्या राजकीय आणि शासकीय व्यवस्थेत सर्व प्रश्न सोडविले होते. सार्वभौमत्वाच्या त्याच्या नव्या सिद्धांता प्रमाणे एकंदर राज्यातील राजाचे स्थान विरोधातीत आणि अतिशय उंचावलेले होते. या बाबतीत अबुल फझल लिहितो, " राजपुरुष हा देवाने दिलेला प्रकाश आहे. सर्व जगाला प्रकाश देणाऱ्या सूर्याचा तो किरण आहे. सर्वगुण संपन्नतेच्या काव्याचा तो एक भाग असून चालू भाषेत त्याला " फार-इ-इझीदी " (दैवी प्रकाश) आणि पूर्वी त्याला "कियान खुरा " (दिव्य तेजोवलय) म्हणत. हा दैवी प्रकाश ईश्वराकडून राजाला कुणाच्याही मध्यस्ती शिवाय प्राप्त होतो व सर्व मनुष्यप्राणी त्याला भक्तीने अभिवंदन करतात. " दैवाधीन नियतीच्या " या सिद्धांतामुळे राज्यसत्तेचा इस्लामी सिद्धांत आणि त्या संदर्भात राज्यात निर्माण झालेले दोन तऱ्हेचे नागरिकत्त्व ही नाहीशी होऊन राजा हा आपल्या सर्व प्रजेच्या– मग ती कुठल्याही जातीची किंवा धर्माची असो– पितृस्थानी मानला जाऊ लागला आणि या प्रजेचे निःपक्षपातीपणाने कल्याण करणे हे त्याचे मुख्य कर्तव्य बनले. सर्व मुलकी आणि लष्करी कारभारात आजपर्यंत राष्ट्रीय धोरण म्हणून चालू असलेल्या मुसलमानेतर प्रजेबद्दलचा पक्षपात अकबराने बंद केला. मजहर आणि दिन-ए-इलाही यांमुळे धार्मिक मतभेदांना सर्वस्वी नाही तरी काहीसा आळा बसून राज्यकारभारातले शेकडो उच्च अधिकारी एकाच राजकीय आणि सामाजिक पातळी वरून विचार करू लागले. अशा तऱ्हेने एक नवा राजकीय विचार अकबराच्या कारकीर्दीत सुरू झाला.

### सामाजिक सुधारणेची आवश्यकता

अकबराच्या मते राजकीय फेरफारांइतकेच सामाजिक सुधारणेला महत्त्व होते. कारण सामाजिक परिवर्तनाशिवाय देशाला राजकीय स्थैर्य लाभ-

णार नाही अशी त्याची खात्री होती. हिंदू व मुसलमान समाज एकत्र यावेत या हेतूने आपल्या मुलांच्या लग्नात त्याने हिंदू आणि मुसलमान या दोन्ही पद्धतींचा अवलंब केला आणि सर्व देशाला एक नवा धडा घालून दिला. आपल्या रजपूत सहकाऱ्यांना त्याने कुटुंबातल्या माणसासारखी वागणूक दिली आणि जनान्यातल्या हिंदू स्त्रियांना होमवहन इत्यादी सर्व धार्मिक विधी राजवाड्यात करण्याची मुभा दिली. त्याच्या राणीचा–जहांगीरच्या आईचा–भाऊ भूपत १५७३ मध्ये मरण पावला. त्याच्या अंत्य विधीसाठी अंबरला जाण्याची परवानगी बादशहाने नेहमीचा रिवाज सोडून राणीला दिली. तसेच इ. स. १५८९ मध्ये राजा भगवन्तदास मरण पावल्यावर युवराज सलीमला समाचारासाठी मुद्दाम अंबरला पाठवून दिले. हे सर्व मुसलमान धर्म पद्धतीच्या विरुद्ध होते. अकबराच्या दरबारात ईद आणि बारावफत बरोबरच रक्षाबंधन, दसरा, दिवाळी आणि वसंतोत्सव असे हिंदू सण ही साजरे होत असत.

## सामाजिक सुधारणा

इ. स. १५८६ ते १५९४ मध्ये लाहोरच्या मुक्कामात असताना अकबराने हिंदू समाजातल्या दुष्ट चाली नाहीशा करण्यासाठी अनेक राजाज्ञा जारी केल्या. मार्च १५८२ मध्येच अकबराने गुलामांची पद्धत बंद केली होती. प्रजेच्या वैयक्तिक स्वातंत्र्यात कुठलाही अडथळा येणार नाही आणि कोणीही गुलामांची खरेदी व विक्री करणार नाही, याबद्दल खबरदारी घेण्याचे हुकूम ठिकठिकाणच्या कोतवालांना देण्यात आले. इ. स.१५८७च्या नववर्षारंभी कोणत्याही माणसाने एका पेक्षा अधिक बायका करू नयेत असा फतवा अकबराने काढला. फक्त पहिल्या बायकोपासून मूल न झाल्यास पुन्हा लग्न करण्याची सूट या कायद्यात ठेवली होती. नाही तर बदायुनी म्हणतो त्या प्रमाणे "एका माणसाला एकच बायको" हाच कायदा होता. मुले न होण्याइतक्या मोठ्या झालेल्या कुठल्याही बाईला विवाह करण्याचा अधिकार नाकारण्यात आला. विधवांना वाटल्यास पुनर्विवाह करण्याची परवानगी कायद्याने देण्यात आली. नवऱ्याशी प्रत्यक्ष शरीर-संबंध न झालेल्या हिंदू विधवांना सती जाण्याची सक्ती करू नये, असाही कायदा करण्यात आला. इतर विधवा स्त्रियांनाही फक्त स्वच्छेनेच वाटल्यास सती जाण्याची परवानगी देण्यात आली. लग्नाची किमान वयोमर्यादा मुलांसाठी १६ वर्षं व मुलींसाठी १४ वर्षं करण्यात आली. तसेच जुलुम जबरदस्तीने किंवा अनितीच्या मार्गांने विवाह करणे हे गैरकायदा ठरविण्यात आले. सर्व विवाह कायदेशीर

ठरण्यास मुलामूलींची आणि त्यांच्या आईवडिलांची संमती आवश्यक ठरविण्यात आली. हे सर्व कायदे योग्य रितीने पाळले जावेत म्हणून सर्व लग्नांची नोंद ठेवण्यासाठी एक खास अधिकारी–तुई बेगी–नेमण्यात आला. यावेळी बादशहाने काढलेले इतर काही महत्त्वाचे हुकूम खालील प्रमाणेहोते –

सुंता करण्याचे वय १२ वर्षापर्यंत वाढविण्यात आले. प्रत्येकाला आपापल्या धर्माप्रमाणे वागण्याची मुभा देण्यात आली. धर्मांतरावर अकबराचा फारसा विश्वास नव्हता. तरी सुद्धा कोणाला धर्मांतर करावयाचे असल्यास त्याला त्याची आडकाठी नसे. जबरीने मुसलमान केलेल्या हिंदूस त्याच्या इच्छेनुसार परत त्याच्या धर्मात जाण्याची मुभा कायद्यान्वये देण्यात आली. प्रत्येकाला आपल्या सद्सद्विविवेक बुद्धीस अनुसरून योग्य वाटेल त्या परमेश्वराची भक्ती करण्याचे आणि शांततेच्या मार्गाने आपल्या धर्माचा प्रचार करण्याचे स्वातंत्र्य देण्यात आले. मशिदी, मंदीरे, चर्च आणि सिनेगॉग बांधण्यावर कुठल्याही तऱ्हेचे बंधन नव्हते. दारू तयार करणे आणि ती विकणे याला बंदी घालण्यात आली. फक्त औषधासाठी लागणाऱ्या दारूच्या विक्रीसाठी अधिकृत दुकाने उघडण्यात आली. भिकाऱ्यांवर काही नियम लादण्यात आले. त्यांना भीक मागण्याची सर्वस्वी बंदी करावी असे अकबराला नेहमी वाटे. " माझ्या राज्यात कोणीही भिकारी असू नये, असे मला वाटते. " " सर्व लोकांनी उद्योग करून आळस दूर सारावा; म्हणजे त्यांचे चित्त बेकायदेशीर गोष्टींकडे वळणार नाही " असे तो म्हणत असे. पुष्कळ प्रयत्न करून सुद्धा अकबराला ही घातक प्रथा बंद करता आली नाही. पण उदर–निर्वाहाची साधने नसलेल्या लोकांना भटक्यासारखे राहू न देता काही तरी कामास लावण्याची व्यवस्था त्याने केली. स्त्रियांना अनीतीच्या व्यवसायासाठी विकण्याची प्रथा बंद पाडावयचे प्रयत्न झाले. वेश्या व्यवसाय करणाऱ्यांना निराळे काढून गावाबाहेर एके ठिकाणी राहण्याची त्यांची सोय करण्यात आली. अशा बायकांकडे जाणाऱ्यांची किंवा त्यांना घरी बोलविणाऱ्यांची नोंद अधिकाऱ्यांना ठेवावी लागत असे. तसेच प्राण्यांची हत्या करणारे, मेलेल्यांवर क्रिया करणारे आणि भंगी काम करणारे यांची निराळी राहण्याची व्यवस्था करण्यात येऊन त्यांना इतर समाजात मिसळण्याची बंदी करण्यात आली. कबरस्तानासाठी गावाच्या बाहेर पश्चिमेला जागा राखून ठेवण्यात येऊ लागली.

ही नवीन समाज व्यवस्था स्थिर व्हावी म्हणून अकबराने शिक्षण पद्धतीत सुधारणा करून तिच्यावरील मध्ययुगीन संस्कृतीचा पडदा दूर करण्याचा प्रयत्न केला. लहान आणि तरुण लोकांबद्दल खूप आस्था दाखवून त्यांचा योग्य तो

बौद्धिक आणि आध्यात्मिक विकास व्हावा अशी तजवीज करण्याचे प्रत्यन त्याने केले. "मुले ही जीवनातल्या बागेतील तरुण रोपटी आहेत आणि त्यांच्यावर प्रेम करणे म्हणजे उदारधी परमेश्वराकडे आपले लक्ष वळवणे आहे." असे तो म्हणत असे.

निरनिराळ्या इयत्तांचे अभ्यासक्रम सुधारण्यात आले. त्यांच्यात काही नव्या विषयांचा समावेश करून निरुपयोगी असलेले जुने विषय काढून टाकण्यात आले. नीतीशास्त्र, शेतीविषय, भूमिती, परिमाण–पद्धती, ज्योतिष, गणित, राज्यशास्त्र. वैद्यकीय शास्त्र, तर्कशास्त्र, इतिहास इत्यादी विषयांचा नव्या अभ्यासक्रमात समावेश करण्यात आला. "चालू परिस्थितीत आवश्यक असणाऱ्या कोणत्याही विषयांची हेळसांड करू नये." असा दंडक घालण्यात आला. शकविण्याच्या पद्धतीतही फेरफार करण्यात आले. शाळा–कॉलेजात शिकवताना उपयुक्त विषयांवर भर देऊन अरबी भाषा आणि वाङमय शिकवण्यात व्यर्थ वेळ दवडू नये असा हुकूम काढण्यात आला; कारण अरबी ही हिंदुस्थानातल्या लोकांची भाषा होणार नाही हे उघड होते.

हिंदुस्थानातील बुद्धिवान लोकांना दरबारच्या फारसी भाषेत सर्वसाधारण वाङमय उपलब्ध करून द्यावे असा प्रयत्न अकबराने केला. यासाठी स्वतःच्या देखरेखीखाली भाषांतराचे एक नवे खाते उघडून संस्कृत, अरबी, तुर्की आणि ग्रीक भाषांतील धार्मिक व इतर लौकीक ग्रंथ फारसी भाषेत भाषांतरित करण्याचे, काम त्याने सुरू केले. अशा तऱ्हेने फारशी भाषेत अनेक सुंदर ग्रंथ उपलब्ध झाले. या गोष्टीस राज्याच्या सुरवातीसच आरंभ झाला होता. त्यामुळे सर्व— भाषांतरित ग्रंथांची तारीख वार यादी देणे अशक्य आहे. त्यातील काही ग्रंथांची नांवे खाली दिली आहेत.

मूळ संस्कृत मधून– सिंहासन बत्तिशी ( खिराद अफ्झा ), अथर्व वेद, महाभारत, भगवद्गीता, रामायण, हरिवंश पुराण, पंचतंत्र, कथासरित्सागर, नल–दमयंती इ.

तुर्की– तुझुक-इ-बाबरी.

मूळ अरबी मधून फारशीमध्ये भाषांतर–मजमा-उल-बुद्‌न, कुराण, समर्त-उल-फिलसाफा.

ग्रीकमधून–बायबल. तसेच इतिहास, धर्म, तत्वज्ञान अशा अनेक विषयां–वर फारसी भाषेत स्वतंत्र ग्रंथरचना झाली. त्यांची माहिती या चरित्राच्या

पुढच्या एका भागात येईल. फारसी भाषेचा अधिकृत शब्दकोश अकबराने मुद्दाम तयार करवून घेतला. यासाठी त्या वेळचे अनेक प्रसिद्ध विद्वान एकत्र आले होते. त्यांत इराणमधून खास बोलावलेला दस्तुर आरदेशीर पण होता. या शब्दकोषात जुने फारसी, दारी आणि पेहलवी शब्द म्हणी आणि वाक्प्रचार समाविष्ट केलेले आहेत हे काम कित्येक वर्षे चालू होते. अकबराच्या मृत्यूनंतर "फरहांगी जहांगिरी" या नावाखाली हा शब्दकोष प्रसिद्ध करण्यात आला. शेतीला उत्तेजन देऊन उद्योगधंदे आणि व्यापार यांचे योग्य नियंत्रण करण्यात आले. गावातील निरनिराळे व्यापारी आणि औद्योगिक संघ यांच्यासाठी खास संघप्रमुख आणि दलाल नेमण्याची परवानगी ठिकठिकाणच्या कोतवालांना देण्यात आली. धार्मिक किंवा इतर कारणांसाठी बैल, म्हैस, घोडे आणि उंट यांना मारण्याची बंदी करण्यात आली.

## ख्रिस्ती धर्मोपदेशकांची दुसरी भेट

इ. स. १५८२ मध्ये दिन-ए-इलाही ची स्थापना केल्यानंतर ख्रिस्ती आणि जैन धर्मोपदेशकांना दरबारात बोलावून त्यांच्याशी धार्मिक बाबतीत चर्चा करण्याची अकबराला काय जरुर होती. असे काही आधुनिक लेखक म्हणतात. हे म्हणणे चुकीचे आहे कारण दिन-ए-इलाहीची स्थापना केली म्हणून इतर धर्म आणि त्यातले आचारविचार आणि त्यांचा लोकांवर होणारा परिणाम यांची माहिती करून घेण्याची अकबराची जिज्ञासा नाहीशी झाली असावी हे म्हणणे बरोबर नाही. तसेच १४ व्या प्रकरणात सांगितल्याप्रमाणे दिन-ए-इलाहीला हिन्दूचा विरोध आहे हे लक्षात घेऊन अकबराने तो एकमेव प्रस्थापित धर्म आहे असा आग्रह धरला नाही. किंबहुना परमेश्वराविषयी अंतीम ज्ञान मिळविणे जवळ जवळ अशक्य आहे असे या सूज्ञ राज्याला वाटले असावे. याचमुळे आयुष्याच्या अखेर पर्यंत निरनिराळ्या धर्माबद्दलची त्याची जिज्ञासा कायमच राहिली. त्याशिवाय लॅटीन आणि ग्रीक भाषांतील ख्रिस्ती धर्मग्रंथांचे फारसीमध्ये भाषांतर करून घ्यावे अशी अकबराची फार इच्छा होती. ६ एप्रिल १५९० रोजी फादर लिओ ग्रिमॉन (अबुल फझल त्याला फर्बोलियम असे म्हणत असे) हा ख्रिस्ती धर्मगुरू अनपेक्षितपणे बादशहाच्या दरबारात हजर झाला. त्याचा फायदा घेऊन अकबराने गोव्याच्या पोर्तूगीज लाटसाहेबाकडे दोन ख्रिस्ती धर्मगुरू आपल्याकडे पाठवून देण्याची विनंती केली. अशा तऱ्हेने

ख्रिस्ती धर्मोपदेशकांचे दुसरे शिष्टमंटळ दरबारात येण्याची व्यवस्था अकबराने केली.

लिओ ग्रिमॉन हा ग्रीस मधला राहणारा असून ख्रिस्ती धर्म संस्थेतला एक छोटासा अधिकारी होता. हिंदुस्थानातून कुठून तरी आपल्या देशास परत जात असताना लाहोरला त्याने अकबराची भेट घेतली त्याचा योग्य सत्कार करून त्याच्या मदतीने ग्रीक भाषेतील बायबलाचे फारसीत भाषांतर करावे असा आदेश त्याने दरबारातल्या विद्वान लोकांना दिला. लिओ ग्रिमॉन हा मोठा विद्वान आणि शहाणा असून त्याच्यापासून अनेक गोष्टींचे ज्ञान झाले, असे अबुल फझल म्हणतो. इतरही पुष्कळ युरोपियन व अर्मेनियन लोक यावेळी बादशहाच्या दरबारात आले आणि त्यांनी " चिनमधील कापड व त्या देशातीतल इतर काही वस्तू बादशहास दिल्या. "

लिओ ग्रिमॉन गोव्याला जात आहे हे पाहून अकबराने त्याच्याबरोबर गोव्याच्या पोर्तुगीज लाटसाहेबाला आणि तिथल्या ख्रिस्ती धर्मगुरूच्या संघाला आपल्याकडे काही ख्रिस्ती धर्मोपदेशक पाठवून द्यावे अशा अर्थाची दोन निरनिराळी पत्रे पाठविली. लाहोर ते गोवा या मार्गावर ग्रिमॉनला कोणत्याही तऱ्हेची इजा पोहोचू नये आणि त्याला सर्व तऱ्हेचे साहाय्य करावे असे फर्मान ग्रिमॉन ज्या प्रांतातून जाणार होता तेथील सुभेदारांस व अधिकाऱ्यांना देण्यात आले. " ख्रिस्ती धर्माची अधिक माहिती करून घेण्यासाठी मी गोव्याहून काही ख्रिस्ती लोक बोलावले आहेत, तरी त्यांच्या प्रवासाची आणि इतर सर्व व्यवस्था योग्य रीतीने करावी, " असा आदेश अकबराने आपल्या अधिकाऱ्यांना दिला. अलाहाबाद, पाटण, बिकानेर आणि मुलतान या मार्गाने ही मंडळी लाहोरला येणार होती.

गोव्याच्या जेजुइट संघाला पाठविलेल्या पत्रात अकबर लिहितो, " इस्लामी धर्मासकट जगातल्या इतर बहुतेक सर्व धर्मांची माहिती मी करून घेतली आहे. फक्त येशू ख्रिस्ताला परमेश्वराने सांगितलेल्या धर्माबद्दल मला विशेष माहिती नाही. तेव्हा आपल्याशी मैत्रीचे नाते जोडून तुमच्या कडून ख्रिस्ती कराराची माहिती करून घ्यावी असा माझा विचार आहे. आपल्याकडील काही विद्वान धर्मगुरुंना माझ्याकडे पाठवून द्यावे अशी विनंती करून अकबर पुढे लिहितो, आपले धर्मगुरु आणि आमचे विद्वान यांच्यामधील धार्मिक चर्चा ऐकून आपले धर्मगुरु आणि आमची विद्वान मंडळी यांची विद्वत्ता आणि नित्तीमत्ता यांच्याबद्दल मला सापेक्षाने विचार करता येईल. आणि आपले धर्मगुरू आमच्या विद्वान

मंडळींपेक्षा, ज्यांना आम्ही काझीक म्हणतो, कसे श्रेष्ठ आहेत हे मला कळेल आणि त्यामुळे आमच्या काजींनाही सत्य समजून घेण्याची संधी मिळेल. ते माझ्या दरबारी राहण्यास आले, तर त्यांच्या इतमामाप्रमाणे त्यांची राहण्याची सर्व व्यवस्था मी येथे करेन. कुठल्याही खिरस्ती धर्मगुरूची इतकी चांगली व्यवस्था आजपर्यंत या देशात झाली नाही. तसेच त्यांनी परत जाण्याची इच्छा प्रदर्शित करताच खूप सन्मानाने मी त्यांची बोळवण करीन.

गोव्याला पोहोचल्यावर " अकबराला खिरस्ती धर्माबद्दल फार प्रेम आहे आणि इस्लामी धर्म त्याला आवडत नाही. " अशी चुकीची समजूत ग्रीमॉनने तिथल्या लोकांची करून दिली. " तुमच्यापैकी कोणी मुघल दरबारात गेले तर तेथे तुमचे फार मोठे स्वागत होईल. " असे पण त्याने सांगितले. हे मोहक भाषण ऐकल्यानंतर गोव्याच्या खिरस्ती संघाने दोन विद्वान धर्मगुरू डु आर्ट लैताओ आणि खिरस्तेवल–द– व्हेगा आणि एस्तेव्हाव्हो रिबेर नावाच्या दिक्षा न घेत–लेला, अशा तिघांना लाहोरला पाठविण्याचे ठरवले. पुष्कळ लांबचा आणि कष्टाचा प्रवास हळूहळू जाणाऱ्या तांड्यासमवेत करून इ. स. १५९१ मध्ये ही मंडळी लाहोरला पोहोचली आणि तेथे त्यांचे योग्य स्वागत करण्यात आले. राजवाड्यातल्या एका बाजूच्या भागात त्यांची राहण्याची, खाण्यापिण्याची आणि करमणुकीची व्यवस्था करून देण्यात आली. एक शाळा काढण्यास त्यांना मदत देण्यात आली आणि तेथे अकबराचा नातू आणि सरदारांची मुले पोर्तुगीज शिक लागली; पण अकबर खिरस्ती धर्म स्वीकारण्यात तयार नाही आणि दरबारातल्या बऱ्याच मंडळींचा खिरस्ती धर्माला विरोध आहे हे पाहून या मंडळीनी गोव्याला परत जाण्याचे ठरवले. अशा तऱ्हेने खिरस्ती धर्मोपदेशकांची दुसरी भेट संपुष्टात आली. ◘

## दरबारात हिरा विजय सुरीचे शिष्य –

जैन धर्मगुरुचे पहिले शिष्ट मंडळ १५८३ मध्ये अकबकराकडे आले आणि इ. स. १५८५ च्या अखेरीस त्यांचा प्रमुख हिरा विजय सुरी गुजराथला परत

---

◘ अकबरनामा भाग ३. पृष्ठ ५७७
Payne :– Akbar & The Jesuites Page, 49,50,229,
Fr. felix, J. P. H. S., Vol, V, No. 2, pp. 72-74.
Maclagan, pp. 46–482.

गेला; पण त्यानंतरसुद्धा हिरा विजयचे काही शिष्य दरबारात राहिले आणि त्यांच्यातर्फे आणि वेळोवेळी पाठवलेल्या इतर शिष्यांतर्फे अकबराने हिरा विजय सुरीशी आपला संबंध चालू ठेवला. या जैन मुनींमध्ये शांतीचंद्र आणि भानुचंद्र विशेष प्रसिद्ध होते. हिरा विजय सुरीबरोबर फत्तेपूर सिक्रीला आलेल्या शिष्यांत शांतिचंद्र होता. आणि हिरा विजय सुरी परत गेल्यानंतर तो तेथेच अकबराजवळ राहिला. हिरा विजय सुरीच्या उपदेशामुळे अकबराने केलेल्या अनेक सत्कृत्यांची नोंद त्याने एका संस्कृत कवितेतून केली. अकबराजवळ दोन वर्षे राहून १५८७ मध्ये शांतिचंद्र गुजराथला आपल्या गुरुकडे परत गेला. नंतर आचार्यांनी पाठवलेला भानुचंद्र बादशहाजवळ राहू लागला. इतर अनेक कामे असताना वेळात वेळ काढून अकबर त्याच्याबरोबर धार्मिक विषयांवर चर्चा करीत असे. अकबराच्या गाढ स्नेहामुळे भानुचंद्राचे दरबारात फार वजन होते. त्याची तुलना पहिल्या ख्रिस्ती मंडळातला अॅक्का व्हीव्हा आणि तिसऱ्या ख्रिस्ती मंडळातला जेरोम झेवियर याच्याशी करतात. त्याच्या प्रयत्नामुळे १६ नोव्हेंबर १५९० आणि १५९२ या वर्षी जैन लोकांना राज्यातल्या बारा प्रांतांमध्ये अनेक तऱ्हेच्या सवलती देणारी दोन फर्माने बादशहाने हिरा विजय सुरी यांच्यातर्फे काढली, असे म्हणतात. अकबर दुसऱ्यांदा काश्मीरला गेला तेव्हा आणि तो लाहोरला परत आला तेव्हा, अशा दोन्ही वेळी भानुचंद्र बादशहाबरोबर होता. शत्रुंजयला जाणाऱ्या यात्रेकऱ्यांवरील कर बादशहाच्या हुकुमावरून माफ करून घेण्यात त्याला यश आले. जैन धर्मग्रंथांचे गाढे ज्ञान असल्यामुळे भानुचंद्राला उपाध्याय ही पदवी देण्यात आली. इ. स. १५८७ पासून १६०५ ⊡

## दुसरे जैन शिष्ठ-मंडळ

पहिल्या जैन शिष्ठ-मंडळाचे लोक तप गाछा पंथातले होते. या पंथाची माहिती करून घेतल्यावर जैन धर्मातला दुसरा विरोधी पंथ खरतर गाछा याची माहिती करून घ्यावी असे अकबराच्या मनात आले. या वेळेस बिकानेरचा एक मंत्री करमचंद्र बाच्छावत हा या पंथापैकी होता. इ. स. १५९१ च्या सुरुवातीस त्याच्याकडे निरोप धाडून खरतर पंथाचा प्रमुख जिना चंद्र सुरी

⊡ ("भानुचंद्रचरित्र–" संपादक–एम. डी. देसाई. (Commissariat–History of Gujrat). Vot.2., p.p. 232 to 35). पर्यन्त त्याचे अकबराच्या दरबारात वास्तव्य होते.

याचे दरबारात येण्याबद्दल मन वळवावे असे अकबराने कळवले. अकबराच्या आमंत्रणाचा विचार करून जैन आचार्यांनी लाहोरला जाण्याची तयारी केली.

जिना चंद्र सुरी यांचे पूर्वाश्रमीचे नाव सुतवन असे असून जोधपूर संस्थानातल्या खेलसर या गावी एका ओसवाल कुटुंबात १५३८ साली त्यांचा जन्म झाला. ९ व्या वर्षी घर सोडून खरतर गाधाचे जिना माणक्य सुरु यांचे शिष्यत्व त्यांनी पत्करले. इ. स. १५५५ नंतर आपल्या गुरुच्या पश्चात ते स्वतः आचार्य झाले; आणि जिना चंद्र सुरी असे नांव त्यांनी धारण केले. उपासना आणि अभ्यास यांत ते मग्न असत. त्यांनी राजस्थान, गुजराथ, सौराष्ट्र आणि हल्लीचा बहुतेक सर्व उत्तर प्रदेश या प्रांतांत पुष्कळ प्रवास केला होता. इ. स. १५८१ चा पावसाळा त्यांनी आग्र्यात काढला. दिल्ली, हिसार, रोहटक आणि पंजाबातील इतर काही शहरांना त्यांनी भेट दिली. पण त्यांचे मुख्य काम जोधपूर, बिकानेर, गुजराथ आणि जयसलमेर येथील केंद्रातून चाले. त्यांचे अगाध ज्ञान, बहुश्रुतपणा आणि संन्यस्त वृत्ती यांची कीर्ती सर्व देशात पसरून लाहोरला अकबराच्या कानांवर आली आणि आपल्या दरबारात येण्याचे आग्रहाचे आमंत्रण अकबराने त्यांच्याकडे पाठवले. यावेळी जिना चंद्र सुरी ५२ वर्षांचे असून कीर्तीच्या शिखरावर होते. नोव्हेंबर १५९१ मध्ये ते खंबायतला होते. तेथून निघून अहमदाबाद, महिसाणा, सिद्धपूर, पालनपूर, सिरोही, जलोर, पाली, सोजत, मेरटा, फलौडी, सरसा आणि कसूर या मार्गाने १४ फेब्रुवारी १५९२ रोजी ते लाहोरला पोचले. त्यांच्याबरोबर ३१ भिक्षु आणि दीक्षा न घेतलेले इतर पुष्कळ अनुयायी होते. या सर्व भिक्षूंमध्ये जमसोम आणि कनकसोम हे फार प्रसिद्ध होते. लाहोरचा जैन समाज आणि इतर लोक यांच्या व अकबराच्या वतीने त्यांचे राजेशाही थाटात स्वागत झाले. त्यांचा एक प्रसिद्ध शिष्य मानसिंग— नंतरचा माहीम राज— हा त्यावेळी लाहोरमध्ये होता. त्याने करमचंदच्या सहकार्याने हे स्वागत फार मोठ्या प्रमाणावर करण्याची व्यवस्था केली. आचार्यांची व बादशहाची ओळख करून देण्यात आली आणि नंतर त्यांचे प्रवचन ऐकण्यासाठी बादशहा त्यांना आपल्या खाजगी महालात घेऊन गेला. जिना चंद्र जवळजवळ एक वर्षापेक्षा अधिक काळ लाहोरला राहिले. या काळात अकबराचा आणि त्यांचा फार घनिष्ठ संबंध येऊन त्यांनी जैन धर्माचा आणि खास करून खरतर गाछाचे वैशिष्टच अकबराला समजावून सांगितले. त्यांच्या विद्वत्तेने आणि चारित्र्याने अकबर इतका प्रभावित झाला की, आषाढ शुद्ध नवमीपासून पूर्णिमेपर्यंत आपल्या सर्व राज्यात त्याने पशुवधास बंदी केली. त्यांचा अनयायी करमचंद

याच्या विनंतीवरून अकबराने जैन तीर्थंकरांच्या १००० मूर्ति जिना चंद्रांना परत केल्या. तारसुन खानने १५७७ साली त्या सिरोहीहून लुटून आणल्या होत्या. तसेच सुरीच्या विनंतीवरून गुजराथमधील सर्व जैन मंदीरांना आणि यात्रा-स्थळांना संरक्षण देण्याचे फर्मान त्यावेळचा गुजराथचा सुभेदार खान-इ. आझम याच्याकडे पाठवून देण्यात आले. काश्मीरच्या दुसऱ्या भेटीहूत परत आल्यावर अकबराने जिना चंद्र सुरींना २३ फेब्रुवारी १५९३ रोजी 'युगप्रधान' ही पदवी बहाल केली. त्यामुळे जैन समाजाला फार आनंद झाला. करमचंद आणि इतर अनुयायांनी या पदवीच्या निमित्ताने एक मोठा समारंभ घडवून आणला. याच-वेळी सुरींचा मुख्य शिष्य मानसिंग याला सुरीपद देण्यात आले आणि जिना सिंह सुरी असे त्यांचे नांव ठेवले. ☐

## साम्राज्यातल्या प्रांताची चार भागांत विभागणी

१२ फेब्रुवारी १५९२ रोजी अकबराने आपल्या राज्यातल्या प्रांतांची चार भागांत विभागणी केली. महसूलाच्या सोयीसाठी ही व्यवस्था करण्यात आली. प्रत्येक विभागावर एक कुशल अर्थशास्त्रज्ञ नेमण्यात आला. ख्वाजा शमसुद्दिन यांच्या हाताखाली पंजाब, मुलतान, काबूल आणि काश्मीर हे प्रांत देण्यात आले. ख्वाजा निजामुद्दिन अहमद बक्षी ( इतिहासकार )च्या हाताखाली अजमेर, गुजराथ आणि माळवा, तिपुरदासच्या हाताखाली दिल्ली आणि बहुधा अवधचा प्रांत, आणि राय रामदासच्या हाताखाली आग्रा, अलाहाबाद, बंगाल आणि बिहार असे विभाग देण्यात आले. राजा तोडरमलच्या मृत्यूनंतर कुलीजखानला अर्थमंत्री करण्यात आले होते. त्या जागेवर तो कायम राहिला

---

☐ भानुचंद्रचरित्र : पृ. ३१, टीप ३८. करमचंद वंश प्रबंध– ले. जयसौम Proceedings of the Indian history Congress (1939), Vol, 1,P.P. 1065-1068

युगप्रधान जिनाचंद्र सुरी. पृ. १२१ ते १२५.

☐ ऐने– इ. अकबरीमध्ये अकबराच्या कारकीर्दीतल्या विद्वानांच्या व संतांच्या यादीत जिना चंद्र सुरींचे नाव आढळत नाही ही आश्चर्याची गोष्ट आहे. इ. स. १६१४मध्ये त्यांचा मृत्यू झाला.

आणि निरनिराळ्या विभागातले कागदपत्र व महसूलाचा वसूल त्याच्या खात्याकडे पूर्वीप्रमाणेच येण्याचे चालू राहिले. याचवेळी अकबराने चलनपद्धतीत पण सुधारणा केल्या

## काश्मीरला अकबराची दुसरी भेट :

४ जुलै १५९२ रोजी काश्मीरला दुसरी भेट देण्याच्या उद्देशाने अकबराने रावी ओलांडून लाहोरच्या बाहेर तळ ठोकला. पण प्रवासाला प्रत्यक्ष सुरुवात पावसाळ्याच्या दिवसांत २२ जुलैला झाली. काश्मीरमध्ये यावेळी स्थानिक बंडाळी सुरू होती. तिथला पुढारी यादगार कुल याला जरब दाखवून शरण आणण्यासाठी अकबराने या भेटीचा बेत योजला असावा. पण अकबर काश्मीरच्या मार्गावर असतानाच तिथल्या बादशाही फौजांनी यादगारचा पराभव करून आणि हिरापूरपर्यंत त्याचा पाठलाग करून त्याला ठार मारले. ( सप्टेंबर १२, १५९२). काश्मीरच्या वाटेवर नवशेराला पोचण्याच्या आधीच त्याचे मुंडके बादशहाच्या पुढे हजर करण्यात आले. ७ ऑक्टोबर रोजी अकबर श्रीनगरला येऊन पोहोचला. तेथे त्याने दिवाळी साजरी केली. "१२ तारखेला दिवाळीच्या निमित्ताने सर्व बोटी, नदी–किनारे आणि घरांची छपरे दिवे लावून सुशोभित करण्यात आली. हा देखावा फार सुंदर दिसत होता," असे अबुल फझल म्हणतो. यावेळी अकबर श्रीनगरला थोडेच म्हणजे एकूण २४ दिवस राहिला. काश्मीरचा सुभेदार मिर्झा युसुफ खान याने नवे आणि वाढवून दिलेले महसुलीचे दर मान्य न केल्यामुळे अकबराने काश्मीरचे खोरे खालसात जमा केले आणि ख्वाजा शमसुद्दिन याला ३०००ची मनसबदारी देऊन तिथला कारभार त्याच्याकडे सोपवला; पण नंतर थोड्याच दिवसांनी राजपुत्र सलीमच्या विनंतीला मान देऊन युसुफखानला काश्मीरची सुभेदारी परत देण्यात आली. ३१ ऑक्टोबरला श्रीनगरहून निघून २९ डिसेंबर १५९२ रोजी अकबर लाहोरला परत आला.

## अझीझ कोका मक्केला पळून जातो

अकबरचा दूधभाऊ मिर्झा अझीझ कोका हा चंचल बुद्धीचा असून धार्मिक बाबतीत कट्टर मुसलमान होता. अकबराचे धर्मविषयक धोरण त्याला बिलकूल मान्य नव्हते. तसेच मनसबदारांचे घोडे डागण्याचे आणि जहागिरी खालस

करण्याचे बादशहाचे धोरण पण त्याला मान्य नव्हते. पूर्वी एकदा फत्तेपूर सिक्रीला आला असताना दिन–ए–इलाहीबद्दल त्याने हेटाळणीचे उद्गार काढले होते व बिरबल आणि अबुल फझल यांच्यावर खोटे आरोप करून जुनागडहून बादशहाला एक उद्धट पत्र पण लिहिले होते. अकबराशी असलेल्या मतभेदांमुळे अकबराचे मन आपल्याविषयी साफ नाही असे त्याला उगीचच वाटू लागले. म्हणून देश सोडून हेदजाझला जाण्याची तयारी त्याने गुप्तपणे केली. २५ मार्च १५९३ रोजी दीव पोर्तुगाजांकडून जिंकून घेण्याचा बहाणा करून तो तिकडे गेला. तेथून आपल्या बायका, ६ मुली आणि इतर अनुयायी घेऊन तो मक्केकडे बोटीने रवाना झाला. त्याच्या या वेडसर हालचालींची दखल न घेता अकबराने त्याचा मोठा मुलगा शमसी याला १००० ची आणि दुसरा मुलगा शदमन याला ५००ची मनसब दिली. राजपुत्र मुरादची त्याने माळव्याहून गुजराथला बदली केली आणि त्याच्या जागी शहारुख याची माळव्याचा सुभेदार म्हणून नेमणूक केली.

मक्क्याला काव्याच्या मौलवींनी अझीझ कोकाला खूप लुबाडले आणि त्याचे तिथले जीवन असह्य करून टाकले. तेव्हा पश्चात्ताप आणि आपल्या धार्मिक समजुती बाजूला ठेवून तो हिंदुस्थानात परत आला. बादशहाचे पाय धरून त्याने त्याची करुणा भाकली आणि स्वतः दिन–ए–इलाहि पंथात सामील झाला. अकबराने त्याला उठवून कवेत घेतले आणि ५००० ची मनसबदारी देऊन त्याला बिहारला सुभेदार नेमले. यानंतर लौकरच मुख्य प्रधान ( वकीला )च्या जागेवर त्याची नेमणूक करण्यात आली. अझीझच्या आईने लहानपणी अकबराचे पालनपोषण केले होते आणि तिच्याबद्दल अकबराला फार प्रेम होते. त्यामुळे या एकंदर कुटुंबाबरोबरच त्याचे संबंध फार सलोख्याचे व स्नेहाचे होते. सर्वांच्या आदरास पात्र झालेली ही स्त्री (जिजी अनगा) मे १६००मध्ये मरण पावली. अकबराला त्यामुळे फार दुःख झाले आणि त्याने श्मश्रू करून आपल्या डोक्याचे पण मुंडण करून घेतले.

## शेख मुबारकचा मृत्यू

५ ऑगस्ट १५९३ रोजी अबुल फझल आणि फैजीचा बाप शेख मुबारक लाहोर येथे मरण पावला. त्याच्या मुलांनी हिंदू पद्धतीप्रमाणे स्वतःचे मुंडण करून घेतले. शेखमुबारकचा जन्म १५०५ साली झाला आणि मेला तेव्हा तो ८८ वर्षांचा होता. त्या काळातला एकमेव विद्वान अशी त्याची प्रसिद्धी होती. धर्माच्या

बावतीत तो मोठा उदारमतवादी असून इतर धर्मांकडे पाहण्याची त्याची दृष्टी सहानुभूतीची होती. मझहरचे म्हणजेच राजा नेहमीच बरोबर असतो अशा अर्थाचे फर्मान काढण्यास त्यानेच अकबराला प्रवृत्त केले. अकबराच्या एकंदर धार्मिक विचारांवर त्याचा खूपच पगडा होता.

१५ जानेवारी १५९० रोजी म्हणजे शेख मुबारकच्या पूर्वी जवजवळ ३॥ वर्षे अबुल फझलची आई लाहोरला मरण पावली होती. या दोघांचे मृतदेह तात्पुरते लाहोरला पुरण्यात आले. २२ सप्टेंबर १५९४ रोजी आग्याला नेऊन त्यांच्या घरी त्यांना मूठमाती देण्यात आली. बाबरच्या हस्त बिहिस्त (रामवाग) या प्रसिद्ध बागेजवळ हे घर होते.

## जैन धर्मगुरुंचे तिसरे शिष्टमंडळ

खरतर गाछा पंथाचा मुघल दरबारात झालेला बोलवाला आणि त्यांच्या प्रमुख धर्मगुरूंनी तेथे संपादन केलेली बादशहाची मर्जी याचे तपगाछाच्या प्रमुख आचार्यांना वैषम्य वाटू लागले. याच कारणामुळे नोव्हेंबर १५९२मध्ये हिरा विजय सुरीने आपला अत्यंत हुशार शिष्य आणि त्याच्यानंतर आचारपद धारण करणाऱ्या विजय सेन सुरीची लाहोरला रवानगी केली असावी. त्या बाबतीत इतर लोकांनीही त्याचे मन वळवल्याची शक्यता आहे. इतर बाबतीतसुद्धा तप-गाछाचा दुय्यम आचार्य असा मान प्राप्त करून घेण्यास विजय सेन सुरी सर्वस्वी लायक होता. अकबरावर आपल्या पंथाचा प्रभाव पाडण्यात तो सर्वस्वी यशस्वी होईल असे सर्वांस वाटत होते. विजय सेन सुरीचा जन्म मारवाडात नलई येथे १५४८ मध्ये झाला आणि वयाच्या ९ व्या वर्षी म्हणजे इ. स. १५५७ मध्ये त्याने भिक्षूची वस्त्रे स्वीकारली. इ. स. १५७२मध्ये तो आचार्य पदावर चढला. उत्तम पंडित आणि साधु पुरुष असून त्याशिवाय विजय सेन सुरी दैनंदिन कारभारातही चांगला हुशार आणि संघटनाचतुर असावा. कारण त्याच्या प्रयत्नांमुळे देशात निरनिराळ्या ठिकाणी अनेक जैन मंदिरे बांधण्यात आली. अकबराच्या दरबारात जाण्याची आज्ञा त्याला मिळाली, तेव्हा तो ४५ वर्षांचा होता. या वेळी त्याची बुद्धी परिपक्व झाली होती, शरीरात खूप उत्साह होता आणि बुद्धिवैभव आणि सौहार्द यामुळे प्रत्यक्ष गुरूच्या खालो-खाल कर्तृत्व आणि मोठेपणाच्या बाबतीत त्याला सगळीकडे मान मिळत होता. २७ नोव्हेंबर १५९२ रोजी १०० भिक्षु बरोबर घेऊन राधपुरहून निघून तो चालत चालत लुधियानाला गेला. तेथे राजकवी फैजी आणि

लाहोरच्या जैन समाजातल्या प्रतिष्ठित व्यक्तींनी त्याचे स्वागत केले. लाहोर-पासून १० मैलांवरून मोठी मिरवणूक काढून वाजत गाजत त्याला लाहोरला आणण्यात आले. जिना चंद्र सुरीला मिळालेल्या स्वागताच्या तोडीचे हे स्वागत असून लाहोरच्या प्रजाजनांच्या मनातून जिना चंद्रच्या स्वागताची आठवण पुसून जावी असा यातला उद्देश होता. ३१ मे १५९३ रोजी त्याने लाहोरमध्ये प्रवेश केला आणि बादशहाने फार प्रेमाने त्याचे स्वागत केले. ◈

विजय सेन सुरी जवळजवळ २ वर्षे अकबराच्या दरबारात राहिला. या काळात त्याच्या आणि अकबराच्या पुष्कळच भेटी झाल्या असणार. अकबराचे याच्याबद्दलचे मत इतके चांगले झाले की त्याने त्याला काली—सरस्वती ही पदवी बहाल केली. अकबराने भानुचंद्राला उपाध्याय ही पदवी दिली, त्याप्रसंगी सुरींने त्या समारंभात मुख्य पुरोहिताचे काम केले. असे म्हणतात की जैन धर्मगुरूंचे बादशहाच्या दरबारातले वजन पाहून ब्राह्मणांना फार वैषम्य वाटू लागले. म्हणून अंबरचा राजा रामदास याच्या करवी ते नास्तिक आणि ईश्वर न मानणारे आहेत असा आरोप त्यांनी केला. याबद्दल अबुल फझलच्या देख-रेखीखाली झालेल्या चर्चेत विजय सेनने हा आरोप खोडून काढला. त्याने असे दाखवून दिले की जैन धर्मातली ईश्वराविषयीची कल्पना हिंदूंच्या सांख्य योगाशी मिळती जुळती आहे. विजय सेनचा एक शिष्य नंदो विजय याने अष्टावधानाचा प्रयोग करून अकबराला खूष केले आणि अकबराने त्याला खूष—फहम् ही पदवी बहाल केली. ⧈

आपला गुरु हिरा विजय सुरी फार आजारी आहे असे कळल्यामुळे विजयसेनला आपले दरबारातले वास्तव्य आटोपते घ्यावे लागले. इ. स. १५९५ च्या मध्यंतरीच्या काळात लाहोरहून तो गुजराथला जायला निघाला. जाण्यापूर्वी सिंधू नदीत चार महिनेपर्यंत मासेमारी बंद करण्याचा हुकूम काढण्या-साठी त्याने अकबराचे मन वळवले. विजय सेन गुजराथला गेल्यानंतर पुष्कळ

---

◈ सुरीश्वर आणि सम्राट २३४ ते ३७.

Commisariat Vol. XI PP. 236–237

⧈ Indian Antiguary, Vol XI P, 256, Commisariat Vol. II PP. 236–237.

जैन भिक्षू अकबराच्या दरबारातच राहिले. इ. स. १६०५ मध्ये अकबर मरण पावला. तोपर्यंत भानुचंद्र सारखा त्याच्या सहवासात होता याचा उल्लेख पूर्वी आलेलाच आहे. सिद्धीचंद्र नावाचा दुसरा एक जैन भिक्षू अकबराच्या दरबारात होता. त्याने अनेक संस्कृत ग्रंथ लिहिले. त्यातल्या भानुचंद्रचरित्रावरून अकबराच्या दरबारासंबंधी बरीच माहिती मिळते. अकबराच्या सांगण्यावरून फारसी भाषेतील धार्मिक आणि इतर ग्रंथ समजून घेण्यासाठी तो फारसी भाषा पण शिकला असे म्हणतात. एका अपघातातून बरा झाल्यावर अकबराने जैन भिक्षूंना ५०० गायी दान देण्यासाठी दिल्या असे म्हणतात. मे १५९७ मध्ये अकबराने काश्मीरला ३ री भेट दिली, त्यावेळेस पण भानुचंद्र आणि सिद्धीचंद्र त्याच्याबरोबर होते. ते दोघेही अकबराबरोबर आग्रयाला परत आले आणि अकबर दक्षिणेच्या स्वारीवर असताना ते त्याच्या बरोबर होते. अशीरगडच्या वेढ्याच्या वेळी आणि अकबर मृत्यू पावला तेव्हा पण ते त्याच्याजवळ आग्र्याच्या दरबारात होते.

## जैन धर्माचा अकबराच्या जिवनावर परिणाम

यावरून असे दिसून येईल की, १५६८ सालापासून किंवा तत्पूर्वीपासूनसुद्धा अकबर मरण पावला तोपर्यंत, अकबराचा जैन धर्माशी निकटचा संबंध आला. या ३७ वर्षांवरच्या काळात कोणी ना कोणी जैन विद्वान त्याच्या दरबारात नेहमी असे. जून १५८३ मध्ये हिरा विजय सुरी पहिले जैन शिष्टमंडळ घेऊन फत्तेपूर सिक्रीला आला आणि तेव्हापासून हा संबंध अधिकच दृढ झाला. या काळात तप गाछा आणि खरतर गाछा या दोन्ही जैन पंथाचे पुरेसे ज्ञान अकबराने मिळवले. जैन मुनींच्या सांगण्यावरून वर्षातून ६ महिने आपल्या राज्यात त्याने पशुवधाला बंदी केली. जैन धर्माचे मुख्य सूत्र जे अहिंसा त्याचाही त्याच्या मनावर खूप परिणाम झाला. शिकारीचा त्याला पहिल्यापासून फार शौक होता पण शिकार करण्याचे त्याने नंतर सोडून दिले, हे आपण पाहिलेच आहे. सामिष आहार पण कमी करून वर्षातून ६ महिने अजिबात बंद केला. धर्मासाठी अकबराने मांसाहार टाकून शाकाहार स्वीकारला असे बदायुनी म्हणतो ते बरोबर आहे. तो लिहितो, " या उपोषणाच्या काळात (फरवर दिनचे मार्च–एप्रिलचे १८ दिवस) अबनचा ऑक्टोबर, नोव्हेंबर संबंध महिना, प्रत्येक रविवार आणि इतर पुष्कळ दिवस बादशहा मांसाहार अजिबात वर्ज्य करीत असे. धार्मिक व्रत म्हणूनच बादशहा मांसाहार घेत नसे. वर्षाकाठी हा शाकाहाराचा काळ ६ महिन्यां–

पेक्षा अधिक वाढवून हळू हळू संपूर्णपणे शाकाहारी बनण्याचा त्याचा विचार होता." या संबंधी अबुल फझल पण हेच लिहितो., "सर्व जगाच्या संसाराचे ओझे त्याच्या डोक्यावर नसते, तर अकबराने मांसाहार संपूर्णपणे बंद केला असता; पण सद्य: परिस्थिती लक्षात घेऊन त्याने तो सर्वस्वी सोडून न देता हळू हळू बंद करण्याचे ठरवले आहे." अकबराच्या उपासाची नोंद त्यावे खालील प्रमाणे केलेली आहे. "प्रत्येक सौर मासाचा पहिला दिवस, रविवार, ग्रहणे; दोन उपासांच्या मधले दिवस, रजब महिन्यातला सोमवार, फरवर दिनचा सबंध महिना आणि स्वतःच्या जन्म झाला तो अबानचा महिना. तसेच अबान-मधल्या उपासांच्या दिवसांची संख्या बादशहाच्या वयाइतकी झाली म्हणजे तो अझरच्या महिन्यातही काही दिवस उपास करतो. हल्ली हा उपवास सबंध महिनाभर चालू असतो. या उपासाच्या व्रतामध्ये दरवर्षी जवळ जवळ पाच दिवसांची वाढ होते." या विषयी अकबर स्वतः म्हणतो, "जगण्यासाठी मांसाहार आवश्यक नसता तर तो मी संपूर्णपणे बंद केला असता. मी स्वत: तो पूर्णपणे सोडून देत नाही याचे कारण हे की मी तसे केल्यास लोकही तसेच करतील आणि त्यांचे फार हाल होतील." इतरत्र तो म्हणतो, "माझ्या शरीरात पुरेसे मांस असते तर ते मांसाहाऱ्यांना मी दिले असते. तसे केल्याने इतर प्राण्यांचे मांस खाण्याचे त्यांनी बंद केले असते. तसेच शरीराचा एखाद्या तुकडा कापून मी लोकांना खायला दिला आणि तो परत वाढण्याची शक्यता असती तरीही मी ते केले असते." अकबराच्या धार्मिक मतांवर आणि जीवनावर झालेला हा परिणाम केवळ जैन धर्मामुळे झाला असे म्हणणे बरोबर नाही. त्यात हिंदू धर्माचाही बराच भाग होता. सुरुवातीपासूनच त्याला मांसाहाराची विशेष आवड नव्हती, हेही लक्षात ठेवले पाहिजे. या बाबतीत मोठ्या रोचक शब्दात तो म्हणतो, "अगदी सुरवातीपासूनच जेव्हा जेव्हा मी माझ्यासाठीं सामिष भोजन तयार करायला सांगितले तेव्हा तेव्हा ते मला बेचवच लागले आणि पहिल्यापासून त्याविषयी मला कधीही आवड निर्माण झाली नाही. या माझ्या नावडीमागे प्राणीमात्रांचे रक्षण करण्याचा हेतू असावा असे वाटून मी मांसाहार घेत नसे."

## तिसरे खिस्ती शिष्टमंडळ : अकबराचे निमंत्रण

दुसरे खिस्ती शिष्टमंडळ एकाएकी परत गेल्यामुळे गोव्याच्या मंडळींची खूपच निराशा झाली. अकबरालाही हे बरे वाटले नाही. आणखी एक शिष्ट-

मंडळ पाठवून द्या अशी विनंती त्याने पुन्हा एकदा थोड्याच दिवसानंतर केली. त्यासाठी १५९४ मध्ये आर्मेनियन खिरस्त्याला त्याने पोर्तुगीज अधिकाऱ्यांना पत्रे देऊन गोव्याकडे पाठवून दिले " खिरस्ती धर्माची माहिती करून घेण्याची माझी फार इच्छा असून त्यासाठी थोडे विद्वान खिरस्ती धर्मगुरू माझ्याकडे पाठवून द्यावेत," असे त्यात म्हटले होते. पोर्तुगीज लाट साहेब याला कबूल झाले, पण पहिली दोन शिष्ट मंडळे हात हालवित परत आल्यामुळे आणखी एक शिष्टमंडळ पाठविण्यास गोव्याच्या स्थानिक अधिकाऱ्याने विरोध केला; पण जेजुइट संघाच्या लोकांनी व लाटसाहेबांनी त्याची समजूत काढून तीन पाद्र्यांची या कामासाठी निवड केली.

फादर जेरोम झेवियर, फादर इमॅन्युएल पिनहिरो, आणि पाद्री बेनेडिक्ट दी गोआज अशी त्यांची नांवे होती. हे तिघेही गाढे विद्वान व अत्यंत कर्तृत्वान असून या कामासाठी फार योग्य होते.

## शिष्टमंडळाचे प्रतिनिधी

जेरोम झेवियर स्पेनमधील नव्हार गावचा राहणारा. इ. स. १५४९ मध्ये बूरो या गावी त्याचा जन्म झाला. हिन्दुस्थानचा मोठा प्रेषित संत फ्रॅन्सीस झेविअरचा तो नात पुतण्या (बहिणीचा नातू) होता. एस्पेलेटा या प्रसिद्ध सरदार घराण्यातला तो होता; पण संत फ्रॅन्सीसशी संबंध येऊन १५६८ मध्ये जेजुईट सोसायटीला येऊन मिळाल्यावर त्याने झेवियर हे नांव धारण केले. हिन्दुस्थानात तो १५७१ साली आला आणि आपले जवळ जवळ सर्व आयुष्य त्याने या देशात घालवले. वसई आणि कोचिनच्या कॉलेजांचा तो काही वर्षे प्रमुख होता. नंतर तो गोव्याला गेला. रुडॉल्फ ॲक्वा व्हीवा इतकी संन्यस्त वृत्ती आणि उत्साह त्याच्याजवळ नव्हता; पण वयाने आणि हुशारीने परिपक्व असून गोव्याच्या अधिकाऱ्यांनी निवडलेल्या या शिष्टमंडळाचा पुढारी होण्यास तो लायक होता. राजकारण आणि धर्मकारण या दोन्हीमध्ये त्याला रस होता. या दोन्ही तऱ्हेची कामे त्याच्याकडे सोपविण्यात आली होती. मुघल दरबारात तो एकूण २३ वर्षे राहिला आणि अकबराच्या मृत्यूनंतर १२ वर्षांपर्यंत विशेष यश आले नाही तरी सुद्धा त्याने तेथे आपले काम चालू ठेवले. इ. स. १६१७ मध्ये तो गोव्याला परत गेला आणि तेथेच ७ जून रोजी मरण पावला. पिनहिरो जेरोमपेक्षा ७ वर्षांनी लहान असून अझोरस समुद्रातल्या सेंट मिग्युएल या पोर्तुगीज बेटात

१५५६ मध्ये जन्मला. १५९२ साली तो हिंदुस्थानात आला. लाहोरला असताना दरबाराच्या भानगडीत न पडता "सामान्य लोकांना खिरस्ती धर्मात ओढून घेण्याचे काम" त्याने स्वतःच्या अंगावर घेतलें. राजकीय उलाढालीतही त्याचे लक्ष असून मुघल दरबारात व्यापारासाठी आणि प्रवासाठी येणाऱ्या इंग्रज लोकांच्या वाटेत अडथळा आणण्याचे त्याचे प्रत्यत्न असत. इ. स. १६१५ मध्ये तो गोव्याला परत गेला आणि १६१९ मध्ये तेथे मरण पावला. तिसरा प्रतिनिधी वेनेडिक्ट द गोएम हाही पोर्तुगीज असून अझोर्सचा राहणारा होता. सेंट मायकेलच्या बेटावर व्हिला फरॅन्का येथे १५६१ च्या सुमारास त्याचा जन्म झाला. त्याच्या पूर्वचरित्राविषयी आणि हिन्दुस्थानात तो कसा आला याविषयी विशेष माहिती उपलब्ध नाही. २६ वर्षांचा असताना त्रावणकोरजवळील पोर्तुगीज काफल्यावर तो लढाऊ खलाशी होता. "स्वभावाने उमदा आणि चैनी" असे त्याचे वर्णन आढळते. १५९३ मध्ये तो जेजुइट संघात दाखल झाला. मुघल दरबारात तो १६०२ च्या अखेरपर्यंत होता. त्यानंतर १६०३ च्या सुरुवातीला लाहोरहून तिबेटपर्यंतच्या त्याच्या प्रसिद्ध प्रवासास सुरुवात झाली. आर्मेनियनचा वेष धारण करून काबुल आणि यारकंद मार्गाने सबंध तिबेट ओलांडून चीनच्या सहरद्दीवरील सूचौ या शहरापर्यन्त तो जाऊन पोहोचला. तेथे तो १६०७ साली मरण पावला. हिन्दुस्थानातल्या मिशनरी कामापेक्षा या प्रवासामुळेच तो फार प्रसिद्ध आहे.

## लाहोरचा प्रवास :

३ डिसेंबर १५९३ रोजी या शिष्टमंडळाने गोवा सोडले, आणि ते दमण आणि खंबायतला जाण्यास निघाले. १५७९ मधल्या शिष्ट-मंडळाबरोबर संरक्षक म्हणून असलेला अनुभवी आर्मेनियन खिरस्ती डॉमिनीक पिरेझ हा त्यांच्याबरोब दुभाषी म्हणून होता खंबायतला त्यावेळी अकबराचा दुसरा मुलगा राजपुत्र मुराद होता. नाताळच्या सुरुवातीस हे शिष्टमंडळ खंबायतला येऊन पोहोचले आणि राजपुत्र मुरादने तेथे त्यांचे स्वागत केले. नवीन वर्षदिनी त्याने त्यांच्या पैशाची व प्रवासाची सोय करून दिली. ४०० उंट, १०० गाडे, १०० घोडे आणि शिवाय अनेक पादचारी अशा मोठ्या कारव्यासह त्यांनी आपला प्रवास सुरू केला. हा सर्व तांडा खंबायतहून आस्ते आस्ते अहमदाबादला पोहोचला. तेथून ऐन उन्हाळ्यात राजस्थानचे वाळवंट ओलांडून ५ महिन्यांच्या कठिण प्रवासानंतर ५ मे १५९५ रोजी लाहोरला जाऊन पोहोचला.

त्यांचे उत्साहाने स्वागत करून रावीच्या तीरावरील राजवाड्यात त्यांची राहण्याची व जेवण्याची सोय करण्यात आली.

## फैजीचा मृत्यू :

तिसरे शिष्टमंडळ लाहोरला पोहोचल्यानंतर थोड्याच महिन्यात अकबराचे दोन अत्यंत विश्वासू आणि हुशार मित्र मरण पावले. अबुल फझलचा मोठा भाऊ राजकवी अबुल फैजी ५ ऑक्टोबर १५९५ रोजी लाहोरला मरण पावला. जलोदर, रक्ताच्या ओकाऱ्या, हातापायांवर सूज, श्वास घेण्यामधील कष्ट इत्यादी अनेक रोगांनी तो ६ महिने जर्जर झाला होता. वाचा बंद होऊन मृत्युशय्येवर पडलेल्या राजकवीला बादशहाने भेट दिली आणि अबुल फझलचे सांत्वन केले. फैजी हा केवळ कवीच नसून मोठा विद्वान आणि खास करून धर्मशास्त्रवेत्ता होता. अकबराचा दिन–ए–इलाहि पथ पण त्याने स्वीकारला होता. याचे लिखाण विपुल असून याचे अनेक काव्यसंग्रह आहेत. उदार मनाचा आणि धर्मसहिष्णु असून न्याय मिळवून देण्यात तो सर्वांना मदत करीत असे. याच्या छत्राखाली असल्यामुळे इतिहासकार बदायुनीचा खूपच फायदा झाला, पण फैजीच्या मोकळ्या आणि सहिष्णु वृत्तीमुळे बदायुनीने याला सतत विरोध केला आणि त्याच्या काव्यावर खूप टीका केली. ढोंगी, गर्विष्ठ, डामडौलाचा शौकीन अशी विशेषणे त्याने फैजीला लावली आहेत. फैजीविषयी लिहिताना तो म्हणतो, " सर्व यहुदी, ख्रिस्ती, अग्नीपूजा करणारे, तसेच निझारी आणि साबाही लोक हे त्याला फार मान देत असत. कारण तो धर्मलंड असून इस्लामच्या अनुयायांचा द्वेष करणारा व महंमद पैगंबराच्या सहकाऱ्यांना आणि धार्मिक शेखांना हलके लेखून शिव्या देणारा होता. तसेच सर्व विद्वान, धार्मिक आणि सज्जन लोकांशी तो अत्यंत उद्धटपणे वागत असे. निषिद्ध मानलेल्या सर्व गोष्टी कायदेशीर आणि पवित्र धर्मात सांगितलेल्या सर्व गोष्टी आणि आदेश तो बेकायदेशीर मानत असे. "

सर्व धर्म आणि सर्व संस्कृतींबद्दल सहानुभूती बाळगणाऱ्या उदारमतवादी फैजीचा बदायुनीने न कळत केलेला हा गौरवच आहे.

## हकीम हुमामचा मृत्यू :

अकबराच्या दरबारातल्या नवरत्नांपैकी आणखी एक रत्न म्हणजे बादशहाचा हकीम हुमाम. हा फैजीच्या मृत्यूनंतर १ महिन्याच्या आतच ३०

ऑक्टोबर १५९५ रोजी २ महिन्यांच्या आजारानंतर मृत्यू पावला. " हा मृदुभाषी, अत्यंत चारित्र्यवान आणि देखणा असून मनुष्यमात्राच्या उन्नतीसाठी नेहमी खटपट करणारा होता. माणसांच्या स्वभावविशेषांचे आणि थोडेसे वैद्यकीय ज्ञान त्याला होते." मरण पावला तेव्हा हा बादशहाच्या भटारखान्याचा अधिकारी (बकावल-बेगी) होता. या मित्रांच्या मृत्यूचे अकबराला फार दु:ख झाले.

## अकबराने ख्रिस्ती धर्ममंडळाला दिलेल्या खास सवलती

जिरोम झेवियर आणि त्याचे सहकारी यांना लवकरच आपल्याकडे बोलावून घेऊन अकबराने त्यांच्याशी प्रेमाचे संभाषण केले. आपल्यासमोर त्यांना बसण्याची परवानगी दिली. इतकेच नव्हे, तर फक्त युवराजासांठी राखून ठेवलेल्या आपल्या गादीवरच्या एका बाजूवरसुद्धा त्यांना बसवले. कुठल्याही राजे लोकांना किंवा मांडलिकांनासुद्धा ही सवलत कधी मिळाली नव्हती; मात्र ख्रिस्ती धर्माची चर्चा बाजूला ठेवून त्याने या लोकांना प्रथम फारसी भाषा शिकण्यास सांगितले. कारण त्यामुळे बादशहाला त्यांच्याबरोबर धर्मासंबंधी चर्चा करता आली असती. हिंदुस्थानातील पोर्तुगीजांच्या अंमलाखालचा प्रांत आणि खास करून याबाबतीतला पोर्तुगीज अंमलाची प्रगती याविषयींची माहिती जाणून घेण्यास तो अधिक उत्सुक होता. चौलच्या समोरचे बंदर अहमदनगर राज्यातून जिंकून विजय घेऊन मिळवल्याबद्दल त्याने पोर्तुगीज लोकांचे अभिनंदन केले. येशू ख्रिस्त, मेरी आणि ख्रिस्ताचे खास बारा शिष्य यांच्या चित्राबद्दल त्याने पुष्कळ आदर प्रदर्शित केला. येशू आणि मेरीच्या मूर्तींना आलिंगन देऊन या मूर्ती जड होत्या तरी सुद्धा तो अनेक काळ आपल्या बाहुपाशात ठेवीत असे. त्यांच्या देवळात जाऊन त्यांच्या धार्मिक समारंभात " तो एखाद्या ख्रिस्ती राजासारखा गुडघे टेकून आणि हात जोडून भाग घेत असे." सर्व ख्रिस्ती धर्मसमारंभ योग्य तऱ्हेने साजरे करण्यासाठी या ख्रिस्ती धर्मगुरूंना तो सर्व प्रकारची मदत करीत असे. युरोपमधून त्यांनी आणलेल्या अनेक मूर्ती, तसेच राजवाड्यातील रेशमी आणि भरजरी किनखाप आणि इतर चीजवस्तू अशाप्रसंगी चर्च सुशोभित करण्यासाठी तो उसन्या देत असे. स्वत:जवळचा युरोपियन ग्रंथसंग्रही त्याने या ख्रिस्ती धर्मोपदेशकांना पहाण्यासाठी दिला. बदकशानच्या मांडलिक मिर्झा शहारुखचे मुलगे आणि इतर मांडलिक राजांची मुले यांना शिकविण्यासाठी शाळा काढण्याची परवानगी त्याने या धर्मगुरूंना दिली. दरबारच्या खर्चाने त्याने लाहोरमध्ये

एक चर्च पण बांधण्याची परवानगी त्यांना दिली. हे चर्च आणि त्या शेजारचे बांधलेले घर तयार झाल्यावर त्यातली पहिली प्रार्थना ७ सप्टेंबर १५९७ रोजी झाली. यावेळी अकबर काश्मीरमध्ये असल्यामुळे या उद्घाटनप्रसंगी लाहोरचा सुभेदार जातीने हजर राहिला आणि फादर पिनहिरोबरोबर त्याने २ तास घालवले. अकबराचे उदाहरण पाहून सलीम आणि इतर राजपुत्रांनी मेरीबद्दल आपली भक्ती दाखवण्यास सुरवात केली. सलीम हा मिशनऱ्यांचा मित्र आणि रक्षणकर्ता झाला.

## पाद्र्यांची गैरसमजूत :

ख्रिस्ती धर्मगुरूंना अकबराने दिलेली मानाची वागणूक, त्यांना दिलेल्या सवलती, ख्रिस्ती धर्माचा खुला प्रसार आणि प्रचार करून हिंदूंना त्यांच्या मर्जीप्रमाणे बाटवण्यास दिलेली मुभा यामुळे अकबर लवकर ख्रिस्ती धर्म स्वीकारणार आहे असा गैरसमज पाद्र्यांनी करून घेतला. महंमद पैगंबरावरील अकबराचा विश्वास सर्वस्वी उडाला असून इस्लामी धर्म त्याने सोडून दिला आहे. असे त्यांना वाटू लागले. लाहोरमध्ये एकही मशीद किंवा कुराणाची प्रत नाही, अशा बाजार गप्पांवर त्यांचा विश्वास बसला. अकबर हा मुसलमान नसून हिंदु झाला आहे, तो जैन धर्माचे आचार पाळतो, पार्शी लोकांप्रमाणे सूर्याची उपासना करतो आणि गोहत्या करणाऱ्यांना देहान्ताची सजा देतो, अशा तऱ्हेची पत्रे त्यांनी गोवा आणि लिस्बन येथील आपल्या ख्रिस्ती पुढाऱ्यांना लिहिली. यांत त्यांनी वस्तुस्थिती लक्षात न घेता स्वतःच्या मनात असलेले विचार बोलून दाखवले यात शंका नाही. जेजुइट धर्मगुरूंची अवास्तव विधाने ही अक्षरशः सत्याला धरून आहेत असे समजून विन्सेंट स्मिथसारख्या आधुनिक युरोपियन लेखकांनी त्यांचा विस्ताराने उल्लेख केला आहे हे करताना त्यांनी विरुद्ध मत प्रदर्शित करणारे अधिक जाणकार हिंदी बखरकार अविश्वसनीय मानले आहेत.

## लाहोरमधील मिशनरी काम :

लाहोरमध्ये चाललेल्या मिशनरी कामाचा उल्लेख जेजुइट धर्मगुरूंच्या— खास करून पिनहिरोच्या— पत्रात सापडतो. नवीन बांधलेल्या चर्चमध्ये त्यांची नियमित प्रार्थना चालत असे आणि समाजातल्या खालच्या थरातील पुष्कळ

लोकांना व बायका–मुलांना त्यांनी बाप्तिस्मा दिला. मिशनऱ्यांच्या सुदैवाने यावेळी गावात खूप रोगराई माजली होती आणि अनेक लोकांनी आपली मुले टाकून दिली होती, त्यांना आपल्या ताब्यात घेऊन या लोकांनी त्यांना ख्रिस्ती धर्माची दीक्षा दिली. तेथील सुभेदारावरील आपले वजन खर्ची घालून गोहत्ये-बद्दल देहांत शिक्षा झालेल्या एका 'खाल्डियन ख्रिस्त्याची' त्यांनी सुटका केली. नाताळ, येशूचा जन्म, प्रभुभोजन इत्यादि त्यांच्या अनेक सणांना पुष्कळ हिंदू आणि मुसलमान लोक हजर राहात असत. त्यांच्यावर या समारंभांचा खूप प्रभाव पडत असे असे हे मिशनरी म्हणतात. इ. स. १५९८ मध्ये लाहोरहून लिहिलेल्या एका पत्रात जेरोम झेवियर लिहितो, "पवित्र बायबलातील काही कूटस्थळांचे प्रदर्शन करून त्या निमित्ताने आमच्या धर्माविषयी प्रचार करण्याची संधी आम्हाला मिळाली. प्रदर्शन बघण्यास इतके लोक जमत असत की, एपीफनी नंतर ८ दिवस ख्रिस्ताचा पाळणा लोकांच्या दर्शनासाठी ठेवत असत. याची कीर्ती सर्व गावांत पसरली आणि तो पाहाण्यासाठी गावातलेच काय, पण गावाबाहेरचेही अनेक लोक येत असत या सर्वांवर वरताण म्हणजे याची बातमी काही लष्करी अधिकाऱ्यांनी बादशहापर्यंत पोहोचवली. बादशहाने स्वत: येऊन प्रदर्शन पाहावे असे त्यांना वाटले असावे.'

झेवियर आणि बेनेडिक्ट बादशहाबरोबर आग्र्याला गेल्यावर थोड्याच दिवसांनी लाहोरमध्ये ३८ लोकांना ख्रिस्ती धर्माची दिक्षा दिल्याचे पिनहिरो लिहितो. यामध्ये नातेवाईकांच्या मर्जीविरुद्ध ३ हिंदूंना ख्रिस्ती करून त्यांची हातात पवित्र गीते देऊन गावातून काढलेली मिरवणूक विशेष उल्लेखनीय आहे. दुसरे प्रकरण म्हणजे एका १६ वर्षाच्या मुसलमान मुलीला ख्रिस्ती करून ग्रेस असे तिचे नाव ठेवण्यात आले. तिच्या आईबापांनी सुभेदाराकडे तक्रार केली, पण अकबराच्या भीतीने त्याने त्यात लक्ष घातले नाही. या मुलीचे एका ख्रिस्ताबरोबर लग्न लावण्यात आले. झेवियरला लाहोर सोडून दूर राहणे अपरिहार्य असल्याने पिनहिरोच्या मदतीसाठी इ. स. १६०० मध्ये गोव्याहून फादर फ्रॅन्सीस्को कॉर्सी याला लाहोरला पाठविण्यात आले आणि तो वर्षा अखेर पिनहिरोकडे जाऊन पोहोचला. पिनहिरो याचे सुभेदाराकडे इतके वजन होते की देहान्त शासन झालेल्यांना माफी मिळून देणे पण त्याला शक्य होते. असे असूनही इ. स. १५९८ नंतर लाहोर येथील ख्रिस्ती केन्द्रास अनेक स्थित्यंतरातून जावे लागले. पिनहिरो आणि त्याचे सहकारी हे नरमांसभक्षक आहेत, ते लहान मुलांना पळवून नेतात आणि इतर लोकांची हत्या करतात. असे त्यांच्यावर आरोप करण्यात आले. त्यांच्याकडे काम करणाऱ्या एका नोकराच्या

साहय्याने मिशनऱ्यांवर विष प्रयोग करण्याचाही प्रयत्न झाला. या सर्व अडचणींना त्यांनी तोंड दिले. इ. स. १६०० च्या नाताळात ४९ लोकांना बाप्तिस्मा दिला. असे पिनहिरो म्हणतो. बाप्तिस्मा घेतलेली काही मंडळी मुसलमान सरदार घराण्यातली होती. एकजण, पोलाद नावाचा वैद्य, सुखवस्तु ब्राह्मण कुटुंबातला होता. अकबराच्या कारकीर्दीच्या अखेरीस लाहोरच्या केन्द्राची काय अवस्था होती याचे वर्णन ८ सप्टेंबर १६०४ रोजी झेवियरने लिहिलेल्या एका पत्रात सापडते. "त्या प्रांतातला सुभेदार हा आपल्या खिरस्ती धर्माचा द्वेष्टा असून खिरस्ती लोकांचा छळ करण्यास नेहमी तयार असे. पण खुद्द पिनहिरोबद्दल त्याच्या मनात मित्रभाव होता. अकबराच्या फर्मानामुळे खिरस्ती लोकांना आपला धर्म उघडपणे आचरण्याची पूर्ण मुभा होती. नाताळ आणि ईस्टरचे सण लाहोरला मोठ्या इतमामाने साजरे होतात. तिथले चर्च सुंदर आणि मोठे असल्यामुळे हे सर्व समारंभ उत्तम रितीने पार पडतात. जोआओ बॅटिस्टा (व्हेचियेट, फ्लॉरेन्सचा एक प्रसिद्ध विद्वान) अशा एका समारंभास हजर होता. एका मुसलमान राज्यात असे समारंभ उघड रितीने होत असल्याचे पाहून त्याच्या डोळ्यात आनंदाश्रू आले. तो आग्र्याला आला असताना खिरस्ती धर्माप्रमाणे काढलेली एका संभावित आर्मेनियअनची प्रेतयात्रा पाहून त्याला फार आश्चर्य वाटले. जळत्या मेणबत्या घेतलेले खिरस्ती लोक, पुढे खिरस्ताचा क्रूस, प्रार्थना म्हणाणारे पाद्री आणि मंत्र म्हणणारी मुले या प्रेतयात्रेबरोबर होती. गुन्ह्यासाठी सजा केलेल्या खिरस्ती लोकांना योग्य कारवाईसाठी प्रांताचा सुभेदार आणि न्यायाधिश खिरस्ती धर्मगुरूंच्या हवाली करत असत. यावरून त्यांचे किती वजन होते याची कल्पना येण्यासारखी आहे. सरदार घराण्यातल्या पुष्कळ मुसलमान बायका घरगुती बाबतीतही या मिशनऱ्यांचा सल्ला घेत असत. खालील घटना खास लक्षात ठेवण्यासारखी आहे. वर उल्लेख केलेल्या पत्रात झेविअर म्हणतो, "काही दिवसांनंतर तिथल्या मुख्य प्रधानाची (कुलीजखानची) बायको मेरीसाठी नैवेद्य घेऊन चर्चमध्ये आली आणि आपल्या मुलाची वर्तणूक सुधारण्यासाठी तिने नवस केला. तिचा हा मुलगा ( मिर्झा लाहोरी ) वाईट चालीचा आणि उच्छंखल होता. असे आम्ही ऐकतो. आईच्या उपदेशाचा किंवा बापाने चार–चौघासमोर केलेल्या कडक शिक्षेचा त्याच्यावर काहीच परिणाम झाला नाही. '

लाहोरच्या मिशनऱ्यांना तिथल्या हिंदूंचा आणि विशेषेकरून एका हिंदु कुटुंबाचा सक्त विरोध होता. बाटवून लग्न केलेल्या खिस्ती कुटुंबांना राहण्यासाठी काही घरे या मिशनऱ्यांना देण्यात आली होती. ती ह्या हिंदू कुटुंबाची

होती. ती आपल्याला परत मिळावीत असा त्यांनी आग्रह धरला. तिथला सुभेदार कुलीजखान आणि न्यायाधीश ही घरे परत देण्यास तयार होते; पण झेवियरने आग्र्याहून त्याबाबत अकबराचा हुकूम आणून ती घरे आपल्याच लाहोरच्या केन्द्राच्या ताब्यात ठेवली. अमुक एका दिवशी कुलीजखान लाहोरमधल्या खिरस्तांना कैद करणार आहे अशी अफवा उठली; पण ती सुदैवाने खोटी ठरली. कुलीजखानच्या गैरहजेरीत लाहोरचा कारभार त्याचा मुलगा चिन कुलीज पाहात होता. त्याचे आणि खिरस्ती पाद्रांचे संबंध मैत्रीचे होते. आग्र्याहून कुलीज-खान परत आल्यावर त्यांना आदराने वागवू लागला. दरम्यान वर उल्लेखि-लेले हिन्दू कुटुंब पुष्कळ अडचणीत आले व त्यामुळे पिनहिरोला अतिशय आनंद झाला.

**अकबराची काश्मीरला तिसरी भेट : दुष्काळात सापडलेल्या मुलांना पाद्री लोक बाप्तिस्मा देतात. :**

काश्मीर हा आपला खाजगी बगीचा आहे, असे अकबर म्हणत असे. तिथे जाण्यासाठी १ एप्रिल १५९७ रोजी किंवा त्या सुमारास तो तिसऱ्यांदा निघाला. याचवेळी राजपुत्र दानियलला ७००० ची वरची मनसबदारी मिळून तो अलाहा-बादचा सुभेदार झाला. तेथे जाण्यापूर्वी बादशहाने त्याला पुष्कळ उपदेश केला कुठलेही काम पूर्ण विचारांती हातात घेऊन ते पार पाडावे असा त्याला सल्ला दिला. चैनीत दिवस न घालवता आपल्याकर्तृत्वाची सतत जाणी ठेवावी, प्रांताची भरभराट करीत असताना दुर्बलांचे अन्यायापासून रक्षण करावे. वाईट लोकांची संगत धरू नये; इत्यादी. १५ मे रोजी बादशहाची छावणी राजोरीला असताना परवानगीशिवाय राजपुत्र सलीम तेथे आला. तेथे त्याच्या हातून काही गैरवर्तणूक झाल्यामुळे त्याला दरबारात येण्याची बंदी करण्यात आली अबुल फझलला याबाबतीत चौकशी करून अहवाल सादर करण्यास सांगितले. जेरोम झेवियर आणि बेनेडिक्ट द गोएझ १३ मे १५९७ रोजी लाहोर सोडून गेले होते; ते पुन: बादशहाच्या छावणीत दाखल झाले. भानुचंद्र आणि सिद्धीचंद्र या दोन जैन भिक्षूंना पण बादशहाबरोबर राहण्याची परवानगी मिळाली. काश्मीरची दरी, तेथल्या नद्या, फळे, फुले इत्यादीं विषयी पुष्कळ माहिती जेरोम झेवियरने काश्मीरहून लिहिलेल्या पत्रात सापडते. बादशहाचा मुक्काम काश्मीरमध्ये असताना (मे–नोव्हेंबर १५९७) तेथे अवर्षणामुळे मोठा दुष्काळ पडला. महागाई फार वाढली आणि पुष्कळ शेतकऱ्यांना आपली

घरेदारे सोडून जावे लागले. गरिबांना अन्नदान करून त्यांचे हाल कमी करण्याचा प्रयत्न अकबराने केला. श्रीनगरमध्ये १२ अन्नछत्रे उघडून तेथे ८०,००० लोकांना जेवण देण्यात येई. दुष्काळी काम म्हणून अकबराने तेथे एक किल्ला बांधण्याचा हुकूम दिला आणि ५५% जकात माफ केली. दुष्काळ निवारण्यासाठी हे प्रयत्न अपुरे ठरले. 'आयांनी सोडून दिलेली मुले रस्त्यात मरत असत.' असे झेवियर लिहितो. अशी बेवारशी मुले गोळा करून जेजूइट लोक त्यांना बाप्तिस्मा देत असत. भाद्रपद शुद्ध त्रयोदशीस सर्व बोटी, टेकड्या आणि तलाव यावर रोशनी करण्याचा हुकूम अकबराने फर्मावला. हा व्यास नदीचा जन्म दिवस समजून त्या दिवशी हिन्दू लोक मोठा समारंभ करीत असत. या समारंभाच्या निमित्ताने वरील रोशणाई करण्यात आली.

## ख्रिस्ती पाद्र्यांचा उतावीळपणा :

अकबराशी धार्मिक बाबतीत चर्चा करून ख्रिस्ती धर्माकडे त्याचे मन वळविण्याची फारशी संधी ख्रिस्ती पाद्र्यांना मिळाली नाही. २८ जुलै १५९६ रोजी झालेल्या एका अपघातामुळे बादशहा १ महिना २२ दिवस आजारी होता. जेरोम झेवियर आणि बेनेडिक्ट ड गोऐझसुद्धा काश्मीरमध्ये २ महिने आजारी पडले. इतर कामात व्यग्र असल्यामुळे धार्मिक बाबतीत लक्ष घालण्यास अकबराला वेळ होत नाही असे पाहून हे पाद्री लोक हळूहळू अधीर होऊ लागले. पण स्पेनचा राजा दुसरा फिलिप याने त्यांना तेथेच राहण्यास आणि आपले कर्तव्य बजावण्यास फर्मावले आणि 'ईश्वर तुमच्या प्रयत्नांना यश देईल' असा आपला विश्वास असल्याचे त्यांना आश्वासन दिले.

२० नोव्हेंबर १५९८ रोजी अकबर लाहोरहून आग्र्याला जाण्यास निघाला. त्याच्याबरोबर जेरोम झेवियर पण होता. ( अकबर जानेवारी १५९९ मध्ये आग्र्याला येऊन पोहोचला). आग्र्याला असताना १५ जुलै १५९९ रोजी जेरोमने बादशहाकडे मुलाखतीची परवानगी मागितली. आता आपल्याला फारसी भाषा पुष्कळ येऊ लागली असून ख्रिस्ती धर्माबद्दल बादशहाला हवी असेल ती सर्व माहिती त्या भाषेतून देण्यास आपली तयारी आहे असे त्याने बादशहास कळवले. यासाठी धार्मिक चर्चेस सुरुवात करण्यास परवानगी असावी असेही तो म्हणाला याबाबतीत बादशहाची प्रत्यक्ष मुलाखत न झाल्यामुळे माझा व माझ्या सहकाऱ्यांचा वेळ फुकट जातो आहे असे त्याने अकबरास सांगितले. 'मला वेळ होईल तेव्हा मी आपल्याला बोलावून घेईन व आपल्याबरोबर

चर्चा करीन ' असे बादशहाने त्यांना कळवले. पण यावेळी तो दक्षिणेवरील मोहिमेची तयारी करण्यात गुंतला होता. ' येशू हा ईश्वराचा अंश आहे असे उघडपणे जाहीर करण्याची आणि ख्रिस्ती धर्माचा प्रचार आणि प्रसार करण्याची पूर्ण मुभा तुम्हाला देऊन मी तुमच्यावर उपकारच केले आहेत आणि यात तुमचा फायदाच झाला आहे' असे बादशहाने झेवियरला सांगितले. या उत्तराने गप्प बसणे झेविअरला भाग पडले. ▣

## अकबराचा दक्षिणेकडील मोर्चा :

२९ सप्टेंबर १५९९ रोजी अहमदनगर आणि खानदेश विरुद्ध चाललेल्या हालचालींवर जातीने नजर ठेवण्यासाठी अकबर आग्र्याहून दक्षिणेकडे निघाला. केप कामोरीनपर्यंत सर्व दक्षिण प्रांत जिंकून घेऊन पोर्तुगीजांना हिंदुस्थानातून हाकून देण्याचा त्याचा अंतिम बेत होता. हेजदद्ला यात्रेला जाणाऱ्यांना पोर्तुगीज लोक त्रास देत असत. पश्चिम किनाऱ्यावर त्यांच्या वसाहती असून अरबी समुद्रावर ते सत्ता गाजवत असत. ते वर्तणुकीने उद्धट असून अकबराच्या साम्राज्याशी त्यांचे खास शत्रुत्व होते. त्यांना एकदा कायमचे समुद्रात ढकलून द्यावे, असे अकबराला फार वाटत असे. पण अकबराजवळ आरमार नव्हते व ते बांधण्याचे पण त्याचे बेत नव्हते. आपल्या जमिनीवरच्या फौजांनिशी पोर्तुगीजांचा नायनाट करता येईल अशी त्याची चुकीची समजूत होती. खानदेश आणि अहमदनगरची मोहीम संपवून नंतर पोर्तुगीजांचा समाचार घेण्याचा त्याचा विचार होता. बऱ्हाणपूर काबीज करून अशीरगडच्या किल्ल्याला त्याने वेढा दिला. पण आतील लोकांनी किल्ला उत्तम तऱ्हेने लढवला आणि तो सहजासहजी जिंकण्याची किंवा हाती येण्याची चिन्हे दिसेनात. तेव्हा बादशहाने चौलच्या पोर्तुगीजांकडून काही तोफा आणि दारुगोळा उसना मिळावा या उद्देशाने झेवियरला तसे एक पत्र लिहिण्यास सांगितले. पण हे ख्रिस्ती पाद्री नुसते धर्मप्रसारक नसून राजकारणात पक्के मुरलेले होते. खानदेशच्या राजाबरोबर पोर्तुगीजांचे मैत्रीचे संबंध आहेत आणि अकबराला लष्करी मदत देणे पोर्तुगीजांच्या हिताचे नाही हे त्यांना माहीत होते. तेव्हा असे पत्र लिहिणे ख्रिस्ती धर्माच्या विरुद्ध आहे ही

---

▣ १ ऑगस्ट १५९९ रोजी झेवियरने लिहिलेले पत्र पाहा. डिसेंबर १५९९ मधला पिमेंटाचा अहवाल. याचा उल्लेख मॅक्लॅगनने आपल्या पुस्तकात पान ५७ वर केला आहे. शिवाय पाहा Du Jarrie pp. 90-91

सबब पुढे करून झेविअरने बादशहाच्या सांगण्याप्रमाणे पत्र लिहिण्यास नकार दिला. त्यामुळे रागावून बादशहाने दरबारात येण्याची त्यांना काही दिवस बंदी केली. अखेर अशीरगडचा किल्ला बादशहाच्या हातात पडला. खानदेशच्य राजाला कैद करण्यात आले आणि किल्ल्याचे रक्षण करणाऱ्या त्याच्या ॲबिसिनियन सेनानी याकूबने आत्महत्त्या केली. किल्ला शरण आल्यानंतर तेथे काही पोर्तुगीज शिपाई आढळून आले. ते खानदेशच्या बाजूने लढत होते. अकबराने उदार होऊन त्यांना परत ख्रिस्ती करून घेण्यासाठी झविअरच्या स्वाधीन केले. अशीरगडचा किल्ला पडल्यावर थोड्याच दिवसांनी पिनहिरो लाहोरहून आला आणि अकबराने त्याचे प्रेमाने स्वागत केले. अशीरगड जिकल्यानंतर राहिलेला अहमदनगरचा प्रांत जिंकण्याचे काम आपल्या अधिकाऱ्यांवर सोपवून अकबर आग्ऱ्याला परत गेला.

## गोव्याला अकबराचे राजकीय शिष्टमंडळ :

दक्षिणेतून निघण्यापूर्वी अकबराने गोव्याला एक वकिलात पाठवून आपण आणि हिंदुस्थानातले अधिकारी या दोघांमधे राजकीय पातळीवर एक तह व्हावा असे सुचवले. या शिष्टमंडळाबरोबर त्याने बेनेडिक्ट ड गोएझची रवानगी केली. २० मार्च १६०० रोजी या शिष्टमंडळाबरोबर पाठवलेल्या पत्रात धर्ममंडळाबद्दल काही उल्लेख नाही; पण राजकीय तहाखेरीज काही हुशार कारागीरांची मागणी, हिरे, माणके इत्यादी मौल्यवान वस्तूंची खरेदी करण्याबद्दलच्या सवलतींचा उल्लेख आहे. आणखी एखादे धार्मिक शिष्ठमंडळ पाठविण्याबद्दल अकबर या पत्रात लिहीत नाही; कारण झेवियर पिनहिरो आणि इतर ख्रिस्ती धर्मोपासक त्याच्याकडे होतेच. मे १६०१ मध्ये हे शिष्ठमंडळ गोव्याला पोहोचले; पण त्याचा काही उपयोग झाला नाहा आणि पोर्तुगीज आणि अकबर यांच्यांत राजकीय पातळीवर तह होऊ शकला नाही.

अशीरगडहू गोएझ काही कैदी घेऊन आला होता. त्यांतले बहुतेक कैदी मिश्र जातीचे असून एक पोर्तुगीज यहुदी होता. त्यांना बाप्तिस्मा देण्यात आला. नंतर बेनेडिक्ट गोएझत तिबेटकडे आणि तिथून पुढे चीनच्या साहद्दीपपर्यंतच्या प्रदेशाची पाहाणी करण्यासाठी पाठवण्यात आले. फादर अँटनी माचाडो या नव्या जेसुइट धर्मप्रचारकाला त्याच्याबरोबर मुघल दरबारात जाण्याची परवानगी देण्यात आली. इ. स. १६०२ च्या उन्हाळचात ही मंडळी आग्ऱ्याला पोहोचली. तेथे मचाडो काही दिवस राहिला, पण बेनेडिक्ट गोएझ तावडतोब

लाहोरला निघून गेला. तेथून १६०३ च्या जानेवारी महिन्यात त्याचा चीनचा प्रसिद्ध प्रवास सुरू झाला. या प्रवासातून तो परत आला नाही हे खरे पण जगातला एक साहसी प्रवासी आणि संशोधक अशी त्याची ख्याति झाली.

## आग्र्याला जेजुईट पाद्री : अकबराच्या चर्चची उभारणी :—

दक्षिणेतून परत आल्यावर अकबराने राहिलेले आयुष्य आग्र्यात काढले जेरोम झेवियर आणि पिनहिरो त्याच्या बरोबर राजधानीला आले. तेथे हे दोघे-जण व बेनेडिक्ट आणि मचाडो यांची सल्लामसलत होऊन आग्र्याच्या ख्रिस्ती केंद्राची स्थापना झाली. १६०२ मध्ये सरकारी खर्चाने एक चर्च बांधण्याची परवानगी अकबराने त्यांना दिली. आज ३५० वर्षानंतरसुद्धा अनेक स्थित्यंतरांना तोंड देऊन सेंट पिटरच्या कॅथेड्रलच्या आवारात श्रीकृष्ण दत्त पालिवाल उद्यानाजवळ ( ह्यूएट पार्क ) हे चर्च अजून अकबराचे चर्च या नावाने शाबूत आहे नवारेच्या राजघराण्यातला फिलीप बोरवाँ आणि त्याची बायको जुलियाना यांच्या देखरेखी खाली चर्च बांधण्यात आले. जुलियाना आर्मीनियातली असून अकबराच्या जनान्यावरील डॉक्टरीण होती. यासंबंधी अकबराने काढलेले फर्मान सेंट पिटर्स कॅथेड्रलमध्ये अजून जतन करून ठेवले आहे. त्यात खालील-प्रमाणे मजकूर आहे, " या आदरणीय धर्मगुरुंना या शहरात ईश्वराच्या प्रार्थने-साठी एक देऊळ बांधण्याची इच्छा आहे, असे निवेदन आमच्याकडे आले आहे. त्यानुसार हे बादशाही फर्मान काढून सर्व संबंधित अधिकाऱ्यांना आम्ही अशी ताकीद देतो की याचे तंतोतंत पालन झाले पाहिजे.वरील मंदिर उभारण्यात कोणत्याही प्रकारची आडकाठी होता कामा नये आणि या धर्मगुरूंना कोण-त्याही प्रकारचा त्रास होऊ नये. हा हुकूम सर्वांनी पाळला पाहिजे.

याच वेळी ख्रिस्ती धर्माचा प्रचार शांततेच्या मार्गाने करण्याची आणि लोकांना ख्रिस्ती धर्म स्वीकारावया असेल त्यांना कुठलीही हरकत न घेता बाप्तिस्मा देण्याची लेखी परवानगी बादशहाने ख्रिस्ती मिशनऱ्यांना दिली. मिर्झा अझीझ कोका आणि इतर प्रतिष्ठित मुसलमान अधिकाऱ्यांच्या विरोधास न जुमानता हे फर्मान काढण्यात आले. हिंदुस्थानातल्या मुसलमान राजाने ख्रिस्ती मिशनऱ्यांना दिलेले हे पहिलेच लेखी फर्मान आहे.

आग्र्याच्या केंद्राचा प्रमुख म्हणून जेरोमची नेमणूक करून अकबराने त्याच्या खर्चासाठी मोठी रक्कम लावन दिली. पुष्कळ लोक ख्रिस्ती धर्माचा

स्वीकार करून या केंद्राभोवती गोळा झाले. बायबलचे आणि ख्रिस्ताच्य चरित्राचे फारसी भाषेत भाषांतर करून जेरोम झेविअरने ती अकबराला नजर केली. ही पुस्तके मिळाल्याने अकबराला आनंद झाला.

## मिल्डन हॉलला जेजुइटांचा विरोध :

पोर्तुगीज आणि स्पेनचे राजकीय व व्यापारी हितसंबंध रक्षण करण्याचाही या पोर्तुगीज पाद्रयांचा संकल्प होता. त्यामुळे इंग्लंड किंवा इतर कुठल्याही युरोपियन देशांच्या या बाबतीतल्या प्रयत्नांना त्यांचा सतत विरोध असे. इ. स. १६०३ मध्ये मिल्डनहॉल नावाचा एक इंग्रज आग्र्याला आला आणि 'मी पहिल्या एलिझाबेथ राणीचा वकील आहे' असे तो म्हणू लागला. इंग्रजी जहाजांना बादशहाच्या साम्राज्यामधील बंदरात मुक्त प्रवेश असावा आणि इंग्लंड आणि हिंदुस्थानच्या व्यापारात सवलती मिळाव्या असा भेटीमागील उद्देश होता. पोर्तुगीजांनी मिल्डनहॉलला विरोध करून अशा व्यापारी सवलती इंग्रजांना मिळू नयेत या उद्देशाने मुघल अधिकाऱ्यांचे हात पण ओले केले असा प्रवाद आहे. अशा तऱ्हेने १६०३ पासून इंग्लंड आणि पोर्तुगाल व त्याचे पाठीराखे जेजुइट यांच्यात लढा सुरू झाला. यामध्ये दोन्ही बाजूंनी एकमेकांवर गुप्त कटाचे आरोप करण्यास सुरुवात केली. पोर्तुगीज पाद्री चोर असून हेरगीरीचे काम करतात अशी अफवा मिल्डन हॉलने पसरवली. "त्यांच्याविरुद्ध मुघल अधिकाऱ्यांचे मन त्याने कलुषित केले असेही म्हणतात. उलट पक्षी मिल्डनहॉलच्या विरुद्ध कारवाई करण्यासाठी जेजुइटांनी गुप्त मसलतीचा त्याच्यासारखाच उपयोग करून मुघल अधिकाऱ्यांना लाच देण्यास सुरुवात केली. सरतेशेवटी अकबराची मुलाखत घेण्यात मिल्डन हॉलला यश आले. तेथे त्याने जेजुइट मिशनऱ्यांच्या देखत बादशहाला असे सांगितले, मोठे नजराणे घेऊन बादशहकडे एक शिष्ठमंडळ पाठविण्याचा राणी एलिझाबेथचा विचार आहे.' बादशहाच्या दरबारात अनेक वर्षे राहूनसुद्धा अशातऱ्हेचे नजराणे घेऊन येणारे शिष्ठमंडळ पाठवण्यात जेजुइटांनी आपल्या राजास प्रवृत्त केले नाही असे उघड विधान त्याने केले. मिल्डन हॉलला कोणत्याही व्यापारी सवलती बादशहा देणार नाही अशी झेवियरची समजूत होती; पण ती चुकीची ठरली; कारण अशा सवलती बादशहाने दिल्या अशी वदंता आहे.

## ख्रिस्ती मिशनचे परिणाम :

अकबराला ख्रिस्ती धर्मात ओढून घेण्याच्या आपल्या मुख्य प्रयत्नांत तिन्ही ख्रिस्ती धर्ममंडळांना अपयश आले. कुठल्याही धर्मात प्रत्यक्ष दाखल न होता सर्व

धर्मात योग्य दिसेल ते स्वीकारण्याचे बादशहाचे सहिष्णु व उदार धोरण मिशनऱ्यांना बरोबर समजले की नाही शंका आहे. कुठल्याच धर्माची शिस्त बादशहा स्वतःला लावून घेत नाही असा चुकीचा आरोप त्यांनी अकबरावर केला. बादशहाला "ख्रिस्ती धर्माबद्दल फार आदर असून इतर कुठल्याही धर्मापेक्षा तो त्याला अधिक प्रिय होता," अशी चुकीची विधाने आधुनिक युरोपियन लेखक अजूनहि करतात. येशू हा देवाचा अंश आहे ही शिकवण अकबराला कधीच मान्य नव्हती. तसेच येशू हा ईश्वराचा पुत्र असून तो एका कुमारिकेच्या पोटी जन्माला आला ही कल्पनाच बादशहाला असह्य होती. यामुळे कुठल्याही ख्रिस्ती धर्म-सूत्रावर त्याचा विश्वास नव्हता. मेरी, येशू आणि त्याचे प्रेषित यांच्या मूर्तीबद्दल तो आदर दाखवित असे यावरून त्या धर्माबद्दल त्याला विशेष प्रेम होते असे म्हणता येत नाही. कारण सर्व धर्मसंस्थापकांबद्दल त्याच्या मनात सारखाच आदर होता. ख्रिस्ती धर्मातल्या कुठल्याही तत्वाचा किंवा आचाराचा त्याने स्वीकार केला नाही.

तरीसुद्धा शेवटल्या ख्रिस्ती मिशनला पुष्कळच यश आले आणि त्यांच्या प्रयत्नांमळे ख्रिस्ती धर्माच्या कॅथोलिक पंथाची उत्तर हिंदुस्थानात स्थापना झाली. ख्रिस्ती धर्माचा उघड प्रचार करून ख्रिस्ती धर्मात प्रवेश करण्यास तयार असलेले इतर धर्मातले लोक आपल्या धर्मात घेण्याची लेखी परवानगी त्यांनी बादशहाकडून मिळवली. खंबायत, लाहोर, हुगळी आणि आग्रा येथे ख्रिस्ती देवळे बांधण्याची लेखी परवानगी प्रथमच बादशहाकडून त्यांनी मिळवली. ही देवळे सरकारी खर्चाने उभारण्यात आली. ठिकठिकाणच्या ख्रिस्ती संघाच्या पुढाऱ्यांना अकबराने जीवनवेतनाची मदत दिली आणि पुष्कळ हिंदी लोकांनी ख्रिस्ती धर्म स्वीकारला. याशिवाय युरोपियन आणि आर्मेनियम ख्रिश्चन पण देशात होते. त्या सर्वांना एकत्र करून जेजुइट लोकांनी ख्रिस्ती धर्माचा संघटित पाया उत्तर हिंदुस्थानात घातला.

आपल्याकडे आलेल्या विद्वान धर्मोपदेशकांकडून ख्रिस्ती धर्माची खरी-खुरी माहिती अकबराने मिळवली आणि त्यांच्या धर्मग्रंथांचे फारशी भाषांतर करून घेतले. अशा तऱ्हेने त्याच्या मनातले दोन मुख्य हेतू पूर्ण झाले. इतके करूनसुद्धा पोर्तुगीजांकडून दारुगोळा किंवा तोफा अशी लष्करी मदत मिळवण्यात त्याला यश आले नाही. तसेच पोर्तुगीजांच्या बलाबलाविषयी योग्य माहिती त्याला मिळू शकली नाही; आणि पश्चिम किनाऱ्यावरून पोर्तुगीजांना हाकून देण्याच्या योजनेत त्यांचे काहीच सहाय्य मिळाले नाही.

—o—

# प्रकरण १८ वे

## दक्षिण देश : दख्खन

### भारतातल्या उत्तर आणि दक्षिण प्रांतांतील ऐतिहासिक आणि सांस्कृतिक एकात्मता:

विंध्य पर्वतामुळे भारताचे झालेले उत्तर व दक्षिण हे दोन भाग ही केवळ एक भौगोलिक वस्तुस्थिती आहे. पण निसर्गाने या दोन्ही भागांची तशी विभागणी केलेली दिसत नाही. हे दोन्ही भाग एकच आहेत अशीच निसर्गाची रचना दिसते. अती प्राचीन काळापासून संस्कृती, व्यापार आणि राजकीय उलाढाली या विंध्याचल आणि नर्मदा या भौगोलिक मर्यादा ओलांडून दोन्ही भागांत एकसारख्याच चालू असलेल्या दिसतात. यावरून देशाचे दोन भागांत विभाजन हे केवळ कृत्रिम वाटते. तसे पाहिले तर हे दोन्ही भाग एकमेकांपासून अलग असे कधीच नव्हते. अतिपूर्वकाली उत्तरेकडील आर्य आणि द्राविडी संस्कृती एकमेकांमध्ये इतक्या मिसळून गेल्या की त्यामधून एकसंध हिंदु समाज आणि संस्कृती निर्माण झाली. अगदी जुन्या ऐतिहासिक काळापासूनच या दोन्ही भागांमध्ये परस्पर राजकीय संबंध असल्याचे दिसून येते. मध्ययुगीन काळात अल्लाउद्दिन खिलजी आणि त्यानंतरच्या दिल्लीच्या सुलतानांनी पूर्वीसारख्याच महत्त्वाकांक्षी हिंदू राजांप्रमाणे दक्षिणेसकट सर्व हिंदुस्थानभर आपली सत्ता प्रस्थापित करण्याचा प्रयत्न केला. दिल्लीची तुर्की सत्ता मोडकळीस आल्यावर गुजराथ, माळवा आणि ओरिसामधील स्थानिक राज्यकर्त्यांनी दक्षिणेकडल्या राजकारणात सक्रिय भाग घेतला. हिंदुस्थानच्या सार्वभौम राजकीय सत्तेचा वारसा मुघलांना दिल्लीच्या सुलतानांकडूनच मिळाला होता. म्हणून संस्थानांची हद्द, राजकीय सत्तेखाली असलेला मुलूख, व्यापारउदीम, धार्मिक धोरण यासंबंधीचे प्रश्न आणि सर्वाहून अधिक महत्त्वाचे म्हणजे निर्वासितांचे आणि स्थलांतर करून आलेल्यांचे प्रश्न हे पूर्वीसारखेच पुन:पुन्हा उद्‌भवत असत आणि त्यातून मार्ग काढणे भाग पडे. त्यामुळे हिंदुस्थानचे भवितव्य हे उत्तर आणि दक्षिण प्रांतांच्या समन्वयावरच अवलंबून होते यात काही शंका नाही.

## दख्खनबद्दलचे अकबराचे सुरुवातीचे आराखडे

बाबर आणि हुमायून यांचे दख्खनवर लक्ष असले तरी तेथील राजकारणात प्रत्यक्ष उलाढाली करण्याइतके सामर्थ्य किंवा फुरसत त्यांना नव्हती. बहामनी राज्य खालसा होण्याच्या बेतात असताना तेथील राजाने बाबरजवळ मदतीची याचना केली, पण बाबरने त्याला मदत देण्याचे नाकारले. दक्षिणेकडील गुंता-गुंतीच्या राजकारणात हस्तक्षेप करण्यास शेरशहालाहि कधी वाव मिळाला नाही. पण आपल्या कारकीर्दीच्या सुरुवातीसच दक्षिणेकडील मुसलमानी राज्ये आपल्या अंमलाखाली आणण्याचा अकबराने निश्चय केला होता. ही दक्षिणेकडील राज्ये कमकुवत असून त्यांची आपापसात नेहमी युद्धे होत असत. ३ ऑगस्ट १३४७ रोजी बहामनी राज्याची स्थापना झाली. हे एकेकाळी बलिष्ठ असलेले राज्य हळूहळू मोडकळीस येऊन त्याचा शेवटला नामधारी राजा कलीमउल्ला याचा अंत झाल्यावर ते नष्ट झाले. त्याच्या फाळणीतून निर्माण झालेली पाच स्वतंत्र राज्ये, अहमदनगर, विजापूर, गोवळ कोंडा, वऱ्हाड आणि बिदर यांचा आपापसात सदैव संघर्ष चालू असे. तसेच दक्षिणेच्या विजयनगरच्या प्रसिद्ध हिंदु साम्राज्याशीही त्यांचा सतत झगडा चालू होता. त्यांच्या उत्तरेस खानदेश असून १३८२ साली तेथे मलीक अहंमदने आपली स्वतंत्र सत्ता प्रस्थापित केली होती. गुजराथच्या राज्यावरोवर (स्थापना १३९६ सन) खानदेशचे झगडे होत असून दक्षिणेकडील या पाच राज्यांबरोबरही त्याच्या लढाया आणि राजकारण सतत चालू होते. १५ व्या शतकाच्या अखेरीस हिंदुस्थानच्या पश्चिम तीरावर आपले ठाणे देऊन पोर्तुगीजांनी अरबी समुद्रावर ताबा मिळवला. त्यामुळे इथले राजकारण अधिकच गुंतागुंतीचे झाले. पोर्तुगीजांची राज्यपद्धती हल्ली प्रमाणेच त्यावेळीही फार क्रूर आणि प्रतिगामी होती. (डिसेंबर १९६१ मध्ये गोवा, दमण, दीव यांची पोर्तुगीज सत्तेखालून सुटका करण्यापूर्वी हे लिहिलेले आहे.) अरबस्तानात जाणाऱ्या मुसलमान यात्रेकरूंना त्रास द्यावा, त्यांच्यावर वाटेल ती बंधने घालावीत आणि निष्कारण कर वसूल करावा, असा पोर्तुगीजांचा खाक्या होता. आपला व्यापार, धर्म आणि सत्ता यांची हवी त्या तऱ्हेने वाढ करण्याचा या लोकांचा निश्चय असून दक्षिणेकडील सर्व राज्यांबरोबर त्यांचे अधूनमधून झगडे सुरू होते. तसेच या राज्यांतून लोकांना बाटवण्याचे पण त्यांचे काम चालू होते. दक्षिणेतल्या या परिस्थितीची अकबराला पूर्ण कल्पना होती आणि तिथल्या अरांजकाचा कायमचा निकाल लावून तेथे शांती प्रस्थापित करावी असे त्याला वाटत होते. शिवाय सबंध देश आपल्या सत्तेखाली आण-

ण्याची त्याची महत्त्वाकांक्षा होतीच म्हणून सुरुवातीलाच म्हणजे १५६४ मध्येच दक्षिण जिंकून घेण्याची एक योजना त्याने तयार केली. पण उत्तरेकडील बराच मुलूख अजून मुघल सत्तेखाली आला नसल्यामुळे हा बेत पुढे ढकलावा लागला तथापि दक्षिणेवरची त्याची नजर कधीच ढळली नाही आणि जेव्हा जेव्हा संधी मिळाली तेव्हा तेव्हा आस्ते आस्ते आपले वर्चस्व तेथे स्थापन करण्याचा त्याने यशस्वी प्रयत्न केला.

## खानदेशशी पहिला संबंध.

साम्राज्याच्या दक्षिण सरहद्दीवर असलेल्या खानदेशच्या राज्याकडे अकबराचे साहजिकच प्रथम लक्ष गेले. मार्च १५६१ मध्ये माळवा जिंकल्यानंतर खानदेशशी त्याचा संबंध आला, कारण माळव्याच्या स्वारीवरच्या पीर महंमदने नर्मदा ओलांडून बाजबहादुरचा पाठलाग केला होता. यावेळी बाजबहादुरला खानदेशच्या राजाने मदत केल्यामुळे या मुघल सेनापतीचा पराभव झाला, आणि नदीत बुडून तो मरण पावला. १५६४ मध्ये तिथला बंडखोर सरदार अब्दुल्ला खान उझबेक याला शोधून काढून त्याचे पारिपत्य करण्यासाठी अकबर माळव्यात गेला. यावेळी त्याचा आणि खानदेशचा प्रत्यक्ष संबंध आला. मांडूला तळ देऊन असताना अकबराने खानदेशचा राजा मीरान् मुबारक शहा याच्याकडे त्याच्या मुलीसाठी मागणी घातली आणि सप्टेंबर १५६४ मध्ये ती अकबराच्या जनानखान्यात दाखल झाली. १५७२ मध्ये अकबराने गुजराथ जिंकले आणि १५७३ मध्ये तिथल्या बंडाळीचा मोड केला. यामुळे नैऋत्येकडील साम्राज्याची सरहद्द खानदेशला भिडली. खास म्हणजे बादशहाचे नातेवाईक गुजराथचे बंडखोर मिर्झांनी पळून जाऊन दक्षिणेकडे आश्रय घेतला. यामुळे पण अकबराचे विशेष लक्ष दक्षिण देशाकडे वळले. या सर्व भानगडीत खानदेशचे राज्य मोठ्या पेचात आले. भौगोलिक आणि इतर दृष्ट्या दक्षिणेकडल्या राज्याशी खानदेशचे जुने मैत्रीचे संबध होते, पण त्याच वेळी मुघल साम्राज्याच्या मैत्रीचा हात झिडकारण्याची ताकद त्यांच्यात नव्हती. इ. स. १५७४ मध्ये खानदेशच्या पूर्वेकडील वऱ्हाडचा भाग अहमदनगरने जिंकून आपली सत्ता वाढवली आणि त्यामुळे दक्षिणेतला राजकीय सत्तेचा समतोल बिघडून गेला खानदेशचा राजा दुसरा महंमद वऱ्हाडच्या गादीवर हक्क सांगणाऱ्याच्या मदतीला गेला. पण तेथे त्याचा पराभव झाला. अहमदनगरच्या विजयी फौजांनी बऱ्हाणपूर लुटून अशीरगडला वेढा दिला. या विजयाने शेफारून जाऊन अहमद-

नगरचे सैन्य मुघल सरहद्दीपर्यंत येऊन पोचले. मुर्तांझा निझाम शहाच्या सैन्याच्या हालचालीमुळे मुघल दरबारात बरीच खळबळ उडाली असावी. साम्राज्यात बंड करणाऱ्या महंमद हुसेन मिर्झांला अहमदनगरच्या निजामाने आश्रय दिलेला असून त्याला बादशहाच्या हवाली करण्यास इ. स. १५७३ मध्य त्याने नकार दिला होता. यामुळे अकबराचे व निझामाचे सूत नव्हते. १५७६ मध्ये नर्मदेच्या उत्तर तीरावर बादशहाची छावणी होती आणि तेथून तो आपल्या दक्षिण सरहद्दीवरील हालचाली पाहात होता. अहमदनगरच्या फौजा वऱ्हाडच्या सरहद्दीवर आणि साम्राज्याच्या दक्षिण हद्दीवर आलेल्या पाहून त्याचे मन अस्वस्थ झाले. तशात मुझफ्फर हुसेन मिर्झा अहमदनगरच्या फौजेबरोबर होता याची टोचणी बादशहाच्या मनाला होतीच. सुदैवाने मुझफ्फर हुसेन मिर्झाला आपल्या छावणीतून जाण्यास सांगावे ही आपल्या सरदारांची विनंती मुर्तांझा निजामशहाने मान्य केली, पण एकंदर परिस्थिती इतकी नाजूक आणि आणीबाणीची होती की खानदेशच्या महंमदशहाने निझामाच्या मदतीसाठी आपली फौज दौलताबादला रवाना केली. सुदैवाने अकबराचे लक्ष यावेळी इतर ठिकाणच्या जरुरीच्या कामात गुंतल्यामुळे त्याने खानदेश आणि अहमदनगरच्या लष्करी सामर्थ्याच्या प्रदर्शनाकडे काणाडोळा केला. अशा तऱ्हेने हा आणीबाणीचा प्रसंग त्या वेळेपुरता टळला.

**खानदेश बादशहाचे मांडलिकत्व पत्करतो :**

खानदेशचे धरसोडीचे वर्तन लक्षात घेऊन अकबराने ते राज्य प्रथम आपल्या सत्तेखाली आणण्याचे आणि नंतर इतर दक्षिणेकडील राज्ये जिंकण्याचे ठरवले. खानदेशच्या स्वारीवर स्वत: जाण्यास त्याला सवड नसल्याने त्याने शहाबुद्दिन अहमदकडे ही कामगिरी सोपवली (१५७६ ची अखेर). खानदेशचा नवा राजा रजाअलीखान याला त्याच्या राजधानीत मुघल सैन्याने वेढा दिला आणि बऱ्हाणपूरचा पाडाव होण्याची वेळ आली. पण शूर बंडखोर मुझफ्फर हुसेन मिर्झा गुजराथवर चाल करून आला आहे असे ऐकून मुघल सरदारांचे धैर्य खचले आणि त्यांनी राजा अलीखानची शरणागती मान्य केली व त्याने दिलेले नजराणे घेऊन ते गुजराथला परत गेले (इ. स. १५७७). मुघलांच्या या पहिल्या स्वारीत खानदेश पादाक्रांत करण्याचा मूळ उद्देश सिद्ध झाला नाही, तरी त्याने बादशहाचे मांडलिकत्व पत्करले. मुघलांच्या दक्षिणेकडील राजकीय हालचालीत हा एक महत्त्वाचा टप्पा होता, कारण यामुळे दक्षिणेतील इतर राज्ये जिंकून घेण्याचा मुघलांचा पुढील मार्ग मोकळा झाला. ❖

❖ पहा : या पुस्तकाचे ११ वे प्रकरण

## अहमदनगरविरुद्धची पहिली मोहीम अयशस्वी :

खानदेशनंतर त्यालाच दक्षिणेस लागून असलेल्या अहमदनगरच्या दुसऱ्या दक्षिणेकडील राज्याकडे अकबराचे लक्ष वेधले. मुघल बंडखोर गुजराथचा मुझफ्फर हुसेन मिर्झा याला आश्रय देऊन आणि आपल्या सैन्यात त्याला मोठी हुद्याची जागा देऊन अहमदनगरचा राजा मूर्तझा निझामशहा याने अकबराला दुखावले होते. तसेच वऱ्हाड जिंकून घेऊन त्याने आपले सैन्य मांडूच्या दक्षिणेकडील मुघल सरहद्दीपर्यंत आणून ठेवले होते, त्याचा उल्लेख पूर्वी आलाच आहे. त्यामुळे अहमदनगरच्या कारभारात हात घालण्याची संधी अकबर शोधत होता. १५८५ मध्ये मीर मुर्तझा खुदावंद खान आणि अहमदनगरचे इतर काही प्रतिष्ठित सरदार तिथला मुख्य वजीर सलानतखान याच्यापुढे पराभूत होऊन मदतीसाठी मुघल दरबारात हजर झाले. त्यांना मदतीचे आश्वासन देऊन बादशहाने माळव्याचा सुभेदार खान–इ–आझम याला वऱ्हाड जिंकून घेऊन तिथे या बंडखोर सरदारांना नेमण्याचा आदेश दिला. ३०० लढाऊ हत्ती, उत्तम तोफखाना आणि सैन्यातले वरिष्ठ अधिकारी यांना खान–इ–आझमच्या मदतीस पाठविण्यात आले.

खान–इ–आझम आणि शहाबुद्दीन अहमदखान यांच्यामधील भांडणामुळे या स्वारीचा मुक्काम ६ महिने दक्षिणेच्या सरहद्दीवरील हांडीया या गावीच राहिला. मुघलांशी वरकरणी मैत्री दाखवण्यास खानदेशचा अलीखान पण दक्षिणेकडल्या आपल्या मित्रांना जाऊन मिळाला; आणि बादशाही फौजेच्या मार्गात त्याने अडथळे निर्माण केले. दरम्यान खेरला जिंकून घेण्यात खान–इ–आझमला यश आले नाही, म्हणून त्याने आपला मोर्चा वऱ्हाडची राजधानी एलिचपूर इकडे वळवला. पण तेथेही शत्रू सामोरा आल्यामुळे त्याने नंदूरबारकडे माघार घेतली. अहमदनगरचे सैन्य त्याचा पाठलाग करीत निघाले; पण गुजराथचा सुभेदार खान–इ–खानानने आपल्या जवळची काही फौज खान-इ-आझमच्या मदतीस पाठवून दिली व गुजराथ आणि माळव्यातल्या सेनेने एक होऊन दक्षिणेकडील सैन्याला मागे रेटले आणि पुन्हा वऱ्हाडवर स्वारी करण्याची तयारी केली तेवढ्यात पावसाळा सुरू झाल्यामुळे या स्वारीचा बेत रद्द करावा लागला (इ. स. १५८६).

## अहमदनगरवरील दुसऱ्या स्वारीत अपयश :

अहमदनगरच्या कारभारात हात घालण्याची आणखी एक संधी अकबराला १५८८ मध्ये मिळाली. अहमदनगरचा सुलतान मुर्तझा निझामशहा वाईट

चालीचा असून दरबारातल्या एका देखण्या षंढ पोरावर तो अतिशय भाळला होता. यामुळे दरबारातले सरदार फार चिडून जाऊन त्यांनी सुलतानाला पदच्युत करण्याचा घाट घातला. त्यापैकी एक जुज्जर खानने सुलतानाचा भाऊ बऱ्हाणउद्दिन याची कैदेतून सुटका करून त्याला गादीवर बसविण्याचा कट रचला. पण हा कट अयशस्वी होऊन बऱ्हाणउद्दीनचा पराभव झाला (१५ जून १५७९). यानंतर तो मुघल दरबारात पळून गेला आणि बादशहाने प्रेमाने त्याचे स्वागत केले (१५८८). या विजयानंतर निजामशहाने गोवळकोंड्याच्या कुतुबशहाच्या मदतीने विजापूरवर स्वारी केली. पण दोन्ही सैन्यातील परस्पर द्वेष आणि भांडणांमुळे या स्वारीस यश आले नाही. यानंतर लवकरच मुर्ताझा निजामशहा वेडा झाला. आपला मुलगा हुसेन याच्या निजताना घालण्याच्या कपड्यांना आग लावून त्याला ठार मारण्याचा प्रयत्न त्याने केला. या हल्ल्यातून जिवानिशी सुटून जाऊन हुसेन बापाविरुद्ध उठला आणि १४ जून १५८८ रोजी त्याने त्याला उकळत्या तेलात टाकून त्याची हत्या केली. पण हुसेन स्वत: एक मूर्ख, अविचारी आणि रक्तपिपासू हुकुमशहा होता. यामुळे त्याला पदच्युत करून १ एप्रिल १५८९ रोजी त्याचा खून करण्यात आला. यानंतर बऱ्हाणउद्दीनचा मुलगा इस्माईल गादीवर आला, पण दरबारातला एक जबरदस्त सरदार जमालखान ह्याच्या हातातला तो केवळ एक बाहुले होता. जमालखान हा कडवा महादवी असल्यामुळे त्याने महादवी धर्म हा राज्याचा धर्म करून टाकला व सूनी व शिया पंथियांचा छळ करून सर्व परकीयांना राज्यातून हाकून दिले. धार्मिक छळ आणि राजकीय बाबतीतला इथला जुलमी कारभार पाहून अहमदनगच्या राज्यातील अंतस्थ कारभारात हात घालण्याची संधी अकबराने साधली. बऱ्हाणउद्दिन याला अकबराने रौशनीयांचा पुढारी जलाला याचा बंदोबस्त करण्यासाठी तीऱ्हाला पाठवून दिले होते, काश्मीरच्या पहिल्या भेटीच्या वेळी त्याला तेथून बोलावून घेऊन अहमदनगर जिंकण्याच्या कामावर अकबराने त्याची नेमणूक केली (एप्रिल, १५८९). माळव्याचा सुभेदार खान–इ–आझम आणि खानदेशचा सुलतान राजा अलीखान यांना त्याच्या मदतीस जाण्यास सांगितले. पण अहमदनगर जिंकून तिथल्या गादीवर बऱ्हाणउद्दिनला बसवण्यात त्यांना यश आले नाही. आपल्या स्वत:च्या लोकांवरच आपण स्वारी करून जात आहो असे अहमदनगर राज्यातल्या लोकांना वाटू नये म्हणून तुम्ही सरहद्दीवरच थांबा आणि छोटेसे शरीररक्षक घेऊन आपल्या देशात मला प्रवेश करू द्या अशी विनंती बऱ्हाणउद्दिनने खान–इ–आझमला केली. बरोबर १००० घोडेस्वार आणि ३०० बरकंदाज घेऊन

बऱ्हाणउद्दीन बऱ्हाडमध्ये शिरला. तिथली राजधानी एलिचपूर– तिला उजवी बगल देऊन तो दाणापूरला आला. तेथे अहमदनगरच्या फौजांनी त्याच्यावर हल्ला करून त्याचा पराभव केला व त्याला माळव्यात परत फिरावे लागले. अशा तऱ्हेने अहमदनगर जिंकून घेण्याचा दुसरा प्रयत्न फुकट गेला.

## अहमदनगरमध्ये बऱ्हाणउद्दीनला मिळालेले यश :

१५८९ मधील अपयशानंतर बऱ्हाणउद्दिन माळव्याला परत आला आणि तेथे अकबराने त्याला एक जहागीर दिली. माळव्याचा नवा सुभेदार शहाबुद्दिन अहमदखान हा डिसेंबर १५९० मध्ये मरण पावल्यावर खानदेशच्या राजा अलीखानची मदत घेऊन बऱ्हाणउद्दीन पुन: अहमदनगरवर चालून गेला. त्याच-वेळी बऱ्हाणउद्दिनबरोबरच अहमदनगरवर हल्ला करण्याविषयी विजापूरच्या आदिलशहाचे मन राजा अलीखानने वळवले. अहमदनगरचा सरदार जमालखान याने प्रथम विजापूरच्या सैन्यावर हल्ला चढवून त्यांचा पराभव केला. दरम्यान बऱ्हाणउद्दिन बऱ्हाडला जाऊन तो प्रांत त्याने काहीही विरोध न होता काबीज केला. विजापूरच्या सैन्याचा निकाल लावल्यानंतर जमालखान बऱ्हाणउद्दिनवर चालून आला. पण या स्वारीत पराभव पावून तो मारला गेला. अहमदनगरचा राजा, बऱ्हाणउद्दिनचा मुलगा इस्माईल याला कैद करण्यात आले. अहमद-नगरमध्ये मोठ्या थाटाने प्रवेश करून बऱ्हाणउद्दिनने तेथील राजवस्त्रे धारण केली. राजा अलीखान खानदेशला परत गेला.

## बऱ्हाणउद्दिन अकबराचे मांडलिकत्व झुगारून देतो :

## दक्षिणेकडील मुघल वकीलाती :

अहमदनगरच्या विजयाने चढून जाऊन व आपले वडिलार्जित राज्य परत मिळवण्यात अकबराने दिलेली मदत विसरून बऱ्हाणउद्दिनाने दिल्लीचे वर्चस्व झुगारुन दिले. ते पाहून दक्षिणेकडल्या इतर राजांनी पण तसेच केले. सर्व धर्मांना सारखी वागणूक देऊन राज्यकारभार उत्तम रितीने कसा करावा हे बऱ्हाणउद्दिनाने अकबराच्या दरबारात प्रत्यक्ष पाहिले होते. पण ते सर्व बाजूस सारून व बऱ्हाण--उल्-मुल्क हा किताब धारण करून तो ख्यालीखशालीत

आपला वेळ घालवू लागला. म्हणून राजा अलीखानकडे एक वकील पाठवून त्याच्यातर्फे बऱ्हाणउद्दिन आणि दक्षिणेतले इतर राजे यांना चार समजुतीच्या गोष्टी सांगण्याचे अकबराने ठरवले. आपले सार्वभौमत्व कबूल करून माझे मांडलिक म्हणून तुम्ही राहण्यास तयार असल्यास मी तुमच्या राज्यांत काही ढवळाढवळ करणार नाही, अशी हमी अककराने या राज्यांना दिली. पण याविरुद्ध जाऊन बंडखोरपणा दाखवल्यास बादशाही फौजा येऊन तुमचे पारिपत्य करतील असेही त्यांना कळविण्यात आले. या धोरणानुसार जुलै—ऑगस्ट १५९१ मध्ये दक्षिणेच्या चार राजांकडे अकबराने आपले चार निरनिराळे वकील पाठवून दिले. राजकवी फैजीला प्रथम खानदेशात पाठविण्यात आले. तेथून अहमदनगरला जाऊन तेथे पाठविलेल्या वकील अमीनउद्दिन बरोबर राहाण्यास त्याला सांगण्यात आले होते. विजापूरच्या आदीलशहाच्या दरबारात मीर महंमद रिझवी आणि गोवळकोंड्याच्या कुतुब-उल्-मुल्ककडे मीर मनीर यांची वकील म्हणून नेमणूक करण्यात आली. याच-वेळी राजपुत्र मुरादला माळव्याचा सुभेदार नेमण्यात आले. १४ सप्टेंबर१९५१ रोजी दरबार सोडून त्या प्रांताचा ताबा घेण्यास जाण्याची परवानगी त्याला देण्यात आली. निशाण, नगारा, छत्र आणि तोघ (एक विशिष्ट प्रकारचे निशाण) ही मानचिन्हे राजपुत्राला देऊन त्याचा सत्कार करण्यात आला. हुशार जागरूक राहून काम करण्याचा सल्ला अकबराने राजपुत्राला दिला. दक्षिणेकडील राज्ये गुण्यागोविंदाने आपल्या सत्तेखाली न आल्यास पुढील युद्धाची तयारी म्हणून अकबराने राजपुत्राची ही नेमणूक केली असावी.

## दक्षिणेविरुद्ध अकबराच्या सुरुवातीच्या हालचाली :

१ वर्ष ९ महिने आणि १४ दिवसांनंतर दक्षिणेमधील आपले वास्तव्य संपवून १५९३ मध्ये फैजी दिल्लीला परत आला. त्याला आपल्या कामगिरीत अंशतःच यश आले होते. दक्षिणेकडल्या चार राजांपैकी खानदेशच्या राजा अलीखाननेच फक्त बादशहाची मांडलिकी पत्करली. तसे पाहिले तर हे त्याने आधीच मान्य केले होते. पण या बाबतीतले त्याचे धोरण दुटप्पी होते. दक्षिणे-कडल्या सर्व राजांनी एकत्र येऊन मुघलसत्ता विंध्यपार करून दक्षिणेत पसरू न देणे हे दक्षिणेतल्या राजांचे धोरण असल्यामुळे राजा अलीखानला त्यांच्या बरोबरचे मैत्रीचे संबंध तोडणे कठिण होते. तरीसुद्धा त्याने आपली मुलगी राजपुत्र सलीमच्या जनान्यात पाठवून दिली. पण विजापूर, गोवळकोंडा आणि अहमद-नगर यांनी बादशहाच्या औपचारिक तहाच्या मागणीस मोठ्या सौजन्याने पण

नकारच दिला. अकबराने आपल्यावर केलेले उपकार न स्मरता साम्राज्याचा वकील अमीनउद्दिनकडे संपूर्ण दुर्लक्ष करून बऱ्हाणुल्मुल्कने त्याची असभ्यपणे बोळवण केली. त्याने अकबराचे आधिपत्य पण मान्य केले नाही किंवा त्याच्याकडे काही नजराणेहि पाठविले नाहीत. यानंतर अहमदनगर जिंकण्याचे अकबराने नक्की केले आणि १५९३च्या अखेरीस राजपुत्र मुरादची या कामावर नेमणूक केली. आग्र्याच्या मार्गाने स्वत: दक्षिणेस जाण्याची बादशहाची इच्छा होती, पण त्यावेळी त्या भागात दुष्काळ असल्यामुळे त्याला आपला बेत पुढे ढकलावा लागला. मुराद बरोबर खान-इ-खानान, रायसिंग आणि इतर पुष्कळ सेनापती होते. पैसा, तोफखाना आणि हत्तीदल यांनी सैन्य सुसज्ज होते. शहारुख मिर्झा आणि शहाबाज खान यांना पण माळव्यातले सैन्य घेऊन मुरादला मिळण्याचे हुकूम सुटले. बंगालमध्ये राहण्याची जरूर नसल्यास दक्षिणेत राजपुत्र मुरादच्या मदतीस जावे असे मानसिंगला एका हुकुमान्वये कळविण्यात आले.

## मुघल स्वारीच्या पूर्वीचे अहमदनगर

अहमदनगर मुघलांची स्वारी होण्यापूर्वीच १८ एप्रिल १५९५ रोजी बऱ्हाण-उल्-मुल्क मरण पावला होता. आपल्या प्रजेला योग्य न्याय देऊन नि:पक्षपातीपणाने राज्य करावे हा अकबराचा सल्ला विसरून जाऊन बऱ्हाण-उल्-मुल्क दुष्ट मोहांना बळी पडला. आपल्या सरदारांच्या कुटुम्बांतील मंडळीवर त्याने अत्याचार केले. मूर्खपणे विजापूरच्या आदिलशहावर अयशस्वी स्वारी केली. कुलाबा जिल्ह्यातले मुंबईच्या दक्षिणेस ३० मैलांवर चौल जवळचे रेवदंडा हे बंदर पोर्तुगीजांकडून जिंकून घेण्यासाठी त्याने फौलादखान आणि असदखान यांना एप्रिल १५९४ मध्ये पोर्तुगीजांविरुद्ध लढाई करण्यासाठी पाठविले पोर्तुगीजांनी निकराचा लढा देऊन अहमदनगरच्या आपल्यापेक्षा बहुसंख्य असलेल्या सैन्याचा पराभव केला आणि चौलजवळील मोरो हे ठाणे जिंकून घेतले. स्त्रीसंभोगाचा अतिरेक केल्यामुळे बऱ्हाण-उल्-मुल्क नंतर लौकरच आजारी पडला आणि आपला मुलगा इब्राहिम बेग याला त्याने आपला वारस नेमले. पण इखलासखानच्या हाताखालील अबिसिनियातल्या पक्षाने इस्माईलची बाजू घेतली. इस्माइल हा बऱ्हाण-उल-मुल्कचा दुसरा एक मुलगा. बरा झाल्यावर बऱ्हाणने इखलासखानशी लढाई करून त्याला पराभूत केले, पण पुन्हा आजारी पडून एप्रिल १५९५ मध्ये तो मरण पावला. त्याने नेमलेला वारस इब्राहिम याला पुष्कळ सरदारांचे पाठबळ होते. नव्या राजाने इस्माईलचे डोळे काढून त्याला ठार

मारले. यानंतर बऱ्हाणची बहीण चांदबिबी ही अहमदनगरच्या राजकारणात पुढे आली. तिने आपल्या भावाला विषबाधा करून मारले होते अशी एक अफवा आहे.

मुघल दरबारात अहमदनगरच्या स्वारीची तयारी सुरू असताना त्या राज्यात अंतस्थ कलहाचे रण माजले होते. मिया मंझूच्या हाताखालचा एक आणि आफ्रिकी इखलास खान याच्या हाताखालचा एक असे दोन तट अहमदनगरच्या सरदारांत पडले होते. इखलास खानने विजापूरबरोबर कुरापत काढल्यामुळे विजापूरचे सैन्य निजामशाहीत घुसले आणि अहमदनगरपासून ८० मैलांवर झालेल्या लढाईत इब्राहिम मारला गेला (१६ ऑगस्ट १५९५). त्याच्यानंतर अहंमद गादीवर आला; पण चांदबिबीच्या साहाय्याने त्याला पदच्यूत करून इब्राहिमच्या तान्हया मुलाला-बहादुरला-गादीवर बसविण्यात आले. पण हलक्या कुटुंबातल्या एका मुलाला पुढे करून इखलास खानने त्याला मोती शहा अशी पदवी दिली आणि अभंगखानने पहिल्या बऱ्हाणशहाचा मुलगा अली याची बाजू घेतली. अशा तऱ्हेने चार निरनिराळे लोक अहमदनगरच्या गादीवर हक्क सांगू लागले आणि त्यामुळे तेथे यादवीला सुरुवात झाली. दख्खनी पक्षाचा पुढारी मिया मंझूने हताश होऊन राज्यातला रक्तपात टाळण्यांसाठी मुरांद आणि खान-ई-खानान यांना बोलावणे पाठवले.

## राजा अलीखान मुघल सैन्यास येऊन मिळतो:

यावेळी दक्षिणेकडल्या राजकारणात पुष्कळ घडामोडी सुरू होत्या. विंध्याचलाच्या दक्षिणेकडील चारी राज्ये मुघलांच्या विरुद्ध संगनमत करण्याच्या विचारात होती. खानदेशचा राजा अलीखान हा वरकरणी कितीहि आज्ञाधारकपणा दाखवत असला तरी मनातून मुघलांच्या विरुद्ध होता. बादशहाचा वकील खानदेशात हजर असेल तेव्हाच तो अकबराच्या नावाने खुतबा वाचण्यास परवानगी देत असे. तरीसुद्धा दक्षिणेच्या स्वारीवर निघालेल्या खान–इ–आझमला तो जाऊन मिळाला; पण नंतर आपण केलेल्या कृत्याचा त्याला पश्चात्ताप होऊन तो घाबरून सुटकेचा मार्ग शोधू लागला. त्याची समजूत घालण्यासाठी फैजीला जेव्हा पाठविण्यात आले तेव्हा झोपेतून जागा होऊन मुघलांची दक्षिणेकडील स्वारी प्रत्यक्ष सुरू झाल्यावर तटस्थ राहणे मूर्खपणाचे आहे हे त्याला कळून चुकले. मुराद खानदेशच्या जवळ आला आहे हे पाहताच आपल्या

मदतीची खातरजमा देऊन बऱ्हाणपूर पासून ६० मैलांवर शहारुख मिर्झाच्या समोर तो येऊन हजर झाला. त्याचे योग्य प्रकारे स्वागत झाले. अकबराने नंदुरवार त्याच्या ताब्यात देण्याचा हुकूम सोडला.

## मुरादची दक्षिणेकडील चाल:

दरम्यान दक्षिणेकडील स्वारीवर निघण्याचा हुकूम मुराद आणि खान-इ-खानान यांना देण्यात आला. पण सुरुवातीपासूनच या दोघांचे पटले नाही. सैन्याची जमवाजमव योग्य वेळी न झाल्यामुळे खान-इ-खानान ठरलेल्या तारखेस निघू शकला नाही. खान-इ-खानानची फौज व आपली फौज यांनी गुजराथ मध्ये एकत्र होऊन आपल्या आधिपत्याखाली दक्षिणेकडे कूच करावे अशी मुरादची इच्छा होती. पण माळव्यातून तडक दक्षिणेकडे जावे असा खान-इ-खानानचा विचार होता. आपला स्वतंत्र अधिकार गाजविण्याची त्याची इच्छा असल्यामुळे त्याच्यात व मुरादमध्ये तंटयास सुरुवात झाली. सरतेशेवटी स्वारीचा बेत नक्की झाल्यावर ३० ऑक्टोबर १५९४ रोजी मुराद अहमदाबादहून भडोचला गेला आणि तेथे खान-इ-खानानची वाट पाहात बसला. जून १५९५ च्या सुरुवातीस त्याने भडोच सोडले. आपल्या सैन्याची जमवाजमव करून खान-इ-खानान काही दिवस भिलसाला राहिला आणि १९ जुलै १५९५ रोजी तो उज्जैनच्या मार्गाने निघाला. याचा साहाजिकच राग येऊन खान-इ-खानानला मुरादने एक खरमरीत पत्र लिहिले. साम्राज्याशी मैत्रीचे धोरण ठेवणारा राजा अलीखान बादशाही फौजांच्या हालचालींमुळे घाबरून गेला आहे म्हणून राजपुत्र मुरादने काही दिवस गुजराथमध्ये थांबावे असा खान-इ-खानानचा राजपुत्राला सल्ला होता, पण त्याच्या विनंतीस मान न देता मुराद अहमदनगरवर हल्ला करण्याच्या हेतूने तिकडे निघाला. तेव्हा शहारुख मिर्झाच्या ताब्यात आपली फौज देऊन खान-इ-खानान राजा अलीखानला बरोबर घेऊन मुरादला भेटण्यासाठी अहमदाबादपासून ६० मैलांवर असलेल्या चांदोड या गावी आला (२९ नोव्हेंबर १५९५). प्रथम वेडेपणाने मुरादने त्यांना भेट देण्याचे नाकारले. नंतर पुष्कळ बोलाचाली झाल्यावर त्यांची भेट झाली. यावेळी मुरादने सैन्यातल्या अधिकाऱ्यांचा अपमान केला आणि अशा तऱ्हेने दोघांमधील भांडणे चालूच राहिली. भरीत भर म्हणजे बादशाही फौजेतल्या सादिकखान आणि शहाबाझ खान या दोन मुख्य अधिकाऱ्यांमध्ये याचवेळी वितुष्ट आले. दंड थोपटून उभे राहिलेल्या शत्रूपुढे अशा सैन्याचा निभाव लागणे अशक्य होते हे उघड आहे.

## अहमदनगरचा पहिला वेढा

राजपुत्र मुराद अहमदनगरला पोहोचला सुद्धा नव्हता एवढ्यातच राज्यातल्या अंतर्गत कारभारात हात घालण्याची संधी मुघलांना दिल्याबद्दल मंझूखानला वाईट वाटू लागले. दरम्यान आपल्या विरुद्ध असलेल्या हबशी पक्षावर विजय मिळवून त्याने आपली सत्ता पुन्हा प्रस्थापित केली होती. चांदबिबीचा विश्वास संपादन करूस तिला त्याने अल्पवयीन राजाची प्रतिनिधी म्हणून काम पाहाण्यास परवानगी दिली आणि हबशी पक्षाशी समझोता केला. मुघलांविरुद्धच्या लढाईत आपल्याला येऊन मिळावे अशा अर्थाचे आमंत्रण त्याने विजापूर, गोवळकोंड्याकडे पाठविले. अहमदनगरच्या संरक्षणाची जबाबदारी चांदबिबीवर सोपवून निजामशाहीच्या मदतीस येण्यासाठी विजापूर आणि गोवळकोंड्याचे मन वळवण्यासाठी तो स्वत: तिकडे गेला. इकडे चांदबिबीने किल्ल्याच्या रक्षणाची तयारी करण्यास धडाक्याने सुरुवात केली आणि मुघलांच्या स्वारीविरुद्ध योग्य ती योजना आखण्यासाठी शमशेरखान या आफ्रिकी सेनानीला बोलावून घेतले. अल्पवयीन राजा अहंमद ह्याला मंझू बरोबर घेऊन गेला असल्यामुळे किल्ल्यातील बहुतेक सर्व फौज चांदबिबीला सामील झाली. तिने आपला भाचा लहानगा बहादुर याची सुलतानपदी स्थापना करून त्याच्या नावाने कारभार करण्यास सुरुवात केली. महंमदखान, अभंगखान यांच्यासारख्या रूष्ट झालेल्या पुढाऱ्यांना तिने आपल्या बाजूस वळवून घेतले. पहिला बऱ्हाण निजामशहा याचा मुलगा अली याची बाजू सोडून देण्याबद्दलही तिने अभंगखानचे मन वळवले. अशा तऱ्हेने आपापसात लढणाऱ्या अहमदनगरच्या सरदारांमध्ये ऐक्य निर्माण करून मुघलांच्या चढाईला तोंड देण्याची तयारी करण्यात ती काहीशा प्रमाणात यशस्वी झाली.

१५९५ साली सुमारे डिसेंबरच्या मध्यात मुराद अहमदनगरजवळ येवून पोहोचला. सुरुवातीसच लोकांची मालमत्ता, जीवित आणि इज्जत यांना कुठल्याही तऱ्हेचा धक्का पोहोचणार नाही अशा तऱ्हेची दवंडी त्याने पिटवली आणि कोणत्याही तऱ्हेचे अत्याचार आणि लूटमार न करण्याचे हुकूम आपल्या सैन्यास सोडले. दुर्दैवाने शहाबाझ खानच्या सैन्याने हा हुकूम मोडून काही लोकांची लूटमार केली, त्यामुळे लोक भेदरून गेले. त्यातल्या काही गुन्हेगारांना पकडून त्यांना राजपुत्राने सर्व लोकांसमक्ष फाशी दिले. तरीसुद्धा लोकांच्या मनातली भीती कमी झाली नाही आणि काही लोक घाबरून पळून गेले. अहमदनगरच्या वेढ्याला १८ डिसेंबर १५९५ रोजी सुरुवात झाली. आरंभी वेढ्याचे काम

फारच वाईट तऱ्हेने चालले होते. एकतर सबंध किल्ल्याला वेढा पडला नव्हता आणि अधिकाऱ्यांतल्या परस्पर हेव्यादाव्यांमुळे आणि गैरसमजुतीमुळे राजपुत्राच्या सैन्यात वेढ्यासंबंधी विशेष आस्था नव्हती. यामुळे वेढ्याचे काम कसे तरी आस्ते आस्त चालले होते.

## चांदबिबींचा प्रतिकार

विजापूरच्या अली आदिलशहाची विधवा आणि मरहुम बऱ्हाण उल–मुल्कची बहीण चांदबिबी हिने किल्ल्याच्या रक्षणाची उत्तम व्यवस्था केली होती. बादशाही सैन्यातील भांडणांचा फायदा घेऊन वेढ्याला जोराने तोंड देण्याचा प्रयत्न तिने केला. तिच्या आमंत्रणाला मान देऊन इखलास खान दौलताबादेहून १०००० घोडदळानिशी तिच्या मदतीला निघाला. त्याला वाटेत थोपवून धरण्यासाठी खान–इ–खानानने ५००० निवडक फौज बरोबर देऊन दौलतखानची रवानगी केली. गोदावरीच्या तीरावर या दोन्ही सैन्यांत लढाई होऊन त्यात इखलास खानचा पराभव झाला. मुंगीपाटणपर्यन्त त्याचा पाठलाग करून मुघल सैन्याने ते गाव लुटले. दरम्यान अभंगखान ७००० घोडदळ आणि पायदळ घेऊन चांदबिबीच्या मदतीला धावून आला. किल्याच्या पूर्व बाजूस मुघलांच्या वेढ्यात खंड पडला होता. तेथून किल्यात शिरण्याचा प्रयत्न त्याने केला. खान-इ-खानानच्या मोक्याच्या जागा ओलांडून तो पुढे गेला पण मुघल सैन्याने त्याच्यावर हल्ला चढवून त्याच्या फौजेची नासाडी करून त्याला मागे हटवले. मुरादची फौज टेहळणीवर असताना अभंगखानची फौज त्यांच्या नजरेस पडली आणि तिच्यावर तावडतोब हल्ला करून त्यांनी अभंगखानला पिटाळून लावले. या पराभवाला न जुमानता किल्याबरच्या शिबंदीने आपला लढा चालूच ठेवला आणि बादशाही फौजेवर हल्ले करून त्यांच्या माल वाहून नेणाऱ्या जनावरांचा थोडाबहुत नाश केला. लूटमार करण्यास निघालेला बडा सय्यद, सय्यदराजा, याच्यावर हल्ला चढवला. शौर्याने लढता लढता सय्यद राजा ठार झाला. मध्यंतरी त्यांनी एक गुजराथी क़ारवा पण लुटला. यामुळे वेढ्याच्या सुरुवातीला मुघल सैन्याचा किल्ल्यातील शिबंदीपुढे फारसा प्रभाव पडला नाही. मुघल दरबारातला अखबारनवीस मोठ्या दुःखाने असे म्हणतो की तीन मोठी सैन्ये अहमदनगरला वेढा देऊन बसली होती पण त्यांना किल्ला किंवा आजूबाजूचा प्रदेश यापैकी काहीही जिंकता आले नाही. इतकेच काय वाहतुकीचे रस्तेसुद्धा सुरक्षित राखता आले नाहीत.

चांदबिबीने आता विजापूर आणि गोवळकोंडा येथे मदतीसाठी निकडीची मागणी केली. विजापूरचा दुसरा आदिलशहा याने आपला प्रसिद्ध सेनानी सुहेलखान याच्याबरोबर २५००० घोडदळ देऊन त्याला अहमदनगरला शहादुर्गच्या मार्गे पाठविले. अहमदनगरचा नामधारी राजा सुलतान अहंमद याला घेऊन मिया मंझू त्याला येऊन मिळाला. गोवळकोंड्याच्या सुलतानाने १०,००० घोडेस्वार आणि २०,००० पायदळ महादी कुली सुलतान याच्या हाताखाली देऊन त्याला चांदबिबीच्या मदतीला पाठवले. या हालचालीची खबर पोहोचताच राजपुत्र मुरादने आपला पालक सादिक महंमदखान याच्याबरोबर मसलत करून विजापूर आणि गोवळकोंड्याच्या फौजा अहमदनगरला पोचण्यापूर्वीच अहमदनगरचा किल्ला जिंकून घेण्याचा निकराचा प्रयत्न करण्याचे ठरवले. तोफांच्या सरक्षणाखाली किल्ल्याच्या पायथ्यापर्यन्त पाच निरनिराळ्या ठिकाणी मोठाले सुरुंग पेरले. त्यांच्यात दारूगोळा भरून त्यांची तोंडे दगडांनी बुजवून टाकली. दुसऱ्या दिवशी शुक्रवारची प्रार्थना झाल्यावर हे सुरुंग उडवून देण्याचे ठरले. किल्ल्यावरील लोकांच्या सुदैवाने ख्वाजा महंमद खान शिराझी नावाच्या एका माणसाने ही बातमी किल्यावर पोहोचवली. तेव्हा रात्रभर काम करून किल्यावरील लोकांनी दोन सुरूंग उखडून त्यातली दारू काढून टाकली. दुसऱ्या दिवशी सकाळी इतर ठिकाणी लावलेले सुरुंग शोधण्यास त्यांनी सुरवात केली. त्याचवेळी राजपुत्र मुराद आणि सादिक महंमद खान यांनी आपली फौज एकत्र केली; पण तटाला खिंडार पडताच हल्ला करण्यास तयार राहाण्याचा इशारा त्यांनी खान-इ-खानानला दिला नाही. यावेळी किल्यावरचे लोक सर्वात मोठा तिसरा सुरुंग खणून काढण्याच्या कामात गुंतले होते. तेवढ्यात मुघलांनी सुरूंग पेटवून दिले. त्यातला एकच सुरुंग उडाला. त्याचा प्रचंड स्फोट होऊन किल्ल्याची जवळ जवळ जवळ १५० फुटांची भिंत कोसळून पडली. (२१ फेब्रुवारी १५९६). सुरुंग खुला करण्यासाठी जमलेले किल्ल्यावरचे पुष्कळ सैन्य या स्फोटामध्ये मारले गेले आणि मूर्तझाखान, सुजातखान, महंमद खान, अफझलखान, इत्यादि प्रमुख अधिकारी आणि राहिलेले लोक घाबरून किल्ल्याच्या कानाकोपऱ्यात पळून गेले. फेब्रुवारी १५६८ मधल्या चितोडच्या स्फोटाचा अनुभव असल्यामुळे मुघल सैन्याने या मोठ्या खिंडारातून ताबडतोब किल्ल्यात घुसण्याचा प्रयत्न केला नाही आणि दुसरा सुरुंग उडण्याची वाट पहाते बसले. पण आश्चर्याची गोष्ट म्हणजे किल्ल्यावरच्या लोकांनी तो सुरुंग खुला करून त्यातला दारुगोळा काढून टाकला असल्याचे त्यांच्या आता ध्यानात आले. मुघल सैन्य किल्ल्याबाहेरच थांबलेले पाहून चांदबिबीने स्वतःच्या देखरेखी-

खाली कोसळलेली तटबंदी दुरुस्त करण्यास सुरुवात केली. किल्ल्याच्या तटबंदीला मोठे खिंडार पडले आहे असे समजताच ही शूर स्त्री आपल्या सैन्याच्या विनंतीला मान देऊन एका हत्तीवर बसून खिंडार पडलेल्या जागी हजर झाली. डोक्यापासून पायापर्यन्त लष्करी पोषाख केलेली, हातात नंगी तलवार आणि डोक्यावर छत्र– चामरे घेतलेल्या चांदबिबीला पाहून तिच्या सैन्याला खूप धीर आला आणि तटबंदी दुरुस्त करण्याचे काम सुरू झाले. घाबरून पळून गेलेले मूर्तझाखान, अभंगखान, सुजातखान इत्यादि अधिकारी आता तिता येऊन मिळाले. दुसरे सुरुंग उडण्याची वाट पाहात असलेले मुराद आणि त्याचे सैन्य यांच्यावर जेव्हा किल्ल्यावरून बंदुकीच्या गोळ्या, तोफांचे गोळे, बाण आणि दगड यांचा मारा होऊ लागला. तेव्हा ते दिमुढ होऊन गेले. दुसरे सुरुंग फुटत नाहीत हे कळून येताच खिंडार पडलेल्या जागेवर त्यांनी जोराचा हल्ला चढविला. पण किल्ल्यावरून होणाऱ्या गोळ्यांच्या माऱ्यामुळे त्यातले पुष्कळ मरून त्यांच्या मृत देहांनी किल्ल्यापुढला खंदक भरून गेला. संध्याकाळ होईपर्यन्त निकराची लढाई लढून सुद्धा किल्ला मुघलांच्या हातात पडला नाही. रात्र पडल्यावर मुराद आणि सादिकखान आपल्या छावणीत परत फिरले. तटाला पडलेले खिंडार भरून निघेपर्यन्त चांदबिबी त्याच जागी उभी होती. नव्याने वांधलेली तटाची भिंत ६ ते ९ फूट उंच होती. तिच्या शौर्यापुढे तिच्या मुघल शत्रूचेसुद्धा डोळे दिपून गेले आणि तेव्हापासून तिला चांद सुलताना या नावाने लोक ओळखू लागले.

## मुराद वेढा उठवतो :

चांद सुलतानाकडून विजापूर आणि गोवळकोंड्याला मदतीसाठी खलिते जातच होते. त्यातले काही मुघलांच्या हातात पडले तरीसुद्धा तिकडल्या फौजा अहमदनगरच्या रोखाने जोरात पुढे येत होत्या. धान्य आणि वैरण यांच्या टंचाईमुळे मुघल सैन्याचे आणि त्यांच्या घोडदळाचे खूप हाल होत होते. चांद सुलतानाची पण तीच स्थिती होती. त्यात आणखी आपापसातल्या भांडणांची भर पडली. हे पाहून तिने मुघलांबरोबर तहाची बोलणी करण्याची तयारी दाखवली. त्याचा ताबडतोब फायदा घेऊन मूळचा अहमदनगरचाच एक सरदार मीर मूर्तझाखान याला वाटाघाटीसाठी मुरादने किल्ल्यावर पाठवून दिले. २३ फेब्रुवारी रोजी युद्धविराम झाला. बहादुरला अहमदनगरचा मांडलिक राजा म्हणून मान्यता द्यावी, वऱ्हाड प्रांत मुघलांना द्यावा आणि बादशहाकडे योग्य तो

नजराणा पाठवावा या अटीवर तह होऊन २० मार्च १५९६ रोजी मुघलांचे सैन्य वेढा उठवून वऱ्हाडला गेले.

## चांद सुलताना आपले आसन बळकट करते :

मुघल सैन्य निघून गेल्यावर विजापूर व गोवळकोंड्याची फौज अहमदनगरला येऊन पोहोचली आणि त्यामुळे चांदबिबीची स्थिती खूपच सुधारली. पण विजापूरच्या सुलतान सुहेलखानाबरोबर आलेल्या मिया मंझूने अहंमदचा गादीवरचा हक्क मान्य करावा असा आग्रह धरला. अभंगखानने त्याला अहमदनगरातून बाहेर काढून विजापूरला घालवून दिले. बहादूरला गादीवर बसवून चांदबीबीने महंमदखानला पेशवा नेमले, पण त्याने राज्यावरील आपली सत्ता बळकट करून त्या सत्तेचा दुरुपयोग करण्यास सुरुवात केली. अभंगखान आणि शमशेरखान यांना त्याने कैदेत टाकले; त्यामुळे इतर सरदार घाबरून गेले आणि चांदबिबीला पुन्हा एकदा विजापूरची मदत मागणे भाग पडले. दुसऱ्या अली आदिलशहाने पुन्हा एकदा सुहेलखानला हा तंटा मिटवण्यास पाठवून दिले. त्याने महंमदखानला अहमदनगरमध्ये घेरले. खान–इ–खानानला राज्यावर पुन्हा स्वारी करण्यास महंमदखानाने आमंत्रण दिले होते म्हणून त्याला पकडून चांदबिबीच्या ताब्यात देण्यात आले. यानंतर आपला हबशी सरदार अभंगखान याला पेशवाईची वस्त्रे देऊन राणीने सुहेलखानला विजापूरला परत जाण्याची परवानगी दिली.

## पुनः लढाईला सुरुवात

२० मार्च रोजी मुघल सैन्य अहमदनगर किल्याचा वेढा उठवून परत जाण्यास निघाले. अहमदनगरचे लोक त्यांच्यावर इतके चिडले होते की त्यांनी त्यांच्या मागोमाग जाऊन त्यांच्या सामानसुमानाची लुटालूट केली. आपापसातल्या भांडणामुळे मुघल सैन्याला मागे फिरून त्याचा प्रतिकार करता आला नाही. वऱ्हाडमधील मखर या गावी पोहोचल्यावर ते गाव शत्रूने खाली केल्याचे त्यांना आढळून आले. तेथून एलिचपूरला जाऊन त्यांनी वऱ्हाड प्रांताचा कब्जा घेतला. वऱ्हाडमध्ये पोलिस आणि मुलकी अधिकारी नेमून त्या भागात शांतता प्रस्थापित करण्यासाठी तेथे काही दिवस मुक्काम करण्याचे मुराद आणि खान–इ–खानान यांनी ठरविले. ते या कामात गुंतले असताना अहमदनगरची काही फौज वऱ्हाडमध्ये

घुसली वऱ्हाड मुघलांच्या ताब्यात जाऊ न देण्याचा त्यांचा उद्देश होता. प्रांतात बंडाळी पण माजली, पण तिचा मोड करण्यात आला.

## विजापूर आणि गोवळकोंडा मुघलांविरूद्ध अहमदनगरला येऊन मिळतात

इतके झाल्यानंतर पण अहमदनगरचा वऱ्हाडमधील प्रतिकार थांबला नाही. मुघलांनी त्यांना न दिलेला मुलूख ताब्यात घेतला अशी एक तक्रार होती. तसेच मुघलांबरोबर केलेला तह विजापूरचा सेनानी सुहेलखान याला मान्य नव्हता व पुन्हा लढाई सुरू करण्याचे कारण तो शोधत होता. १७ ऑक्टोबर १५९६ रोजी गोदावरीच्या तीरावर (बाणगंगा) पाथरीपासून १६ मैलांवर निजामशाही सैन्याने मुघलांवर जोराचा हल्ला चढवला आणि सोनपतजवळ दोघांमध्ये घनघोर लढाई झाली. त्यात फार मोठ्या हानीनिशी निजामशाही सैन्याला पराभव पत्करावा लागला आणि खूप मालमत्ता मुघलांच्या हातात पडली. पण यानंतर लवकरच विजापूर आणि गोवळकोंडा यांनी अहमदनगर बरोबर हात मिळवणी केली आणि त्यांचे सेनानी सुहेलखान व महादी कुली सुलतान हे ७०,००० सैन्यानिशी वऱ्हाडमधे घुसले. दक्षिणेतल्या राज्यांपैकी फक्त खानदेश आता मुघलांच्या बाजूला राहिले खान-इ-खानान २०,००० सैन्यानिशी जालना येथे तळ देऊन राहिला होता. त्याला या तिन्ही राजांच्या सैन्याशी सामना देण्याशिवाय गत्यंतर नव्हते. ६ फेब्रुवारी १५९७ रोजी पाथरीपासून २४ मैलांवर असलेल्या अष्टी गावाजवळ दोन्ही सैन्यांत मोठी लढाई झाली पण त्यात कोणालाच विजय प्राप्त झाला नाही. तिन्ही राज्यांची सैन्ये गोदावरी ओलांडून गेली आणि सकाळी ९ ला सुरू झालेली लढाई दिवसभर चालली. मुघलांच्या बाजूने इमानाने लढता लढता खानदेशचा राजा अली खान धारातीर्थी पतन पावला. दुर्दैवाने त्याच्या इमानाबद्दल शंका आल्यामुळे मुघलांनी खानदेशची छावणी लुटली होती. आपली चूक कळून आल्यावर त्यांनी याबद्दल माफी प्रदर्शित केली. पण यामुळे कोणाचेच समाधान झाले नाही आणि यापुढे फरुकी आणि मुघल यांच्या मधील तेढ कधीच मिटली नाही. दुसऱ्या दिवशी लढाईला तोंड लागले; त्यात संयुक्त फौजांचा पराभव झाला, पण अतिशय थकल्यामुळे मुघल सैन्याने त्यांचा पाठलाग केला नाही. सुहेलखानने शहा दुर्गला माघार घेतली आणि इतर कुतुबशाही आणि निजामशाही सरदार घाबरून जाऊन अहमदनगरला आणि हैदराबादला पळून गेले. या दणदणीत विजयानंतर

खान–इ–खानान जालनामध्येच राहिला. नरनाला आणि गावील येथील किल्ले हस्तगत करून घेण्यासाठी त्याने आपल्या सैन्याच्या तुकड्या रवाना केल्या.

## मुरादला दरबारात परत बोलावले जाते:

दक्षिणेतल्या राज्यांनी पराभव पत्करण्याचे नाकबूल केल्यामुळे निरनिराळ्या ठिकाणी दोन्ही सैन्यात अधून मधून चकमकी होत राहिल्या. अहमदनगरवर चालून जाण्याची मुरादची फार इच्छा होती पण खान–इ–खानानच्या विरोधामुळे त्याला हा बेत सोडून द्यावा लागला. आधी वऱ्हाडचा कब्जा घ्यावा असे खान–इ–खानानचे मत होते. इ. स. १५९८ च्या मार्च महिन्यात मिर्झा अल्ली बेग अकबरशाही याने दौलताबादच्या आधीन असलेल्या राहुतारा येथील किल्ला जिंकून घेतला. एक महिन्याच्या वेढ्यानंतर किल्ल्यावरील पाणी संपल्यामुळे तेथील फौज त्याला शरण आली. दक्षिणेतल्या या स्वारीच्या यशावर अकबर फार नाखूष होता. राजपुत्र मुराद व खान–इ–खानान या दोघांनाही त्याने परत बोलावण्याचे ठरवले. एप्रिल महिन्यात सालबहान नावाच्या एका स्वामीनिष्ठ व प्रामाणिक अधिकाऱ्याला दक्षिणेत पाठविण्यात आले. उतावळेपणाने आणि अविचाराने वागलेल्या राजपुत्र मुरादला दरबारात परत घेऊन येण्याचे काम त्याच्यावर सोपवण्यात आले. खान–इ–खानान पण बेमुर्वतखोरपणे परवानगी न घेता आपल्या जहागिरीवर निघून गेला होता. त्याला ताकीद देण्यासाठी रुप खवास या दुसऱ्या अधिकाऱ्याची रवानगी करण्यात आली. दक्षिणेत जाऊन मुरादच्या गैरहजेरीत तेथेल्या सैन्याचा ताबा घेण्याची सूचना त्याला देण्यात आली.

इ. स. १५९८ मध्ये गोदावरीच्या तीरावरील मुंगीपट्टण हा किल्ला मुघलांच्या हातात पडला. त्याच वर्षी ऑक्टोबर महिन्यात वऱ्हाडमधील पुण्याचा प्रसिद्ध डोंगरी किल्ला छोटयाशा वेढ्यानंतर मुघलांच्या हातात पडला. ह्या किल्ल्याच्या तिन्ही बाजूंना नदी असून ती कुठल्याच ऋतूत ओलांडता येत नसे. मुघल सेनानी बहादुर उल-मुल्क याच्या जबरदस्त वेढ्यामुळे किल्ल्यावरील शिबंदीचे फार हाल झाले आणि शेवटी किल्ल्यावरचा दाणागोटा संपत आल्यामुळे किल्लेदार नसीब उल्-मुल्क याने किल्ला मुघलांच्या स्वाधीन केला. यानंतर काही दिवसांनी सालबहान आणि रुप खवास हे लाहोरला दरबारात परत गेले. मुराद दक्षिणेहून परत जायला तयार होता. पण याचवेळी त्याच्या अधिकाऱ्यांत भांडणे सुरू होती. तेव्हा मुराद निघून गेल्यास तेथे अधिकच गोंधळ माजेल असे वाटून काही अधिकाऱ्यांनी त्याला दरबारात परत न जाता

तेथेच राहाण्याचा सल्ला दिला. मी आणि राजपुत्र मुराद लवकरच परत येतो असे खान-इ-खानानने वकीलाला सांगितले. या उत्तराने अकबराला फार राग आला. यानंतर खान-इ-खानान लवकरच दरबारात परत आला. त्याची मुलाखत घेऊन अकबराने त्याला माफी केली.

## अकबर तुराण (ट्रान्स आक्सियाना) वरच्या स्वारीचा बेत रद्द करतो.

पंजाबमध्ये १३ वर्षांहून अधिक काळ वास्तव्य केल्यावर अकबराने आग्र्यास परत जाण्याचे ठरवले आपल्या पूर्वजांची मातृभूमि तुराण जिंकून घेण्यासाठी राजपुत्र सलीमला पाठवण्याचे त्याच्या मनात होते. तुराणचा राजा अब्दुला खान उझबेग याच्या मृत्यूनंतर तेथे यादवीस सुरुवात झाली होती, या संधीचा फायदा घ्यावा असे अकबरास वाटत होते; पण जेव्हा सलीमने हिंदुस्थानाबाहेर जाण्याचे नाकारले, तेव्हा दुसऱ्या एखाद्या मुलाला तिकडे पाठवावे असे त्याला वाटले. पण मुराद अजून परत आला नव्हता व दानियलची वागणूक चांगली नसून अलाहाबाद सोडून तो अगोदरच निघून गेला होता. तेव्हा तुराणच्या स्वारीचा बेत रहित करून आग्र्यामार्गे जाऊन दक्षिणेवर स्वारी करण्याचा त्याने निश्चय केला दक्षिणेत विजय मिळवून मग तुराणकडे चाल करून जावे असा त्याचा विचार होता.

## अकबर आग्र्याला परत येतो

१२ वर्षे लाहोरला वास्तव्य केलेली सरदार मंडळी वायव्य हिंदुस्तानच्या वातावरणात मिसळून गेली होती आणि दक्षिणच्या स्वारीचा विचार त्यांना पसंत नव्हता. पण त्यांच्या विरोधास न जुमानता ६ नोव्हेंबर १५९८ मध्ये अकबर आग्र्यास परत येण्यास निघाला. मरीयम मकानी आणि इतर स्त्रिया लाहोर मध्येच राहिल्या. पंजाबचा कारभार ख्वाजा शमसुद्दिन याच्याकडे सोपवण्यात आला. वाटेत व्यास नदीवर गोविंदवाल येथे अकबराने अर्जुन कुरु या मोठ्या ब्राह्मण राजाचा पाहुणचार स्वीकारला. जानेवारी १५९९ मध्ये जानेवारीच्या सुरवातीस तो आग्र्याला येऊन पोहोचला. राजपुत्र मुरादला दरबारात परत घेऊन येण्यासाठी ५ जानेवारी रोजी त्याने अबुल फझलची दक्षिणेत रवानगी केली. राजपुत्राला घेऊन आग्र्याला परत यावे पण तिथल्या परिस्थितीचा आढावा घेऊन तेथे राहणे आवश्यक वाटल्यास तेथे राहून शहारुख

मिर्झाच्या हाताखाली काम करावे असे त्याला सांगण्यात आले. अकबराजवळ राहून अबुल फझल कुठल्याही माणसाचा मुलाहीजा न ठेवता अकबराला योग्य तो निर्भीट सल्ला देत असे. त्याचे वैषम्य वाटून आपल्याला दक्षिणेत पाठविण्याचा कट दरबारातल्या काही सरदारांनी रचला, असे अबुल फझलला वाटले यातील खरे खोटे काहीही असले, तरी मुरादच्या गैरहजेरीत दक्षिणेकडील स्वारीचे आधिपत्य करण्यासाठी शहारुख मिर्झाची तिकडे रवानगी करण्यात आली व अबुल फझलला त्याच्या हाताखाली पाठविण्यात आले. शक्य तितक्या लवकर दक्षिणेकडे जाण्याचा हुकूम मिर्झाला देण्यात आला.

## दक्षिणकडील मोहिमेची पुढील प्रगती

यावेळी वऱ्हाडमधील अहमदनगरच्या ताब्यात असलेला मुलूख जिंकून घेण्याच्या प्रयत्नात मुराद होता. मीर मुर्तझाच्या हाताखालील एका मुघल तुकडीने गावीलच्या किल्ल्याला वेढा दिला. किल्ल्यावरील सामुग्री संपल्यामुळे वझी उद्दीन आणि विश्वास राय यांनी किल्ला मुघलांच्या ताब्यात दिला आणि ते स्वतः मुरादच्या नोकरीत दाखल झाले. नंतर मुरादने वऱ्हाडमधले मालगड (मूळ ग्रंथातील सैलगड) चा किल्ला आणि जळगाव जिंकले. नंतर नरनाळा आणि मानपूरचे किल्ले पडले. यानंतर दौलताबाद जवळील लोहगड हा किल्ला एक महिन्याच्या वेढ्यानंतर शरण आला. वऱ्हाड आणि गोंडवनच्या हद्दीवरील खेरल्याचा प्रसिद्ध किल्ला जिंकून घेण्यासाठी शेख इब्राहिमची रवानगी करण्यात आली. सुदैवाने हा किल्ला जिंकून घेण्याचे यश त्याला लाभले. किल्ल्यावरील धान्य सामुग्री संपल्यामुळ सय्यद हुसेनने किल्ल्याच्या चाव्या त्याच्या स्वाधीन केल्या. बरेच दिवसांच्या लढाईनंतर नाशिकचा किल्ला पण मुघलांच्या हाती पडला.

## अबुल फझल दक्षिणत येतो :

नाशिकचा किल्ला पडल्यानंतर दुसऱ्या दिवशी अबुलफझल बऱ्हाणपूरजवळ येऊन पोहोचला. खानदेशचा नवा राजा बहादुरखान याने अशीरगडपासून ८ मैलांवर त्याचे स्वागत केले. बादशहाने पाठविलेले फर्मान आणि पोषाख याचा आदराने स्वीकार करून आपल्याजवळ काही दिवस राहण्याची विनंती त्याने अबुल फझलला केली. ती नाकारून अबुल फझल दुसऱ्या दिवशी बऱ्हाणपूरला जाण्यास निघाला. तो तापी नदी ओलांडून गेल्यावर बहादुरखानने पुन्हा

त्याची भेट घेतली. दक्षिणेतल्या लढाईसंबंधी त्याने दाखवलेल्या बेपर्वाईबद्दल अबुल फझलने त्याची कानउघाडणी केली. आपण स्वत: युद्धात हजर राहू शकत नाही याबद्दल अनेक सबबी पुढे करून बहादुरखानने आपला मुलगा कबीरखान याची २००० घोडदलासह दक्षिणेकडे रवानगी केली. यामुळे रागावून जाऊन अबुल फझलने त्याचा पाहुचार घेण्याचे किंवा त्याने पाठविलेला नजराणा स्वीकारण्याचे नाकारले.

## मुरादचा मृत्यू :

अहमदनगरच्या अयशस्वी स्वारीमुळे मुरादच्या कीर्तीला कलंक लागला व त्याची प्रकृती ढासळली. अहमदनगरचा वेढा उठवून माघार घ्यावी लागली याचे त्याला फार दु:ख झाले. त्याचा मुलगा सुलतान रुस्तम हा १५५८ मध्ये मरण पावला. तेव्हापासून आपल्या काही मूर्ख सहकाऱ्यांच्या नादाने त्याने दारु पिण्यास सुरुवात केली होती. "दारुबाजीच्या अतिरेकामुळे त्याला झटके येऊ लागले; पण प्रकृती सुधारण्यासाठी त्याने काहीच प्रयत्न केले नाहीत. त्याला अन्न पचेनासे झाले पण त्याने आपले दुखणे सर्वांपासून लपवून ठेवले." अहमदनगरहून माघार घेतल्यावर तो प्रथम गावीलला आणि नंतर एलिचपूरला गेला. अतिश्रमांमुळे आणि काळजीमुळे तेथे तो आजारी पडला. असे असूनसुद्धा स्वारीचा बेत रहित न करता आजारी असतानाच तो नरनाळचावर चालून गेला. याचा परिणाम म्हणजे "त्याच्या पोटातले दुखणे वाढले व त्याचे शरीर व विचारशक्ती दोन्ही क्षीण झाल्या." म्हणून तो शहापूरला परत आला आणि मग तेथे त्याच्यावर वैद्यकीय इलाज सुरू झाले. त्यामुळे मुरादच्या प्रकृतीत थोडीशी सुधारणा झाली, पण अकबर आग्र्याला आला आहे व त्याने आपल्याला दक्षिणेतून परत बोलावले आहे, हे ऐकून तो परत आजारी पडला व दु:खी झाला. दारूचे व्यसन आणि अहमदनगरच्या स्वारीत आलेल्या अपयशामुळे कीर्तीला लागलेला कलंक धुवून काढण्यापूर्वी दरबारात परत जाण्याची त्याची इच्छा नव्हती. इतक्यात अबुल फझल बऱ्हाणपूरला आला आहे, अशी बातमी त्याला मिळाली. ती ऐकून अहमदनगरला वेढा देण्यासाठी तो पुन्हा निघाला. या स्वारीत त्याचा मुख्य हेतू आग्र्याला न जाण्याचा होता, असे अबुल फझल म्हणतो. "दौलताबादपासून २० कोसांवर पूर्वेच्या तीरावरील दिहारी (दिहबारी) येथे त्याला पुन्हा झटके येण्यास सुरुवात झाली. २ मे १५९९ रोजी बेशुद्धावस्थेत असतानाच तो मरण पावला." मुराद आजारी आहे असे

कळताच अकबराने हकीम मिश्रीला ताबडतोब दक्षिणेकडे पाठवून दिले पण तो तेथे पोचेपर्यंत सर्व कारभार आटोपला होता. त्याच्या मृत्यूमुळे बादशहाला फार दु:ख झाले; पण त्याने शांत चित्ताने मुलाच्या मृत्यूची बातमी ऐकून घेतली.

मुराद हा मोठा हुशार, कर्तबगार राजपुत्र होता. तो अभ्यासातही तरबेज असून चांगल्या शिष्याला आवश्यक असणारे सर्व गुण त्याच्यात लहानपणीच दिसून आले होते. त्याच्या पूर्ववयातला शिक्षक मॉनसेराट याने त्याची खूप स्तुति केली आहे (१५८२–८३). पण लाहोरला निघालेल्या तिसऱ्या ख्रिस्ती शिष्टमंडळाचे सभासद त्याला गुजराथमध्ये भेटले. त्यांचे मत मुरादविषयी विशेष चांगले झालेले दिसत नाही. सुसंस्कृत असला तरी घमेंडखोर आणि शिकारीशिवाय दुसऱ्या कशातहि लक्ष न घालणारा, असे मुरादबद्दल त्यांचे मत होते. लोकांशी जमवून घेण्याची कला त्याच्यात नसल्यामुळे आपल्या अधिकाऱ्यांशी व सहकाऱ्यांशी त्याचे पटत नसे. मिळालेल्या संधीचा योग्य उपयोग न केल्यामुळे कुशल सेनानी किंवा कारभारी म्हणून मुराद कधीच प्रसिद्धी पावला नाही. सर्व गोष्टींची माहिती असणारा हुशार राजपुत्र होण्याचे पण त्याला जमले नाही.

## अबुल फझलची दक्षिणेतील कामगिरी :

अबुल फझल दक्षिणेत आल्यावर आपल्या डोळ्यांदेखत राजपुत्र मरणार हे त्याला दिसून आले. सगळीकडे गोंधळ माजला असून सैन्यातले पुष्कळ लोक—खास करून तुराणी—पळून जाऊ लागले होते. अबुल फझलने राजपुत्राचे शव मूठमाती देण्यासाठी शहापूरला पाठवून दिले. अनेक अडचणींना तोंड देऊन व पैसे वगैरे देऊन त्याने सैन्यात पुन: हुरूप निर्माण केला. मे १५९५ मध्ये अहमदनगरवर चालून जाऊन तेथील किल्ल्याला वेढा देण्याची तजवीज त्याने केली. थोड्याच दिवसांनंतर तालतमचा किल्ला जिंकून घेण्यासाठी पाठवलेल्या सुंदरदासने तो किल्ला जिंकून घेतला.

## दक्षिणेकडे दानियलची नेमणूक : मध्यंतरीच्या काळातील अबुल फझलची कामगिरी :

मुरादच्या मृत्यूचे वर्तमान आग्र्याला येताच अकबराने सलीमला दक्षिणेकडे पाठवण्याचे ठरवले. पण वाईट लोकांच्या नादी लागलेला राजपुत्र सलीम ऐनवेळी गैरहजर राहिला; म्हणून या कामगिरीवर दानियलला पाठवणे

बादशहाला भाग पडले. खास बादशहासाठी वापरण्यात येणारा लाल तंबू वापरण्याची त्याला परवानगी देण्यात आली. तसेच अबुल फझलने दक्षिणेमध्ये राहून त्याचा सल्लागार म्हणून काम पाहावे अशी सूचना बादशहाने पाठविली. दानियल येईपर्यंत अबुल फझलने सैन्याला स्थिरस्थावर करून त्या प्रांताचे रक्षण केले आणि मुरादच्या हातातून सुटलेली दक्षिणेकडील काही स्थळे जिंकून घेतली. इतक्यात शहारुख मिर्झा दक्षिणेच्या सैन्याला येऊन मिळाला. त्याच्याशी वाटाघाटी करून त्याचे सहकार्य मिळविण्यासाठी अबुल फझलने त्याची भेट घेतली. अहमदनगरच्या पूर्वेस असलेला विजयगडचा किल्ला आणि त्या भोवतालचा मोठा प्रदेश मुघलांच्या हातातून जाऊ नये याबद्दल योग्य ती पावले टाकली गेली. मुरादच्या मृत्यूपूर्वी एक महिना शेर खाजाच्या हाताखालील मुघल सैन्याने या किल्ल्याचा ताबा घेतला होता. राजपुत्राच्या मृत्यूनंतर शिबंदीचा जोर कमी झाला आणि किल्ला सोडून देऊन मुघल सैन्याला परत जाऊन मिळण्याची त्याने तयारी केली. या राजद्रोही हालचाली बंद पाडून किल्ला मुघलांच्या ताब्यात ठेवण्याचे अटोकाट प्रयत्न अबुल फझलने केले. समजूतदारपणे आणि हुशारीने वागून त्याने या कामात यश मिळविले. या किल्ल्यावरच्या शिबंदीची स्थिती अत्यंत हलाखीची होती. त्यांचे घोडे छपरावरचे गवत खाऊन जगत होते आणि त्या घोड्यांवर सैन्याची उपजीविका चालू होती. सुदैवाने अकबराने गुजराथमधून पाठविलेला खजिना वेळेवर येऊन पोहोचला आणि त्यामुळे मुघल सैन्याचे हाल संपले.

## अकबर स्वतः दक्षिणेकडे कूच करतो :

प्रवासातली दानियलची दिरंगाई पाहून अकबर शिकारीसाठी माळव्यात जाण्याचा बहाणा करून निघाला. पण त्याचा मुख्य हेतु दानियलला अधिक कार्यप्रवण करण्याचा होता. आपल्या गैरहजेरात कुलीजखानकडे सर्व कारभार सोपवून १६ सप्टेंबर १५९९ रोजी त्याने आग्रा सोडले. खुस्त्रु, परवीझ आणि खुर्रम हे यावेळी त्याच्याबरोबर होते. मेवाडच्या पूर्वेकडील प्रदेश मुघलांकडून परत मिळवण्याच्या प्रयत्नात राणा अमरसिंग होता. त्याच्या पारिपत्यासाठी जाण्याचा हुकूम याच दिवशी सलीमला देण्यात आला. सलीमबरोबर मानसिंगला

पाठविण्यात आले आणि आपल्या बापाचा प्रतिनिधी म्हणून का पाहाण्यासाठी जगत्सिंगची बंगालकडे रवानगी झाली. खान-इ-खानानल दक्षिणेत दानियलला जाऊन मिळण्याचा हुकूम सुटला. याचवेळी एक दुर्दैव घटना घडली. बंगालला जाण्याच्या तयारी असलेला जगत्सिंग वाटेत आग्र्याल मरण पावला; त्यामुळे साऱ्या कछवा जमातीला फार दुःख झाले. अकबरालाह या गोष्टीचे फार वाईट वाटले. मानसिंगकडे त्याने सांत्वनपर निरोप पाठवल आणि त्याचे समाधान करण्यासांठी एक घोडा व मानाची वस्त्रे पण त्याला दिली.

## चांदबिबीच्या अबुल फझलशी वाटाघाटीं :

दक्षिणेकडील स्वारीचे काम रेंगाळत चालले होते. वऱ्हाडमधील नरनाळ आणि तालतमचे किल्ले विशेष प्रतिकार न होता बादशहाच्या हातात पडले, ह सांगितलेच आहे. कुतलुखानच्या मुलांनी ते सुंदरदासच्या ताब्यात दिले आणि त्यामुळे बादशहाच्या छावणीत आनंदाचे वातावरण पसरले. या किल्ल्यावरील फौजांना बादशहाच्या नोकरीत दाखल करून घेण्यात आले. याच सुमारास अबुल फझल अहमदनगरला जाण्यास निघाला. बऱ्हाण-उल्-मुल्कचा नातू राज बहादूरच्या नावाने चांदबिबी अहमदनगरचा कारभार तेव्हा पाहात होती किल्ल्यावरील बहुतेक सर्व फौज तिच्या बाजूची होती, पण बाहेरचे काही लोक आणि सैन्यातला शिद्दी अधिकारी अभंगखान याच्या हाताखालची फौज तिच्य विरुद्ध असून तिला त्रास देत होती. एका बाजूने मुघलांशी वाटाघाटी चाल ठेवून दुसऱ्या बाजूने चांदबिबीने विजापूर आणि गोवळकोंड्याकडून मदत मागवली. मुरादच्या मृत्यूबद्दल तिने पाठविलेला दुखवट्याचा संदेश आणि स्वतःच्या अडचणी सांगणारे पत्र २४ मे १५९९ रोजी अबुल फझलच्या हातात पडले. दिलेली वचने पाळण्याची तयारी नसल्यास वाटाघाटींना काहीच अर्थ नाही, असे अबुल फझलने तिला कळवले आणि अकबराला तिने शरण यावे असा सल्ला पण तिला त्याच वेळी दिला. किल्ल्यावरील लष्करातल्या लोकां-बरोबर तिचे जमेनासे झाले होते आणि अभंगखानचे पारिपत्य केल्यावर मी किल्ल्याच्या चाव्या स्वाधीन करते अशा अर्थाचा आपल्या शपथेवर तयार केलेला तहाचा मसुदा तिने अबुल फझलकडे पाठवून दिला. बिरागडचा किल्ला

आणि त्या भोवतालचा प्रांत स्वतःच्या नावे करून द्यावा अशी दुसरी पण अट त्यात होती. तहाचा मसुदा मान्य होऊन त्यावर सह्या झाल्यास राजा बहादुरला अकबराच्या भेटीसाठी पाठविण्याचे पण तिने मान्य केले.

## वऱ्हाड पुनः एकदा मुघलांच्या हातात :

राजपुत्र दानियल अहमदनगरला योग्य वेळी न पोहोचल्यामुळे अबुल फझल तेथेच खोळंबून राहिला. दानियल येण्यापूर्वी किल्ल्याला वेढा देणे त्याला योग्य वाटले नाही. त्याचा फायदा घेऊन अभंगखानने वऱ्हाड जिंकून घेण्याची तयारी केली. तिथला जुना सुभेदार, समशेर उल् मुल्क याची त्याने कैदेतून मुक्तता केली व त्याच्या हाताखाली फौज देऊन दौलताबादहून वऱ्हाडच्या स्वारीवर त्याची रवानगी केली. यावेळी बादशहाच्या अधिकाऱ्याच्या कुटुंबातली मंडळी वऱ्हाडमध्ये होती. या बातमीमुळे हे लोक अस्वस्थ झाले. म्हणून त्यांच्या रक्षणासाठी अबुल फझलने मिर्झा युसुफ खानला तिकडे पाठवून दिले. पण त्याच्या दिरंगाईमुळे शमसेर उल् मुल्कचे फावले आणि तो वऱ्हाडमध्ये घुसताच बादशहाच्या बाजूचे तिथले पुष्कळ लोक पळून गेले. शत्रूला शह देण्यासाठी अबुल फझल अहमदनगरवर चालून गेला. याचा योग्य तो परिणाम होऊन वऱ्हाडमधील आणि इतर दूर दूर ठिकाणी पसरलेले अहमदनगरचे सैन्य राजधानीच्या रक्षणासाठी धावून आले. थोड्याशा सैन्यानिशी एकाकी पडलेल्या समसेर–उल्–मुल्कचा सहज पराभव करून त्याला नंतर ठार मारण्यात आले. तो एलिचपूरवर चाल करून जात असता मिर्झा युसुफ खानने आपली फौज त्याविरुद्ध पाठविली; त्यामुळे घाबरून जाऊन शमसेर–उल्–मुल्क पळून गेला. त्याचा पाठलाग करून एका रात्री त्याच्यावर अचानक हल्ला करण्यात आला. नंतर झालेल्या लढाईत तो मारला गेला.

## दानियलचा अहमदनगरकडे मोर्चा :

दरम्यान दानियल अहमदनगरच्या वाटेवर येऊन पोहोचला होता. मी हजर होईपर्यंत किल्ल्यावर चाल करून जाऊ नये असे त्याने अबुल फझलला कळवले. अहमदनगर जिंकल्याचे श्रेय अबुल फझलला मिळू नये असा त्यात हेतू होता. दानियलचा हुकूम मान्य करून गोदावरीवरील मोंगीपट्टम् या गावावरून अबुल फझल परत फिरला. दरम्यान दानियल बऱ्हाणपूरला पोहोचला होता. खानदेशचा राजा बहादुरखान त्याच्या स्वागतासाठी हजर झाला नाही म्हणून त्याचे

पारिपत्य करण्यासाठी तिकडे सैन्य पाठविण्याची राजपुत्राने तयारी केली. त्याच-वेळी अहमदनगरचा प्रसिद्ध सेनानी अभंगखान याच्यावर हल्ला चढवून बादशाही फौजांनी त्याला पराभूत केले व आपला जीव वाचवण्यासाठी अभंगखान पळून गेला.

## नाशिकवर ताबा :

नाशिक मुघलांनी जिंकून घेतले होते आणि तिथला सुभेदार सादतखान मुघलांना शरण आला होता; पण त्याचा दुय्यम अधिकारी राजू याने आपल्या सैन्याच्या व अधिकाऱ्यांच्या मदतीने आजूबाजूचा प्रदेश आपल्याच ताब्यात ठेवला होता. त्याला हाकून देण्यासाठी दानियलने ५००० घोडेस्वारांनिशी दौलतखानची रवानगी केली. राजूचा पराभव झाला आणि सादतखान, फरादखान, सुजातखान, शर्झाखान, अब्दुस सत्तर असे अनेक दक्षिणी आणि सिद्दी अधिकारी बादशाही पक्षाला मिळाले. आपल्या काही सल्लागारांच्या सांगण्यावरून यांच्यातल्या काही-जणांच्या प्रामाणिकपणाबद्दल राजपुत्राच्या मनात शंका आली व त्याने त्यांना कैद केले. हे पाहून फरादखान आणि दुसरे काही दक्षिणी अधिकारी राज-पुत्राच्या छावणीतून पळून गेले. दिलेली वचने राजपुत्र पाळत नाही असा आवाज उठला आणि बादशहाला येऊन मिळण्यास उत्सुक असलेले दक्षिणेतील पुष्कळ सरदार अर्ध्या वाटेतूनच परत गेले.

## नाशिक मुघलांच्या हातातून जाते :

याच सुमारास नाशिकचा किल्ला मुघलांच्या हातातून गेला. अहमद-नगरचा वेढा चालू असताना विजापूरचे सैन्य त्यांच्या मदतीला येत आहे अशी बातमी आली. त्यामुळे नाशिकची फौज अहमदनगरला बोलावून घेण्यात आली आणि पुरेशा सैन्याच्या अभावी तो बळकट किल्ला पुन: शत्रूच्या हातात गेला.

## अहमदनगरचा पाडाव

अहमदनगरला वेढा दिलेल्या मुघल सैन्याजवळ पुरेसा दाणागोटा नसल्या-मुळे आणि पुष्कळ लोक असंतुष्ट असल्यामुळे दानियलने अधिक रसद आणि फौज पाठवण्याची मागणी केली. त्याप्रमाणे मिर्झा रुस्तुमच्या हाताखाली एक

मोठे सन्य रवाना करण्यात आले. मिर्झा रुस्तुमबरोबर बाजबहादुर, खान कुली, रहीम दाद, पायंडा बेग आणि इतर सेनानी होते. सैन्याच्या खर्चासाठी एक लाख सोन्याची नाणी देण्यात आली होती. या मदतीचा फायदा घेऊन बादशहाच्या फौजांनी लालांगचा किल्ला जिंकला. तिथली फौज शरण आली. आणि मलीक शेर आणि इतर काही खानदेशमधल्या अधिकाऱ्यांना घेऊन फते उल्ला दरबारात दाखल झाला.

अहमदनगरचा प्रतिकार इतका जबरदस्त होता की, काही वेळ बचावाचे धोरण स्वीकारून पावसाळा संपल्यावर किल्ला हस्तगत करण्याचा प्रयत्न करावा असे दानियल आणि त्याच्या बरोबरच्या लोकांना वाटले; पण वेढा शक्य तितका बळकट करून किल्ला लवकरात लवकर जिंकून घ्यावा असे त्यांना अकबराने फर्मावले आणि त्यांना धीर देण्यासाठी मोठ्या सैन्यानिशी तो स्वतः बऱ्हाणपूरला आला. हे पाहून चांदबिबीने पुनः तहाची बोलणी सुरू केली आणि अबुल फझलला सादर केलेल्या पहिल्याच अटी पुन: पुढे केल्या; पण अभंगखानाने किल्ला लढविण्याची तयारी केली. त्याचाही धीर अखेरीस सुटला आणि ५ एप्रिल १६०० रोजी अहमदनगरकडे जाणारा चितोडच्या खिंडीतला मार्ग मोकळा करून त्याने लढाई न करताच आपल्या सैन्याला रजा दिली. सैन्यात भांडणे सुरू झाल्याने तो जानीरला पळून गेला. दुसऱ्या दिवशी सकाळी बादशाही फौजा खिंडीच्या मार्गाने खाली उतरल्या आणि अहमदनगरजवळ त्यांनी तळ दिला. १२ एप्रिल रोजी तोफखान्याची वाटणी करण्यात आली. काही तोफा खुद्द राजपुत्र दानियलच्या हाताखाली, काही शहारुख मिर्झाकडे आणि राहिलेल्या खान खानान, मिर्झा युसुफ खान, मीर मुर्तझा, जगन्नाथ, शेर ख्वाजा, मीर अली बेग, ख्वाजा बेग आणि मिर्झा इफ्तीखार खान इत्यादि प्रमुख अधिकाऱ्यांमध्ये वाटून देण्यात आल्या. सर्वांनी आपापल्या जागा धरून किल्याला सर्व बाजूंनी वेढा दिला. अशा तऱ्हेने धोक्यात आलेल्या चांदबिबीने पुन: एकदा तहाची बोलणी सुरू केली. पण किल्यावरचे काही लोक याच्या अगदी विरुद्ध होते. ३ जुलै १६०० रोजी किल्यावरच्या विरोधी आणि प्रबळ गटाने जिताखान नावाच्या एका वजनदार खोजाच्या हस्ते चांदबिबीचा खून करवला. पुन: लढाईला सुरुवात करून त्यांनी बादशाही फौजांवर गोळीबार सुरू केला. वेढा घातलेल्या सैन्यावर त्यांनी पुष्कळ निकराचे हल्ले चढविले पण ते यशस्वी न झाल्याने त्यांना किल्ल्यात परत यावे लागले. किल्याबाहेरील उतारावर (खाकरीज) जाण्याचा प्रयत्न वेढा घालणाऱ्या फौजेने केला. ९० ते १२० फूट रुंद आणि २१ फूट खोल असलेला खंदक त्यांनी भरून काढला आणि ८१ फूट उंच असलेल्या दगडी तटबंदीपर्यन्त ते येऊन पोचले. दानियल आणि मिर्झाच्या

तोफखान्याने किल्यावर सतत मारा सुरू ठेवला. पुष्कळ ठिकाणी सुरुंग लावण्यात आले. पण किल्यावरच्या लोकांनी ते शोधून काढून भरून टाकले "आश्चर्याची गोष्ट म्हणजे त्यांनी किल्याच्या आतून एक भोक पाडून एका सुरूंगाला आग लावून दिली. पण किल्याबाहेरील उतारावर येईपर्यंत ती आग विझून गेली. आणि नंतर झालेल्या स्फोटामुळे किल्यावरील एका बुरूजाला तडा गेल्या.' हे आढळून येताच किल्यावरील लोकांनी तो सुरूंग उखडून टाकण्याचा प्रयत्न केला, पण बुरूजाला गेलेला तडा बाहेरच्या बाजूला असल्याने त्यात त्यांना यश आले नाही. १८० मणांची दारू सुरूंगात घालून १८ ऑगस्ट १६०० रोजी सकाळी न्याहारीच्या वेळी तिला आग लावण्यात आली. त्यामुळे लैला नावाचा मनोरा आणि आजुबाजूची ९० फुटांची तटबंदी कोसळून पडली. किल्यावरील अनेक लोक त्याखाली चिरडून मेले. पण वेढा दिलेल्या सैन्याचे त्यामुळे काही नुकसान झाले नाही. मिर्झा युसुफखानच्या तोफखान्या समोरील भगदाडातून किल्यात प्रवेश करून बादशाही सैन्याने शिबंदीचे १५०० लोक मारून टाकले (१९ ऑगस्ट). राजा बहादुरला केद करून त्याची, राहिलेला काळ कंठण्यासाठी, ग्वाल्हेरच्या किल्यात रवानगी करण्यात आली, 'अनेक मौल्यवान रत्ने, कलावतूचे काम असलेले कापडचोपड, एक उत्कृष्ट ग्रंथालय अशा अनेक गोष्टी आणि २५ हत्ती बादशाही फौजेला मिळाले. तोफा आणि दारूगोळा किती मिळाला त्याची गणतीच नाही.' ४ महिने आणि ४ दिवसांच्या वेढ्यानंतर मुघलांनी हा किल्ला घेतला. या प्रचंड विजयाची बातमी अकबराला दोन दिवसांनी मिळाली आणि तेथे आनंदी आनंद झाला नंतर लवकरच बादशाही फौजांनी पुण्याच्या उत्तरेस ५६ मैलांवर असलेले जुन्नर जिंकून घेतले. तेथे बीर नावाचा एक किल्ला होता. नंतर शिवाजीचा जेथे जन्म झाला तोच हा शिवनेरी किल्ला असावा. ही अहमदनगरच्या राज्याची पहिली राजधानी होती, पण गाव आणि किल्ला काहीहि प्रतिकार न होता मुघलांच्या हातात पडला.

### अकबर ब्ऱ्हाणपूरला जातो :

सप्टेंबर १५९९ मध्ये अकबर दक्षिणेकडे निघाला, याचा उल्लेख पूर्वी आलाच आहे. माळव्यात काही दिवस थांबून दानियल आणि त्याच्या बरोबरच्या सरदारांना अहमदनगर जिंकून घेण्यास वेळ द्यावा असा त्याचा विचार होता. एवढ्यात खानदेशचा राजा बहादूर याने दानियलचा योग्य तो सन्मान

केला नाही म्हणून दानियल खानदेशची राजधानी बऱ्हाणपूर यावर हल्ला करण्याच्या विचारात आहे अशी बातमी आली. तेव्हा खानदेशात वेळ न घालवता तावडतोब अहमदनगरला जावे असे बादशहाने दानियला कळवले. यात राजपुत्राचा मुद्दाम अपमान करण्याचा बहादुरचा हेतू नसून प्रथम बादशहाचे स्वागत करून मग राजपुत्राला भेटण्याचे त्याच्या मनात असावे असा अकबराचा तर्क होता. एकंदर प्रकाराची चौकशी करून त्यातले खरेखोटे समजून घ्यावे असे त्याने ठरवले. यासाठी बादशहा बऱ्हाणपूरला जाण्यास निघाला. दरम्यान बहादुरने आपला मुलगा कबीरखान याच्याबरोबर नजराणा देऊन त्याला दानियलच्या भेटीस पाठवले. बहादुरचे मन वळवण्यासाठी अकबराने एकामागून एक तीन वकील पाठवले. पण खोटया सबबी पुढे करून तो बादशहाच्या भेटीस येईना. सामान्य प्रतीचे चार हत्ती त्याने बादशहाला भेट म्हणून पाठवून दिले त्याचाहि बादशहाला फार राग आला. बहादूरचा बाप राजा अलीखान हा बादशाही फौजांबरोबर मुघलांच्या बाजूने लढता लढता मरण पावला होता; यामुळे बहादुरबद्दल अकबराला विशेष आपलेपणा वाटत असे. म्हणून बहादुरने पाठवलेल्या उडवाउडवीच्या उत्तराकडे त्याने दुर्लक्ष केले होते, पण आता बहादूरच्या राज्याजवळ अकबर येऊन पोचला तरीसुद्धा बहादुर राजधानी सोडून त्याला सामोरा गेला नाही. यामुळे अतिशय चिडून जाऊन दीपालपूर आणि धारच्या मार्गे अकबर बऱ्हाणपूरवर चालून गेला. फेब्रुवारी १६०० मध्ये अशीरगडला वेढा देण्यासाठी त्याने आपले अनेक अधिकारी आणि मोठे सैन्य पाठवून दिले. मार्चच्या सुरूवातीला त्याने नर्मदा ओलांडली आणि पारशी नवरोजच्या दिवशी (मार्च १०) विजागड येथे आपली छावणी दिली.

## अकबर अशीरगडच्या किल्याला वेढा देण्याचा हुकूम देतो :

बहादूरला आपली चूक सुधारण्याची पुन्हा एकदा संधी देण्याचे उदार धोरण अकबराने ठरवले. माफीची खातरजमा करून देऊन बऱ्हाणपूराहून बहादूरशहाला दरबारात घेऊन येण्यासाठी त्याने अबुल फझलला पाठवून दिले. तसेच आपल्या सैन्याचे आधिपत्य शहारुख मिर्झाकडे देऊन स्वतः बादशहाच्या दिमतीस यावे असे त्याने अबुल फझलला कळवले. २० मार्च रोजी आहुतारा येथे दानियलची मुलाखत घेऊन अबुल फझल बिजागडजवळ अकबराकडे आला. बहादुर बऱ्हाणपूरच्या बाहेर येऊन आपल्याला भेटला होता आणि अकबराच्या दरबारात हजर राहण्याचे पण त्याने कबूल केले होते, पण अशीरगडच्या अभेद्य

किल्ल्यावर पोचताच त्याने आपले वचन मोडले, अशी हकीगत अबुल फझलने बादशहाला सांगितली. तेव्हा पुन्हा प्रवास सुरू करून ३१ मार्च रोजी अकबर बऱ्हाणपुरला आला. अशीरगडला वेढा देऊन चारी बाजूंनी किल्यावर तोफा डागण्यासाठी दुसऱ्या दिवशी खान–इ–आझम, आश्रफखान, शेख फरीद आणि अबुल फझल यांची रवानगी करण्यात आली. खानदेशवर पहारा ठेऊन दळण-वळणाचे मार्ग खुले ठेवण्याचे काम अबुल फझलकडे सोपवण्यात आले. त्यानुसार खानदेशचा ताबा घेऊन तेथे अब्बुल फझलने २२ लष्करी ठाणी उभी केली. यामुळे बंडखोरांचे पारिपत्य होऊन प्रांतात शांतता प्रस्थापित झाली.

## अशीरगडचा किल्ला

अशीरगडचा प्रसिद्ध किल्ला सातपुडा पर्वत–श्रेणीच्या एका टोकावर बांधलेला आहे. समुद्रसपाटीपासून त्याची उंची २३०० फूट आणि जमिनीच्या पृष्ठभागापासून ९०० फूट आहे. त्यामुळे हा किल्ला अतिशय मजबूत आणि अभेद्य समजला जात असे. बऱ्हाणपूरच्या उत्तरेस १२ मैलांवर दक्षिणेला जाणाऱ्या हमरस्त्यावर हा किल्ला आहे. मुख्य किल्ल्याभोवती तीन छोटे मजबूत किल्ले आणि तटबंदीने बांधून काढलेल्या दोन टेकड्या आहेत. माळी आणि अंतारी किंवा जुना माळी हे दोन किल्ले पश्चिमेस उत्तरेच्या बाजूने झुकलेले असून कोशी आणि कमळगडचे किल्ले त्याच्या ईशान्येस आहेत. या चारी किल्ल्यांनी वेढलेला असल्यामुळे प्रथम ते किल्ले जिंकून घेतल्याशिवाय अशीर-गडचा मुख्य किल्ला हातात पडणे अशक्य होते. किल्ल्याच्या दक्षिणेस कोहरी नावाची प्रचंड टेकडी आणि नैऋत्येस सापन नावाची टेकडी आहे. पूर्वेकडून नैऋत्येकडे जाणाऱ्या किल्ल्याच्या मध्यभागाभोवती छोटया छोटया टेकड्या असून त्याचा घेर जवळ जवळ १५ मैल होता. या भागात सर्वत्र तोफा डाग-लेल्या असून त्यांच्या रक्षणासाठी गोलंदाज नेमलेले होते. १६ व्या शतकात हा किल्ला कसा होता याचे वर्णन वेढयाच्या वेळी प्रत्यक्ष हजर असलेला इतिहास-कार फैजी सरहिंदी याच्या लिखाणात सापडते. तो म्हणतो, "हा किल्ला एका उंच, कठीण टेकडीवर बांधलेला असून भोवतालच्या तीन छोटया टेकड्यांवर तीन किल्ले आहेत. चंद्राभोवती पसरलेल्या वलयासारखे ते दिसतात. किल्ल्यात प्रवेश करण्याच्या आणि तेथून बाहेर पडण्याच्या वाटा सापडणे फार मुष्किल आहे. त्याच्यावर दुरून मारा करता येईल अशी दुसरी उंच टेकडी त्याच्या समोर नाही आणि जाण्याला रस्ता पण नाही. किल्ल्याखालची सर्व जागा सपाट

व ओसाड असल्यामुळे तेथे झाडी किंवा जंगलाचा आसरा घेण्याची सोय नाही. या किल्ल्याला एक दरवाजा असून दरवाजाच्या बाहेर कमरगड नावाचा दुसरा एक किल्ला आहे. या किल्ल्याच्या भिंती दोन्ही बाजूंनी मुख्य किल्ल्याला जोडलेल्या आहेत. हा किल्ल्याचा बाहेरचा कोट समजला जात असे आणि त्याच्या रक्षणासाठी कनिष्ठ प्रतीची फौज म्हणजे तिरंदाज आणि बरकंदाज यांची नेमणूक केलेली होती. किल्ल्याच्या खाली, पण एका उंच जागेवर, माळीगड नावाचा आणखी एक मजबूत किल्ला आहे. किल्यावरून पाहिले असता हा अगदी जमिनीच्या तळाशी आहे असे वाटते. पण खालून पाहिले असता आकाशात तो अर्धाअधिक उंच गेलेला दिसतो. एकंदर संरक्षण व्यवस्थेतील हा अगदी कडेचा किल्ला असल्यामुळे तोफा व इतर साधने ठेवून त्याच्या रक्षणाची खास सोय केलेली होती. या किल्ल्याखालीच एखाद्या शहराएवढी मोठी अशी तखती नावाची वस्ती होती. थोडक्यात सांगावयाचे म्हणजे हा किल्ला म्हणजे जगातील एक विस्मयजनक गोष्ट आहे आणि तो प्रत्यक्ष पाहिल्याखेरीज कोणालाही त्याची यथार्थ कल्पना येणे शक्य नाही."

किल्ल्याच्या टोकावर ६० एकरांचे मोठे पठार असून त्यात गोड्या पाण्याचे अनेक तलाव होते. किल्ल्यावर १३०० तोफा आणि अर्ध्या शेरापासून २ मण वजनापर्यंत तोफांचे अगणित गोळे पण होते. किल्ल्यावर भरपूर दाणागोटा, तेल-पाणी व इतर उपयोगी वस्तू होत्या. किल्ल्याचा वेढा पुष्कळ दिवस चालणार हे जाणून राजा बहादुरने किल्ल्यावर एक लाख लोक आणि कोंबड्यांसकट सर्व तऱ्हेचे प्राणी जमा केले होते. किल्ल्यावर गरजेच्या वस्तूंचा किती प्रचंड साठा होता याची कल्पना फैजी सरहिंदी उल्लेखावरून येते. तो म्हणतो की वेढा संपल्यावर किल्यात धान्य, तेल आणि इतर जरुरीच्या वस्तूंचा साठा जशाचा तसाच सापडला. वेढ्यानंतरहि किल्यावर सुरवाती इतकाच पाणीपुरवठा होता.

## अशीरगडचा वेढा

वेढ्याच्या कामात उपयोगी पडणारा मोठा तोफखाना अकबराजवळ नव्हता आणि वेढ्यात उपयोगी पडणारे इतर साहित्य त्याने आणले नव्हते. कारण नेहमी मैत्री दाखवणारा खानदेशचा राजा आपल्यावर उलटेल अशी कल्पना त्याला नव्हती. अशा वेळी नरनाळा, गावी आणि अहमदाबाद येथून मिळतील त्या तोफा आणण्याची व्यवस्था करण्यात आली, पण त्या सर्व कमी पल्ल्याच्या असून या वेढ्यात फारशा उपयोगी पडण्यासारख्या नव्हत्या. सन

१६०० मध्ये फेब्रुवारीच्या अखेरीस आणि मार्चच्या सुरूवातीला मुघलांनी किल्ल्याला वेढा दिला. खान–इ–आझम, असफखान, साम्राज्याच्या बक्षी फरीद बुखारी आणि ठठ्ठ्याचा मिर्झा जानी बेग यांच्या हाताखाली प्रमुख तोफा होत्या.

## सापन आणि माळीगड मुघलांच्या हातात पडतात

वेढ्याचे काम कित्येक महिने चालू होते. मोठ्या तोफा हाताशी नसल्या-मुळे या वेढ्याला केवळ नाकेबंदीचे स्वरूप आले. सर्व तऱ्हेचे प्रयत्न करूनहि किल्ला मुघलांच्या हातात येईना. किल्ल्याभोवतालच्या प्रदेशात तिथल्या विशिष्ट परिस्थितीमुळे सुरुंग लावणे किंवा साबात उभे करणे शक्य नव्हते. वेढ्याच्या जागी जातीने हजर राहून व देखरेख ठेऊन अकबराने आपल्या लोकांना धीर दिला. एकंदर कठिण परिस्थिती लक्षात घेऊन विजया साठी तो रोज प्रार्थना करू लागला. सुदैवाने विजयाचे पहिले चिन्ह म्हणजे सापनची टेकडी जून १६०० मध्ये मुघल सैन्याच्या ताब्यात आली पण यानंतर अनेक महिने वेढ्यात काहीच प्रगती दिसेना. खाद्यपदार्थांची कमतरता आणि महागाई व किल्ल्यावर जाणारा उंच, अवघड रस्ता यामुळे मुघल सैन्याचा धीर खचू लागला त्यात आणखी किल्ल्यावरील लोकांनी काही अधिकाऱ्यांना व शिपायांना पैसा देऊन फितवले. " किल्ल्यावरून आलेल्या सोन्यामुळे काही प्रतिष्ठित अधिकारी कर्तव्य-भ्रष्ट झाले; " असे अबुल फझल म्हणतो. यामुळे बादशाही सैन्यात फार शिथिलता उत्पन्न झाली. पण काही दिवसांनंतर काराबेगकडे नोकरीसाठी फितवून आणलेल्या किल्ल्यावरच्या एका शिपायाने माळीच्या किल्ल्यावर जाण्याची चोरवाट दाखवली. याचा फायदा घेऊन माळी जिंकण्याचे काम अबुल फझल-कडे सोपवण्यात आले. यासाठी अनेक शिड्या तयार केल्या गेल्या. ढोलकी व तुतारी वाजवल्यावर सर्वांनी एकत्र येण्याचे हुकूम सैन्याला दिले गेले जेथून हल्ल्याला सुरूवात व्हावयाची होती तेथे पोचताच नगारा वाजवून इशारा द्यावा असे ठरले. २८ नोव्हेंबर १६०० सालची रात्र अंधेरी होती, पाऊस पडत होता. अशा रात्री एकामागून एक तीन तुकड्या सापन टेकडीच्या माथ्यावर पाठविण्यात आल्या. काराबेगच्या हाताखाली पहिली तुकडी चोरमार्गाने माळीच्या किल्ल्यात घुसली आणि किल्ल्याचा दरवाजा त्यांनी मोडून टाकला. इतके होता होता तीन प्रहर रात्र उलटून गेली होती. पुष्कळ लोक किल्यात घुसले आणि त्यांनी लढाईचा इशारा दिला. धोक्याची जाणीव होऊन किल्ल्या-वरील शिबंदी लढावयास सज्ज झाली. पहाटेच्या सुमारास अबुल फझल स्वतः

शिडयांच्या सहाय्याने माळीच्या किल्ल्यावर चढून आला. किल्ल्यावरील फौज अशीरगडच्या मुख्य किल्ल्यात निघून गेली. सूर्योदयाला इतर तुकडयांतले लोक गडावर चढून आले. पेश्रू खान, मीर कासीम वदक्षी आणि जगदेव यांनी कोहरी जिंकले. शेख फरीदखान बक्षी, बहादुरखान रहमत खान, शामसिंग आणि सामनजी खानचे मुलगे यांनी हल्ला चढवून जुना माळी ताब्यात घेतला (२८ नोव्हेंबर).

## राजा बहादुरची शरणागती :

माळीगड पडल्यामुळे बहादुर घाबरून गेला. त्यातच आपल्याला कैद करून मुघलांच्या ताब्यात देण्याचा कट शिबंदीतल्या काही लोकांनी रचला आहे. अशी बातमी त्याला मिळाली तेव्हा वेढयाचा प्रमुख अबुल फझल याच्याकडे बहादुरने एक वकील पाठवून शरण येऊन बादशहाच्या दरबारात जातीने हजेरी देण्याची तयारी दर्शवली. प्रथम अबूल फझलने त्याकडे दुर्लक्ष केले, पण वकीलाने तीच विनंती पुन: केल्यावर त्याने अकबराकडे हे वर्तमान कळवले. अकबराने बहादुरची विनंती मान्य केली आणि ३ डिसेंबर रोजी तहाच्या प्राथमिक वाटाघाटी करण्यासाठी राम दासाला किल्ल्यावर पाठवले. बहादुर खानची सूचना आल्यापासून चवथ्याच दिवशी बहादुरचा वकील मुकर्रब खान रामदासाबरोबर बादशहाच्या छावणीवर आला. मुकर्रब खान हा बहादुरच्या सैन्यातला एक विश्वासू अधिकारी असून किल्ल्यावरील फौजेचा प्रमुख हबशी याकुत याचा मुलगा होता. 'किल्ला आणि मुलूख मला परत मिळाल्यास आणि सर्व कैद्यांची सुटका केल्यास मी शरण येण्यास तयार आहे' असा निरोप बहादुरने आपल्या वकीलाहाती पाठवला. या अटीना मान्यता देऊन बादशहाने बहादुरचा प्राण आणि मान राखला, असे अबुल फझल म्हणतो, यावरून किल्ला व मुलूख बहादुरच्या ताब्यात राहू देण्यास अकबराची मान्यता नव्हती असे दिसते. मुकर्रब खान दुसऱ्या दिवशी परत आला आणि बहादुरला दरबारात आणण्यासाठी खान-इ-आझमला पाठवावे अशी आणखी एक विनंती बहादुरने केली आहे असे त्याने सांगितले. ती मान्य करून त्याप्रमाणे खान-इ- आझमला मालीगडला पाठवण्यात आले आणि बहादुर व त्याचे मुलगे अफझल खान आणि खुदवन्द खान यांना घेऊन तो बादशहाच्या छावणीत दाखल झाला (१० डिसेंबर १६००) बादशहाबरोबरच्या औपचारिक भेटीनंतर त्यांना शेख फरीद बक्षीच्या आघाडीच्या तंबूत अडकावन ठेवण्यात आले.

## बहादुरच्या शरणागतीची कारणे : अशीरगडचा पाडाव

अकबराच्या भेटीसाठी बहादुर स्वतः का आला आणि नंतर त्याने किल्ला बादशहाच्या स्वाधीन का केला याची अबुल फझलने खालील शब्दात नोंद करून ठेवली आहे: " अशीरगडवर हवा तेवढा दारूगोळा आणि सर्व तऱ्हेची शस्त्रास्त्रे भरपूर होती. उलटपक्षी अकबराजवळ वेढयाची काहीच साधने नव्हती. वेढा सुरू झाल्यावर काही दिवसांनी किल्ल्यावर रोगराई सुरू झाली आणि त्यामुळे पुष्कळ लोक मरू लागले. तरीसुद्धा धीर न सोडता किल्ल्या-वरील लोकांनी बचावाची नवी नवी साधने हुडकून काढली. पण माळीगड पडल्यामुळे त्यांचा बाहेरच्या जगाशी संबंध तुटला आणि दाणागोटा व ताजी फौज किल्ल्यावर आणण्याचा मार्ग बंद झाला. यामुळे किल्ल्यावरील सैन्य घाबरून गेले त्यानंतरच बहादूर शरण येऊन अकबराच्या भेटीस येण्यास तयार झाला. पण बहादूर अकबराच्या छावणीत दाखल झाल्यावरसुद्धा किल्ला खाली करण्यात आला नाही आणि त्यावर हल्ला चढवून तो काबीज करण्याची तयारी करावी लागली. याच वेळी अकबराने पोर्तुगीजांकडे वजनदार तोफांची व दारूगोळयाची मागणी केली आणि त्यासंबंधी चौलला आपल्या देशबांधवास लिहिण्याबद्दल त्याने जेरोम झेविअर आणि बेनेडिक्ट डी गॉस यांना सांगितले. पण असे करणे ख्रिस्ती धर्माच्या विरूद्ध आहे असे बादशहास मान-भावीपणाने झेविअरने कळवले. तेव्हा इतर उपाय योजून किल्ला हस्तगत करण्याचे बादशहाने ठरवले. दीर्घकाळ थांबण्यास तो तयार नव्हता कारण लढाऊ सेनानी आणि विजेता ही त्याची कीर्ती धोक्यात होती आणि राजपुत्र सलीमने अलाहाबादला बंड पुकारले होते. वेढा बळकट करून व त्याचबरोबर किल्ल्यावरील शिबंदीला मोठी लाच देऊन फितूर करण्याचे ठरले. अबुल फझलच्या सावधगिरीने केलेल्या विधानाचा हाच अर्थ होतो. " जरी तोफा कोहीहाई–जवळ नेण्याचा प्रयत्न झाला आणि मोठा तोफखाना आणण्याची परवानगी मिळाली, तरी गुप्तपणे किल्ल्यावरील लोकांना फितवण्याचे काम सर्वांनी चालू ठेवले. गोड गोड बोलून त्यांना आपल्या बाजूकडे वळवून घेण्यात आले." या धोरणाचा योग्य तो परिणाम झाला. जर राजा बहादुरने आपल्या मुख्य अधिकाऱ्यास स्वत: लिहून किल्ला खाली करून देण्यास सांगितले; तर आम्ही ते करण्यास तयार आहोत असे किल्यावरील लोकांचे मत पडले. बहादुरच्या पत्रामुळे " हकनाक किल्ला खाली केला असा दोष आम्हाला कोणी लावणार नाही." अशी त्यांची विचारसरणी होती. आपले जीवीतमान आणि

मालमत्ता याबद्दल पण अकबराची लेखी हमी त्यांनी मागितली. वरीलप्रमाण पत्र लिहिण्यास बहादुरने प्रथम नकार दिला पण नंतर तसे पत्र लिहून त्यावर शिक्कामोर्तब करण्यास त्याला भाग पाडण्यात आले. मुकर्रबखान किल्ल्यातल्या इतर काही मंडळींबरोबर ही दोन पत्रे घेऊन किल्ल्यावर गेला आणि ती पत्रे त्याने याकुतच्या हातात दिली. फैझी सरहिंदी याविषयी लिहितो, " मंडळी जवळ आली तेव्हा मुकर्रबखानचा बाप किल्ल्याच्या टोकावर जाऊन उभा राहिला आणि आपल्या धन्याला कैदेत पाठवून किल्ला खाली केल्याबद्दल त्याने मुलाची निर्भर्त्सना केली. यामुळे मुकर्रबखानला इतके वाईट वाटले की त्याने खंजीर काढून आपल्या पोटावर दोन तीन जखमा करून घेतल्या. यानंतर थोड्याच दिवसांनी तो मरण पावला." राजाविरूद्ध कट करून त्याला पदच्युत करतील या भीतीने अशीरगडच्या किल्ल्यावर कैदेत असलेल्या राजपुत्रांना किल्ल्याचा लढा चालू ठेवण्याचा आग्रह याकूतने केला, असे जेरोम झेविअर म्हणतो. पण भीतीमुळे कोणीही तसे करण्यास धजला नाही. निराश होऊन याकूतने शेवटी आत्महत्त्या केली आणि किल्ल्यावरल्या शिबंदीने ता. १७ जानेवारी, १६०१ रोजी किल्ला अबुल फझलचा मुलगा अबदूर रहमान याच्या हवाली केला.

किल्ला खाली करून देण्यास किल्ल्यावरील लोकांना अनेक दिवस लागले. चार दिवसांत ३४००० लोक किल्ला खाली करून आपल्या कुटुंबांसहित सर्व मालमत्ता घेऊन आले आणि त्यांची सुरक्षित जागी बोळवण करण्यात आली. या मंडळींत इफ्तीकार खान हबशी, उलुघखान, मारझान झंमी इत्यादी खानदेशच्या सैन्यातील प्रमुख अधिकारी होते. त्यांना सन्मानाने वागवण्यात आले. इतर त्रेपन्न लोक— ज्यांच्यांत अनेक विद्वान लोक आणि राजाच्या कुटुंबातली मंडळी होती— त्यांना मानाची वस्त्रे आणि उत्तमोत्तम घोडे देण्यात आले. किल्ल्यावरचा खजीना, जडजवाहिर आणि इतर मौल्यवान वस्तूंचा ताबा मुघलांनी घेतला.

## अबुल फझलने जाणूनबुजून वस्तुस्थितीचा विपर्यास केला का? उपलब्ध पुराव्याची चाचणी

अशीरगडचा वेढा आणि पाडाव याबद्दल चार निरनिराळ्या तत्कालीन लेखकांनी आपापली हकीकत लिहुन ठेवली आहे. त्यापैकी तीन म्हणजे अबुल फझल, फैझी सिरहिंदी आणि जेरोम झेविअर हे वेढ्याच्या वेळी प्रत्यक्ष हजर

होते. चवथा फिरिस्ता प्रत्यक्ष जागेवर हजर नसला, तरी समकालीन होता. त्याचा ओढा मुघलांपेक्षा खानदेशचा राजा आणि दक्षिणेकडील इतर सुलतान यांच्याकडे अधिक होता. मुघलांना तो उपटसुंभ लेखीत असे. झेविअरच्या हकीगतीला अर्थातच फार महत्व आहे. पण परदेशी असल्यामुळे सर्व घडामोडींची खडान्‌खडा बातमी त्याला असणे शक्य नाही. त्यामुळे अशीरगडचा वेढा आणि त्याचा पाडाव याबद्दल त्याने एकच बाजू पुढे मांडली आहे. शिवाय याबाबतची त्यावेळची त्याची पत्रे गहाळ झाली असून डुजारिकचा इतिहास (Histoirs) त्या पत्रावर आधारित आहे किंवा नाही याबद्दल शंका आहे. तिन्ही हिंदी इतिहासकारांच्या मते मुघलांचा लष्करी जोर नोव्हेम्बर १६०० मध्ये माळीगड जिंकून घेतल्यावर पुष्कळच वाढला. माळी पडल्यामुळे किल्ल्यावरच्या सैन्यात भीतीचे वातावरण पसरले. तसेच अहमदनग-रचा किल्ला पडला ही बातमी अशीरगडला २२ ऑगस्ट रोजी पोचली. आणि त्यामुळे बहादूर आणि इतर किल्ल्यावरील लोक घाबरून गेले, असे वरील तिन्ही लेखक म्हणतात. याचा परिणाम म्हणजे बहादुरने आपले दोन प्रमुख अधिकारी, मेव्हणा (बहिणीचा नवरा) सादतखान आणि शेख पीर महंमद हुसेन यांना दहा हत्तींचा नजराणा घेऊन अकबराकडे पाठवले आणि क्षमेची याचना केली. पण बहादूर जातीने बादशहासमोर हजर होईपर्यन्त याची दखल घेण्यास अकबराने नकार दिला. पीर महंमद हुसेन नंतर किल्ल्यावर परत गेला पण सादतखान आपल्या फौजेनिशी मुघलांना येऊन मिळाला आणि त्याने अकबराकडे नोकरी पत्करली. तिसरी गोष्ट म्हणजे बहादुर शरण येण्याचे कारण किल्ल्यावर सुरू झालेली रोगराई असे हे तीघेही म्हणतात. य साथीत २५००० (फिरिस्ता म्हणतो ४०,०००) लोक गेले. “किल्ला शरण येण्याचे कारण म्हणजे बिघडलेली हवा” असे फैझी सरहिंदी म्हणतो. “या दूषित हवेमुळे दोन रोगांचा फैलाव झाला. एक म्हणजे कंबरेखालील अवयवात अर्धा-गवायू. हा रोग झालेल्या लोकांची हालचालच बंद झाली. दुसरा म्हणजे डोळ्यांचा दुखरेपणा. यामुळे किल्ल्यावरील अनेक अधिकारी आणि सैनिक निराश व हताश झाले आणि किल्ला खाली करण्याचा एकमुखी सल्ला त्यांनी बहादुरला दिला. त्यांचा सल्ला ऐकून बहादुराने बादशहाकडे शरणागतीची बोलणी सुरू केली.” किल्ल्यावरील लाखावर लोकांची गर्दी, अनेक तऱ्हेची जनावरे आणि कोंबड्या यांमुळे रोगराई सुरू होऊन मृत्युसंख्या इतकी वाढली असे या तीन्ही इतिहास-कारांचे मत आहे.

किल्ल्यावरील रोगाची साथ आणि त्यामुळे वाढती मृत्यूसंख्या यांचे मुख्य कारण म्हणजे अकबराने खास नेमलेल्या हुशार जादुगाराकडून केले गेलेले चेटकीचे प्रयोग असा लोकांचा समज असल्याचे फिरिस्ता म्हणतो. तसेच शत्रूचा पराभव होऊन स्वतःस जय मिळावा म्हणून अकबराने केलेल्या प्रार्थनेचाहि यात समावेश आहे. ह्या गोष्टी आपल्याला कितीहि मूर्खपणाच्या वाटल्या तरी किल्ल्यावरच्या धर्मभोळ्या लोकांनी त्याला फार महत्व दिले, यात काही शंका नाही. बहादूरच्या कंजूषपणामुळे किल्ल्यावरील शिबंदीचा पगार आणि दाणागोटा वेळच्या वेळी मिळत नसे. त्यामुळे किल्ल्यावर भरपूर सामुग्री असूनसुद्धा ते भुकेले व दुःखी होते असे फिरिस्ता म्हणतो. त्यातच अबुल फझल दूरान्वयाने म्हणतो त्याप्रमाणे अकबराकडून येणाऱ्या लाचेची भर पडली. त्यामुळे किल्ल्यावरच्या काही लोकांनी कट करून अकबराकडे किल्ला स्वाधीन करण्याचा आग्रह बहादुरकडे एकमताने धरला. तसे करतांना आमचे जीवित, मान आणि वित्त यांना धोका पोचणार नाही. अशी हमी बादशहाकडून घ्यावी असे त्यांनी सुचवले या संकटसमयी बहादुरने त्यांचे न ऐकल्यास त्याला पकडून अकबराच्या स्वाधीन करण्याचे पण त्यांनी ठरवले. या कटाचा पत्ता लागून बहादुरने आपले सरदार आसफखान, मिर्झा जागर, कबीरखान इत्यादि मंडळींबरोबर सल्लामसलत केली आणि त्यांचे मत किल्ला खाली करून द्यावा असेच पडले. इतक्यात नगरचा किल्ला पडल्याची बातमी आली आणि या सर्वांचा परिणाम म्हणजे किल्ला खाली करून अकबराच्या भेटीला जाणे बहादुरला भाग पडले.

वेढ्याची हकीगत देण्यात अबुल फझलने इतिहासाची प्रतारणा केली असे इतिहासकार व्हिन्सेंट स्मिथ म्हणतो, पण वरील हकीगतीवरून या म्हणण्याला काही आधार दिसत नाही. किल्ल्यावरील फौजेला लाच दिली या गोष्टीचा पुसट उल्लेख पण अबुल फझलच्या हकीगतीत येतो. राजा बहादुरला जबरदस्तीने किल्ला खाली करून देण्याच्या कागदावर सही करावयास लावली, याचा स्पष्ट उल्लेख अबुल फझलने केला आहे. आणि ही गोष्ट त्याच्या प्रामाणिकपणाची खात्री देण्यास पुरेशी आहे. बहादुरला कैद करण्यात अकबराची चूक झाली हे उघड आहे, पण बहादुरला किल्ल्यावर सुखरूप परत पाठवण्याचे वचन अकबराने दिले होते या विधानाला झेविअरच्या तथाकथित लिखाणाशिवाय दुसरा आधार नाही. एक वर्षभर आपल्या दरबारात हजर राहण्याचे अकबराचे फर्मान धुडकावणारा खानदेशचा राजा इतक्या सहजासहजी फसेल असे मानणे चुकीचे आहे. याशिवाय अकबराने बहादुरला वैयक्तिक सुरक्षिततेची ग्वाही देऊन त्याचा मान राखण्याचेच फक्त कबूल केले होते, इतकेच अबुल फझल म्हणतो.

तरीसुद्धा बहादुरला ग्वाल्हेरच्या किल्ल्यात स्थानबद्ध करून त्याला ४००० मोहरांचा तनखा लावून देणे ही गोष्ट स्मिथ म्हणतो त्या प्रमाणे विश्वासघाताची नसली तरी बादशहाला साजेशी खचित नव्हती. मुकर्रबच्या टोमण्यामुळे अकबर इतका रागावला की, त्याने त्याला ठार मारण्याची सजा दिली, हे झेविअरचे म्हणणे मुळीच विश्वासपात्र नाही. यावरून अकबराच्या दरबारातील कडक शिस्तीची माहिती झेविअरला नव्हती असेच म्हणावे लागते. यात महत्त्वाची गोष्ट अशी आहे की, मुकर्रबला बादशहाच्या बाजूला वळवून घेण्यात आले होते, आणि खानदेशचा राजा आणि मुघल सत्ता या दोघांच्या तर्फे त्याचे प्रयत्न चालू होते. बापाच्या हेटाळणीमुळे मुकर्रबने स्वतःला मारून घेतले असे फैझी सरहिंदीचे मत आहे, ते वस्तुस्थितीला अधिक धरून असल्यासारखे वाटते. दोन्ही बाजूंनी पेचात पडल्यामुळे मुकर्रबला दुसरा मार्गच उरला नव्हता असे म्हणण्यास हरकत नाही. स्वच्छ आणि नेटका कारभार आणि सचोटी यात मुघल आणि फरूकी यांच्यात डावेउजवे करण्यासारखे काही नव्हते. पण या बाबतीत अकबराची वर्तणूक खानदेशच्या बहादुरपेक्षा फार उच्च प्रतीची होती यात शंका नाही. अनेक तऱ्हेचा बहाणा करून बहादुरने मुघलांना कित्येक महिने झुलत ठेवले. आणि असे करीत असताना अकबराचे आधिपत्य त्याने उघड उघड कधीच अमान्य केले नाही. तसेच विश्वासघातकीपणाच्या आरोपापासून बहादूरला सर्वस्वी निराळे ठेवता येत नाही. बादशहाबरोबर तहाची बोलणी करीत असताना शरणागतीची बाब मुख्य ठेवून आपला हुकूम हातात पडल्याशिवाय किल्ला खाली करू नये असे त्याने आपल्या लोकांना बजावले असावे असे वाटते. उलटपक्षी कोणत्याहि तऱ्हेचा आडपडदा न ठेवता अकबराने सरळ सरळ जातीने येऊन मुजरा करण्याची शरणागतीची मागणी केली होती. एकमेकांचे शत्रू फितवण्यासाठी दोघांनीहि पैशाचा भरपूर उपयोग केला. झेविअरला या गोष्टी माहीत नसाव्या किंवा आपल्या भूमिकेच्या समर्थनार्थ त्याने मुद्दामहून त्याचा उल्लेख केला नसावा. यापूर्वी झालेल्या वाटाघाटींची किंवा त्यावेळची बहादुरची नीच वर्तणक यांची त्याला माहिती नव्हती. याशिवाय तो राजा होण्यास सर्वस्वी नालायक असून बाया आणि दारू या दोन्ही व्यसनांच्या संपूर्णपणे आहारी गेलेला होता, हे पण झेविअरला ठाऊक नव्हते. झेविअरच्या पत्रांवरून त्याचे बादशहाबद्दलचे मत चांगले होते असे जरी दिसत असले, तरी तेवढ्यावरून तो बादशहाचा पक्षपाती किंवा त्याच्या वागणुकीचे यथार्थ मूल्यमापन करणारा होता असे मानण्यास मुळीच जागा नाही. बादशहाच्या दरबारात आलेल्या सर्व जेजुइटांप्रमाणे एकंदर हिंदुस्थानातल्या लोकांबद्दल आणि खास करून मुसल-

मानांबद्दल झेविअरचेहि मत चांगले नव्हते. झेविअर जसा विद्वान आणि उत्साही धर्मप्रचारक होता तितकाच तो कावेबाज राजकारणी पण होता. झेविअरने वर्णन केलेला प्रसंगाच्या वेळीच बादशाहाने त्याला दरबारातून हाकून देऊन गोव्याला परत जाण्याची आज्ञा केली होती. तसेच अकबराने ख्रिस्ती धर्म स्वीकारला नाही म्हणूनहि तो निराश झाला होता. यात दोष अकबराचा नसून स्वत.चा आणि स्वतःच्या धर्माचा होता हे त्याला समजले नाही. स्वतःवर केलेले उपकार माणूस सहज विसरतो, पण अपमान कधीच विसरत नाही.

## दक्षिणेकडील मुघल प्रांताचा राजप्रतिनिधी म्हणून दानियलची नेमणूक :

अशीरगडचा किल्ला मुघलांच्या हातात पडला याला फार मोठे ऐतिहासिक महत्त्व आहे. अहमदनगर मुघलांच्या ताब्यात आलेच होते आणि अशीरगडच्या पाडावामुळे, अकबराच्या ह्यातीत नाही तरी त्यानंतर, राहिलेला दक्षिणेतला प्रदेश जिंकून घेण्याचा मार्ग खुला झाला. या विजयाने प्रभावित होऊन विजापूर, गोवळकोंडा आणि बिदार येथील राजांनी अकबराकडे अभिनंदनपर संदेश आणि नजराणे पाठविले. दक्षिणेत राहून विजापूर, गोवळकोंडा व बिदार येथील राज्ये आपल्या अंमलाखाली आणून तिथल्या राजांना मांडलिक म्हणून ठेवण्याचा बादशहाचा विचार होता. त्यानुसार आपल्या मैत्रीची खातरजमा करण्यासाठी त्याने आपले वकील शरीफ सरमादी, मसाऊद बेग आणि मुनीम यांना अनुक्रमे विजापूर, गोवळकोंडा आणि बिदार येथे पाठवून दिले. विजापूरच्या सुलतानाने आपली मुलगी दानियलला देऊ केली, तिचा स्वीकार करण्यात आला. मुघलांच्या पुढचा यावेळचा खास प्रश्न म्हणजे निजामशाही राज्याशीं अजूनहि इमान राखणाऱ्या लोकांच्या ताब्यातला अहमदनगर राज्यातील काही भाग मुघल सत्तेखाली आणणे हा होता. त्यासाठी फेब्रुवारी १६०१ मध्ये अकबराने अबुल फझलची नाशिकला नेमणूक केली व अहमदनगरमध्ये शांतता प्रस्थापित करण्यासाठी खान–इ. खानानला तिकडे रवाना केले. अहमदनगर पडल्यानंतर जुन्या निजामशाहीतल्या काही सरदारांनी शहा अलीचा मुलगा मूर्तीझा अली याला दौलताबादला गादीवर बसवून मुघलांशी लढण्याची तयारी केली. निजामशाहीचा पक्षपाती राजू हा बादशहाचे फर्मान न जुमानता त्या राज्यातला काही भाग बळकावून बसला होता. म्हणून मूर्तीझा अलीचे पारिपत्य करण्यास खान–इ–खानानाला तिकडे पाठवण्यात आले आणि अबुल फझलला नाशिकला न पाठवता बंडखोरांचे पारिपत्य करण्याच्या कामात मदत करण्या-

साठी त्याला खान–इ–खानानकडे धाडून देण्यात आले. अबुल फझलचा मुलगा अब्दुल रहमान याची रवानगी तेलंगणात करण्यात आली. ही सर्व व्यवस्था लावल्यावर अकबराने अशीरगडच्या किल्ल्याला जातीने भेट दिली. तेथे चार दिवस घालवून तो बऱ्हाणपूरला आपल्या मुख्य ठिकाणी परतला. अहमदनगरचा कारभार शहारुख मिर्झाकडे सोपवून १८ फेब्रुवारीला राजपुत्र दानियल बऱ्हाणपूरला आला. त्याचे मोठ्या प्रेमाने स्वागत करून बादशहाने अशीरगडचा किल्ला त्याला नजर केला आणि खानदेशचे नाव दानदेश ठेवून तो सर्व प्रांत त्याच्या हाताखाली दिला. खानदेश आणि अहमदनगर राज्यातला सर्व भाग म्हणजेच मुघलांचा दक्षिणेकडील प्रदेश यावर दानियलची राजप्रतिनिधी म्हणून नेमणूक करण्यात आली. "ग्वाल्हेरच्या तुरुंगात शांतपणे विचार करण्यास मिळून तो काही शहाणपण शिकेल" अशा विचाराने बहादुरला त्याच्या कुटुंबासह तिकडे पाठविण्यात आले. त्याला ४००० मोहरांचा तनखा नेमून देण्यात आला; आणि खानदेशच्या इतर सात राजपुत्रांना सालीना २००० मोहरा ठरवून देण्यात आल्या.

## अकबर आग्र्याला परत येतो :

अलाहाबादला सलीमने बंड पुकारल्यामुळे अकबाराला दक्षिणेकडे राहण्याचा आपला विचार सोडून द्यावा लागला. २१ एप्रिल १६०१ रोजी तो बऱ्हाणपूरहून आग्र्यास जाण्यास निघाला. निरोप देण्यासाठी बरोबर आलेल्या दानियलला त्याने नर्मदेच्या तीरावरून परत बऱ्हाणपूरला पाठवून दिले. १ ऑगस्ट रोजी तो फत्तेपूर सिक्रीला येऊन पोचला आणि तेथे त्याने ११ दिवस मुक्काम केला. अशीरगडच्या विजयाचे स्मारक म्हणून याचवेळी त्याने सिक्रीचा बुलंद दरवाजा बांधण्याची आज्ञा दिली. नंतर तो आग्र्यास जाण्यास निघाला. वाटेत त्याची राणी सलीमा सुलतान बेगम हिने आपल्या नव्यानेच केलेल्या बागेत त्याला पाहुणचार दिला. हे स्थळ बहुधा किरौली असावे.

— ० —

# प्रकरण १९ वे

## राजपुत सलीमचे बंड आणि अकबराचे अखेरचे दिवस

### सलीम : लाडका मुलगा आणि गादीचा वारस

ऑगस्ट १६०१ मध्ये दक्षिणेहून परत येतो तोच अकबरापुढे त्याचा थोरला मुलगा आणि गादीचा वारस सलीम याने केलेल्या बंडाचा प्रश्न उभा राहिला. राजपुत्र सलीम–ज्याने पुढे जहांगीर हे नाव धारण केले–याचे वय यावेळी ३१ वर्षे ८ महिने होते (सौर पंचांग) मनाने आणि शरीराने, दोन्ही दृष्टींनी तो आता प्रौढावस्थेत आला होता. वयाच्या २० व्या वर्षापासूनच तो स्वतःची निराळी मते प्रदर्शित करू लागला होता. वरवर पितृभक्ती दाखवीत असता अलीकडे दोन वर्षे तर त्याला उद्धट स्वरूप येऊन त्याचेच पर्यवसान शेवटी उघड बंडाळीत झाले. अनेक नवसांनी झालेला सलीम पित्याच्या फार लाडात वाढला होता. अकबराचे त्याच्यावर फार प्रेम होते. बुद्धीच्या कक्षा वाढवणारे सर्व तऱ्हेचे शिक्षण मुलाला मिळावे अशी व्यवस्था बादशहाने केली होती आणि राज्यकारभाराच्या सर्व महत्त्वाच्या बाबतींत, दरबारात हजर राहून आपले मत व्यक्त करण्याची संधी त्याला देण्यात येत होती. आपल्या इतर मुलांच्यापेक्षा सलीमला अधिक मानाच्या जागा देऊन अकबराने त्याचा गादीवरचा हक्क जवळ जवळ जाहीर केला होता. १५७७ मध्ये त्याने सलीमला १०,००० ची मनसबदारी दिली आणि आपले दुसरे मुलगे मुराद आणि दनियाल यांना फक्त अनुक्रमे ७००० ची व ६००० ची मनसबदारी दिली १५८५ मध्ये त्याने मुरादला ९००० री व दानियलला ७००० री मनसबदार केले; पण त्याचवेळी सलीमला, पूर्वी कुणालाही न दिलेली १२००० ची मनबदारी बहाल केली. यानंतर ९ वर्षांनी त्याच्या हाताखाली १०,००० उत्कृष्ट घोडेस्वार देण्यात आले. सर्व सरकारी समारंभात त्याचा मान इतर दोन भावांपेक्षा पहिला असे. मार्च १५८२ मध्ये काबूलच्या मिर्झा हकीमवर अकबराला मोठा विजय प्राप्त झाला. त्याप्रित्यर्थ झालेल्या विजयोत्सवात सामाजिक आणि राजकीय सुधारणा सुचवण्यासाठी राजपुत्रांपैकी फक्त सलीमचेच मत विचारण्यात आले होते. गुलामी रद्द केल्याची घोषणा सिंहासनावरून केल्यानंतर

मुख्य प्रधानासकट दरबारातले सर्व अधिकारी आणि इतर सरदार मंडळी यांना बाजूला ठेवून पुढील सुधारणा सुचवण्यासाठी प्रथम सलीमचे नाव पुकारण्यात आले. थोडक्यात म्हणजे "माझा थोरला मुलगा सलीम माझ्यानंतर गादीवर येणार" हे अकबराने निरनिराळ्या प्रसंगी स्पष्ट केले होते.

## सलीमचे सुरुवातीचे आज्ञाभंगाचे काही प्रकार

वडिलांचे प्रेम आणि पक्षपात याला न जुमानता ऐन विशीत सलीमने बादशहाची आज्ञा न जुमानण्यास सुरुवात केली. याचे पहिले उदाहरण मे १५८९ मध्ये अकबर काश्मीरच्या पहिल्या भेटीवर असताना घडले. आपल्या अकबरनाम्यात याचा उल्लेख करण्याइतके महत्त्व अबुल फझल या प्रसंगाला देतो. एक दिवसाची सफर केल्यानंतर बादशहा देवार किंवा देग्राम येथे सुपियानच्या पश्चिमेस अर्ध्या मैलावर आपल्या छावणीत आला. भींथारहून जनानखान्याला घेऊन येण्याची कामगिरी सलीमवर सोपवण्यात आली होती. रस्ता फार अडचणीचा आहे अशी सबब सांगून सलीमने त्यांना नवशिऱ्यालाच ठेवून दिले. ही सर्व हकीगत दुपारी बादशहाच्या कानावर आली. बादशहाचा हुकूम मोडण्याचे 'धारिष्टच' (हलेरी) यात उघड उघड दिसून येत होते. या कारणापुढे आणि त्याच्या 'वाईट प्रवृत्तीमुळे' (ख्वाहिश तबाह) त्याला दरबारात हजर राहण्याची बंदी करण्यात आली. यावेळी बादशहा इतका रागावला होता की, थोडेसे रक्षक बरोबर घेऊन देग्रामहून जनाना आणण्यासाठी तो स्वतः हिरापूरला गेला. तेव्हा सलीम घाबरला. आपल्याच तंबूत स्वतःला कोंडून घेऊन त्याने खाणेपिणे, झोप वर्ज्य केली. दरबारी मंडळींच्या विनंतीला मान देऊन अकबर हिरापूरहून परत आला. सलीमच्या मनाला हे फार लागले असावे; कारण दोन महिन्यांनंतर ८ जुलै १५८९ रोजी अकबर जेव्हा जबरदस्त पोटदुखीने आजारी पडला, तेव्हा सलीमच्या सांगण्यावरून आपल्याला विषबाधा करण्यात आली असे बादशहाला वाटले असावे असे म्हणतात. दोन दिवस बादशहा फार अस्वस्थ होता आणि तिसऱ्या दिवशी तो दोन चमचे सार प्यायला. या संबंधी अबुल फझल लिहितो. 'मी अनेक वेळा आजारी पडलो पण त्या पहिल्या दिवसाइतक्या वेदना मला कधीच झाल्या नाहीत असे बादशहा म्हणाला." इतिहासकार बदायुनी या प्रसंगाचे वर्ष ९९९ हिजरी (३० ऑक्टोबर १५९० –१९ ऑक्टोबर १५९१ इ. स.) असे चुकीने देतो. तो पुढे म्हणतो, 'यावेळी

अकबर बेशुद्धावस्थेत असताना आपल्या थोरल्या मुलाचा संशय घेऊन त्या आपल्याला विष दिले अशा अर्थाचे काही शब्द बादशहाने उच्चारले.' ते शब्द खालीलप्रमाणे "बाबा शेखुजी, ही सर्व दौलत अखेरीस तुझ्याकडेच येणार आहे हे माहीत असताना तू माझ्यावर हा प्रयोग का केलास? माझा जीव घेण्यास गैर मार्गाचा अवलंब करण्याची काहीच जरूर नव्हती. कारण तू म्हणाला असतास तर मी स्वत:हून माझा जीव तुझ्या हातात दिला असता.' यानंतर बदायुनी म्हणतो की, अकबराच्या अत्यंत विश्वासातला आणि त्याच्या मुदपाकखान्याचा प्रमुख हकीम हुमाम याने आपल्या खाण्यात काहीतरी मिसळलेले असावे असेही अकबराला वाटले. तसेच मुरादच्या हालचालीवर लक्ष ठेवण्यासाठी सलीमने आपले काही विश्वासू लोक नेमले होते, असे बदायुनीचे म्हणणे आहे. अकबर नामा, भाग ३, पान ५५२. पोटदुखीचे हे दुखणे अकबराकडे त्याच्या वडिलांकडून आले असावे. "नंतर थोड्या दिवसांनी अकबर पूर्णपणे बरा झाल्यावर जनानखान्यातल्या मंडळींनी आणि शहाजादा मुरादने ही हकीगत बादशहाला सांगितली.'

## सलीम आणि अकबरामधील बेबनाव

सलीमच्या आज्ञाभंगाचा आणखी एक प्रकार १६ मे १५९७ रोजी घडल्याचा उल्लेख आढळतो. यावेळी अकबर काश्मीरच्या तिसऱ्या भेटीवर होता; आणि त्याचा मुक्काम राजोरी येथे होता. त्या दिवशी, "परवानगीशिवाय सलीम बादशहापुढे हजर झाला. वाटेत काही गैरप्रकार केल्यामुळे बादशहाने त्याला भेटीस येण्याची बंदी केली." ही घटना बरीच महत्त्वाची असावी कारण त्या बाबतीत चौकशी करण्यासाठी अबुल फझलला अकबराने सांगितले. सरतेशेवटी दोन्ही बाजूंकडून समझोता होऊन हा प्रश्न मिटला असावा. सलीमने दिलगिरी प्रदर्शित केली आणि मुलांच्या अतीव प्रेमाखातर अकबराने त्याला माफी दिली. याच दिवशी दुसरी एक दुर्दैवी घटना घडली, अकबराने भिभार खिंडीच्या तोंडावर ख्वाजागर्ग फतेउल्लाला मुद्दाम ठेवले होते. खिंड पार करून काश्मीरमध्ये येण्याची सवलत कोणालाही देऊ नये. असा हुकूम त्याला देण्यात आला होता. काश्मीरमध्ये लोकांची गर्दी झाली तर दुष्काळ पडण्याला ते एक कारण होऊ शकेल, म्हणून ही खबरदारी घेण्यात आली होती. या हुकुमाची अंमलबजावणी करीत असताना सलीमबरोबर बाचाबाची होऊन त्याच्या हाताखालचा एक माणूस मारला गेला. सलीम

त्यामुळे रागावला. तेव्हा फत्तेउल्लाला सलीमकडे पाठवून 'तू हवी ती शिक्षा त्याला कर' असे अकबराने सांगितले: अकबराने दाखवलेला मनाचा मोठेपणा पाहून सलीम विरघळून गेला आणि फत्तेउल्लाला काहीहि शिक्षा न करता त्याने बादशहाकडे परत पाठवून दिले.

यानंतर थोड्याच महिन्यांनी आणखी एक गोष्ट घडली. त्यामुळे बादशहा आणि सलीम यांच्यातले संबंध आणखीनच दुरावले. काश्मीरमध्ये असताना एक दिवस वुलारच्या सरोबरावर बादशहा नौकाविहारासाठी गेला होता. तेथून त्याने लैन लंका या तळ्यातल्या सुंदर स्थळाला भेट दिली. अबूल फझल लिहितो, "तीरच्या नवव्या दिवशी तलावावरून जात असताना राजपुत्राकडून काही तरी अपराध घडला." यामुळे फार राग येऊन अकबराने आपली नाराजी ख्वाजा भूलच्या हस्ते राजपुत्राला कळवली. बादशहाचा निरोप सांगताना ख्वाजाने बेअदबी दाखवली असावी. त्यामुळे राजपुत्र रागावला. त्याची समजूत काढण्यासाठी बादशहाने ख्वाजाच्या जिभेचे टोक कापून टाकले. त्यामुळे सलीमचे समाधान झाले आणि हा प्रसंग मिटला.

## अबुल फझलविरुद्ध सलीम

नंतर एकाच वर्षात अबुल फझल आणि सलीम यांच्यांतील बेबनावास सुरुवात झाली. दरबारात अबुल फझलला फार मान आणि प्रतिष्ठा असल्यामुळे आपल्याला योग्य तो अधिकार आणि मान मिळत नाहीत अशी सलीमची तक्रार होती. राजपुत्राकडे लक्ष देण्यास अबुल फझलला फारशी फुरसद नव्हती. तशातच आपली स्वामीनिष्ठा आणि सर्वांशी मिळून वागण्याचे धोरण यामुळ आपल्याला कुठूनच धोका नाही असे अबुल फझलला वाटत असे. पण बादशहा आणि सलीम या दोघांनाही खूष ठेवणे उत्तरोत्तर अशक्य होत चालल्याचे त्याला आढळून आले. अबुल फझलचा द्वेष करून सलीम त्याच्या विरुद्ध कागाळ्या करू लागला. त्याची धर्मावरील श्रद्धा म्हणजे नुसता भोंदूपणा आहे असा आरोप सलीमने केला. दरबारात दिन–ए–इलाहिचा उदो उदो करून घरात तो पाक मुसलमाना सारखा वागतो आणि कुराणाची नक्कल करीत बसतो अशी बातमी सलीमने बादशहाला दिली. तसेच बादशहाच्या परवानगीशिवाय वडिलांनी लिहिलेली कुराणावरची टीका अबुल फझल देशाबाहेर पाठवतो, असा पण आरोप त्याने केला. यामुळे मे १५९८ मध्ये अबुल फझलवर बादशहाची काही काळ नाराजी झाल्याचे दिसते. पण सलीमला खूष करण्यासाठी

वरवर बादशहाने असे दर्शवले असावे; कारण थोड्याच दिवसांत बादशहाची मेहेरनजर पुन: पहिल्यासारखीच अबुल फझलकडे वळलेली दिसते.

### सलीम अकबराचा आज्ञाभंग करतो

याच वर्षी सलीमने अकबराचा उघड उघड आज्ञाभंग केल्याचे दोन दाखले आढळतात. अब्दुल्लाखान उझबेकच्या मृत्यूनंतर तुराणमध्ये अंदाधुंदी माजल्याची बातमी इ. स. १५९८ च्या सुरुवातीस अकबराच्या कानावर आली. तेव्हा तो प्रांत आपल्या ताब्यात घेण्याचा बेत अकबराने केला. तिकडल्या मोहीमेचे अधिपत्य सलीमने करावे असे अकबराने ठरवले; पण हिंदुस्थानाबाहेर जाण्याचे सलीमने नाकबूल केल्यामुळ या स्वारीचा बेत रहित करण्यात आला. यानंतर थोड्याच दिवसांनी राजपुत्र मुरादच्या मृत्यूनंतर दक्षिणेकडील सेनेचा मुख्य सेनापती म्हणून सलीमची नेमणूक करण्यात आली. याचाही अव्हेर करून ठरल्यावेळी सलीम जागेवर हजर झाला नाही. आपला स्वार्थ लक्षात ठेवून अर्थात त्याने राजधानीतच मुक्काम करण्याचा निश्चय केला होता.

### सलीमच्या बंडाची कारणे

वरील हकीगतीवरून हे स्पष्ट होते की, मे १५८९ ते १५९८ या ९ वर्षांच्या काळात अकबर आणि सलीममध्ये खूप तेढ निर्माण झाली होती. याच काळात बंडाचे बीज सलीमच्या मनात रुजू लागले असावे. सर्व उपलब्ध पुराव्यावरून असे दिसून येते की, बंडाची जबाबदारी अखेरीस सलीमकडेच जाते. यापेक्षाही कठीण प्रसंग निर्धाराने हाताळणारा अकबर फार संयम आणि सौम्यता दाखवतो. आपल्या फार लाडक्या मुलाचे पारिपत्य करणे ही बाब जरा नाजूकच होती. सलीमच्या सुरुवातीच्या अज्ञाभंगाची छाननी केल्यास असे दिसून येते की, वडलांच्या विरुद्ध वागताना आपण बादशहाचाही आज्ञाभंग करीत आहोत याची जाणीव सलीमला नव्हती. यामुळे दरबारी रीतिरिवाज मोडून बादशहाची गैरमर्जी त्याने स्वत:वर ओढवून घेतली. आपण वयात आलेले असून गादीवरचा हक्क पण आपलाच आहे; तेव्हा बादशहा आणि दरबारांतल्या इतर मंडळींनी आपल्याला योग्य तो मान दिला पाहिजे असे सलीमला वाटले असावे. आपल्या हितसंबंधांत कुणीही ढवळाढवळ करू शकणार नाही हे ठाऊक असतानासुद्धा त्याबद्दल पुरी खात्री करून घ्यावी असे पण सलीमला वाटे. याच वेळी गादीचा वारस म्हणून काही महत्त्वाकांक्षी सरदार त्याच्या भोवती जमा झाले. त्यामुळे सलीमच्या बाजूचा असा एक पक्ष कळत न कळत या काळात तयार होऊ लागला. याच वर्षात अकबराला अनेक अपघात होऊन पुष्कळदा

तो जबर जखमी झाला. आजारी पण पुष्कळ वेळा पडला व त्याची मूळची पोलादी प्रकृती काहीशी खालावली. यामुळे आपल्या हाती राज्य येण्यास आता फारसा विलंब लागणार नाही असे सलीमला व त्याच्या अनुयायांना वाटले असावे, असा तर्क करता येतो. सलीम जसजसा मोठा होऊ लागला, तसतशी साम्राज्यातील सत्ता आणि अधिकार योग्य प्रमाणात आपल्याला मिळत नाहीत असा त्याचा समज होऊ लागला. यामध्ये सलीमच्या दृष्टीने मुख्य अडचण अबुल फझलची होती. दरबारातल्या कुठलाही अधिकाऱ्यापेक्षा, मग तो कितीही मोठा विद्वान किंवा प्रबळ असो- आपल्या शब्दास अकबराने अधिक मान द्यावा असे त्याला वाटू लागले. सलीम जसजसा मोठा होऊ लागला तसतशी शरीरसंभोग आणि दारू याबद्दलची व इतर तारुण्यसुलभ व्यसनां-वरची त्याची आसक्ती वाढतच गेली. स्वतःचा जनाना मोठा असूनसुद्धा जून १५९६ मध्ये तो झैनखान कोकाच्या मुलीच्या विलक्षण प्रेमात पडला आणि तिच्याशी लग्न करण्याचा आग्रह त्याने धरला. "हा विवाह योग्य नाही असे अकबराला वाटत होते; पण सलीम प्रेमवेडा झालेला पाहून त्याने या लग्नास संमती दिली." इतिहासात नंतर नूरजहान या नावाने प्रसिद्ध झालेली मेहेरून्निसा आणि अनारकली *यांच्यावरही राजपुत्राचे फार प्रेम होते, या गोष्टीला पुष्कळ आधार सापडतो. सलीमच्या या प्रेमचेष्ठा आणि तारुण्यातले वेडेचार पाहून तो स्वतःला व आपल्या घराण्याला कलंक लावत आहे असे अकबराला वाटले. यामुळेपण दोघांमधील दुरावा वाढण्यास मदत झाली. १५९८ च्या मध्यात सलीमच्या वागणुकीमुळे दोघांमध्ये कायमची तेढ निर्माण झाली होती. बादशहा आणि अबुल फझल यांच्या नांपाक धार्मिक धोरणाविरुद्ध सलीमने पाक मुसलमान धर्माची बाजू घेतली, म्हणून मुख्यतः त्यांच्यांत तेढ निर्माण झाली, असे व्हॉन नोव्हेर म्हणतो; पण त्या म्हणण्याला फारसा आधार सापडत नाही. सलीम बापापेक्षाही अधिक पाखंडी होता आणि ख्रिस्ती पाद्र्यांकडे अकबरापेक्षाही त्याचा कल अधिक होता. भांडणाचे मुख्य कारण राज्यपद शक्यतोवर लवकर मिळवण्याची सलीमची इच्छा हेच होते.

---

*सलीमचे महेरुन्निसावरी प्रेम याबाबत पहा— माझे mughal Empire p.276-79. ३ रे प्रकाशन सलीम आणि अनारकली यांच्यासंबंधी पहा— Willim finch Early Travels in India 166. Eaward Terry- कित्ता ३३० p. C. Grey- P. U. H. S. J. April 1934 p. 76-80 अनारकलीच्या कबरी-तून मृत्यूलेख आणि तावीख 1008 A. H. हिजरी १५९९-१६०० A. D. पहा murray's Handlook for Panjab

## सलीम नाखुषीने मेवाडच्या स्वारीवर जातो :

सलीमची पितृद्रोही वागणूक पाहून अकबर खूपच अस्वस्थ झाला असावा. सलीमसाठी योग्य ते काम शोधून काढून त्याला त्यात कसा गंतवून टाकावा या विचारात असताना त्याने १५ सप्टेंबर १५९९ रोजी दक्षिणेला निघण्यापूर्वी अजमेरच्या सुभेदारीवर सलीमची नेमणूक केली. १५९७ साली राणा प्रतापचा मुलगा अमरसिंग मेवाडच्या गादीवर आला होता. त्याच्या विरुद्ध स्वारी करण्यास सलीमला सांगण्यात आले. सलीमला अजमेरचा सुभेदार कशा परिस्थितीत करण्यात आले याबद्दल अबुल फझल लिहितो, "मोठ्या मनाचा बादशहा, अनेक तऱ्हेने, सलीमवरील आपले विशेष प्रेम व्यक्त करीत होता. पण मद्यपान आणि वाईट संगत यामुळे स्वतःच्या बऱ्या–वाईटातला भेद सलीमला कळेनासा झाला होता. म्हणून काही काळ त्याला दरबारात येण्याची बंदी करण्यात आली होती. अखेरीस मरीयम मकानीच्या मध्यस्थीमुळे बादशहापुढे येऊन कुर्निसात करण्याची परवानगी त्याला देण्यात आली. यावेळी पुनः एकदा योग्य वर्तणुकीचे आणि सेवेचे वचन सलीमने बादशहाला दिले." परिणामी बादशहाने त्याला मेवाडच्या राण्याविरुद्ध पाठवले. त्याच्याबरोबर मानसिंग, शहा कुली महरम इत्यादि मातब्बर अधिकारी दिले होते; पण वाटेत फुकट वेळ घालवून सलीमने मुख्य मोहिमेकडे दुर्लक्ष केले. दक्षिणेच्या मार्गावर असताना ग्वाल्हेरहून मीर अबदुल हाजीला त्याला समज देण्यासाठी मुद्दाम पाठवून देणे अकबराला भाग पडले.

मुख्य मोहिमेकडे संपूर्ण दुर्लक्ष करून "वाईट लोकांच्या संगतीत दारू पिण्यात आणि मजा मारण्यात सलीम अजमेरलाच दिवस काढू लागला." उदेपूरला सैन्य रवाना करून तो स्वतः अजमेरमध्येच राहिला. तितक्यात दुसऱ्याच बाजूने मुघलांनी व्यापलेल्या मेवाडच्या हद्दीत प्रवेश करून राणा अमरसिंगने मालपुरा आणि इतर भरभराटीची ठिकाणे लुटली. त्याचे पारिपत्य करण्यासाठी सलीमने माधोसिंगला पाठवले तेव्हा अमरसिंग डोंगराळ मुलुखात निघून गेला, पण जाता जाता त्याने एका रात्री मुघल सैन्यावर हल्ला चढविला. रझा कुलीलाल बेग, मुबारिझ बेग, आलिफ खान इत्यादि सरदार प्रतिकारास उभे राहिल्यामुळे राण्याने माघार घेतली. नेमून दिलेली कामगिरी पार न पाडता सलीम परत आला.

## सलीमचे उघड बंड : आग्रा जिंकून घेण्यात त्याला आलेले अपयश

अकबर दक्षिणेत आहे ही संधी साधून उघड बंड पुकारून पंजाबवर 'ताबा मिळवण्याचा बेत' सलीमने रचला, बंगालमध्ये जाऊन तेथील बंड केलेल्या अफगाणांचे पारिपत्य त्याने करावे हा मानसिंगचा सल्ला त्याने मानला नाही. अजमेर सोडून आग्र्याच्या मार्गाने तो तातडीने निघाला आणि वाटेत नुकत्याच मेलेल्या शहाबाज खान कंबुची एक कोटीची मालमत्ता त्याने जप्त केली (११ नोव्हेंबर १५९९). बादशहाच्या गैरहजेरीचा फायदा घेऊन राजधानी आपल्या ताब्यात घ्यावी असा त्याचा विचार होता. तिथला सुभेदार कुलीज खान सलीमच्या स्वागतासाठी किल्याबाहेर आला; पण राजधानी त्याच्या ताब्यात देण्याचे त्याने साफ नाकारले. यामुळे सलीमला तो विचार सोडून द्यावा लागला. तेव्हा आग्र्यापासून ८ मैलांवर त्याने यमुना ओलांडली. यावेळी मरियम मकानीचा मुक्काम आग्र्यात होता. दरबाराच्या नेहमीच्या रिवाजाप्रमाणे सलीम तिच्या भेटीलाही गेला नाही. सलीमच्या एकंदर वागणुकीचा मरियम मकानील फार धक्का बसला. "सलीमच्या प्रेमाखातर ती त्याच्या मागोमाग काही अंतर गेली. त्याला समजुतीच्या चार गोष्टी सांगून योग्य मार्गावर आणावे असा तिचा विचार होता." आपली आजी आपल्या पाठोपाठ येत आहे असे कळताच "सलीम शिकारीची जागा सोडून, बोटीत बसून नदीमार्गाने निघून गेला. यामुळे निराश होऊन ती थोर बाई परत फिरली." अलाहाबादला जाऊन सलीमने तिथल्या सरकारी अधिकाऱ्यांच्या जहागिरी जप्त केल्या आणि ३० लाखांचा बिहारचा खजिना आपल्या ताब्यात घेतला. अलाहाबादला स्वतःचा दरबार थाटून त्याने 'राजा' ही पदवी घेतली. अकबराने आणि साम्राज्यातल्या इतर अधिकाऱ्यांनी काहीच झाले नाही अशी समज करून घेऊन याकडे दुर्लक्षा करण्याचे ठरविले.

## सलीमची समजूत घालण्याचे अकबराचे प्रयत्न

अशीरगडला असताना सलीमच्या बंडाची बातमी अकबराला मिळाली. याबाबतीत पुष्कळ सल्लामसलत झाली, आणि अनेक बड्या अधिकाऱ्यांनी कडक उपाय योजण्याचा सल्ला बादशहाला दिला; पण सामोपचाराचे धोरण स्वीकारण्याचे ठरवून अकबराने सलीमला एक प्रेमळ पत्र लिहिले व त्याच्या वर्तनाबद्दल जाब विचारला. सलीमला योग्य तो सल्ला देऊन त्याला योग्य मार्गावर आणण्यासाठी त्याचा बाळपणचा मित्र ख्वाजा महंमद शरीफ याची त्याच्याकडे

खास रवानगी करण्यात आली. बादशहाच्या खलित्याचा राजपुत्राने आदराने स्वीकार केला, पण वडिलांचा उपदेश न मानता स्वत: निर्दोषी असल्याचा बहाणा त्याने केला 'मी बादशहाचा ताबेदार असून बादशहाच्या दारी नत-मस्तक होण्यास नेहमीच तयार आहे' अशी खुबीदार भाषा त्याने वापरली पण त्याचवेळी त्याने आपली बंडाळी चालूच ठेवली. महंमद शरीफला आपल्या बाजूला वळवून घेऊन त्याने त्याला आपला मुख्य वजीर नेमले आणि मोठ्या सैन्याची जुळवाजुळव करण्यास सुरुवात केली.

## राजधानीचा कब्जा घेण्याचा सलीमचा दुसरा अयशस्वी प्रयत्न :

दरम्यान सलीमला ताळ्यावर आणण्याच्या हेतूने अकबर अशीरगडहून आग्र्याकडे येण्यास निघाला; पण त्याने केलेल्या सौम्य कानउघाडणीचा काहीच परिणाम न होऊन सलीमने आपली गैरवर्तणूक चालूच ठेवली. १६०२ सालच्या मार्च महिन्यात आग्र्याला जाऊन बादशहाला भेटण्याची परवानगी आपल्याला द्यावी असे सलीमने अकबराला कळवले; पण ही विनंती 'मनापासून केलेली नसल्याने' ती अमान्य करण्यात आली. इतक्यात ३०,००० सैन्यानिशी सलीम दुष्ट हेतूने आग्र्यावर चालून येत आहे अशी बातमी आली. हा मुख्य हेतू झाकून ठेवण्यासाठी "आग्र्याला वडिलांना भेटण्यासाठी मी जात आहे" असे सलीमने सगळीकडे जाहीर केले. यावेळी अकबर आग्र्याला पोहोचला नव्हता राजधानीवर सलीमचा डोळा आहे असे वाटून अकबराने त्याला ताबडतोब परत फिरण्याचा हुकूम दिला आणि मला भेटण्याची खरी इच्छा असल्यास, जमवलेल्या मोठ्या सैन्याला रजा देऊन, थोड्याशा रक्षकांनिशी आग्र्याला भेटीला यावे, असे त्याने सलीमला कळवले. "अलाहाबादला परत जाण्यातच-तुझे हित आणि स्वास्थ्य आहे," असेही त्याने सलीमला बजावले. बादशहाची भेट घेणे हा सलीमचा मुख्य उद्देश नव्हताच. बादशहाचा हुकूम न मानल्यास आपल्याविरुद्ध कडक उपाय योजण्यास बादशहा मागे पुढे पाहणार नाही, हे दिसून येताच सलीम निराश होऊन इटाव्याहून परत फिरला (१४ मे १६०२). सलीमचे मन कुठल्यातरी योग्य कामात गुंतवून ठेवण्याच्या हेतूने याचवेळी अकबराने त्याला बंगाल आणि ओरिसाचा सुभेदार नेमले. आणि तिकडे जाऊन कामावर रुजू होण्यास त्याला सांगितले. त्यावेळचा तेथील सुभेदार राजा मान सिंग याला दरबारात परत बोलावण्यात आले. बादशहाच्या हुकुमाचा अव्हेर करून सलीम अलाहाबादलाच स्वतंत्र राजाप्रमाणे राहू लागला.

## सलीम राजासारखा वागू लागतो :

राजवस्त्रे धारण करून सलीम आता अलाहाबादला व्यवस्थित दरबार भरवू लागला. त्याने पुष्कळ लष्कर जमा केले, मोठ्या हुद्याच्या जागेवर अधिकारी नेमले आणि आपल्या भोवती मित्रांचे कोंडाळे जमा केले. पदव्या आणि जहागिरी बहाल करणे, फर्माने काढणे इत्यादि राजाला योग्य अशी कामे सुरू करून बहारैच, करा माणिकपूर, कोरा घाटिमपूर, काल्पी, कनौज आणि विहार येथे आपल्या सुभेदारांची नेमणूक केली. परकीय सत्तेचे साहाय्य घेण्याचा सुद्धा प्रयत्न करून त्याने गोव्याच्या पोर्तुगीजांकडे लष्करी मदतीची मागणी केली आणि स्वत:च्या दरबारात ख्रिस्ती मिशनरी पाठवून द्यावे अशी विनंतीसुद्धा त्याने गोव्याच्या गव्हर्नरास केली.

## अबुल फझलचा खून :

सलीमच्या बंडाळीमुळे अस्वस्थ झालेल्या अकबराने अबुल फझलला दक्षिणेतून मसलतीसाठी परत बोलावून घेतले. आपला मुलगा अब्दुल रहमान याच्याकडे सैन्याचे आधिपत्य सोपवून स्वत: ताबडतोब आग्र्याला निघून यावे असे अकबराने अबुल फजलला कळवले. अबुल फझलवर सलीमचा फार रोष होता. बापलेकांमध्ये वितुष्ट येण्यास मुख्य कारण अबुल फझल आहे असे त्याला वाटे. याच सुमारास, ओर्छाच्या बीरसिंग बुंदेलाने बंड पुकारले होते; आणि त्याचे राज्य दक्षिणेकडे जाणाऱ्या मार्गावर होते; तिकडून येणाऱ्या अबुल फझलवर हल्ला करून त्याला ठार मारावे असे सलीमने बीरसिंगाला सांगितले. अबुल फझल आणि अकबर यांची भेट होऊ न देण्याचा त्याचा विचार होता. या कामगिरीबद्दल बीरसिंगाला त्याने रक्षणाची आणि मोठ्या बक्षिसाची हमी दिली. बीरसिंग मोठ्या सैन्यानिशी आपला रस्ता रोखून धरण्यासाठी येत असल्याचे अबुल फझलला उज्जैनला समजले; पण उज्जैनच्या रस्त्यावरून माघार घेऊन घाटीचांदाच्या मार्गाने पुढे जाण्याचा आपल्या लोकांनी दिलेला सल्ला तरीसुद्धा अबुल फझलने मानला नाही. ९ ऑगस्ट १६०२ रोजी बनयावान सरकारमधील सराई बरकी आणि अंतरी या दोन गावांमधली आपली दबा धरलेली जागा सोडून बीरसिंग बाहेर आला. अबुल फझलने आपल्या अल्प संरक्षकांसह त्याला तोंड दिले. त्याचा वश्वास व अधिकारी गदाई खान अफगाण याने स्वतः पुढे जाऊन शत्रूशी सामना करण्याची तयारी दर्शवली. त्यामुळे अबुल फझलला ६ मैल दूर असलेल्या

अंतरी या गावी जाण्यास वेळ मिळाला असता. अंतरी येथे राय रायन् ( टिपुरदास ) आणि बिकानेरचा राजा रायसिंग हे ३००० घोडदळानिशी तळ देऊन होते; पण खान अफगाणने सुचवलेला हा मार्ग स्वीकारण्याचे अबुल फझलने नाकबूल केले आणि पळून न जाता लढता लढता मरण पत्करण्याचा त्याने निश्चय केला. भ्याडासारखे पळून जाण्याऐवजी लढता लढता मरणे त्याने पसंत केले. " बादशहाच्या कृपेमुळे मी एक साधासुद्धा विद्यार्थी अमीर, वजीर आणि बादशहाचा सेनापती पण झालो. आज जर बादशहाच्या मजविषयीच्या मताविरुद्ध मी वागलो, तर लोक मला काय म्हणतील आणि माझ्या प्रतिस्पर्ध्यांना मी माझे तोंड कसे दाखवू ! " परत फिरण्याचा मार्ग अजून मोकळा आहे आणि बीरसिंगाचा समाचार पुन: केव्हा तरी घेता येईल, असे गदाईखानने त्याला पुनः पुन: सांगून पाहिले, पण अबुल फझलने त्याचा सल्ला मानला नाही. या सल्लामसलती चालू असतांनाच बीरसिंग अबुल फझलजवळ येऊन पोहोचला आणि त्याच्यावर हल्ला करून आपल्या भाल्याने त्याने त्यास ठार मारले. वीरसिंगाशी लढता लढता गदाई खान आणि त्याचे लोक धारातीर्थी पडले. अबुल फझलचे शीर धडापासून वेगळे करून वीरसिंगाने ते सलीमकडे अलाहाबादला पाठवून दिले; ते दृष्टीस पडताच सलीमला फार आनंद झाला. अबुल फझलच्या मृत्यूमुळे सर्वांनाच फार दुख झाले. अकबरनाम्याला पुस्ती जोडणाऱ्या लेखकाने लिहिले आहे, " अरेरे ! विद्वत्तेची खाण आणि बुद्धीचा सागर आता नाहीसा झाला. ज्ञानाचा दीप कायमचा मालवला गेला; उत्कृष्ट संभाषणाची गंगाच आता आटून गेली. " ☆

☆ अकबरनामा भाग ३, पाने ८१०–८१२; तुझुक –इ–जहांगीर भाग २ पान १२. इंग्रजी भाषांतर भाग १, पाने २४–२५; इनायतुल्ला– Elliot Dowson's History of India, भाग ६ पान १०७ यांपैकी शेवटचा लेखक हा सलीमचा पक्षपाती आहे. त्याच्या म्हणण्याप्रमाणे सलीमविषयी त्याने सादर केलेला अहवाल बादशहाने सर्वस्वी मान्य केला नाही आणि जाब विचारण्यासाठी बादशहाने त्याला दरबारात बोलावून घेतले. डलेट (पान १६७) म्हणतो की, बादशहाच्या बोलावण्याला लिहिलेल्या उत्तरात अबुल फझलने लिहिले होते की, " राजपुत्र सलीमला बंदिस्त करून बादशहापुढे हजर करण्याची शक्ती आणि कौशल्य माझ्यात आहे. " अबुल फझलचे मुंडके सलीमने एका घाणेरड्या जागी फेकून देण्यास सांगितले असे म्हणतात.

अबुल फझलच्या मृत देहावर आंतरीच्या खेड्याजवळ एक अगदी साधी कबर उभारण्यात आली आहे. डिसेंबर १९५२ मध्ये मी ती पाहून आलो.

## अबुल फझलची योग्यता

एक असामान्य बुद्धीचा पुरुष म्हणून अबुल फझलची त्या काळात प्रसिद्धी होती. साहित्य, इतिहास आणि तत्त्वज्ञान यांत पारंगत असलेला पहिल्या प्रतीचा विद्वान, विचारवंत आणि एक उत्कृष्ट लेखक अशी त्याची ख्याती होती. साहित्यिक किंवा धार्मिक वादविवादात इबादतखान्यात किंवा दरबारात त्याच्याशी दोन हात करण्यास त्याचे प्रतिस्पर्धी धजत नसत. फारशी भाषेतले अनेक लेखक आणि विद्वान यांनी पिढ्यान्‌पिढ्या त्याची लेखनशैली आणि खास करून त्याची पत्रे ही कित्ता म्हणून गिरवावी असे मानले आहे. पण त्याचे यथार्थ अनुकरण करण्यात कोणालाच यश आले नाही. विद्वत्तेप्रमाणेच संभाषणचातुर्य आणि हजरजबाबी-पणाबद्दलही अबुल फझलची ख्याती होती. तो हाडाचा सनातनी होता असे राजपुत्र सलीम म्हणत असे; पण वास्तविक पाहाता धर्माबाबत त्याची मते इतकी उदार होती की त्यांचे शत्रू त्याला हिंदू, पारशी किंवा नास्तिक म्हणण्यासही मागेपुढे पाहात नसत. अबुल फझलच्या बुद्धीची आणि विचारांची भरारी त्यांना कधीच झेपली नाही. सर्व धर्मांच्या लोकांनी एकमेकांबरोबर गुण्यागोविंदाने राहाण्यात त्यांचे कल्याण आहे, हा विचार प्रथम प्रसृत करण्याचे श्रेय अबुल फझललाच दिले पाहिजे. इतिहास लिहिण्याची त्याची पद्धत पुष्कळदा बोजड वाटते आणि त्यात बादशहाला अतिमानव समजून त्याची अतोनात स्तुती केलेली आढळून येते आणि त्यामुळे पुष्कळवेळा त्याची शैली बिघडलेली वाटते. परंतु हे पण मान्य केले पाहिजे की, आपल्या इतिहासातून खरी घटना त्याने क्वचितच वगळलेली आढळते. तसेच अकबराच्या राज्याची उत्तम सनावळी त्याने महत्प्रयासाने तयार केली. अकबरनामा आणि ऐने अकबरी हे दोन ग्रंथ त्याच्या अचाट परिश्रमांची आणि खोल अभ्यासाची साक्ष देतात. इतिहासातल्या घडामोडींची केवळ हकीगत देऊन त्याचे समाधान होत नाही, त्या घडामोडीं-मागील उद्देश स्पष्ट करण्याचा त्याचा प्रयत्न असतो. अमुक एक गोष्ट का केली याचे दिग्दर्शन त्याच्या इतिहासात आढळते. अकबराच्या कारकीर्दीचा अभ्यास करणारास त्याच्या ग्रंथांचा अभ्यास करणे केवळ अपरिहार्य आहे.

२० च्या मनसबदारीपासून सुरुवात करून अबुल फझल ५००० च्या मनसबदारीपर्यंत जाऊन पोचला. इतका मोठा हुद्दा फक्त प्रतिष्ठित सरदारां-नाच प्राप्त होत असे. काही काळ त्याने खानदेशचा सुभेदार म्हणून काम केले (इ. स. १६००); पण बहुतेक सर्व काळ त्याने अकबराचा मुख्य सचीव म्हणून काम केले. आपल्याला युद्धात सेनापतीचे काम मिळावे अशी त्याची फार

दिवसांची इच्छा होती. १५९९ ते १६०१ या दोन-तीन वर्षांच्या काळात दक्षिणेत असताना आपले लष्करी कौशल्य आणि संघटनाचातुर्य दाखवावयाची संधी त्याला मिळाली. लढाईप्रमाणेच मुत्सद्देगिरीतही पण तो तरबेज होता. त्याच्या अधिकाराच्या मानाने खुद्द बादशहाकडे, दरबारात आणि एकंदर राज्यात त्याचे वजन फार मोठे होते. बादशहाचा तो खास मित्र आणि सल्लागार होता आणि "राजाचा जोनाथन" असे त्याचे यथार्थ वर्णन पहिल्या ख्रिस्ती मंडळातल्या जेजुइट लोकांनी केले आहे. बादशहाजवळ त्याचे किती वजन होते, याबद्दलच्या अवास्तव कल्पनाही रूढ आहेत. अकबर प्रत्येक वेळी त्याचा सल्ला स्वीकारत असेच असे नाही. किंवा अबुल फझलशिवाय त्याचे चालत नसे असे पण नाही. कारण पुष्कळ वेळा शिक्षा म्हणून अकबराने अबुल फझलला दरबारात येण्याची बंदी केली होती. अशा वेळी अत्यंत अस्वस्थ होऊन दरबारी जीवनाचा त्याग करून सेवानिवृत्त व्हावे असे अबुल फझलल वाटत असे. तरी सुद्धा अबुल फझल हा अकबराचा अत्यंत जिवलग स्नेही आणि मुघल साम्राज्याचा एक अत्यंत कुशल आणि विश्वासू अधिकारी होता यात संशय नाही. तो एक प्रसिद्ध लेखक असून स्वभावाने अत्यंत सौम्य आणि दयाळू वृत्तीचा होता. खाण्यापिण्याचा शौक आणि सर्वांशी खेळीमेळीची मैत्री याबद्दल तो प्रसिद्ध होता. आग्रा येथे १४ जानेवारी १५५० मध्ये त्याचा जन्म झाला. मृत्यूसमयी तो ५१ वर्षे ७ दिवसांचा होता.

## अकबराचा शोक

अबुल फझलच्या मृत्यूमुळे अकबराला फार मोठा धक्का बसला. एके दिवशी "कबुतरांचे उड्डाण पाहात असता" मध्यान्हीच्या वेळी शेख फरीदने बादशहाला ही दु:खद बातमी दिली. "ही बातमी ऐकताच दु:खाची किंकाळी फोडून बादशहा बेशुद्ध झाला. नंतर शुद्धीवर येण्यास त्याला बराच वेळ लागला. नंतर अनेक दिवस आपल्या जिवलग मित्राच्या मृत्यूमुळे त्याच्या डोळ्यांतले पाणी किंवा चेहऱ्यावरचे दु:ख खळले नाही. अबुल फझलच्या मृत्यूचा विचार मनात येताच तो दु:खाचे उसासे टाकून स्वत:ची छाती बडवून घेत असे." यानंतर तीन दिवस त्याने लोकांना दर्शन देण्याचे टाळले. अबुल फझलच्या मृत्यूमुळे त्याच्यात आणि सलीममध्ये कायमचे वितुष्ट आले आणि या कृत्याबद्दल "त्याने सलीमला कधी क्षमा केली नाही."

## बीर सिंग देव विरुद्ध मोहीम

बीर सिंग देवचा पिच्छा पुरवून त्याला प्रायश्चित्त देण्याचे अकबराने ताबडतोब ठरवले. राय रायन (तिपुर दास) याला विर सिंग विरुद्ध ताबडतोब चाल करून जाण्याचा हुकूम देण्यात आला आणि बीर सिंगाचे शीर धडावेगळे केल्याशिवाय परत फिरू नकोस असे त्याला बजावण्यात आले. त्या प्रांतातले इतर मांडलिक, बिकानेरचा राजा रायसिंग आणि बुंदेल्याचा रामचंद्र यांना राय रायनच्या मदतीस पाठवण्यात आले. झिया–उल्–मुल्क याला बक्षी नेमून एक मोठे सैन्य अशा तऱ्हेने या कामगिरीवर रवाना झाले. यानंतर थोड्याच दिवसांनी अबुल फझलचा मुलगा अबदुल रहमान याला दक्षिणेतून परत बोलावून घेऊन राय रायनच्या मदतीस पाठविण्नात आले. जंगले आणि दऱ्याखोऱ्यांचा आश्रय घेऊन बीर सिंग आता उघड वाटमारी करू लागला. बादशहाची फौज आपल्या विरुद्ध चालून येत आहे असे पाहाताच तो प्रथम भंडार आणि नंतर एरछच्या किल्ल्यात पळून गेला. राय रायनने त्याचा पाठलाग केला. तेव्हा किल्ल्याबाहेर येऊन त्याने बेरवा नदीच्या काठी राय रायनशी सामना दिला. रायरायनने नदी पार करून त्याला पराभूत केले. त्यामुळे तो पुन्हा एरछच्या किल्यात आश्रयास गेला. राय रायनने किल्ल्याला वेढा दिला. एका रात्री किल्ल्याची भिंत फोडून, राय रायनच्या तोफखान्याला बगल देऊन बीर सिंग पळून गेला. लगेच त्याचा पाठलाग करण्यात आला पण दाट जंगलामुळे आणि खोल दऱ्यांमुळे त्याला पकडणे शक्य झाले नाही. बीर सिंग बेपत्ता होऊन देशोधडीस लागला आहे, अशी बातमी मिळताच अकबराने रायरायनला एप्रील १६०३ मध्ये दरबारात परत बोलावून घेतले. त्याला विक्रमजित ही पदवी आणि ५००० ची मनसबदारी मिळाली. १६०४ च्या सुरुवातीस त्याला बीर सिंगच्या शोधार्थ पुनः पाठविण्यात आले. त्याच्या हाताखाली अबदुल रहमान (अबुल फझलचा मुलगा), राजा रायसिंग, राजा परहार आणि इतर अधिकारी देण्यात आले. त्यांनी ओरछा जिंकून वीरसिंगला तेथून हाकून दिले. काही महिन्यांनंतर बीर सिंगाने ओरछा भोवतालच्या विहिरीत विषारी वनस्पती टाकल्या आहेत अशी बातमी मिळाल्याने बादशहाचे सैन्य तेथून परत फिरले. बादशहाच्या सैन्याने ही मोहीम मनापासून हाताळली नाही हे उघड आहे. कारण वीर सिंग बुंदेलाचा आश्रयदाता आणि पोशिंदा राजपुत्र सलीम याचा कायमचा रोष पत्करण्यास कोणीच तयार नव्हते. अशा तऱ्हेने अबुल फझलचा खून करणारास शिक्षा झाली नाही आणि अकबराच्या मृत्यूनंतर त्याला ३००० ची मनसबदारी आणि राजा ही पदवी मिळाली.

## राजपुत्र सलीम आणि अकबर यांच्यांत समझोता

अबुल फझलच्या मृत्यूबद्दल सलीमला माफी करणे अकबराला फार जड गेले. पण झाले गेले विसरून जाऊन अपराधी राजपुत्राला माफी करणे याखेरीज दुसरा कुठलाच योग्य आणि शहाणपणाचा मार्ग उतारवयाला लागलेल्या बादशहापुढे नव्हता. दोघांच्यांत समेट घडवून आणण्यास कोणाच्या तरी मध्यस्थीची जरूर होती; पण राजपुत्राचा गुन्हा फार मोठा असल्यामुळे आणि बादशहाचा त्याच्यावर फार राग असल्याने अशा तऱ्हेची मध्यस्थी करण्यास कोणी तयार होईना. पण सरतेशेवटी गोष्टी अधिक वाईट थराला जाऊ नयेत असा विचार करून मरीयम मकानी आणि गुलबदन बेगम यांनी बादशहाकडे राजपुत्राच्या वतीने रदबदली करण्याचे ठरवले. बादशहाप्रमाणेच त्यांनाही एकंदर परिस्थितीबद्दल फार काळजी वाटत होती. या दोघींना, म्हणजे आपल्या आईला आणि गुलबदन बेगमला बादशहा फार मानत असे. त्यांच्या मध्यस्थीचा स्वीकार करून सलीमला माफी देऊन दरबारात येण्याची परवानगी बादशहाने दिली असे म्हणतात. सलीमा सुलताना बेगम हिचे बादशहावर आणि सावत्र मुलगा सलीम याच्यावरही खूप वजन होते सलीमला बादशहाच्या माफीची खबर देऊन त्याला आग्र्याला घेऊन येण्यासाठी तिला सप्टेंबर १६०२ मध्ये अलाहाबादला पाठविण्यात आले. एक हत्ती, एक देखणा घोडा आणि मानाची वस्त्रे असा नजराणा तिच्याबरोबर देण्यात आला. नंतर ऑक्टोबरमध्ये इतर मौल्यवान वस्तू, एक खास निवडलेला घोडा, मानाची वस्त्रे आणि स्तुतिपर निरोप राजपुत्राला पाठवण्यात आले. याचा योग्य तो परिणाम होऊन मी दोन मुक्काम पुढे जाऊन सलीमा बेगमचे स्वागत केले, अशा अर्थाचे पत्र राजपुत्राने अलाहाबादहून पाठवले. इराणच्या वकीलाने आणलेले काही घोडे आपल्याला बादशहाकडून मिळावे अशी विनंती राजपुत्राने केली. दरम्यान ७ फेब्रुवारी १६०३ रोजी गुलबदन बेगम ८२ वर्षांची होऊन मरण पावली. त्यामुळे वरील वाटाघाटी संपण्यास वेळ लागला. यानंतर लवकरच राजपुत्र दरबारात येऊन माफी मागण्यास तयार आहे. अशा अर्थाचे पत्र सलीमा बेगमकडून आले. या पत्रात राजपुत्राला वाटत असलेला बादशहाबद्दलचा आदर आणि निष्ठा यांचा उल्लेख असून त्याच्या मनातले रानटी आणि संशयी विचार आता नाहीसे झाले आहेत आणि मी त्याला घेऊन लवकरच दरबारात हजर होते, असे म्हटले आहे. मार्च १६०३ मध्ये 'मी राजपुत्राला घेऊन येत आहे' असे आणखी एक पत्र तिने लिहिलेले आहे.

आग्ऱ्याच्या वाटेवर असतांना 'माझी आजी मरियम मकानी हिने मला हाताने धरून बादशहाच्या पायावर घालावे' अशी विनंती सलीमने केली. त्याप्रमाणे एक मुक्काम पुढे जाऊन आजीने नातवाचे स्वागत करून त्याच्या घाबरलेल्या मनाला धीर दिला. दुसऱ्या दिवशी राजपुत्र दरबारात दाखल झाला. बादशहाच्या पायावर डोके ठेवून त्याने आपले अपराध कबूल केले. त्याला माफी देऊन बादशहाने आपल्या छातीशी धरले. राजपुत्राने १२००० मोहरा आणि ९७७ हत्तींचा नजराणा बादशहाला दिला. त्यांपैकी ३५० हत्ती ठेवून घेऊन बाकीचे राजपुत्राला परत करण्यात आले. राजपुत्राच्या खास विनंतीवरून 'पुन' नावाचा एक डौलदार हत्ती त्याला देण्यात आला. राजपुत्राची सर्व भीती दूर करण्याच्या हेतूने बादशहाने आपल्या डोक्यावरचा मंझिल काढून तो राजपुत्राच्या डोक्यावर ठेवला. सलीमचे सर्व अपराध पोटात घालून मी ठरवल्याप्रमाणे त्याला गादीचा वारस मी अजूनही मानतो असे दरबारी मंडळीस जाहीर करण्याचा अकबराचा हेतू असावा.

## मेवाडला सलीमची दुसऱ्यांदा रवानगी

१६०३ सालच्या ऑक्टोबर महिन्यात दसऱ्याच्या मुहूर्तावर बादशहाने सलीमची मेवाडचा राणा अमरसिंग विरुद्धच्या मोहीमेवर पुन्हा नेमणूक केली आणि त्याला तिकडे जाण्याची परवानगी दिली. पण ही कामगिरी आनंदाने मान्य करून सलीम निघाला, पण आग्ऱ्याहून २० मैलांवर जाऊन थांबला, आणि तेथून त्याने नाना तऱ्हेच्या गैरवाजवी मागण्या करण्यास सुरुवात केली. फत्तेपूर सिक्रीला मुक्काम करून पुरेसे सैन्य आणि युद्ध सामुग्री जवळ नसल्याचा वहाणा करून त्याने पुढे जाण्याचे साफ नाकारले. मेवाडसारखी खडतर मोहीम पार पाडणे या मद्यपी आणि चंचल वृत्तीच्या राजपुत्राला केवळ अशक्य होते. आणि दरबारात परत फिरण्याची परवानगी त्याने बादशहाकडे मागितली. आग्ऱ्याला न येता अलाहाबादला जाऊन तेथे चैनीत राहाण्याचा सल्ला अकबराने सलीमला दिला; त्यामुळे अत्यंत खूष होऊन मद्यपान आणि चैन करीत सलीमने मथुरेजवळ यमुना ओलांडली व अलाहाबादचा रस्ता धरला.

## सराईमधून राहण्याजेवणाची फुकट सोय

१६०३ च्या अखेरीस राज्यात सगळीकडे गरिबांसाठी वसतीगृहे व अन्नछत्रे उघडण्याचा बादशहाने हुकूम दिला. तत्पूर्वी राजधानीत आणि इतर

काही ठिकाणी अशी वसतीगृहे होती. वहातुकीच्या वाटेवर असलेल्या सरायांमधून प्रवाशांना राहाण्यास फुकट जागा देण्याची सोय आता करण्यात आली. तेथे गरिबांकरता अन्नछत्रेहि उघडण्यात आली.

## मान्बाईची आत्महत्या

सलीमच्या व्रात्यपणाला कंटाळून अकबराने त्याचा मुलगा सुलतान खुश्रु याला हाताशी धरून त्याच्याकडे जास्त लक्ष देण्यास सुरुवात केली. सलीमला बाजूला करून खुश्रूला युवराजाचे अधिकार द्यावेत असेही कदाचित् त्याला वाटले असावे. यामुळे सलीम आणि खुश्रु यांच्यात दुरावा निर्माण होऊन त्याचे खुश्रूच्या आईला फार दुःख झाले. मानबाई ही सलीमची पहिली व पतिनिष्ठ बायको खुश्रूची ती आई. पितृभक्ती आणि शिष्टाचार बाजूस ठेऊन बाप जिवंत असताना स्वत: राज्य मिळवण्याची खटपट तू करू नकोस, असा सल्ला तिने आपल्या मुलाला दिला; पण खुश्रूने तो मानला नाही आणि लवकर राज्य मिळवण्याचे स्वप्न उराशी धरून राहिला. यामुळे मानबाई फार व्यग्र झाली. थोड्याच दिवसांनंतर मानबाईचा भाऊ माधोसिंग सलीम विरुद्ध खुश्रूला मिळाला. हा अपमान सहन न होऊन मानबाईने अफू खाऊन आत्महत्या केली. तिचा स्वभाव हळवा पण हुकमती होता. एका सवतीबरोबर झालेले भांडण आणि नवराबायकोत काही काळ आलेले वितुष्ट हे तिच्या आत्महत्येचे तत्कालिक कारण असावे. तने आत्महत्या केली तेव्हा सलीम शिकारीवर होता. तिच्या मृत्यूची बातमी कळताच तो घाईने परत फिरला. मानबाई त्याची लाडकी बायको असून तिच्यावर त्याचे फार प्रेम होते. खुश्रूच्या जन्मानंतर त्याने तिला शहा बेगम ही पदवी बहाल केली होती. अलाहाबादला जिथे तिने आत्महत्या केली त्याच खुश्रूबागेत तिचे दफन करण्यात आले. या दुःखद घटनेविषयी लिहिताना सलीम म्हणतो, ‘ मी युवराज असताना आपला मुलगा खुश्रू आणि भाऊ माधोसिंग यांच्या गैरवर्तणुकीस कंटाळून खुश्रूच्या आईने अफू खाऊन जीव दिला. तिच्या अनेक गुणांविषयी आणि प्रेमळ स्वभावाबद्दल मी काय लिहावे ! ती फार हुशार होती आणि माझ्यावर तिचे इतके प्रेम होते की, माझ्या एका केसासाठी तिने आपल्या हजारो मुलांचा व भावांचा बळी दिला असता. माझ्याशी प्रेमळपणे वागण्याबद्दल तिने अनेक वेळा खुश्रूला लिहिले. त्याचा काहीच परिणाम झाला नाही असे पाहून आणि गोष्ट कोणत्या थराला जाईल याचा अंदाज न आल्यामुळे एखाद्या शूर आणि स्वाभिमानी रजपुता-

प्रमाणे तिने आत्महत्त्या करण्याचे ठरवले. या प्रकारामुळे पुष्कळदा ती बिथरल्या सारखी वागे···पण काही काळाने ती खूपच सावरली. २६ झिलहिज्जा १०१३ या दिवशी मी शिकारीवर गेलो असता तिने वैतागाने अफू खाऊन स्वत:चा शेवट करून घेतला. जणु काही आपल्या नादान मुलाच्या पुढील वर्तणुकीचे स्वप्नच तिला पडले होते. तिच्यावरील प्रेमामुळे मी अनेक दिवस फार दुखा:त काढले आणि जगण्यात काही राम राहिला नाही असे पण मला वाटले. चार दिवस म्हणजे ३२ प्रहर मी अन्न पाण्याला स्पर्शहि केला नाही. " याचवेळी बादशहाने पाठवलेल्या सांत्वनपर पत्रामुळे सलीमचे पुष्कळ समाधान झाले.

## सलीमचे दुसरे बंड

अलाहाबादला परत आल्यावर सलीम पुन: मद्यपान आणि चैन करण्यात दंग होऊन राहिला. वाईट आणि तोंडपुजा मित्रांच्या नादी लागून त्याने पुन: बादशहाविरुद्ध कारवाई सुरू केली. आता त्याच्या जुन्या व्यसनांना काहीच सीमा राहिली नव्हती. तिन्हीत्रिकाळ तो आता इतका दारू प्यायला लागला की तिचा त्याच्यावर काहीच परिणाम होईनासा झाला. तेव्हा त्याने दारूबरोबर अफू खाण्यास सुरुवात केली. "मी १८ व्या वर्षी मद्यपानास सुरुवात केली आणि अलाहाबादला असतांना जहाल मद्याचे २०–२० पेले सुद्धा घेत असे " असे त्याने आपल्या आठवणींत लिहून ठेवले आहे, दारू आणि अफूच्या नशेच्या भरात तो साध्यासुध्या गुन्ह्यांना सुद्धा देहान्ताची शिक्षा देत असे. एकदा एका अखबर-नवीसाने राजपुत्राच्या अतिरेकी व्यसनाबद्दल बादशहाला काहीतरी लिहिले असावे त्यामुळे चिडून जाऊन दारूच्या नशेत असतांना त्याने या माणसाला जीवंत सोलून मारण्याची शिक्षा दिली. त्याने घरातील एका नोकराला काठ्यांनी बडवून ठार मारले आणि एका प्याद्याला खच्ची केले. या अघोरी शिक्षांची हकीगत ऐकून अकबराला अतिशय राग आला. " मेलेला बकरा सुद्धा माझ्याच्याने पाहवत नाही आणि माझ्या मुलाने अशी क्रूर शिक्षा द्यावी हा एक दुर्दैवाचाच प्रकार नाही का ?" असे उद्‌गार त्याने काढल्याचे सांगतात. या सर्व गोष्टी ऐकून सलीमचे पारिपत्य करण्यासाठी बादशहाने स्वत: अलाहाबादला जाण्याचे ठरवले.

## सलीमविरुद्ध अकबराची निष्फळ मोहीम

नातवा विरुद्धच्या मोहिमेस मरीयम मकानी हिचा विरोध होता, तरी सुद्धा त्यास न जुमानता अकबराने आपल्या आघाडीच्या तुकड्या आग्र्याहून पुढे पाठवून दिल्या आणि २१ ऑगस्ट १६०४ रोजी आग्र्यापासून ६ मैलांवर तो एका बोटीत बसून यमुनेच्या वाटेने अलाहाबादला जाण्यास निघाला. बाकीचे सैन्य खुष्कीच्या मार्गाने त्याच्या पाठोपाठ येणार होते. राजपुत्राने पश्चात्ताप दर्शवून माफी मागितली, तर त्याला घेऊन राजधानीला यावे असा अकबराचा हेतू होता. पण त्याने आपली गैरवर्तणूक चालूच ठेवल्यास त्याला योग्य ती शिक्षा करून निद्रेतून जागा करावा असा त्याचा विचार होता. सलीमने प्रतिकार केल्यास शस्त्रबळ वापरण्याची अकबराची तयारी होती, पण सुदैवाने म्हणा किंवा दुर्दैवाने म्हणा बोट थोडी दूर गेली असतानाच नदीच्या उथळ पात्रात रुतून बसली आणि काही केल्या तिला तेथून बाहेर काढता येईना. तेव्हा ती रात्र बोटीवरच काढून दुसऱ्या दिवशी सकाळी आपल्या आघाडीच्या फौजेने नदीच्या तीरावर दिलेल्या छावणीत अकबर आला. नंतर ३ दिवस पडलेल्या मुसळधार पावसामुळे आणि वादळामुळे सैन्याचे फार हाल होऊन पुढे कूच करणे जवळ जवळ अशक्य झाले. याचवेळी मरीयम मकानी फार आजारी असल्याची आग्र्याहून बातमी आली. सलीमवर स्वारी करून जाण्यास तिचा विरोध असल्यामुळे तिने आजारीपणाचे सोंग केले असावे असे अकबराला वाटले पण पूर्ण चौकशीअंती ती खरेच फार आजारी आहे आणि हकिमाने तिची आशा सोडली आहे असे कळले. तेव्हा अकबराला आग्र्याला परत येणे भाग पडले आणि मृत्यूशय्येवर पडलेल्या आपल्या आईला भेटण्यास तो गेला. २९ ऑगस्ट १६०४ रोजी ती मरण पावली. हिंदू पद्धतीने श्मश्रू करून अकबराने तिचे सुतक पाळले. हुमायूनच्या कबरीजवळ पुरण्यासाठी तिची शवपेटी दिल्लीला घेऊन जात असता अकबराने तिला काही काळ खांदा दिला. राज्यात एक दिवस सुतक पाळण्यात आले; कारण दुसऱ्या दिवशी दसरा होता आणि अकबराला दसऱ्याचा दरबार भरवायचा होता.

## मरीयम मकानी :

मरीयम मकानीचा (हमीदाबानू बेगम) तारुण्याचा काळ आपल्या दुर्दैवी नवऱ्याबरोबर अनेक हालअपेष्टात आणि हद्दपारीत गेला; पण जसजसे

मुघलांचे साम्राज्य वाढू लागले आणि अकबराची प्रतिष्ठा वाढत गेली, तसतसे तिचे पण वजन वाढू लागले. अकबराचे तिच्यावर फार प्रेम असून सर्व दरबार आणि आम जनता तिला फार मान देई. तिचे पण अकबरावर फार प्रेम होते. अनेक वेळा मुलगा कोठे तरी दूर स्वारीवर किंवा इतर कामावर असताना लांबचा आणि त्रासाचा प्रवास करून ती त्याच्या भेटीसाठी मुद्दाम जात असे. अकबर तिचा योग्य तो मान राखून तिच्या शब्दाला किंमत देत असे; पण आपल्या राजकीय धोरणावर किंवा स्वतःच्या धार्मिक किंवा लौकिक मतांवर त्याने तिला कधीच प्रभुत्व गाजवू दिले नाही. तिला ज्यामुळे सुख होईल ते सर्व करण्यास बादशहा तत्पर असे; पण स्वतःची मते आणि आपले सहिष्णुतेचे धोरण आणि मानवतावाद याबाबत तो तिचा विरुद्ध सल्ला कधी मानत नसे. याविषयी त्यावेळच्या ग्रंथात अनेक उल्लेख सापडतात. काही धर्मवेड्या पोर्तुगीजांनी एका कुत्र्याच्या गळ्याभोवती कुराणाची प्रत बांधून त्याची धिंड काढली होती. त्याला उत्तर म्हणून गाढवाच्या गळ्यात एक बायबलाची प्रत अडकवन त्याची धिंड काढावी असा आईने दिलेला सल्ला अकबराने मानला नाही. ऑक्टोबर १५८९ मध्ये लाहोरचा दरबार उठवून आग्र्यास तिच्या इच्छेप्रमाणे येण्याचे त्याने नाकारले. मुलगा ऐकत नाही असे पाहताच १० ऑक्टोबर १५८९ रोजी मरीयम मकानी एकटीच घरचा कारभार पाहण्यासाठी आग्र्याला निघून गेली. इ. स. १५९० च्या सुरुवातीला अकबराला जबर दुखापत झाली. तो पंजाबमध्ये रोहटासला आपल्या छावणीत होता. ‘तू काही काळ विश्रांती घे’ अशी खास विनंती मरीयम मकानीने त्याला केली, पण तीही त्याने मानली नाही. जगात सगळीकडे दुःख असताना मी सुखात आराम करावा हे योग्य नाही, असे त्याने तिला कळवले. अकबराने सलीमवर स्वारी करण्याला वयस्क महाराणीचा तीव्र विरोध होता ही गोष्ट मशहूर आहे, पण अकबराने तिचे ऐकले नाही. यामुळे नंतर ती आजारी पडली व या दुखण्यात तिचा अंत झाला. मृत्युसमयी ती ७७ वर्षांची होती.

## सलीम अखेर शरण येतो : त्याची कैद आणि सुटका–

अकबराची आपल्या विरुद्धची स्वारी मरीयम मकानीच्या मृत्यूमुळे स्थगित झाली असे कळताच स्वतः आग्र्याला जाऊन बादशहाच्या स्वाधीन होण्याचे सलीमने ठरवले. अकबरासारख्या अनेक लढाया मारलेल्या, कसलेल्या लढवय्यासमोर आपला टिकाव लागणार नाही, तेव्हा त्याच्या दयेची याचना

करणे हेच योग्य आहे, असे त्याला वाटले असावे. तेव्हा आपल्या आजीच्या मृत्यूनंतर बादशहाला सांत्वनपर भेट देण्याचे कारण पुढे करून ९ नोव्हेंबर १६०४ रोजी तो आग्र्याला आला आणि भर दरबारात त्याने आपले डोके अकबराच्या पायावर ठेवले. यावेळी त्याने बादशहाला एक लक्ष रुपयांचा हिरा, २०० हत्ती आणि इतर अनेक मौल्यवान वस्तू नजराण्यादाखल दिल्या. त्याचे सकृद्दर्शनी स्वागत करून अकबराने त्याला आलिंगन दिले. सलीमबरोबर आलेल्या त्याच्या मित्रांचे पण नजराणे अकबराने स्वीकारले. यावेळी राजाविरुद्ध सतत बंड करणारा व सलीमला जाऊन मिळालेला भाऊ आणि पठाणकोटचा राजा बसू राजपुत्राबरोबर होता. त्याला कैद करावे असा हुकूम बादशहाने सोडला; पण पकडण्यास आलेल्या अधिकाऱ्यांची नजर चुकवून बसू आपल्या राज्यांत पळून गेला. सलीमचा हट्टीपणा आणि इतर मूर्खपणाची वागणूक व खास करून बादशहाविरुद्ध दीर्घ काळ चालू असलेली त्याची बंडाळी याबद्दल अकबराचा राग कायम होता. तेव्हा त्याला शिक्षा करून चांगला धडा शिकवावा असे त्याने ठरवले. प्रथम कैद करून त्याला स्त्रियांच्या महालात पाठवण्यात आले तेथेही त्याला त्याच्या अनेक अपराधांची जाणीव देऊन बादशहाने त्याची सडकून कानउघाडणी केली. मान खाली घालून आणि डोळ्यांत पाणी आणून राजपुत्राने त्याच्या प्रश्नांना उत्तरे दिली. नंतर त्याला एका घुसलखान्यात कोंडून ठेवण्यात आले; आणि दरबारातला एक प्रसिद्ध हकीम राजा शालीवाहन आणि दोन नोकर रुप खवास आणि अर्जून न्हावी यांची त्याच्यावर देखरेख करण्यासाठी नेमणूक करण्यात आली. जणू काही राजपुत्र आजारी असून त्याला औषधोपचाराची जरुरी आहे, असे यात दिसून येते. त्याच्या मद्यपानावर पूर्णपणे बंदी घालण्यात आली आणि या कडक शिक्षेमुळे अट्टल नशाबाज राजपुत्र अगदी खचून गेला. सलीमच्या बहिणी आणि अनेक स्त्रियांनी दया येऊन सलीमकरता बादशहाकडे रदबदली केली. त्याला आता पूर्ण पश्चात्ताप झाला आहे असे त्यांचे म्हणणे होते. तेव्हा १० दिवसांनंतर त्याची सुटका करून यमुनेच्या पलिकडल्या तीरावर स्वत:च्या घरी जाऊन राहाण्याची त्याला आज्ञा देण्यात आली. स्वत:च्या देखरेखीखाली सलीमला ठेवण्याची बादशहाची इच्छा होती; पण तेवढ्यात दानियल मृत्यूच्या दारी पोहोचला आहे असे पाहून बादशहाने सलीमची सुटका केली आणि त्याचे हुद्दे आणि जहागीर त्याला परत दिली. ☆

☆ अकबरनामा भाग ३, पाने ८३२–८३८. उलेटचा वृत्तांत (पाहा, पाने १६८–१७०). यात पुष्कळ चुकीची विधाने आहेत. उदाहरणार्थ– सलीम

अखेरीस शरण येण्यापूर्वी दानिअलचा मृत्यू, अकबराने अनेकवेळा सलीमच्या थोबाडीत मारल्या (त्यावेळचा इतर कुठलाच लेखक याचा उल्लेख करीत नाही), अकबराने आपल्या हाताने सलीमला अफू खायला दिली. सलीमची तिसऱ्या दिवशी सुटका. इत्यादि. दुर्दैवाने व्हिन्सेंट स्मिथ त्यावेळच्या हिंदी लेखकांस बाजूस ठेवून वरील गोष्टी खऱ्या मानतो. पाहा– मसीर–इ–जहांगिरी पान २६ ब.

## तुराणवरील स्वारीचा अखेरचा बेत :

सलीम शरण आल्यावर अकबराला फार बरे वाटले आणि ट्रान्स ऑक्सियाना म्हणजे तुराणवरील स्वारीचे बेत त्याच्या मनात घोळू लागले. अब्दुल्ला खानच्या बहिणीचा मुलगा बाकीखान याच्या गैरकारभाराच्या बातम्या येत होत्या. त्यामुळे लोक त्रासले आहेत असेहि समजले होते. तेव्हा आपल्या मातृभूमीचा हा भाग परत घेण्यास ही वेळ बरी आहे असे अकबराला वाटले. स्वारीच्या तयारीसाठी त्याने दक्षिणेतून खान–इ–खानान, बंगालमधून मानसिंग आणि लाहोरहून कुलीजखानला बोलावून घेतले. या आणीबाणीच्या प्रसंगी आपल्याला दक्षिणेत राहाणे फार जरूर आहे असे खान–इ–खानानने कळवले, पण मानसिंग आणि कुलीजखान ताबडतोब आग्र्याला आले. नंतर स्वारीचा बेत रहित का झाला याचे कारण कळत नाही. दानिअलचा मृत्यू आणि बादशहाची खालावलेली प्रकृती यामुळे बेत रहित झाला असावा.

## किश्स्तवार आणि मारूची मोहीम :

याच सुमारास चाक टोळ्यांच्या नायकाविरुद्ध एक मोठी मोहीम काढण्यात आली. यात अकबराचा हात नसून ही मोहीम काश्मीरच्या सुभेदाराने सुरू केली. या टोळ्यांचा मुलुख त्यांच्याकडून काढून घेतल्यामुळे हे लोक किश्स्तवारच्या राजाच्या आश्रयास जाऊन राहिले होते. अलिया चाक आणि हुसेन चाक यांनी गेलेला मुलुख परत मिळवण्यासाठी काश्मीरच्या मुलखात हल्ले करण्यास सुरुवात केली. किश्तवारचा राजा त्यांना सामील असल्यामुळे याच्याविरुद्ध काश्मीरचा सुभेदार महंमद कुली बेग याने ही मोहीम सुरू केली. किश्तवारचा डोंगराळ मुलुखात प्रवेश केल्यावर त्याने आपला मुलगा

अली कुली याला स्वारीवर पुढे पाठवून दिले; पण किश्स्तवारच्या राजाने त्यास सामोरे जाऊन नजराणे दिले. आणि शरणागती पत्करली. चाकना आसरा न देण्याचे त्याने कबूल केले; म्हणून महंमद कुलीने आपला मोर्चा मारूच्या डोंगराकडे वळवला. कारण चाक तेथे जाऊन राहिले होते. त्या भागात घाटावर हिवाळ्यातले बर्फ पडू लागले होते आणि तेथे सैन्याच्या हालचाली करणे कठीण होते. तरीसुद्धा महमद कुलीने आगेकूच करुन आलिया आणि हुसेनला माऊहून पिटाळून लावले. पण त्यांचा एक साथी झैदा याने बादशाही फौजेवर एका रात्री हल्ला चढवला; पण दुसऱ्या दिवशी सकाळी पराभव पत्करून त्याला परत फिरावे लागले. लढाईचे पारडे दोन्ही बाजूला झुकत झुकत डोंगराळ मुलखातत ही लढाई बरेच दिवस चालली, पण शेवटी अलिया, हुसेन आणि झैदा यांना पिटाळून लावण्यात आंले व त्यांच्या घरांना आगी लावू ती बेचिराख करण्यात आली. नंतर शरण येऊन त्यांनी पुनः गडबड न करण्याचे कबूल केले. तसेच सर्व जमीनदार शरण येऊन त्यांनी आपले मुलगे ओलीस ठेऊन दिले. विजय प्राप्त करून महंमद कुली वेग परत फिरला.

## दानियलचा मृत्यु

आपल्या दोघा थोरल्या भावांप्रमाणेच अकबराचा तिसरा व सर्वांत लहान मुलगा दानिअल याने पण मद्यप्राशनास सुरवात केली होती बादशहापासून दूर दक्षिणेचा कारभार पाहाण्यास गेल्यावर त्याने या व्यसनाचा अतिरेक केला. दारू पिऊ नको असे बादशहाने आवर्जून कळवताच आपल्या डोक्याची शपथ घेऊन मी दारू अजिबात सोडतो असे त्याने बादशहास कळवले व शपथेसाठी जवळची मद्याची सर्व पात्रे फोडून टाकली. पण मनाच्या कमकुवतपणामुळे त्याचा हा निश्चय फार काळ टिकला नाही. दुसरे काही नाही तरी स्वतःच्या तन्दुरूस्तीसाठी तू हे वाईट व्यसन सोडून दे आणि तुझा थोरला भाऊ मुराद याची या व्यसनामुळे कशी दुर्दशा झाली ते लक्षात ठेव, असे बादशहाने त्याला बजावले. त्याचा काही परिणाम होत नाही असे पाहून दानियलला परत आग्र्याला बोलावण्यात आले.

पण दक्षिणेकडील हालचालीविषयी खान-इ-खानानशी महत्त्वाची मसलत करण्यास मी जातो, असे दानियलने कळवले (मार्च, १६०३). खानदेश सोडून दक्षिणेत जाणे ही दानिअलची शुद्ध फसवाफसवी आहे हे अकबराला माहीत होते. खानदेशहून दक्षिणेकडे जाण्यात त्याचा हेतू व्यसनात दंग राहून दरबारात तोंड

न दाखवण्याचा होता हे अकबराने ताडले होते. म्हणून त्याने राजपुत्राला पुन: एकदा जबर ताकीद दिली. मग दानियलने बिरबलचा मुलगा हरिहर राय याला बादशहाकडे पाठवले. मी सहा महिने झाले दारू सोडली आहे आणि काहीतरी सबब काढून इतक्यात मला दरबारात येणे जमणार नाही, असा निरोप त्याच्या हाती बादशहाला पाठवला. प्रेमळ बापाने दारू सोडून देण्याबद्दल दानियलला पुन: पुन: लिहिले. नंतर दानियलची प्रकृती फार खालावली असून आग्र्याला यायची त्याला लाज वाटते असे अकबराला कळले. मग अकबराने अबुल फझलचा धाकटा भाऊ शेख अबुल खैर याला 'कसेहि करून दानियलला परत घेऊन ये,' असे सांगून दक्षिणेत पाठवून दिले. तसेच राजपुत्राला दारू मिळणार नाही असा बंदोबस्त न केल्याबद्दल खान–इ–खानानला दोष दिला. खान-इ-खानानने मग दानियलला दारू न मिळू देण्यासाठी त्याच्या भोवती सक्त पाहारा ठेवला. पण बंदुकीच्या दस्त्यातून किंवा लहान बाटल्या फेटयांत लपवून लोक त्याला दारू आणून देत असत. सरते शेवटी हा राजपुत्र दारूच्या नशेत बेभान अवस्थेत बऱ्हाणपूर येथे ११ मार्च, १६०५ रोजी मरण पावला. तो ४० दिवस आजारी होता. त्याच्या मृत्यूसंबंधी सलीम लिहितो, "दारु मिळण्याचे अजिबात बंद झाल्यावर तो रडत असे आणि कसेहि करून मला दारु आणून द्या अशी आपल्या नोकरांना गळ घालीत असे. आपल्या खास नोकरीतल्या बरकंदाज मुर्शीद कुली खानला त्याने सांगितले की माझी आवडती तोफ 'याका उ जनाझा' यात थोडी दारु ओतून ती मला आणून दे राजपुत्राची मर्जी संपादन करण्याच्या हेतूने त्या मूर्खाने दोनदा शुद्ध केलेला मद्यार्क तोफेत ओतून तो राजपुत्राला आणून दिला. अनेक वर्षांच्या वापरामुळे या तोफेला तोफेच्या दारूचा वास येत होता. तोफेतला गंज मद्यार्कात मिसळला असल्याने तो पीताच राजपुत्र जमिनीवर पडला." मुर्शीद कुली आणि त्याचे सहकारी यांना खान–इ–खानाने कैद करून काठयाने बडवून ठार मारले.

मृत्यूसमयी दानियल ३२ वर्षे आणि ६ महिन्यांचा होता. (सौर पंचांगा-प्रमाणे) त्याचा जन्म ९ सप्टेंबर १५७२ साली झाला. (२ जमेदी–उल्–अव्वल ९८० हिजरी). आपल्या भावाविषयी जहांगीर लिहितो, 'दानियल रूपाने देखणा आणि वागायला मोठा लाघवी होता. हत्ती आणि घोडे त्याला फार आवडत असत. कुणाजवळही चांगला हत्ती किंवा घोडा आहे असे समजताच तो आपल्या ताब्यात येईपर्यंत त्याला स्वस्थ बसवत नसे. हिंदी गाणी त्याला आवडत आणि हिंदी लोकांच्या भाषेत त्याने बऱ्यापैकी थोडीफार काव्यरचना केली आहे."

दानियल फार दिवस जगणार नाही हे अकबर ओळखून होता; पण जवळ जवळ एक महिन्यानंतर त्याच्या मृत्यूची बातमी ऐकून त्याला फार दुःख झाले. दानियलला तोन मुलगे-तहमुरास, हुशंग आणि बैशंघर व चार मुली होत्या. त्यानें अनेक लग्ने केली. त्यातले शेवटले विजापूरच्या राजकन्येशी मृत्युपूर्वी काही आठवडेच झाले होते. त्याची सर्वांत प्रेमळ बायको खान-इ-खानानची मुलगी जनान बेगम होती. दानियलच्या मृत्यूचे तिला अतोनात दुःख झाले आणि दानियलच्या मृत्यूनंतर तिने आपले राहिलेले आयुष्य दुख:तच काढले. ※

※ ऐन अकबरी भाग ३, पाने ८३७-८३८. व्ही. ए. स्मिथ याने दानियलच्या मृत्यूची दिलेली तारीख एप्रिल, १६०४, ही चुकीची आहे. ( पाहा. Akbar The Great Mogul पान ३१६) त्यावेळच्या हिंदी लेखकांवरील गैर-विश्वासामुळे ऐने अकबरीत ( भाग ३, पान ८३७ ) तसेच तकमील, Elliot and Dawson's History of India भाग ६, पान ११४ मधे दिलेली तारीख म्हणजे राज्याच्या ५०० व्या वर्षातला शब्बाल महिना (११ मार्च, १६०५ इ. जुने पंचांग) खरी धरीत नाही. त्याऐवजी बील आणि उलेट या युरोपीयनांचे ग्रंथ तो प्रमाणभूत मानतो. तसेच मृत्यूसमयी दानियल ३३ वर्षांचा होता हे जहांगीरचे संदिग्ध विधान तो विश्वासार्ह मानतो. पाहा. स्मिथ पुरवणी व (कित्ता पाने ३२८—३३२). जहांगिरचे लिखाण केवळ आठवणींवर आधारित असून त्यातल्या तारखा चुकीच्या आहेत. व्ही. ए. स्मिथच्या वरकरणी खऱ्या वाटणाऱ्या विवेचनावरून डॉ. वेणीप्रसाद ( Jahangir पान ५६ ) आणि रिचर्ड बर्न (Combridge dge Hislery of Jndiaभाग ४, पान १५१ व नंतर) यांच्यासारख्या विचारी आणि प्रामाणिक विद्वानांची पण दिशाभूल झाली. आहे.

## राज्याची अखेर

राज्याला ५० वे वर्ष लागल्याचा समारंभ ११ मार्च १६०५ रोजी साजरा झाला. राजवाड्यावर रोषणाई आणि इतर समारंभ झाले. खास दरबार भरवण्यात आला. दरबारी लोकांनी नजराणे दाखल केले आणि पुष्कळांना बढती मिळाली. सलीमने बादशहाला एक हत्ती नजर केला. दानियलने पाठवलेला गजपती आणि दोन हत्तिणी बादशहाला नजर करण्यात आल्या. सलीम तेथे असेपर्यंत दानियल राजधानीत येणार नाही अशी बातमी आली. यावेळी बिकानेरचा राजा रायसिंग याला प्रथम २००० ची आणि नंतर ४००० ची

मनसबदारी देण्यात आली; कारण वीरसिंग बुंदेलाला पकडण्यात तो जवळ जवळ यशस्वी झाला होता. वीरसिंग जखमी होऊन मोठ्या कष्टाने त्याच्या हातून सुटला होता. सकतसिंग, हा बहुधा राणा प्रतापचा धाकटा भाऊ असावा; याची मनसब वाढवून ती १६०० जाट आणि ३०० स्वारांची करण्यात आली. राजा मानसिंग बंगालमधून खास या समारंभासाठी आला होता. त्याने बादशहाला १००० सोन्याच्या मोहरा आणि १२००० रुपये नजर केले. यावेळी सरदारांचा सर्वांत श्रेष्ठ दर्जा म्हणजे ७००० जाट आणि ६००० स्वारांची मनसबदारी मानसिंगला देण्यात आली. सुलतान खुश्रूला १००० ची मनसबदारी मिळाली. नवीन वर्षाच्या समारंभानंतर अकबराने सलीमला त्याच्या घरी भेट दिली आणि काही तास त्याच्याबरोबर घालवले. नंतर थोड्याच दिवसांनी सर्व दिवाण (मुलकी अधिकारी व मंत्री) सलीमच्या हाताखाली देण्यात आले; आणि मनसबीच्या दान–पत्रावर राजपुत्राचे शिक्कामोर्तब असावे असा बादशहाने आदेश दिला.

## अकबराची प्रकृती खालावते :

कारकीर्दीच्या शेवटी शेवटी अकबराची पोलादी प्रकृती ढासळू लागली. तत्पूर्वीचे अनेक वर्षांतील अपघात आणि आताचे दुःखणे याला कारण असावे. १५८८ च्या ऑगस्ट महिन्यात लाहोरजवळ शिकारीवर असताना एका लांडग्याने त्याच्या डाव्या पायाचा कचकचून चावा घेतला; त्यामुळे अनेक दिवस काळजीत गेले. ९ जुलै १५८९ रोजी तो पोटातल्या दुखण्याने आजारी पडला. त्यातून बरे व्हायला त्याला पुष्कळ दिवस लागले. त्याच वर्षाअखेर पंजाबमध्ये डाक्क्याजवळ शिकारीवर असताना त्याच्या घोड्याने ठोकर खाल्ली आणि बादशहा घोड्यावरून खाली पडला. दगडावर तोंड आपटून तो जखमी झाला इ. स. १५०० च्या सुरुवातीस त्याला मोठाच अपघात झाला. झेलम जवळ हिलन येथे तो हत्तीवर स्वार होण्याचा प्रयत्न करित असता खाली पडला यावेळी त्याला इतकी जबर दुखापत झाली की, बादशहा मेला अशी बातमी सगळीकडे पसरली. २८ जुलै, १५९६ रोजी एका काळविटाने भोसकल्यामुळे त्याच्या वृषणाला भलतीच इजा होऊन रक्तस्राव सुरू झाला.

त्याच्या स्वतःच्या आजाराशिवाय या काळात अकबराकर कौटुंबिक आपत्ती पण कोसळल्या. त्याचे दोन मुलगे– मुराद व दानियल अनुक्रमे इ. स. १६०० आणि १६०५ मध्ये मरण पावले. त्याचा आवडता नातू मुरादचा

मुलगा रुस्तुम आणि त्याची आई यांना पण याच काळात मृत्यू आला. अकबराने या सर्व दुःखांचा शांतपणे स्वीकार केला, पण त्याचा परिणाम त्याच्या प्रकृतीवर झाल्याशिवाय राहिला नाही. १५८९ नंतर त्याचे अनेक वरिष्ठ लष्करी आणि मुलकी अधिकारी, दरबारातले अनेक विद्वान आणि कलाकार एकामागून एक मरण पावले. त्यातल्या काहींशी त्याची गाढ मैत्री होती आणि त्याच्या राज्याला वैभव प्राप्त करून देण्यात त्यांचा मोठा वाटा होता. यामुळे अकबर फार एकाकी आणि दुःखी झाला. त्याच्या प्रसिद्ध व कसलेल्या सेनापतीपैकी १६०५ मध्ये मानसिंग आणि कुलीजखान हे दोघेच फक्त जिवंत असून स्वारीवर जाण्यास लायक होते. राहिलेल्या दोघांपैकी खान-इ–आझम, मिर्झा अझीझ कोका हा फार लहरी स्वभावाचा होता. दुसरा खान–इ–खानान अब्दुर रहीम खान हा सर्वस्वी विश्वासाला पात्र नव्हता. या उपरान्त गादीचा वारस असलेल्या आपल्या मोठ्या आणि फार लाडक्या मुलाचे बंड अकबराला स्वतःच्या डोळ्यांनी पहावे लागले. आपल्या वयाची जवळ जवळ ५५ वर्षे अकबराने शारिरिक आणि मानसिक कष्ट करण्यात घालवली होती. या काळात विश्रांती अशी त्याने फारशी घेतली नाही. उतारवय झालेल्या बादशहाच्या प्रकृतीवर या सर्व गोष्टींचा परिणाम झाला असे समजावयास हरकत नाही.

## अकबर आजारी पडतो

२२ सप्टेंबर १६०५ रोजी अकबर आजारी पडला. या आजाराचे तत्कालिक कारण म्हणजे सलीम आणि त्याचा मुलगा खुश्रू यांच्यांतील बेबनाव. यापूर्वी काही दिवस सलीमचा प्रसिद्ध हत्ती गिरण बार आणि खुश्रूचा तितकाच प्रसिद्ध हत्ती अपूर्व यांच्यामध्ये लढाई होईल असे अकबराने जाहीर केले होते. ठरल्याप्रमाणे आग्र्याच्या किल्ल्यासमोर यमुनेच्या तीरावर ही लढाई झाली. अनेक सरदार आणि मोठा जनसमुदाय ही लढाई पाहाण्यास जमला होता. अकबर दर्शनाच्या झरोक्यात बसून ही लढाई पाहात होता. सलीम आणि खुश्रू आपापल्या घोड्यावर स्वार होऊन आपल्या अनुयायांसह यमुनेच्या वाळवंटात उभे होते. या साठमारीत सलीमचा हत्ती गिरण–बार विजयी झाला. आधीच ठरल्याप्रमाणे बादशहाचा रंथमभान हा हत्ती लढणाऱ्या दोन हत्तींना निवारण्यासाठी मैदानावर सोडण्यात आला. याला सलीमच्या अनुयायांनी हरकत घेतली; इतकेच नव्हे तर अकबराच्या माहुताला अपूर्वच्या

मदतीस जाण्यास अडथळा करून त्याच्यावर दगडफेक केली. सलीमचा हत्ती जिंकला हे खरे, पण त्यामुळे बापलेकांमधील वितुष्ट आणि परस्परांवरचा राग याचे अगदी उघड प्रदर्शन झाले. यामुळे अकबराच्या मनाला फार क्लेश झाले. रात्रभर त्याला नीट झोप लागली नाही आणि नंतर त्याला ताप चढला; पाठोपाठ अमांशही झाला आणि आजार आणखीनच वाढला. अकबराची धडधाकट प्रकृती त्याचा हा आजार निभावून नेईल असे बादशहावर उपचार करणारा प्रसिद्ध हकीम अली गिलानी याला वाटले. म्हणून जवळजवळ आठ दिवस त्याने बादशहाला काहीच औषध दिले नाही; पण त्या आठवड्यात बादशहाची प्रकृती सुधारण्याऐवजी अधिकच खालावली असे पाहून हकीम अलीने जुलाब थांबण्याचे एक कडक औषध बादशहाला दिले. त्यामुळे बादशहाचा अतिसार थांबला पण (costive fever) मलावरोधाचा ताप आणि (strangury) मूत्रावरोध याचा त्रास सुरू झाला. तेव्हा अलीने बादशहाला जुलाबाचे औषध दिले आणि त्यामुळे अतिसाराचे दुखणे पुन: जोरात सुरू झाले. ते थांबवण्यासाठी हकीमाने इलाज केले, पण त्यांचा काही उपयोग झाला नाही. बादशहा अनेक दिवस शारीक वेदनांमुळे अस्वस्थ होता. आजाराच्या सुरूवातीला काही दिवस तो सकाळी नेहमीच्या रिवाजाप्रमाणे झरोक्यातून खाली जमलेल्या लोकांना दर्शन देत असे, पण त्यानंतर तो इतका अशक्त झाला होता की तो १५ दिवस बिछान्यात पडून होता. कुठल्याही कामकाजात लक्ष घालण्याची ताकद त्याच्यात उरली नव्हती.

## सलीमला राज्य मिळू न देण्याचा कट

अकबर आता फार दिवस वाचत नाही असे पाहून तो मेल्यावर सलीमला बाजूला ठेवून त्याचा मुलगा खुश्रू याला गादीवर बसवण्याचा कट शिजला. नोव्हेंबर १६०४ मध्ये सलीमचे पहिले बंड संपले. तत्पूर्वी खुश्रूला जवळ करून सलीमच्या ऐवजी त्याला आपला वारस करण्याचा विचार अकबराच्या मनात आला होता; पण याविषयीचा अखेरचा निर्णय घेणे अजून बाकी होते. बादशहाच्या वर्तणुकीने शेफारून जाऊन राजा होण्याची स्वप्ने खुश्रूला पडू लागली आणि त्याच्या बाजूचा एक गट पण दरबारात तयार झाला. खुश्रू म्हणजे मानसिंगच्या बहिणीचा मुलगा आणि मिर्झा अझीझ कोकाचा जावई. त्यामुळे हे दोघे जण खुश्रूच्या गटाचे पुढारी होते. यावेळी खुश्रू जवळ जवळ सतरा वर्षांचा होता. तो दिसायला सुंदर, चारित्र्याने निर्मळ असून त्याचे

खाजगी आयुष्य निष्कलंक होते. बोलण्याचालण्यात तो मोठा लाघवी असल्यामुळे सर्वांचा आवडता होता. त्याचे साहित्य शिक्षण खुद्द अकबराच्या देखरेखीखाली झाले. अबुल फझल, त्याचा भाऊ अबुल खैर आणि पंडित शिवदत्त भट्टाचारजी यांच्यासारखे प्रसिद्ध विद्वान त्याचे शिक्षक होते. हिंदु तत्त्वज्ञान विषयात भट्टाचारजींचा हात धरणारा त्यावेळी कोणी नव्हता आणि त्यानेच राजपुत्राला हिंदु तत्त्वज्ञानाची माहिती करून दिली. अनेक बायका करण्याची चाल असणाऱ्या कुटुंबात वाढला असूनसुद्धा खुश्रूने एकच लग्न केले होते; आणि आपल्या बायकोवर त्याचे फार प्रेम होते. वयाने लहान असूनसुद्धा त्याचा रुबाब, बोलणे-चालणे, आणि संयमी वर्तणूक यामुळे त्याने लोकांची मने जिंकून घेतली होती. याच्या उलट सलीम मद्यपी व स्त्रीलंपट होता. युद्धात काय किंवा राजकारणात काय त्याची अक्कल बेताचीच होती. यामुळे सलीमपेक्षा खुश्रूकडेच लोकांचा ओढा अधिक होता. सुलतान खुश्रूला गादीवर बसवण्यात लोकांचे हित आणि स्वतःचा फायदा आहे असा विचार करून मानसिंग आणि अझीझ कोका यांनी या कटात भाग घेतला होता आणि इतर अनेक सरदार यात सामील झाले होते.

## कट फसतो

दुसऱ्या दिवशी नेहमीप्रमाणे सलीम बादशहाच्या भेटीला येईल तेव्हा त्याला पकडून कैद करण्याचे मानसिंग, अझीझ कोका आणि इतर सरदारांनी ठरवले. हा बेत सिद्धीस जाण्यासाठी साम्राज्याचा मुख्य वजीर (वकील) अझीझ कोका याने किल्यातल्या सर्व मुख्य मुख्य जागांवर आपले अधिकारी नेमले. सलीमचा पाडाव करून खुश्रूला गादीवर बसवण्याच्या या कटाला अकबराची संमती मिळाली असती तर तो नक्कीच यशस्वी झाला असता; पण याच वेळी कटाच्या पुढाऱ्यात दोन तट पडले एक खुश्रूच्या बाजूचा व एक सलीमच्या बाजूचा यामुळे अचानक घाला घालण्याचा कट गुप्त राहू शकला नाही. कटाची बातमी मीर झिया उल् मुल्क काझवीनी याने सलीमला दिली. यावेळी सलीम आपल्या घरून निघन किल्याजवळच्या बुरजाच्या पयाथ्याशी बोटीतून उतरण्याच्या तयारीत होता. कटाची बातमी कळताच तो आपल्या वाड्यात निघून गेला आणि तेथून तो दिवसभर बाहेर फिरकला नाही.

कटाचे गुपित फुटल्यावर अझीझ कोका आणि मानसिंग यांनी उघडपणे खुश्रूच्या बाजूने प्रचार करण्यास सुरुवात केली. दरबारातल्या वरिष्ठ सरदारांच्या

आणि अधिकाऱ्यांच्या बैठकीत ते म्हणाले, " राजपुत्र सुलतान सलीमचे चारित्र्य आपणा सर्वांना माहीतच आहे. बादशहाला त्याच्याबद्दल काय वाटते हे पण सर्वांना ठाऊक आहे. त्याने आपल्या मागून गादीवर येऊ नये अशीच बादशहाची इच्छा आहे. तेव्हा आपण सर्वांनी एकत्र येऊन खुश्रूला गादीवर बसविले पाहिजे " सैदखान छकटाई याने या गोष्टीला विरोध केला. तो रागाने म्हणाला, " राजपुत्र सलीम शहा जिवंत असताना त्याच्या मुलाला गादीवर बसवावे असे तुम्ही म्हणता काय ? ते होणे सर्वस्वी अशक्य आहे कारण ते छकताई तार्तारांच्या कायद्याच्या व रीतिरिवाजाच्या विरुद्ध आहे. " अशा तऱ्हेने वादाला तोंड लागले. सैक खान, मलिक खैर आणि इतर पुष्कळ लोकांनी सभात्याग केला आणि सभेचा शेवट गोंधळात झाला. अझीझ कोकाला फार राग आला, पण तो काही बोलला नाही.

## दरबाराचा सलीमला पाठिंबा

अशा रीतीने कटाचे पारडे फिरल्याचे पाहून अकबराचा विश्वासू अधिकारी व सलीमचा पक्षपाती राजा रामदास कछवा याने आपले शूर रजपूत शिपाई सलीमच्या वतीने खजिन्याचे रक्षण करण्यासाठी उभे केले. फरीद बुखारी या नावाने ओळखला जाणारा मूर्तीझा खान आणि बऱ्हाचे सय्यद यांनी उघडपणे सलीमला पाठिंबा जाहीर करून त्याच्या वाड्यात प्रस्थान ठेवले. मिर्झा-शरीफ मुताविद खान आणि बहुतेक इतर सर्व सरदार सलीमला जाऊन मिळाले. यावेळी सलीम आपल्या काही मूर्ख सहकाऱ्यांचा सल्ला घेऊन जलमार्गाने अलाहाबादला जाण्याच्या तयारीत होता. इतक्यात हे सरदार आपल्या फौजेनिशी त्याला येऊन मिळाले आणि खुश्रूचे अनुयायी दरबारातील सरदार मंडळींचा पाठिंबा न मिळाल्यामुळे आपापल्या जागी पांगले गेले आहेत अशी बातमी त्यांनी सलीमला दिली. थोड्या वेळाने अझीझ कोका घाबरतच सलीमला भेटायला गेला; पण मानसिंग मात्र आपला भाचा खुश्रूला घेऊन आपल्या घरी गेला आणि तेथून जलमार्गाने बंगालला जाण्याची तयारी त्याने केली. इस्लामचे रक्षण करून मी आपला मुलगा खुश्रू आणि त्याचे पक्षपाती यांना माफी देईन असे वचन सलीमच्या वाड्यात जमलेल्या मुसलमान सरदारांनी त्याला घ्यायला लावले असे म्हणतात. सलीमने आपले वचन मोडले नाही.

## अकबराचा मृत्यू

अशा रीतीने सरदारांच्या मदतीची खात्री झाल्यावर सलीम बापाची शेवटची भेट घेण्यास निघाला. यावेळी अकबराची प्रकृती अतिशय बिघडली असून त्याला श्वास लागला होता. त्याची वाचा बंद झाली असली तरी शेवटपर्यंत तो शुद्धीवर होता. सलीमने बापापुढे लोटांगण घालताच बादशहाने डोळे उघडले आणि सलीमच्या अंगावर बादशाही वस्त्रे आणि फेटा चढवून हुमायूनची कटयार त्याच्या कमरेला बांधावी अशी खूण त्याने जवळच्या सेवकांना केली. हे सर्व झाल्यावर राजपुत्राने पुन: एकदा बादशहाला साष्टांग नमस्कार घातला. अकबराने पण थोडे पुढे झुकून त्याचा स्वीकार केला आणि नंतर काही वेळाने तो मरण पावला. १५ ऑक्टोबर १६०५ (जुने पंचाग) या दिवसानंतरच्या रात्री अकबराला मृत्यू आला. यावेळी नुकतीच त्याला ६३ वर्षे पुरी झाली होती. त्याने एकंदर ४९ वर्षे ८ महिने आणि ३ दिवस राज्य केले. त्याला तीन मुलगे आणि तीन मुली होत्या, मुलांपैकी मुराद आणि दानियल हे दोघेही त्याच्या आधीच दारूच्या व्यसनाला बळी पडून मेले होते. राहिलेला सलीम "जहांगीर" हे नाव घेऊन त्याच्या पश्चात् गादीवर बसला. त्याच्या मुलींपैकी शहाझाद खान्‌म (खानम् सुलतान) आणि शुक्रुन्निसा बेगम यांची लग्ने झाली होती; पण आरम बानू बेगम ही शेवटपर्यंत अविवाहितच राहिली. जहांगीरच्या कारकीर्दीत तिला मृत्यू आला.

अकबराच्या मृत देहाला स्नान घालून त्याचे शव मुसलमान पद्धतीप्रमाणे कपड्यात लपेटण्यात आले. आग्र्यापासून पश्चिमेस ६ मैलांवर असलेल्या सिकंद्रा या गावी ते मोठ्या समारंभाने दफन पेटीतून नेण्यात आले. सलीमने सर्वप्रथम दिवाणी आम पर्यन्त या शव पेटीला पायाच्या बाजूने खांदा दिला; नंतर एकामागून एक अशा मोठ्या सरदारांनी खांदा देऊन ही पेटी मोठ्या इतमामाने सिकंद्रा येथे नेली. तेथे बादशहाने स्वत:साठी एक राजेशाही कबरीचा पाया आधीच बांधून ठेवला होता. त्याच्या मृत्यूमुळे सगळीकडे दु:खाचे सावट पसरले.

यावेळी पोर्तुगीज जेजुइट लोक आग्र्याला होते. त्यांच्यापासून मिळवलेल्या माहितीच्या आधारे दु यारीक लिहितो, "बादशहा जसा जगला तसाच मेला. जिवंत असताना त्याने कुठल्या धर्माचे पालन केले हे जसे कोणाला समजले नाही तसेच त्याचा मृत्यू कोणत्या धर्मात झाला हे पण कुणाला समजले

नाही." आयुष्याच्या अखेरच्या २५ वर्षांत अकबराने कुठलाच धर्म हा आपला आहे असे मानले नव्हते. ईश्वरावर संपूर्ण श्रद्धा ठेवून त्याने सर्व धर्मांबद्दल सारखाच आदर दाखवला. या गोष्टीचे जेजुइट लोकांना मोठे आश्चर्य वाटले. कारण प्रस्तुत चालू असलेल्या कुठल्याच धर्माचा स्वीकार न करता माणसाला राहाता येते ही गोष्ट त्यांच्या विचार शक्तीच्या बाहेरची होती. "त्याच्या डोळ्यावरचे नास्तिकतेचे झापड दूर करण्यात किंवा येशूच्या पवित्र धर्मात मृत्यू प्राप्त करून घेण्याचा मार्ग त्याला दाखवून देता आला नाही" याची त्यांना फार खंत वाटली.

# प्रकारण २० वे

## अकबराचे व्यक्तिमत्त्व आणि स्वभावविशेष

### अकबराचे रूप :

अकबराची समकालीन तीन यथार्थ शब्दचित्रे आपल्याला आढळून येतात. फादर मॉनसेराट हा इ. स. १५८० च्या फेब्रुवारी महिन्यात अकबराला भेटला आणि जवळजवळ दोन वर्षे तो त्याच्या निकट सान्निध्यात होता. याने केलेले अकबराचे वर्णन उपलब्ध आहे. त्याचा मुलगा जहांगीर आणि तिसऱ्या ख्रिश्चन शिष्टमंडळातले जेजुइट, खास करून जेरोम झेवियर यांनी पण अकबराचे शब्दचित्र रेखाटले आहे. दु यारिक याच्या 'Histoire' या ग्रंथात जेरोम झेवियरने केलेले अकबराचे वर्णन पाहावयास सापडते. या तिघांच्या वर्णनात अकबराची निकोप प्रकृति आणि सुदृढ बांधा यांचा उल्लेख केलेला आढळतो. त्याच्या नजरेत असा काही भारदस्तपणा होता की, त्याला पाहाताच आपण एखाद्या राजपुरुषाच्या पुढे आहोत असे लोकांना वाटत असे. आपल्या बापाबद्दल जहांगीर लिहितो, "रुबाबदार दिसणारा अकबर फार उंच नाही आणि फार ठेंगणा नाही अशा मध्यम शरीरयष्टीचा होता. साधारण मानाने तो उंच होता असे म्हणण्यास हरकत नाही. त्याची कांती गव्हासारखी होती. त्याचे डोळे काळे व भुवया पण काळाचाभोर असून तो रंगाने सावळा होता. त्याची छाती रुंद आणि हात लांब होते. एखाद्या सिंहासारखी त्याची शरीरयष्टी ( वाघाप्रमाणे कंबरेत बारीक. ) होती. त्याच्या नाकाच्या डाव्या बाजूस अर्ध्या वाटाण्याच्या आकाराचा तीळ असून तो फार सुंदर दिसत असे. चेहऱ्यावरून भविष्य सांगणाऱ्या लोकांच्या मते हा तीळ मोठ्या भाग्याचे आणि उज्जल यशाचे लक्षण होते. त्याचा आवाज फार मोठा असून बोलताना किंवा एखादा मुद्दा सांगताना त्याला एक विशिष्ट गांभीर्य येत असे. बोलण्याचालण्यात तो चार-चौघांपेक्षा फार निराळा आणि उठून दिसत असे, आणि प्रत्यक्ष ईश्वराची खास कृपा त्याच्या व्यक्तित्वात उघड दिसत असे."

सलीमने वडिलांचे असामान्य रुबाबदार व्यक्तिमत्व खालील दोन ओळीत साकार करण्याचा प्रयत्न केला आहे. "बादशहाचे वागणे मोठे भारदस्त असून

तो राजवंशातला आहे असे वाटे. सुलेमानने स्वतःच जणू काही त्याच्या बोटावर अंगठी चढवली आहे असा भास होई. ''

१५८० साली अकबर ३७ वर्षे आणि ७ महिन्यांचा असताना मॉनसेराटने त्याचे खालीलप्रमाणे वर्णन केले आहे. '' या राजाची चेहरेपट्टी आणि देहयष्टी कुठल्याही राजास शोभावी अशीच आहे. प्रथमदर्शनींच हा राजा असावा असा विचार पाहाणाऱ्याच्या मनात येतो. त्याचे खांदे रुंद असून त्याचे पाय घोडेस्वारास योग्य असे थोडेसे आत वाकलेले आहेत. रंगाने तो सावळा असून उजव्या खांद्याकडे डोके किंचित् झुकते ठेवण्याची त्याची लकब आहे. त्याचे कपाळ मोठे आणि डोळे इतके चमकदार आहेत की सूर्यकिरणात चकाकणाऱ्या समुद्रासारखे ते दिसतात. सौरोमाटी, सिनाई, निफोनी आणि इतर उत्तर आशियातल्या लोकांप्रमाणे त्याच्या पापण्या लांब आहेत. त्याच्या भुवया तितक्याशा उठून दिसत नाहीत. त्याचे नाक सरळ असून लहान असले तरी तरतरीत दिसते. ओठाच्या वरती डाव्या नाकपुडीखाली त्याच्या चेहऱ्यावर एक तीळ आहे. तो दाढी ठेवत नाही; पण वयात न आलेल्या तुर्की मुलाप्रमाणे मिशा राखतो (वयात आलेले बहुतेक तुर्की लोक दाढी ठेवायला लागतात). आपल्या जातीच्या रिवाजाप्रमाणे तो केस कापत नाही आणि टोपी न वापरता फेटा बांधतो. त्याचे लांब केस या फेटचाखाली झाकलेले असतात. हिंदू चालीरीतींचा मान राखण्यासाठी आणि हिंदू प्रजेला खूष ठेवण्यासाठी तो हे करतो असे म्हणतात. त्याच्या डाव्या पायाला जरी कसलीच इजा पोचली नसली, तरी तो त्या पायाने किंचित् लंगडत चालतो. शरीराने तो रोड किंवा लठ्ठ नसून त्याचा एकंदर बांधा मोठा सुडौल आहे. तो शरीराने काटक व स्वभावाने आनंदी आहे. तो हसू लागला त्याचा चेहरा विचित्र दिसू लागतो. एरवी त्याचा चेहरा शांत आणि खुल्या प्रकृतीचा भारदस्त दिसतो. रागात आला म्हणजे त्याच्या चेहऱ्यावर असे विलक्षण तेज़ दिसू लागते की पहाणारा भयचकित होऊन जातो.

**पोषाख :**

इतर मुसलमानांप्रमाणे आणि खास करून उलेमाप्रमाणे लोकरीचे किंवा सुती पायघोळ आंगरखे अकबर घालीत नसे. सुंदर जरी–काम केलेले रेशमी कपडे तो वापरी. त्याचा झगा आखूड, गुडघ्यापर्यंत लांब असे. त्याचे जोडे घोटे झाकून टाकीत असत. त्याच्या पागोटयावर मौल्यवान् रत्ने लावलेली असत आणि तो मोत्याचे, सोन्याचे व रत्नांचे दागिने अंगावर घालीत असे.

अकबराच्या दरबारातील जेजुईट पाद्रयांचा हवाला देऊन डू यारिक लहितो ।–, "त्याच्या झग्याच्या कापडात जरतारी धागा विणलेला असे. त्याचा झगा गुडघ्यापर्यंत पोहोचतो. त्याचे मोजे आपल्या सारखेच असत पण त्याचे जोडे मात्र त्याने स्वत:च तयार केलेल्या विशिष्ट नमुन्याबरहुकूम असत. डोक्यावर पुष्कळ मोत्यांच्या किंवा रत्नांच्या माळा तो घालीत असे. युरोपीय पेहराव त्याला फार आवडत असे. कधी कधी तो पोर्तुगीजांप्रमाणे काळ्या मख-मलीचा पोषाख हौसेने घालीत असे; पण हा पोषाख तो फक्त खाजगी प्रसंगीच वापरी, मोठ्या समारंभाच्या वेळी नाही." एखादी कटचार किंवा तलवार कंबरेला कसलेली किंवा हाताशी चोवीस तास असे. एक सशस्त्र शरीररक्षक त्याच्याबरोबर नेहमी असे. बादशहाने मागितल्यास त्याला हवे ते हत्यार तो देत असे.

## अकबराचे बोलणे चालणे :

अकबराचा चेहरा हजार लोकांत उठून दिसण्यासारखा असून त्याचा स्वभाव गोड आणि एकंदर वागणे आल्हाददायक होते. "बादशहाच्या अंगी इतके गुण आहेत की, मला त्याचे योग्य वर्णन करता येत नाही. त्यांची जंत्री कर-ण्यास मोठे ग्रंथसुद्धा अपुरे पडतील." असे अबुल फझल म्हणतो. जहांगीरने पण आपल्या बापाविषयी असे लिहून ठेवले आहे. तो म्हणतो, "माझ्या पूज्य वडिलांचे गुण साधारण मान्यतेच्या किंवा स्तुतीच्या पलीकडले आहेत. मुलाने बापाकडे बघण्याची दृष्टी बाजूस ठेऊन कुठलीही अतिशयोक्ती न करता त्याच्या सग्दुणांविषयो ग्रंथ लिहिले, तरी सुद्धा प्रत्यक्ष वस्तुस्थितीच्या मानाने लिहिण्यात फारच थोडे उतरले, असे दिसून येईल."

अकबराची राहाणी साधी आणि भारदस्त व अबोल होती. उगीच बडबड करण्याची त्याला सवय नव्हती; पण जे बोलावयाचे ते थोडक्यात विचार करून आणि स्पष्ट शब्दांत तो सांगत असे. वस्तुत: तो उत्तम वक्ता होता असे जेजुइट पाद्रयांनी मुद्दाम लिहून ठेवले आहे. त्याचा स्वभाव विनोदी असून बोलणे मुद्देसूद आणि मार्मिक व हजर जबाबी असे. काही काही वेळा तो रागाने बेभान होऊन अत्यंत क्रूर शिक्षा देत असे; पण असे प्रसंग क्वचितच येत आणि आले तरी फार वेळ टिकत नसत. आमजनतेशी संपर्क ठेवून लोकाची सुखदु:खे स्वत: समजावून घेण्याचा त्याचा प्रयत्न असे. स्वारीवर असताना किंवा मुक्कामात शेकडो लोक त्याला येऊन भेटत असत आणि तो त्यांच्याशी

प्रेमाने बोलत असे. या त्याच्या गुणांमुळे तो ताठरपणा न दाखवता मनमिळाऊ वृत्तीने सर्व थराच्या लोकांत, खास करून हिंदुस्थानातल्या सामान्य जनतेत अत्यंत लोकप्रिय झाला होता. दरबारात असला काय किंवा ग्रामीण प्रदेशात स्वारीवर किंवा मौजेच्या सहलीवर असला काय, हजारो लोक त्याच्या दर्शनासाठी गोळा होत.

परदेशी पाहुण्यांना अकबर विशेष आदराने वागवत असे. "परदेशी लोकांशी त्याची वागणूक फार सौजन्याची व प्रेमळ असे. विशेषत: परदेशी राजांचे वकील आणि स्वदेशातून हाकून दिलेले त्याच्या आश्रयास आलेले इतर देशांतील राजे, यांच्याशी तो फार सभ्यतेने वागे." असे मॉनसेराट लिहितो.

## अकबराचे खाणेपिणे

३८ वर्षांचा झाला नव्हता तेव्हा पासूनच खाण्यापिण्यात अकबर फार संयम राखू लागला. मांसाहार त्याने हळूहळू कमी केला. नंतर वर्षातील तीन महिन्यांपेक्षाही जास्त काळ तो अजिबात बंद केला. "तो मिताहारी असून वर्षातून तीन-चार महिनेच मांसाहार करीत असे. इतर वेळी दूधभात आणि मिठाई हाच त्याचा आहार असे." असे डू जारिक म्हणतो. "लहानपणापासूनच मला मांसाहाराची आवड नव्हती. यात मी प्राणीमात्रावर दया करावी असा ईश्वराचा हेतू असावा." असे अकबर म्हणत असे. हिंदू आणि जैन लोकांशी संबंध आल्यावर त्याने राज्यात गोवधाला बंदी केली आणि वर्षातून काही ठरलेल्या दिवशी प्राणिहत्येला आणि शिकारीला सर्वस्वी मनाई केली. हा मनाई हुकूम वर्षातील अनेक महिने जारी असे. अकबर बहुतेक दिवसांतून एकदाच दुपारच्या वेळी यथास्थित भोजन करी. आणि त्यासाठी नाना तऱ्हेची पक्वान्ने तयार होत असत. "त्याचा जेवणाचा थाट मोठा असून त्याच्यात जवळ जवळ चाळीस निरनिराळे पदार्थ असत. हे सर्व पदार्थ मोठमोठाल्या थाळ्यांतून वाढले जात. पांढऱ्या स्वच्छ कपड्यात बांधून आणि त्यावर खानसाम्याचे शिक्कामोर्तब होऊन मुदपाक खान्यातून ते भोजनगृहात येत असत. असे करण्याचे कारण म्हणजे त्यात कोणी वीष वगैरे कालवू नये हे होते. हुजरे लोक हे अन्न घेऊन जेवण घराच्या दारात येत असत. त्यांच्या पुढे इतर नोकर व मागे खाजगीतला प्रमुख

कारभारी असे. खास मोठ्या सार्वजनिक मेजवानीचा बेत नसल्यास अकबर आपल्या खाजगी दालनातच जेवण घेई." असे मॉनसेराट म्हणतो. तरुण वयात अकबर मद्यपान आवडीने करीत असे, पण नंतर त्याने दारू पिणे जवळ-जवळ सोडून दिले होते. अफू खाण्याची पण त्याला सवय होती. पण ती तो कुठल्यातरी पेयात घेत असावा. टरबूज, द्राक्षे, डाळिंबे यांसारखी फळे त्याला फार आवडत. तीन तासांहून अधिक तो झोपत नसे. "झोपेमुळे शरीर-प्रकृती चांगली राहाते हे जरी खरे असले, तरी आयुष्य ही सगळ्यात मोठी ईश्वरी देणगी असून तिचा उपयोग शक्यतोवर जागतेपणी करावा," असे तो म्हणे. एकंदरीत त्याचे सर्व आयुष्य नियमित आणि संयमी असून खाणेपिणे माफक आणि बेताचे असे. "परमेश्वराचे कार्य करण्यासाठी माणसाने अन्न व निद्रा घ्यावी. मूर्खासारखे त्याच्यासाठीच जगू नये." असे अकबराचे ब्रीदवाक्य होते.

## शिकार खेळ वगैरे

हिंस्त्र पशूंच्या शिकारीची आणि खेळांची आवड अकबराला लहानपणा-पासूनच होती. त्याची एकंदर वृत्तीच बसून राहाण्याची नव्हती. काबूलमध्ये असताना तो आपला बहुतेक सर्व वेळ घोड्यावर व उंटावर बसणे, कुत्र्यांना शिकवणे आणि निरनिराळ्या प्राण्यांची शिकार करणे यात घालवत असे. घोडे आणि कुत्री त्याला शेवटपर्यंत फार आवडत असत, पण १५५५ मध्ये बापाबरोबर हिंदुस्थानात परत आल्यावर त्याला हत्तीचे अतिशय आकर्षण वाटू लागले. आपल्या माहुतांना दाद न देणाऱ्या मदोन्मत्त हत्तीच्या पाठीवर बसून तो त्यांना काबूत आणीत असे. शिकवलेल्या हत्तींच्या मदतीने मस्त हत्ती काबूत आणताना अनेकदा त्याचा जीव धोक्यात पडलेला होता. रानटी हत्ती, घोडे आणि इतर जनावरांना शिकवण्याच्या प्राणघातक उद्योग मी सतत करतो; कारण मी काय करतो ते ईश्वराला पसंत नसल्यास अशा प्रसंगी अपघात होऊन मी मरून जाईन, असे तो म्हणत असे. काही वेळा कऱ्यामध्ये (कमर्गा) अनेक प्राणी कोंडून त्यांची तो शिकार करीत असे. हाकारे पाठवून ५०–६० मैलांवरचे जंगली प्राणी रिंगणात एकत्र जमवून बादशहा आणि त्याचे सरदार धनुष्यबाण, भाला, तलवार किंवा बंदुक यांनी त्यांची शिकार करीत असत. अकबर स्वतः इतका बेडर वृत्तीचा होता की तो पायी चालत जाऊन जंगलात वाघांची आणि तत्सम हिंस्त्र प्राण्यांची शिकार करत असे. तो वीस वर्षांचाही नव्हता तेव्हा

एकदा नारवारच्या जंगलात त्याला एक वाघीण सामोरी आली आणि अकबराने तलवारीच्या एका घावासरशी तिला ठार मारले. पोलो खेळण्याची त्याला फार आवड होती. कधी कधी रात्रीसुद्धा खैराचे चेन्डू घेऊन तो हा खेळ खेळत असे. निरनिराळ्या प्राण्यांच्या लढाया लावून राजवाड्यातल्या सज्जामधून त्या पाहात बसणे हा त्याचा आवडता छंद होता. दरबारातले सरदार, अधिकारी आणि सामान्य रहिवाशी यांनाही त्या पाहाण्यासाठी आमंत्रण असे. कोंबड्यांची लढाई, काळवीटांची लढाई, रेड्यांची लढाई, हत्तींची लढाई अशा नाना तऱ्हेच्या प्राण्यांच्या लढाया बादशहासमोर होत असत. गाणे बजावणे, मुष्टियुद्ध, द्वंदयुद्ध, जादूचे प्रयोग हे पण पाहायला त्याला आवडत असत. अनेक तऱ्हेचे पक्षी, खास करून कबुतरे, त्याला आवडत आणि ती उडताना पाहाण्यात त्याला फार गंमत वाटे. हा त्याचा नाद आयुष्याच्या अखेरपर्यन्त कायम होता. ऑगस्ट १६०२ मध्ये अबुल फझलला मारल्याची बातमी आली तेव्हा तो आपल्या कबुतरांबरोबर खेळत होता असे म्हणतात. पण त्याने आपली खेळांची आवड कधीही राज्यकारभाराच्या आड येऊ दिली नाही. किंबहुना नाना तऱ्हेचे खेळ पाहात असतानाच सरकारी कामकाजाबद्दल त्याचे विचार चालू असत, असे बारिक सारिक गोष्टींची नोंद करणाऱ्या जेसुईट पादऱ्यांनी म्हटले आहे. मॉनसेराट लिहितो, "अशा वेळी तो सार्वजनिक कामकाज बाजूला ठेऊन मजेत असावा असे वाटे; पण यावेळीही त्याच्या मनात राज्यातल्या महत्त्वाच्या कामांचे विचार चालू असत."

अकबराने वाघ व तत्सम अनेक हिंस्त्र श्वापदे पाळली होती. जहांगीरच्या म्हणण्याप्रमाणे बादशहाच्या शिकारखान्यात १००० चित्ते होते. त्यांना शिकवून शिकारीच्या वेळी त्यांचा उपयोग करण्यात येई. तसेच पाळीव हरिणांच्या करवी रानटी हरणे पकडण्यात येत. ही पाळीव हरणे आग्रा आणि फत्तेपूर सिक्रीच्या शिकारखान्यात असत. बादशहा स्वारीवर निघाला की त्याच्याबरोबर वाघ आणि चित्ते असत. पुष्कळ वेळा मिरवणुकीत किंवा समारंभाच्या वेळी त्यांचे प्रदर्शन करण्यात येई. बदकशानचा सुलेमान मिर्झा बादशहाच्या भेटीस आला, तेव्हा रस्त्यावर दुतर्फा पिंजऱ्यात कोंडलेले चित्ते ठेवलेले होते. हत्ती आणि घोडे यांना अर्थातच फार महत्त्व होते; कारण घोडदळ व हत्ती म्हणजे अकबरातच्या सैन्यातला एस प्रमुख भाग होत. हजारो घोडे, हत्ती, आणि उंट राहतील असे मोठमोठे तबेले फत्तेपूर सिक्रीला राजवाड्याजवळ बांधलेले होते. त्यांची बादशहाकडून नियमित पाहणी होत असे. त्या सर्वांना

नावे दिलेली असून बादशहा प्रत्येक प्राण्याला त्याच्या नावाने ओळखत असे. त्यांच्या खाण्यापिण्याकडे बादशहा जातीने लक्ष पुरवी आणि त्यापैकी कोणी रोड झाला आहे काय याकडे त्याचे लक्ष असे. या प्राण्यांवर देखरेख करण्यासाठी ठेवलेल्या माणसांना, ते आपले काम कसे करतात ते पाहून बढती दिली जाई किंवा कमी करण्यात येई.

**औपचारिक निरक्षरता –**

हुमायूनला अनेक वर्षे हद्दपारीत आणि शत्रुशी झगडण्यात घालवावी लाग–ल्यामुळे अकबराचे बालपण कष्टात गेले काबूल जिंकल्यानंतर हुमायुनाचे सर्व कुटुंब एकत्र आले आणि त्यानंतर अकबराच्या शिक्षणाची खरी सुरुवात झाली; पण अकबर हा स्वभावाने हूड असून त्याला शिकण्याची मुळीच आवड नव्हती, त्यामुळे जन्मभर तो निरिक्षरच राहिला. अकबराला लिहिता येत नसले, तरी तो अगदीच निरक्षर नव्हता आणि त्याला वाचता येत होते हे सिद्ध करण्याचे प्रयत्न अलीकडे काही लोकांनी केले आहे. १ण त्याला लिहिता वाचता येत नव्हते याला भरपूर पुरावा सापडतो.

"अकबराचे शुद्ध अंतःकरण आणि पवित्र आत्मा शिक्षणाच्या बाह्योपचारा–कडे कधीच वळले नाहीत." असे अबूल फजल कबूल करतो. लिहिता वाचता येत नाही याची शरम वाटण्याचे कारण नाही, असे अकबरही मानीत असे, या विषयी तो स्वतः म्हणतो, "ईश्वराचे सर्व प्रेषित निरक्षरच होते. तेव्हा प्रत्येक श्रद्धाळू माणसाने आपला एक तरी मुलगा या स्थितीत ठेवावा." आपल्या वडिला विषयी नेहमी आदराचे उद्गार काढणारा जहांगीर हा या विषयी कांय लिहितो ते लक्षात घेण्यासारखे आहे. अकबर निरक्षर होता असा शिक्का मार–ण्यात त्याचा काही वैयक्तिक हेतू असल्याचे कारण दिसत नाही. तेव्हां याबद्दल त्याचे विधान डावलून चालणार नाही. तो म्हणतो, "सर्व धर्मांतल्या आणि पंथांतल्या विद्वान मंडळी बरोबर खास करून हिंदुस्थानातले पंडीत आणि विद्वान यांच्याबरोबर बादशहाचा कायचा संपर्क असे. यामुळे त्याचे ज्ञान इतके वाढले होते की, निरक्षर असूनसुद्धा तो निरक्षर आहे हे कोणाला समजून सुद्धा येत. नसे. तसेच गद्य आणि काव्य यांतले बारकावे पण त्याला समजत असत" त्या–

N. N. Law, Promotion of Learning in India during Muhammadan Rule, PP. 139–143; M. L. Roychaudhari, Indian Historical Quarterly, Vol. XXII, No 1; P. 81.

मुळे या माणसाला लिहिता वाचता येत नाही असे कोणालाच वाटत नसे. या संदर्भात मॉनसेराट लिहितो" अनेक कठीण प्रश्नांची सुंदर चर्चा करून बादशहा आपल्या निरक्षरतेवर मात करीत असे ( खरे पाहता त्याला लिहिता वाचता मुळीच येत नाही. ) अकबराच्या सहवासात अनेक वर्षे घालवले लेजेजुइट मिशनरी जेरोम झेवियर आणि इम्यान्युएल पिनहिरो हे पण "अकबर निरीक्षर होता" असे पुन: पुन: म्हणतात. डुयासिक म्हणाले. "बादशाहला लिहिता वाचता येत नव्हते. तरीसुद्धा राज्यातली खडान खडा माहिती त्याला असे.

**अकबराची ज्ञानलालसा :–**

लिहिता–वाचता येत नसेल. तरी अकबर मोठा बहूश्रुत आणि विद्वान होता. त्याच्या ग्रंथालयात २४००० वर उत्कृष्ट हस्तलिखित ग्रंथ असून त्यामध्ये वाङ्मय काव्य, इतिहास, तत्वज्ञान, मानसशास्त्र, ज्योतिष, धर्मशास्त्र इत्यादी विषयावरील उत्तमोत्तमग्रंथ होते. अकबर नियमीतपणे कोणाकडून तरी हे ग्रंथ वाचवून घेई या सर्व ग्रंथाची किंमत जवळ जवळ ६४ लक्ष ३३ हजार ७३१ रु. होती. अकबराला पुस्तकाचे फार वेड होते. बादशहाच्या ग्रंथालयातून नेलेले पुस्तक वेळेवर परत केले नाही म्हणून तो बदायुनीवर तो एकदा नाराज झाला होता. निरनिराळी शास्त्रे व कला जाणणारे विद्वान लोक, तसेच तत्वज्ञ, धर्मशास्त्रज्ञ आणि कवि याना बोलावून घेऊन तो त्यांच्या बरोबर अनेक विषयाची चर्चा करीत असे. त्याची स्मरणशक्ती फार दांडगी असल्यामुळे वाचून दाखवलेले किंवा विद्वान मंडळींकडून ऐकलेले सर्व त्यांच्या लक्षात राहत असे यामुळे धर्म आणि तत्वज्ञान यात अतिशय कठीण मुद्याविषयी सुद्धा तो इतकी मार्मिक चर्चा करीत असे की तो निरक्षर आहे असे कोणाला वाटत सुद्धा नसे. मॉनसेराट लिहितो "अकबर ज्ञानाचा फार भोक्ता व पुरस्काती असून त्याच्याभोवती विद्वान मंडळीचे नेहमी कोंडाळे असे. धर्म आणि तत्वज्ञान इत्यादी विषयांवर त्यांना चर्चा करण्यास सांगे आणि त्यांच्याकडून जगात होऊन गेलेले थोर राजे आणि अविस्मरणीय घडामोडी बद्दल माहिती करुन घेई. त्याची स्मरणशक्ती आणि सारासार विचार शक्ती चांगले असून अनेक विषयावरील चर्चा एकाग्रतेने ऐकून त्याने आपल्या ज्ञानात खूप भर घातली होती. अनेक कठीण विषयांची उत्तम मांडणी करुन

◈ ऐन अकबरी भाग ३ (दुसरी आवृत्ती ). पान ३३२ "त्या युगाच्या राज्याची अकलनशक्ती बुद्धिसाध्य किंवा प्रयत्न करुन मिळवलेली नव्हती. ज्यात मानवी प्रयत्नाचा काहीच भाग नाही अशी ती एक इश्वरदत्त देणगी होती अशी पुस्ती अबूल फजल अकबराच्या विधानास जोडतो ( पाहा अकबर नामा, भाग १, पान ५८९

तो आपल्या निरक्षतेवर मात करीत असे ( त्याला लिहिता–वाचता मुळीच येत नाही.) अनेक विषयावरील त्याची मते तो इतक्या खुबीने प्रगट करीत असे की, हा माणूस निरक्षर नसून मोठा पंडीत आहे असेच त्याबद्दलची माहिती नसणाऱ्यास वाटावे तसा तो आहे यात शंकाच नाही. कारण बुद्धी आणि संभाषणचातुर्य यामध्ये तो आपल्या अनेक विद्वान प्रजाजनातही मागे टाकतो. या उपरांत एखाद्या राजाला साजेसा अधिकार व भारदस्तपणा त्याच्या जवळ आहे तो निराळाच साहित्य विषयावर चर्चा करण्यासाठी विद्वान लोक त्याच्याभोवती रोज जमतात.''

अकबर हा फार गुणी राजा होता. त्याला विद्येची आवड तर होतीच, त्या शिवाय तो अनेक वाद्ये वाजविण्यात कुशल होता, आणि चित्रकला व इतर कलांचेही त्याला थोडे बहुत ज्ञान होते.

**यांत्रिक वस्तू आणि हस्त व्यवसायाची आवड ;—**

तोफा ओतण्यासारख्या यांत्रिक कामाची अकबराला फार आवड होती. शिवाय सोनाराचे काम, गालिचे आणि रंगीत पडदे तयार करणे, याची पण त्याला आवड होती. कधी कधी तो इतर कामगाराबरोबर स्वत: हातात छिन्नी घेऊन दगडावर कोरीव काम करीत असे. “ एखाद्या साध्या कारागीराचे काम बघण्यात किंवा हौसेखातर करण्यात त्याला कमीपणा वाटत नसे त्यासाठी त्याने राजवाड्याजवळ एक छोटासा कारखाना उभा केला होता. याशिवाय तेथेच चित्रकला, सोनाराचे काम, गालिचे व पडदे अशी कला कुसरीची कामे व हत्यारे तयार करण्यासाठी छोटे छोटे कारखाने होते. या कारखान्याना भेट देऊन तेथील काम पाहण्यास तो पुष्कळ वेळ घालावी. आणि मनावरचा ताण कमी करी. – मॉनसेराट.

या विषयी दुयारिक आणखी लिहितो, “ एका घटकेत तो राजकारणात गुंतलेला किंवा प्रजाजनांच्या भेटी घेतांना आढळे. आणि लगेच दुसऱ्या घटकेला उंटाचे केस कापण्यात किंवा दगड फोडण्यात, झाडे तोडण्यात किंवा लोखंड ठोकण्यात गढलेला दिसून येई. हे सर्व करण्यात तो इतका रमून जाई की, तो प्रत्यक्ष स्वताच्या राज्यकारभारातच गुंतलेला आहे असे वाटावे. त्याने बंदूकीचे पुष्कळ नवे प्रकार शोधून काढले ज्या बंदुकीने चितोडच्या वेढचात जयमलला ठार मारले ती ‘ संग्राम ’ नावाची बंदूक त्याने स्वत: तयार केली होती, असे म्हणतात. पोर्तूगीज जेजुइट म्हणतात की, अकबराला केवळ राजकारण आणि

युद्धकलेची गाढ माहिती होती, असे नव्हे तर, अनेक यांत्रिक कलातही तो निष्णात होता. तोफा ओतण्याचे काम तो जातीने उभा राहून हौसेने पहात असे आणि नानातऱ्हेच्या तोफा आणि बंदुका ओतणारे कारागीर त्याच्या राजवाड्यात असत.

## अकबराचे खाजगी जीवन :—

अकबराचे बालपण कष्टात आणि दुर्दैवाच्या फेऱ्यात गेले पण नंतर त्याचे घरगुती जीवन फार सुखात गेले. लहानपणी तो केवळ आपल्या वडिलांचाचा नव्हे तर कुटुंबातल्या सर्व मंडळीचा फार आवडता होता त्यांच्याबर त्याच्या सावत्र आयांचे खास करून हाजी बेगमचे इतके प्रेम होते की लोक तिलाच चुकून हमीदा बानू बेगम समजत असत. अकबराचे पण तिच्यावर आणि गुलबदन बेगमसारख्या इतर स्त्रियावर फार प्रेम होते आणि त्यांच्या मृत्यू नंतर तो नेहमी त्याची आठवण काढत असे. हुमायुन अधिक जगला असता तर आणखी सेवा आपल्या कडून झाली असती असे त्याला अपल्या बापा विषयी वाटे. आपल्या आईवर त्याचे अतोनात प्रेम होते. तिला भेटण्यासाठी व आदराने तिचे स्वागत करण्यासाठी तो दूरवर जाई. सर्व तऱ्हेने, शक्य असेल त्या सर्व प्रकारे बादशहाने तिची उत्तम प्रकारे सेवा केली. आपल्या राजकीय धोरणात मात्र तो तिला हस्तक्षेप करू देत नसे. त्याचा दूधभाऊ मिर्झा हकीम याने अकबराविरुद्ध अनेक वेळा बंड केले. पण बादशहाने त्याला फार ममतेने वागविले. काबूलमध्ये पराभव झाल्याने मिर्झा हकीमला तिथल्या डोंगराळ मुलुखात आश्रयाला जावे लागले. तरी सुद्धा त्याने नंतर काबूलचे राज्य त्याला परत देऊन टाकले. त्याला योग्य ते शासन करावे असा बादशहास अनेकानी सल्ला दिला पण हकीम माझ्या वडीलाची स्मृती असल्यामुळे मला त्याच्या अंगावर हात टाकता येत नाही. असे तो म्हणाला आपल्या सर्व दायाना त्याने स्वतःच्या आई प्रमाणे वागविले. त्यांची मुले व इतर नातेवाईक यांच्यावर पण प्रेमाची पाखर घातली. महान अनगाच्या मृत्यू यात्रेबरोबर तो कांही अंतर चालत गेला आणि जिजी अंनगांच्या प्रेताला त्याने खांदा सुद्धा दिला. त्याचा दूधभाऊ अझीझ कोका त्याच्याशी पुष्कळ वाईट वागला. पण आम्हा दोघांमध्ये दुधाची नदी वाहात आहे, असे म्हणून त्याला योग्य ती शिक्षा देण्याचे त्याने टाळले. दूरदूरच्या नातेवाईकांना सुद्धा त्याने मुद्दाम होऊन मदत केली. बदक्शानचा मिर्झा सुलेमान याचे मोठे स्वागत करून एक मोठी रक्कम बादशहाने त्याच्या हवाली केली आणि हातातून गेलेला वडिलोपार्जित प्रांत परत मिळविण्यासाठी त्याला मदतीचे पण आश्वासन

दिले. सुलेमानचा नातू शहारुख मिर्झा याला त्याने आपल्या पदरी ठेवून घेऊन दरबारात मोठी अधिकाराची जागा दिली. मिर्झा हे बादशहाचे दूरचे नातेवाईक. गुजरातमध्ये आणि इतर ठिकाणीही त्यांनी बादशहाला वरचेवर पुष्कळ त्रास दिला. त्या सर्वांना बादशहाने माफी केली आणि मुझफ्फर हुसेन मिर्झाला आपल्या बाजूला वळवून घेऊन त्याला दरबारात मोठी जागा व आपली मोठी मुलगी लग्नात दिली. अकबर अत्यंत कर्तबगार आणि दूरदृष्टीचा व भक्कम चारित्र्याचा नसता, तर हकीम आणि मिर्झा यांच्या सतत बंडाळीमुळे व दगाबाजीमुळे बापाप्रमाणे तो पण हिंदुस्थानचे राज्य प्रसंगी गमावून बसला असता. अकबराने आपल्या सर्व मुलांना प्रेमाने वाढवून त्या काळात उपलब्ध असणारे सर्व उत्तम शिक्षण देऊन त्यांना राज्यकारभार करण्यास शिकविले. त्यांचे संगोपन, शिक्षण आणि चारित्र्य यावर तो जातीने नजर ठेवत असे. राजपुत्राना बाण आणि बंदुक मारणे, घोड्यावर बसणे इत्यादी कला शिकविण्यासाठी खास शिक्षक ठेवले आहेत, असे मॉनसेराट म्हणतो. मुरादचा शिक्षक म्हणून खुद्द मॉनसेराटचीच नेमणूक झाली होती. रोज वाचलेले आणि पाठ केलेले म्हणून दाखविण्यास बादशहा मुरादला सांगत असे. यामुळे हुरूप येऊन मुराद खूप अभ्यास करीत असे. मुराद हा एक चांगला शिष्य होता असे मॉनसेराट म्हणतो "बादशहाचे मुलांवर फार प्रेम असले, तरी कोणतीही गोष्ट झाली पाहिजे असे वाटल्यास तो मुलांना कडक ताकीद देत असे. याबाबतीत मुलांना रागावण्यास किंवा मारण्यासही तो कमी करीत नसे. शिष्याने काही अपराध केल्यास त्याला वाटेल ती शिक्षा करण्याची मुभा गुरुजींना होती." आपल्या मुलींसाठी पण योग्य शिक्षिका ठेवून बादशहाने त्यांना लिहिण्यावाचण्यास आणि इतर तऱ्हेने शिकविले. आपल्या सर्व मुलींवर बादशहाचे अतिशय प्रेम होते. त्यांतील एक मुलगी आराम बानू बेगम स्वभावाने रागीट होती. तिच्याबद्दल बादशहाने सलीमला सांगितले, "बाबा, मी मेल्यानंतर या तुझ्या बहिणींवर तू माझ्यासारखेच प्रेम कर, कारण ती माझी हिंदीत म्हणतात त्याप्रमाणे फार लाडकी आहे. तिच्यावर सदैव ममता करून तिचे बारिक सारिक अपराध पोटात घाल." अबुल फझल म्हणतो की, अकबराचे आपल्या नातवंडांवर मुलांपेक्षाही अधिक प्रेम होते.

## प्रेमळ मित्र :

अकबर आपल्या मित्रांबद्दल फार अगत्य दाखवित असे आणि दरबारच्या रीतिरिवाजांना धक्का न पोहोचू देता त्यांच्या घरी त्यांचा पाहुणचार घेऊन त्यांचा

मान राखत असे. त्यांच्या सुखदु:खात सहभागी होऊन एखादा मित्र मरण पावल्यास तो दु:खी होऊन अश्रू ढाळीत असे. सरहद्दीवरच्या टोळ्यांविरुद्ध लढत असताना बिरबल मरण पावल्यावर अकबर दोन दिवस अन्नपाण्याला शिवला नाही. आपल्या मित्राचा मृत देह हाती न लागल्याने त्याच्यावर हिंदू संस्कृतीप्रमाणे अन्त्यसंस्कार करता आले नाहीत, याचे त्याला फार दु:ख झाले; मृत्युशय्येवर पडलेल्या राजकवी फैजीच्या भेटीस जाऊन अकबराने अतिशय अगत्याने त्याच्या प्रकृतीची चौकशी केली. अबुल फझलच्या खुनाची बातमी कळताच त्याने तीन दिवस अन्न पाणी वर्ज्य केले. सलीमला हिंदुस्थानचे राज्यच हवे होते. तर त्याने अबुल फझलसारख्या निरपराधी माणसाचा खून करण्याऐवजी मलाच मारून टाकायला हवे होते, असे तो या दु:खद घटनेची आठवण आली की म्हणत असे. त्यावेळच्या एका रजपूत राजाबद्दल उपलब्ध असलेल्या दलपत–विलास या ग्रंथावरून असे दिसते की, तो निरनिराळ्या रजपूत जमातींच्या त्यांच्या छावण्यात भेटी घेऊन त्यांच्या मुलाबाळांची चौकशी करी आणि अशा तऱ्हेने त्यांच्याशी मैत्रीचे संबंध प्रस्थापित करी. स्त्रियांबद्दल अकबराचे काय मत होते ते त्यावेळच्या लिखाणावरून समजण्यासारखे नाही, पण इतके खास म्हणता येईल की, त्याचा जनाना मोठा असला तरी तो स्त्रीलंपट नव्हता. त्याचे वैषयिक जीवन नियमित होते. बदायुनी त्याचा टीकाकार, पण तीन भागांत लिहिलेला त्याचा प्रचंड ग्रंथ किंवा जेजुइट पाद्ऱ्यांनी लिहिलेलीअनेक पत्रे व इतर तत्कालीन साहित्य यात बादशहाने स्त्रियांबद्दल अपमानास्पद भाषा वापरल्याचा किंवा मत प्रदर्शित केल्याचा एकही उल्लेख आढळत नाही. अब्दुल कादीर बदायुनीच्या मुंताखाब–उत्-तवारीख यात बादशहाच्या रंगेलपणाचा एकच दाखला आढळतो. पण त्यावेळेस तो केवळ २० वर्षांचा तरुण होता. मध्ययुगीन फारसी आणि तुर्की लोकांच्या अनैसर्गिक शारीरिक संबंधाच्या व्यसनापासून पण तो मुक्त होता. इतकेच नव्हे तर अशा लोकांबद्दल त्याला नेहमी घृणा वाटे. अकबराला मुले आवडत आणि "जीवनातल्या बगिचातली ही छोटी छोटी रोपटी आहेत" असे तो म्हणे. यासाठी त्यांची योग्य ती काळजी घेऊन त्यांना चांगले शिक्षण द्यायला पाहिजे, असे तो म्हणत असे. बाप मेलेल्या अनेक उच्च कुटुंबातील मुलांचा सांभाळ करून त्याने त्यांना शिक्षण दिले आणि बादशहाची ही रीत इतर राजांनी अनुसरण्यासारखी आहे असे मॉनसेराट म्हणतो. अधूनमधून तो क्रूरपणाने वागे, पण एकंदरित पाहता त्याचे मानव जातीवरचे प्रेमच दिसून येते. युसफ झाओ रानटी टोळ्यांविरुद्ध युद्ध करण्यास गेलेल्या आपल्या सेनापतींना

तो असे सांगे की, "लहान मुलांची हत्या करू नका, कारण पुढे फळाला येणारे ते वृक्ष असून ईश्वराचा आधार आहेत. 'ज्याला जीव देता येतो त्यालाच हत्या करण्याचा अधिकार असावा. आणि जो जो आपल्या सद्सद्विवेक बुद्धीला स्मरून अशी हत्या करतो त्याला ईश्वराचा हवाला घेतल्याशिवाय गत्यंतर नाही." हे त्याचे ब्रीदवाक्य होते. वस्तुतः सर्व मनुष्य जातीवर आणि प्राणी मात्रांवर त्याचे प्रेम होते.

## आम जनतेबद्दल सहानुभूती :

दरबारातले सरदार आणि मांडलिक यांच्या संबधी अकबराची वर्तणूक इतकी कडक असावयाची की त्याच्याकडे डोके वर करून पाहण्याची कोणाची छाती होत नसें, पण सामान्य प्रजाजनांना तो फार ममतेने वागवी. बादशहा–समोर जाऊन आपली गऱ्हाणी सांगण्याची त्यांना पूर्ण मुभा होती. त्यांनी नजर केलेल्या वस्तू हातात घेऊन तो छातीशी धरत असे. ( आपल्या सरदारांनी दिलेल्या नजराण्यांचा त्याने इतक्या आदराने कधीच स्वीकार केला नाही. ) पुष्कळ वेळा अशा वस्तू आपण पाहिल्याच नाहीत असा बहाणा तो करी, पण तो केवळ प्रजाजनांना फसविण्याचा धोरणी भाग होता.

अकबराच्या लोकसंग्रहाविषयी मॉनसेराट म्हणतो, "सामान्य प्रजाजनांची तो किती सहज भेट घेत असे याचे यथार्थ वर्णन करणे अशक्य आहे. बहुतेक रोज तो आपल्या सरदारांना किंवा प्रजाजनांना स्वतःला भेटून संभाषण करण्याची संधी देत असे. आणि या सर्वांशी त्याचे बोलणे-चालणे कठोर न होता मोकळे पणाने आणि मधुर शब्दांनी होई. त्याच्या या सौजन्यशील वर्तणुकीचा त्याच्या प्रजाजनांवर किती मोठा परिणाम होई ते पाहण्यासारखे आहे.'

## धार्मिक मते :

लहानपणापासून अकबर फार धार्मिक वृत्तीचा होता. इस्लाम धर्मावर विश्वास असताना तो रोज सकाळी एकांतात बसून परंपरागत मुसलमान पद्धतीप्रमाणे 'या हु या हादी' हा मंत्र जपत असे. इ. स. १५७९ पर्यंत वर्षातून कमीत कमी एकदा आणि कधी कधी दोनदासुद्धा अजमेरला जाऊन तो मुईन उद्दिन चिस्तीच्या कबरीचे दर्शन घेत असे. शेखाच्या कबरीपुढे भक्तीने प्रार्थना करून शिवाय तो मोठा दानधर्म पण करी. ख्वाजाच्या माना-

खातर तो अनेक वेळा एखाद्या साध्या यात्रेकरूप्रमाणे थोडी फार पायी सफरही पण करीत असे. अजमेरच्या ख्वाजाचे नाव 'या मुईन' हीच त्यावेळी त्याची युद्धाची ललकारी होती. काही वर्षांनंतर त्याची धार्मिक मते, बदलली. रूढिबद्ध सुन्नी पंथात समाधान न झाल्यामुळे तो शिया पंथाकडे वळला. पण तेथेही त्याच्या उदार अंत:करणाला हवे होते ते सापडले नाही. नंतर, तो सुफी पंथाकडे वळला आणि तेथून पुढे अनेक हिंदु पंडित, जैन आचार्य, पार्शी मोबेद आणि ख्रिस्ती पाद्री यांच्याशी त्याचा संपर्क वाढला. सर्व धर्मांचा शास्त्रीय पद्धतीने अभ्यास केल्यावर त्याला असे आढळून आले की, सत्य हे सर्व धर्मांत आहे, सर्व धर्मांत साधुवृत्तीचे आणि संयमी पुरुष असतात. यामुळे कुठल्याही एका धर्माचा आणि त्यातल्या विधींचा स्वीकार न करता त्याने अनेक धर्मांतल्या प्रार्थना पद्धतींचा स्वीकार केला. उदाहरणार्थ, पार्शी आणि हिंदु धर्माला मान्य असलेली सूर्योपासना तो करी. ख्रिस्ताचा आणि मेरीच्या मूर्तीकडे तो आदराने वघे. जैनांची अहिंसा मान्य करून त्याने अनेक हिंदु धर्मातले आचार स्वीकारले. एकंदरीत सर्व धर्मांबाबत तो अशी वर्तणूक ठेवी की, सर्वधर्मियांना बादशहा आपल्याच धर्मातला आहे असे वाटावे. आणि प्रत्येकाला राजा आपल्या बाजूचा आहे आणि असेच वाटत असे, असे दु यारिक म्हणतो. अबुल फझलचेही मत असेच होते... सर्व धर्मांना सारखेच लेखून त्याप्रमाणे आचरण करणाऱ्यांशी बादशहा सलोख्याचे व अपक्षपाती धोरण ठेवी; त्यामुळे प्रत्येकाला हा आपल्यातलाच आहे असे वाटे. सर्वांशी सलोख्याची वृत्ती ( सुलाह–ई–कुल ) हेच धोरण अकबराने सतत आचरिले. अशा तऱ्हेने अकबराने अशोक आणि हर्षवर्धन यांची जुनीच प्रथा पुढे चालवली. हे दोघे पण कुठल्याच धर्माबद्दल भेदभाव ठेवत नसत. उलट निरनिराळ्या धर्मांच्या प्रार्थनेत सामील होत. या बाबतीत हिंदुस्थानात हजारो वर्षे प्रचलित असलेला सर्वधर्मसमभाव बादशहाने आत्मसात केला होता. देशाच्या आत्म्याशीच जणु काही तो समरस झाला होता. हिंदु आणि सुफी धर्मांतील त्यागवृत्ती आणि संन्यास यांचे त्याला विशेषण आकर्षण होते. या बाबतीत त्याचे खालील उद्गार लक्षात ठेवण्यासारखे आहेत.

१) "संसारातल्या सर्व घडामोडींच्या पाशापासून जो स्वत:ला पूर्णपणे अलग करू शकतो त्याला इतर कुठल्याही प्रेमापेक्षा दिव्य असे जे ईश्वरीप्रेम त्याचा लाभ होतो."

२) "मी एका मोठ्या साम्राज्याचा अधिपती आहे आणि राज्याचे सर्व अधिकार माझ्या हाताशी आहेत हे खरे, पण माणसाचे मोठेपण ईश्वराच्या

आज्ञेप्रमाणे चालण्यात आहे. अनेक धर्म व त्यांतील कर्मकांडामुळे माझ्या मनाचे समाधान होत नाही. या दिखाऊ वैभवाच्या झगमगाटात माझे हृदय व्याकूळ होऊन जाते. साम्राज्य करण्याचा हव्यास मी कशासाठी करावा ! कोणीतरी देवमाणूस प्रगट होऊन माझ्या हृदयाची ही व्यथा दूर करील काय?"

३) "या राज्याचा कारभार चालवण्यास योग्य असा माणूस माझ्या पाहाण्यात आला, तर त्याच्यावर सर्व राज्याची जबाबदारी सोपवून मी त्यातून बाहेर पडेन."

४) "संसाराचा त्याग करण्यासाठी माझी संमती मागण्यास कोणी आला तर ती मी मोठ्या आनंदाने देईन. मूर्ख लोकांना भुरळ घालणाऱ्या या जगातून ज्याने आपले मन काढून घेतले आहे त्याला त्याच्या निश्चयापासून मागे खेचणे मोठे दोषास्पद ठरेल. पण असे करणे वरवरचेच असल्यास त्याचा योग्य मोबदला तसे करणाऱ्यास मिळाल्याशिवाय राहाणार नाही."

संसारात राहूनही धर्माचे योग्य अनुसरण करणे शक्य आहे. हे हळू हळू त्याच्या लक्षात आल्यासारखे दिसते. जगातल्या गोष्टींबद्दल आसक्ती बाळगणे हे दुःखाचे मूळ आहे, हे त्याला कळून चुकले असावे असे वाटते. एके ठिकाणी तो म्हणतो, "अयोग्य गोष्टींसंबंधीची तहान आणि स्वतःचा बडेजाव ही दुःखाला कारणीभूत होतात." यासंबंधी राजर्षि जनकाचा दाखला देऊन तो म्हणतो, "हिंदु स्त्रिया पाणी आणण्यासाठी नदीवर तलावावर किंवा विहीरीवर जातात. पाण्याने भरलेले अनेक घडे डोक्यावर ठेवून आपल्या मैत्रिणींबरोबर गप्पागोष्टी करीत, खाचखळग्यांतून किंवा उंचसखल जागेतून त्या आपला मार्ग काढतात. त्यांचा तोल जसा कधी सुटत नाही तसाच तोल माणसाने स्वतःच्या घड्यात ठेवला, तर त्याला अपाय होण्याची भीती नाही. समतोल मनाने ईश्वराशी नाते जोडण्यात पुरुषाने त्यांचे अनुकरण का करू नये?" हा विचार मनात ठेवूनच हरद्वारला आपले शेवटले दिवस घालविण्यासाठी गेलेल्या राजा तोडरमलला त्याने परत बोलावले असावे. "मनुष्यमात्राच्या सेवेसारखी ईश्वराची दुसरी सेवा नाही; तेव्हां जनसेवेत शेवटपर्यंत राहून मरणोत्तर प्रवासाची शिदोरी बांधून घ्यावी;" असा सल्ला त्याने तोडरमलला दिला.

—३०

## खरी धर्मपरायण व्यक्ती :

धर्मासंबंधीच्या अकबराच्या वागण्यात धोरणी राजकारणाचा पुष्कळ भाग होता असे म्हटले जाते. यात त्याचा मुख्य उद्देश खास करून आपल्या बहुसंख्य हिंदु प्रजाजनांना खूष करण्याचा होता; पण अकबर भोंदू किंवा अप्रामाणिक होता, असा पुरावा कोठे सापडत नाही. त्याच्या धार्मिक प्रवृत्तीबद्दल त्याचे शत्रू-सुद्धा ग्वाही देतात. अकबर धर्माच्या बाबतीत निरीश्वरवादी, ढोंगी किंवा औपचारिक मान्यता देणारा नव्हता, असे आपले मत निराश झालेले जेझुइटसुद्धा देतात. धर्म म्हणजे केवळ एक शिष्टाचार असे पण त्याला वाटत नसे. याविषयी दु यारिक लिहितो, "तो निरीश्वरवादी आहे असे म्हणता येत नाही, कारण स्वर्ग व पृथ्वी निर्माण करणाऱ्या ईश्वरावर त्याची दृढ श्रद्धा आहे. ईश्वराची आपल्यावर सारखी नजर आहे असे समजूत त्याने आपले सर्व आयुष्य काढले. इतर अनेक कामांत व्यग्र असूनसुद्धा दिवसातून चार वेळा प्रार्थना करण्यास तो कधी चुकत नसे. यात पुष्कळ वेळ जाई, पण इतर कामांच्या निमित्ताने यात कपात होत नसे. हातात सुंदर रत्नांची जपमाळ घेऊन तो १०५० वेळा परमेश्वराचे (त्याला वाटते तसे सूर्याचे नव्हे) नाव घेत असे." यासंबंधी जहांगीर म्हणतो, "एवढे मोठे राज्य, कल्पनेबाहेर व अचाट असा खजिना आणि पुरून ठेवलेली संपत्ती व लढाऊ हत्ती आणि अरबी घोडे असूनसुद्धा ईश्वराच्या सिंहासनासमोर नम्र भावनेची पायरी त्याने कधी सोडली नाही; परमेश्वराची सतत आठवण ठेऊन परमेश्वरासमोर आपण एक य:कश्चित माणूस आहोत असे तो मानत असे."सत्याच्या शोधात अकबराने आपले सर्व आयुष्य वेचले आणि कर्तव्य-परायणता म्हणजेच परमेश्वराची खरी भक्ती आहे असा त्याचा विश्वास होता, असे अबुल फझल म्हणतो. सर्व सृष्टीचा निर्माता ईश्वर हा सर्वज्ञ आणि सर्वाठायी असून अकबराचा त्याच्यावर कसा दृढ विश्वास होता हे खालील उद्गारांवरून दिसून येते.

"जगातील प्राणीमात्र आणि ईश्वर यांच्यामधील संबंध शब्दातीत आहे."

"झोपी गेलेल्यांना जागे करण्यासाठी ईश्वरासंबंधी बाह्योपचारी प्रार्थना करावी लागते. ईश्वराची खरी प्रार्थना माणसाच्या हृदयातच जन्म घेते, शरीरात नाही."

"जे निराकार आहे ते प्रत्यक्षात झोपलेले किंवा जागे दिसून येत नाही केवळ कल्पनाशक्तीनेच त्याचे आकलन करावे लागते. असे त्याचे आकलन होण म्हणजेच त्याचे दर्शन होण्यासारखे आहे."

"प्रत्येकजण आपापल्या परिस्थितीप्रमाणे परमेश्वराला निरनिराळी नावे देतो, पण कुठल्याही ज्ञात न होणाऱ्या वस्तूला नाव देणे व्यर्थ आहे." "सृष्टी म्हणजे एक पोकळी नाही याबद्दल चर्चा करण्यात काही अर्थ नाही. कारण ईश्वर सर्वत्र भरून राहिलेला आहे."

"सतानाची कल्पना फार जुनाट व वेडगळ आहे, कारण परमेश्वराची आज्ञा उल्लंघन करू शकेल असा कोण आहे!"

बादशहाच्या बोलण्यातले असे अनेक दाखले देता येतील पण अकबराची ईश्वरभक्ती सिद्ध करण्यास एवढे पुरेसे आहेत. तो काहीसा गूढवादी होता आणि सूफींच्याप्रमाणे त्याला पुष्कळदा साक्षात्कार पण होत असे. भावसमाधीमध्ये ईश्वराशी प्रत्यक्ष संबध साधता येतो असे तो मानत असे. अनेक धर्मप्रवृत्त लोकांप्रमाणे तो एकाकी आणि उदास असे.

## अकबर ईस्लाम धर्म सोडतो

अकबराचा खरा धर्म कुठला होता याबद्दल त्या वेळच्या व अलीकडल्या लेखकांनी निरनिराळी मते मांडली आहेत. त्याने मुसलमानी धर्माचे पालन केले नाही आणि महंमदाला तो ईश्वराचा एकमेव प्रेषित मानत नसे, असे जेजुइट लोक आग्रहाने सांगतात. बदायुनीचे मत जवळ जवळ तसेच आहे, पण प्रत्येक धर्मातल्या लोकांना अकबर आपल्याच धर्माचा आहे असे वाटत असे याचा उल्लेख बदायुनी करीत नाही. पण जेजुइट मंडळी तसे आवर्जून म्हणतात. "त्याच्या एकंदर वागण्यावरून तो मुसलमान नाही हे जरी दिसून येत असले, तरी कुठला धर्म त्याला मान्य आहे हे नक्की सांगता येत नाही." हिंदु, पार्शी, जैन या धर्मांप्रमाणे तो वागतो असे अनेक वेळा वाटे, पुष्कळ वेळा तो खिरस्ती अवशेषांची सुद्धा पूजा करीत असे." या त्याच्या परस्परविरोधी वर्तनामुळे त्याचे प्रजाजन इतके गोंधळून जात की, आपला राजा कोणत्या धर्माचा आहे हे त्यांना समजत नसे."

अकबर खराच मुसलमान होता की नाही? या प्रश्नाला एका शब्दात उत्तर देता येत नाही. ईस्लाम हा एक रेखीव धर्म असून त्यात संशयाला फारशी

जागा नाही. कुराण ईश्वरप्रणित आहे, महमद त्याचा प्रेषित आहे. तसेच कलमा नमाज आणि रमझान यावर ज्याचा विश्वास नाही त्याला मुसलमान म्हणता येत नाही. कुराण म्हणजे देववाणी आहे असे अकबर मानत नसे. साक्षात्कारावर त्याचा विश्वास नव्हता. महंमद हा ईश्वराचा एकमेव प्रेषित होता याच्यावरही त्याचा विश्वास नव्हता. इतर अनेक प्रेषितांसारखा तो एक होता, असे त्याचे मत होते. महंमद हा जगातला शेवटला प्रेषित असून त्याने केलेल्या उपदेशापुढे पूर्वीच्या सर्व प्रेषितांचे म्हणणे फोल आहे असे पण अकबराला इतर मुसलमानांप्रमाणे वाटत नसे. किंबहुना महंमदासंबंधी अकबर पुष्कळदा थट्टेने बोलत असे. मुसलमान धर्माप्रमाणे तो दिवसातून पाच वेळा नमाज पढत नसे आणि रमझान पण पाळत नसे. तरीसुद्धा वर उल्लेख केल्याप्रमाणे सूर्योदयी मध्यान्ही, सायंकाळी, मध्यरात्री, इस्लामी पद्धतीप्रमाणे जरी नाही, तरी दिवसातून चार वेळा तो प्रार्थना करी. इ. स. १५७९ नंतर अजमेरला काय किंवा मक्केला काय, यात्रेला जाण्याने मोठे धर्मकार्य होते यावरचा त्याचा विश्वास उडाला. अशा तऱ्हेने विचारांत आणि आचारांत अकबराने मुसलमान धर्म सोडला असला, तरी त्याने उघडपणे तसे कधी सांगितले नाही आणि तसे सांगण्याची गरज पण नव्हती. सरकारी यंत्रणेच्या दृष्टीने पण ते योग्य नव्हते. इ. स. १५८० नंतर तो सर्वस्वी इतर चार-चौघासारखा मुसलमानच होता, असे खात्रीने म्हणता येत नाही. लोकांना फसवण्यासाठी एखाद्या काफिरासारखे वागून तो गुप्तपणे ईस्लामधर्म अनुसरत असल्यास न कळे. हिंदू धर्मात सांगितलेला पुनर्जन्म आणि कर्म या दोन्हींवर त्याचा विश्वास होता. इस्लामी धर्मात या दोहोंनाही थारा नाही. जागतिक उत्क्रांतिवाद इस्लामला अपरिचित नाही असे काही विद्वान मानतात आणि याच्या पुष्टयर्थ मौलाना रूमीच्या प्रसिद्ध वचनाचा आधार देतात. ते वचन असे, "खनिजातून बाहेर पडून मी वनस्पतीच्या रूपात जगलो; वनस्पतीच्या रूपात मृत्यू पावून मी प्राणिमात्र म्हणून डोके वर काढले." पण ही एक कविकल्पना आहे आणि इस्लामी धर्म प्रणालीचा तो एक भाग नाही. दसरा, दिवाळी, रक्षाबंधन, वसंतोत्सव इत्यादि हिंदू समारंभ तो पाळत असे. जनान्यातल्या रजपूत स्त्रियांना हिंदूधर्माप्रमाणे पूजाअर्चा करण्याची मोकळीक होती. इतके असूनसुद्धा मुसलमान संस्कृतीतल्या अनेक गोष्टी त्याला मान्य होत्या आणि पुष्कळ इस्लामी समारंभ तो पाळत असे. हिंदु पद्धतीप्रमाणे श्मश्रू करून तो सुतक पाळत असे, पण आपल्या मुलांच्या आणि नातवांच्या मृत देहांना हिंदू पद्धती प्रमाणे अग्नी न देता त्याने मूठमातीच दिली. स्वतःसाठी त्याने एक मोठी कबर पण बांधून ठेवली होती.

महंमदाच्या जन्म--मृत्यूच्या दोन्ही दिवशी तो मोठी मेजवानी पण देत असे. ईस्लामी पद्धतीच्या सर्व रीतिरिवाजांना फाटा देणे सोपे नव्हते व आवश्यक पण नव्हते.

## बुद्धिवादी असूनही धर्मभोळा

बुद्धिप्रामाण्य आणि धर्मभोळेपणा याचे अकबराच्या स्वभावात मोठे विचित्र मिश्रण झाले होते. आत्म्याच्या बाबतीत तो पूर्वापार रूढीपेक्षा आणि शासनापेक्षा स्वत:ची बुद्धी प्रमाण मानत असे. माणूस हा तारतम्य-विचार करणारा प्राणी आहे असे तो म्हणे. "माणसाची खरी योग्यता त्याच्या बुद्धी-मुळे त्याला प्राप्त झाली आहे. अंधानुकरण माणसाला न शोभणारे आहे असे तो मानी." "माणसाने आपल्याला योग्य दिसेल त्याप्रमाणे वागावे आणि दुसऱ्याचे अंधानुकरण करू नये हे सिद्ध करण्याची काही जरुरी नाही. माणसाने दुसऱ्याचे अनुकरणच करावयाचे असते तर सर्व प्रेषितांनी आधीच्या प्रेषितांचे अनुकरण केले असते," याविषयी अधिक जोरदार शब्दांत तो म्हणतो, "पुष्कळ मूर्ख आणि रूढिप्रिय लोक जुन्या चालीरीती म्हणजेच बुद्धिप्रामाण्य असे म्हणतात, आणि असे केल्याने स्वत:चा कायमचा विनाश करून घेतात." ईश्वरी चमत्कारांवर त्याचा विश्वास नव्हता. कारण "मूर्ख लोक दैवी चमत्कारावर विश्वास ठेवतात, पण शहाणे लोक प्रत्यक्ष पुरावा असल्याशिवाय कुठलीच गोष्ट खरी मानत नाहीत." आंधळ्याला दृष्टी देणे, मृताला जिवंत करणे, जखमी झालेल्याला बरा करणे, अशासारखे चमत्कार येशू खिरस्ताने केले, ते त्याच्या जवळ काही दैवी शक्ती होती म्हणून नव्हे, तर त्याचे वैद्यकीय ज्ञान चांगले होते म्हणून. प्रत्येक गोष्टीकडे सारासार दृष्टीने बघून योग्य विचारांती कान डोळे उघडे ठेऊन ती मान्य करावी असा अकबराचा स्वभाव होता. प्राचीन इतिहास, जात किंवा धर्म यांविषयी त्याला विशेष आस्था नव्हती. भावनेला त्याच्या एकंदर मनोरचनेत वाव असला तरी सर्व भावना बुद्धीच्या निकषावर घासून पाहाण्याची त्याची रीत होती.

इतके असूनसुद्धा अकबरात काहीच दोष नव्हते असे म्हणता येत नाही. अनेक बायका करण्याची त्यावेळची प्रथा त्याने मोडली नाही. त्याच्या काही विवाहांमागे राजकीय हितसंबंध होते हे खरे, पण याशिवाय नेहमीच्या पद्धतीप्रमाणे तरुण वयात विवाह केलेल्या त्याच्या कितीतरी बायका होत्या. धर्मभोळेपणामुळे शुभदिवस, शुभ शकुन, भविष्य इत्यादींवर त्याचा विश्वास होता. खास आणीबाणीचा प्रसंग आल्यास स्वारीवर निघताना ज्योतिषांचा

सल्ला तो घेत नसे हे खरे, पण इतर वेळी तो हे बहुधा नेमाने करी. राजवाड्याच्या झरोक्यात उभे राहून खाली जमलेल्या लोकांचे अभिवादन स्वीकारणे हे एका जुन्या हिंदु पद्धतीचे पुनरुज्जीवन होते; पण याच्याही पलिकडे जाऊन लहान मुलांच्याकडे बघून किंवा आपण हुंगलेले पाणी त्यांना देऊन त्यांचे रोगबरे करणे, इत्यादी गोष्टी अकबर करी. " मी दैवी चमत्कार करतो. माझे पाय धुतलेले पाणी वापरल्यास रोगी बरे होतात, असे भासवण्याचा तो प्रयत्न करी. आपल्याला मुले व्हावीत म्हणून किंवा आजारी मुले बरी व्हावीत म्हणून अनेक बायका त्याला नवस करतात. प्रत्यक्षात तसे घडल्यास या बायका त्याला एखादी भेट अर्पण करतात आणि त्या कितीही क्षुल्लक असल्या तरी अकबर त्यांचा आदराने व प्रेमाने स्वीकार करतो." अबुल फझल यायिषयी लिहितो, "अनेक देशांतले अनेक लोक, तरणे, म्हातारे, ओळखीचे, अनोळखी हे आपापले प्रश्न सोडविण्यासाठी बादशहाला नवस करतात आणि त्यात सिद्धी प्राप्त झाल्यास त्याच्यापुढे नतमस्तक होतात. बादशहाने गावे अशा आशेने अनेक लोक दररोज बर भांड्यात पाणी घेऊन येतात. अनेक वैद्यांची औषधे घेऊनही हताश झालेले आणि बरे होण्याची आशा सुटलेले रोगी याच्या दैवी शक्तीमुळे बरे होतात. '

राजकीय डावपेचात आणि शत्रूशी वागण्यात अकबराचे वर्तन नेहमीच शुद्ध व सरळ होते असे म्हणता येत नाही. कुठल्याही हिंदु राजाने त्याच्यापुढे हजर होऊन सलामी न दिल्यास किंवा तसे करण्यास विलंब केल्यास त्याने आपला भयंकर अपमान केला आहे असे अकबराला वाटे. या त्याच्या हळव्या दुराग्रहामुळेच त्याचे व राणा प्रतापचे कधी जमले नाही आणि भाठ्याच राजा रामचंद्र, काश्मीरचा युसुफखान आणि खानदेशचा बहादुरखान यांना त्याने क्रूरपणे वागविले.

## कुशल लढवय्या आ ण सेनानी :

शांततेने राज्यकारभार चालविण्यात अकबराने एवढे प्रचंड यश मिळविले की, त्यामुळे त्याची मुत्सद्देगिरी किंवा युद्धकौशल्य पुष्कळदा फिके पडते. मधून-मधून शांततेचा थोडा बहुत काळ सोडल्यास त्याची बहुतेक सर्व राजवट इतरांबरोबर लढाई करण्यात व नवनवे प्रांत जिंकून घेण्यात गेली, याचा कधी कधी विसर पडतो.

त्याच्या सैन्याची शिस्त, युद्धसामग्री व पद्धतशीर रचना आणि रणांगणावर तो कधीच पराभूत झाला नाही ह्या गोष्टी लक्षात घेता अकबराचे असामान्य युद्धकौशल्य मान्य करावे लागते. तो शूर व धारिष्टचवान लढवय्या असून अनेक चकमकींत त्याने आपला जीव धोक्यात घातला होता. यामध्ये परौंखची चकमक, खान–इ–झमन या बंडखोर पुढाऱ्याविरुद्धची शेवटची मोहीम, सारनाळ जवळची एक आणि अहमदाबादच्या दोन लढाया यांचा खास उल्लेख केला पाहिजे. तो मोठा कुशल सेनापती असून हाताखालच्या सर्व अधिकाऱ्यांची त्याच्यावर सहजस्फूर्त अतोनात भक्ती होती. त्या सर्वांना तो जातीने ओळखत असे. अनेक रणांगणांवर विजय मिळवणाऱ्या आपल्या सेनापतीवर त्याच्या शिपायांचे फार प्रेम होते. युद्धात कुशल असलेले शिपाई व अधिकारी तो चटकन निवडून काढत असे. रजपुतांची स्वामीनिष्ठा आणि लढाऊ वृत्ती ओळखून त्यांचा उपयोग करून घेणारा हिंदुस्थानचा पहिला मुसलमान राजा अकबरच होय. युद्धातील डावपेचांत तो अत्यंत तरबेज होता. शत्रूंनी केलेल्या चुका चटकन् लक्षात घेऊन तो स्वतःसाठी त्याचा पुरेपूर फायदा उठवत असे. सर्वत्र सलोखा आणि शांती राखण्याचे त्याचे धोरण होते, पण हे धोरण यशस्वी होण्यासाठी लष्करी पाठबळ जरूर आहे, असे आधुनिक मुत्सद्याप्रमाणे तो मानी. "शत्रूवर चढाई करण्याची तयारी राजाने नेहमी ठेवली पाहिजे; नाहीतर आजूबाजूचे लोक त्याच्यावर चढाई करतात. प्रत्यक्ष लढाईचा अनुभव देऊन आपले सैन्य नेहमी सुसज्ज ठेवले पाहिजे, नाहीतर आळसात आणि चैनीत राहण्याची सवय सैन्याला लागते." शत्रूच्या प्रांताची भौगोलिक आणि नैसर्गिक परिपूर्ण माहिती आणि त्याच्या आर्थिक परिस्थितीबद्दलची व युद्ध सामर्थ्याची खडान् खडा बातमी, अत्यंत जलद हालचाली करणारे सैन्य आणि ऊन, वारा, पाऊस, नद्या–नाले, जंगले, दलदलीचे प्रदेश आणि डोंगर इत्यादि नैसर्गिक अडचणींची बिलकूल तमा न बाळगण्याची पद्धत, या सर्व गोष्टींचे प्रत्यंतर त्याच्या निरनिराळ्या मोहिमांमध्ये दिसून येते. युद्धातल्या डावपेचांइतकेच युद्धाला लागणारे साहित्य महत्त्वाचे आहे याची त्याला पूर्ण जाणीव होती. सैन्याला लागणारी हत्यारे, सामानसुमान, वाहतुकीची व्यवस्था, मोदीखाना या सर्वांवर त्याचे लक्ष असे. प्रत्येक लढाईनंतर आपला एखादा कुशल लष्करी अधिकारी एकंदर रणक्षेत्राची पाहाणी करण्यासाठी तो रवाना करी. यावरून सैन्यातल्या निरनिराळ्या तुकड्या आणि त्यावरचे अधिकारी यांनी युद्धात प्रत्यक्ष काय कामगिरी केली याची माहिती त्याला मिळत असे आणि त्या कामगिरीनुसार त्या अधिकाऱ्यांना बक्षिसे मिळत किंवा शिक्षा

दिली जाई. माळव्याचा बंडखोर सरदार अब्दुल्ला खान उझबेक विरुद्धची आपली मोहीम बादशहाने जुलै १५६४ मध्ये, म्हणजे ऐन पावसाळयात सुरू केली. नारकाहून सारंगपूरच्या वाटेवर बादशाही फौजांना अनेक दाट जंगलांतून पसार होऊन पाऊस, चिखल आणि नदीला आलेले पूर यांच्याशी सामना करावा लागला. असे सांगतात की, त्यावेळी सैन्यातले घोडे छातीपर्यंत पाण्यात बुडत होते आणि आपल्या केसांचेही उंटांना वजन वाटू लागले. या सर्व अडचणींना न जुमानता अकबर खिरारपांसून सारंगपूरपर्यंतची ८० मैल घोडदौड एका दिवसात करून गेला आणि पुढील दोनतीन दिवसांत आपल्यापेक्षा दसपटीने मोठ्या असलेल्या शत्रूच्या सैन्याचा त्याने धुव्वा उडवला. या तुफान घोडदौडीमध्ये फक्त ३०० स्वारच त्याच्याबरोबर राहू शकले. इ. स. १५६७ च्या जून महिन्यात एकदा हत्तीवर बसून बरोबरच्या ११ माणसानिशी बादशहाने माणिकपूरजवळ पुराने दुथडी भरून चाललेली गंगा ओलांडली. पलिकडल्या तीरावर देशातला एक प्रसिद्ध सेनानी खान–इ–झमन उझबेक हा तीन ते चार हजार घोडदळानिशी लढाईस सज्ज होऊन उभा होता. यावेळी अकबराजवळ फक्त ५०० सैनिक आणि ५०० हत्ती होते. या छोट्या सैन्यानिशी खान–इ–झमनवर हल्ला करून अकबराने मोठी कत्तल करून त्याच्या सैन्याचा संपूर्ण नाश केला. ऑगस्ट १५७३ मध्ये फत्तेपूर सिक्रीपासून अहमदाबादपर्यंतचा ४५० मैलांचा खडतर प्रवास त्याने ९ दिवसांत संपवला आणि अहमदाबादजवळ एकाच दिवशी एकामागून एक झालेल्या दोन लढायांत शत्रूचा पराभव केला. ही सर्व मोहीम संपवून राजधानीस परत येण्यास त्याला ४३ दिवस लागले. " एकंदर प्रवास लक्षात घेता गुजराथवरील अकबराची दुसरी मोहीम ही इतिहासातली सर्वात झपाट्याची मोहीम समजली पाहिजे. " असे व्हिन्सेंट स्मिथ म्हणतो.

इ. स. १५७४ मध्ये ऐन पावसाळयात पूर आलेल्या नदीतून आग्र्याहून पटण्याला जाऊन अकबराने बंगालचा राजा दाऊद याचा सणसणीत पराभव केला. इ. स. १५८१ मधील काबुलची मोहीम फार विचारपूर्वक आणि कौशल्याने आखण्यात आली होती, असे मॉनसेराट मोठ्या कौतुकाने म्हणतो. ५०,००० घोडेस्वार, ५०० हत्ती आणि मोठे पायदळ असलेली ही प्रचंड सेना अत्यंत शिस्तीत पुढे जात होती. छावणीत किंवा कूच करताना आणि प्रत्यक्ष लढाईतसुद्धा सर्व गोष्टी ठरलेल्या वेळापत्रकाप्रमाणे होत असत. रोजा लागणाऱ्या जरुरीच्या वस्तू आणि दाणागोटा अतिशय स्वस्त मिळत असे. सिंधू नदीवर एक पूल बांधणे सुरू असताना " बादशहा रात्रीच्या रात्री आपल्या सेनानींबरोबर

डावपेच आखण्यात घालवीत असे. दिवसाचा वेळ शिकारीत, निरनिराळ्या खेळांच्या सामन्यांत, किंवा बादशहाच्या सामर्थ्याचे प्रदर्शन करण्यात जाई." शत्रूच्या अचानक हल्ल्याबद्दल बादशहा फार सावध असे. "अनेक युद्धांत विजय मिळवून चढून गेलेल्या सेनानीची अशी सावधगिरीची वागणूक विशेष वाखाणण्यासारखी होती" असे मॉनसेराट म्हणतो.

प्रत्यक्ष मोहिमेवर असताना अकबर कसा वागत असे हे पाहण्यासारखे आहे. स्वारीवर असताना तो कधी बेचैन होत नसे आणि दरबारचे रोजचे काम शक्यतोवर बिनविरोध चालू राही. काबूलच्या मोहिमेवर असताना आणि प्रत्यक्ष लढाई सुरू झाल्यावर अकबराची वर्तणूक पाहून मॉनसेराट चकित झाला. यावेळी मिर्झा हकीमचे वकील तहाची बोलणी करण्यासाठी बादशहाकडे आले होते. "राजाला योग्य अशा रुबाबात त्यांचे स्वागत करण्यात आले. दरबरात एका बाजूला बादशहा भाल्याचा आधार घेऊन होता. त्याच्या बाजूला फक्त त्याचा मोठा मुलगा आणि इतर सरदारांची मुले होती. वकिलांचे भाषण ऐकत असतानाच कसलेल्या शिपायांची द्वंद्वयुद्धे चालू होती. रानम्हशींच्या लढाया पण सुरू होत्या. लोकांनावाटावे की बादशहा मोहिमेवर नाही, तर मौजेत सर्कसच पाहात आहे. बादशहाच्या दरबाराचे व सैन्याचे सामर्थ्य किती प्रचंड आहे आणि आपल्या भावाच्या ताकदीला तो कसा कस्पटासमान लेखतो, हे दाखविण्याचा हेतुपुरस्सर उद्देश यात होता."

## कुशल राजकारणी पुरुष :

युद्धातील डावपेचांप्रमाणे राजकारणातल्या डावपेचांतही अकबर फार कुशल होता. याचे पहिले धडे त्याने राजस्थानात घेतले असावेत. युद्ध करण्याचे शक्य तितके टाळून समजुतीच्या मार्गाने आपले काम साधून घ्यावे. असे त्याचे एकंदर धोरण होते आणि यात त्याला पुष्कळ यश मिळाले. रजपूत राजांना एकमेकांविरुद्ध लढायला लावून स्वत.साठी त्याने त्यांचे सहाय्य कसे चतुराईने मिळवले या संबंधीच्या हकीगतींचा एक स्वतंत्र ग्रंथच होईल. १५६२ च्या सुरुवातीला भारमलशी सोयरिक करून त्याने कछवा राजपुतांची कायमची मैत्री संपादन केली. यामुळे रजपूत राजघराण्यात मोठी फूट पडून मेरटा (१५५२), जोधपूर (१५६३), चितोड (१५६७–६८), रणथंभोर (१५६९) आणि कलिंजर (१५६९) अशा निरनिराळ्या ठिकाणी रजपूत राजे अकबराच्या साम्राजाचा विस्तार करण्यासाठी आणि स्वःच्या जातभाईंची राज्ये नाहीशी

किंवा कमी करण्यासाठी लढले. त्याचे हे राजकीय धोरण इतके यशस्वी झाले की, १५७० मध्ये नागोरला बादशहाची छावणी असताना तेथे त्याच्या भेटीस जाण्यास आणि त्याच्याबरोबर वैवाहिक संबंध जमवून आणण्यात रजपूत राजांच्यामध्ये चढाओढ लागली होती. बादशहाच्या जाळ्यात सापडून जोधपूर, बिकानेर आणि जयसलमेरचे राजे त्याचे मांडलिक झाले. आपल्या कुशल डावपेचांनी त्याने मेवाडच्या राणा प्रतापला इतर रजपूत राजांपासून वेगळे केले. या सर्व गोष्टी बादशहाने इतक्या चातुर्याने केल्या की, १५७६ मध्ये मेवाडविरुद्ध झालेल्या हळदीघाटच्या प्रसिद्ध लढाईत बहुतेक सर्व रजपूत राजे बादशहाच्या बाजूने राणा प्रतापच्या विरुद्ध लढले. यावेळी बादशहाच्या सेनेचे नेतृत्व अंबरच्या राजा मानसिंगाकडे होते. त्याने प्रतापविरुद्ध प्राणपणाला लावून युद्ध केले. राणा प्रताप हा एकच राजा असा निघाला की ज्यानेअकबरापुढे कधीच मान तुकविली नाही. दरबारात प्रत्यक्ष हजर राहून सलामी दिली पाहिजे या बादशहाच्या दुराग्रहामुळे मानी प्रताप इतका रागावला की समझोत्याचे सारे प्रयत्न त्याने फेटाळून लावले. या एका बाबतील अकबराचे धोरण चुकले असे म्हणावे लागते.

राजस्थानातल्या या धूर्त अनुभवाचा बादशहाने पुढे गुजराथमध्ये चांगला उपयोग करून घेतला. तिथल्या मुसलमान राजांना व सरदारांना एकमेकांविरुद्ध लढायला लावून विशेष रक्तपात न करता बादशहाने सबंध गुजराथवर कब्जा मिळविला. इतर ठिकाणी पण, खास करून काश्मीर, कंदहार आणि राजा अली खानचा खानदेश येथे बादशहाची मुत्सद्देगिरी प्रशंसा करण्यासारखी यशस्वी झाली.

## प्रशासक

अकबर हा एक अत्यंत उच्च दर्जाचा प्रशासक होता असे म्हटले पाहिजे. राज्यकारभाराची मुलतत्वे आणि त्यांचा खातेवार तपशील याची त्याला बरोबर माहिती होती. कारभारातल्या निरनिराळ्या खात्यांकडे एकसारखे लक्ष देऊन निरनिराळ्या सुधारणा करण्यात बादशहा गुंतलेला असे. इतर अनेक व्यवसायांत गुंतलेला असूनसुद्धा निरनिराळ्या खात्यात सुधारणा कशा करता येतील व ती खाती अधिक कार्यक्षम कशी होतील, याचे विचार त्याच्या डोक्यात नेहमी घोळत असत. मॉनसेराट आणि जेरोड झेविअरसारख्या जेजुइट पाद्र्यांनी याचा उल्लेख केलेला आहे. यारिक लिहितो, “ विशेष लक्षात घेण्यासारखी गोष्ट म्हणजे, हे सर्व करमणुकीचे कार्यक्रम सुरू असताना राज्यातल्या महत्त्वाच्या घडामोडींकडे

त्याचे पूर्ण लक्ष असे. त्यामुळे अकबर गादीवर आला त्यावेळची आणि त्याच्या मृत्युसमयीची राज्यपद्धती यांत फार फरक दिसून येतो. बादशहाच्या घरगुती कामकाजापासून जिल्ह्याच्या कारभारापर्यंतचे बारिक सारिक नियम व केलेल्या सूचना ऐने अकबरीत लिहून ठेवलेल्या आढळतात. त्या पाहून कुठल्याही आधुनिक प्रशासकाला किंवा वाचकाला आश्चर्य वाटल्याशिवाय राहणार नाही. घालून दिलेल्या नियमांचे योग्य पालन होत आहे की नाही हे अकबर आणि त्याचे वरिष्ठ अधिकारी जागरुकपणे पाहात असत. एखाद्या हुकुमशाहाप्रमाणे सर्व सत्ता हाती असूनसुद्धा अकबर लोकशाही पध्दतीनुसार प्रत्येक मुलकी किंवा लष्करी गोष्टींविषयी आपले मत योग्य शहानिशा करून बनवत असे. कोणतेही धोरण जाहीर करण्यापूर्वी तो आपल्या धान मंडळींचा सल्ला घेई. या विषयी एका युरोपीय लेखकाने प्रत्यक्ष पाहून लिहून ठेवलेली हकीगत येथे उद्‌धृत करण्या–सारखी आहे. " सल्ला मसलतीची बादशहाची पद्धत अशी: कुठल्याही गोष्टीचा निर्णय घेण्यापूर्वी बादशहा प्रत्येक सल्लागाराला बोलावून घेऊन त्याचे मत विचारतो. आणि मग ज्या धोरणाला सर्वांत जास्ती सल्लागारांचा पाठिंबा असतो. ते धोरण तो अंमलात आणतो. एखादी गोष्ट नक्की करण्याचे ठरवल्या वर सुध्दा 'मी हे करावयाचे ठरवले आहे, याला तुमची संमती आहे काय ? असे तो आपल्या अधिकाऱ्यांना विचारी. 'सलाम राजेसाहेब' असे त्यांचे उत्तर येताच मग त्या गोष्टींचा अंमल सुरू होत असे. एखाद्या सल्लागाराचें मत विरोधी पडल्यास त्याचे म्हणणे शांतपणे ऐकून घेऊन कधी कधी तो स्वत:चे मतसुध्दा बदलत असे."

" आपल्या सर्व सल्लागारांचा सल्ला घेऊन नंतर आपल्याला योग्य दिसेल ते धोरण अकबर ठरवित असे. कधी कधी आपल्या धोरणासंबंधी तो सल्लागारांचे मत विचारीं. त्याला संमती असल्यास 'आमच्या राजाला शांती मिळो' असे ते म्हणत. एखाद्याने विरोधी मत प्रदर्शित केल्यास बादशहा ते शांतपणे ऐकून त्याचे शंका-समाधान करी. आपल्या धोरणामागील कारण परंपरा पण समजावून सांगे. कधी कधीं विरोधांची कारणे लक्षात घेऊन तो आपल्या धोरणात बदल करी " असे डू यारिक लिहितो.

आपल्या अकबरनाम्यात अबुल फझलने याच गोष्टींचा उल्लेख केला आहे; त्याला वरील विधानाने पुष्टी मिळते. युध्दामध्ये आणि शांततेच्या काळात प्रदीर्घ चर्चा करून अकबर आपल्या प्रधानांचा सल्ला नेहमीच नाही, तरी पुष्कळवेळा मान्य करीत असे. असे त्याने नमुद केले आहे. अंबरचा राज

भगवन्तदास इत्यादी रजपूत सरदारांच्या मताला मान देऊन त्याने आपला दिन-ए-इलाही धर्म सर्रास सुरू केला नाही, याचा उल्लेख पूर्वी केलाच आहे.

मंजूर झालेल्या कायद्यांची अंमलबजावणी नीट होत आहे की नाही यावर अकबराची बारीक नजर असे. या बाबतीत तो फार दक्ष असे. हुकुमाची अंमलबजावणी न केल्याबद्दल बहुतेक सर्व अधिकाऱ्यांना केव्हा ना केव्हातरी त्याने दोष दिल्याचे आढळून येते. भगवन्तदास, मानसिंग, अबुल फझल आणि शहाजादा सलीम यांना सुद्धा दरबारात येण्याची बंदी करून खालच्या हुद्यावर नेमल्याचे दाखले आढळून येतात. "सरकारी कामकाज करण्यात हलगर्जीपणा केल्यास बादशहा कडक शासन करीत असे हे विशेष लक्षात येते. सार्वजनिक कायद्याचे उल्लंघन करणाऱ्याविरुद्ध त्याचे धोरण फार कडक आहे. यामुळें त्याची आज्ञा पालन करण्यात सर्व अधिकारी तत्पर असतात. सरकारी खात्यांची कामें योग्य तऱ्हेने न्यायाला धरून झाली पाहिजेत असा बादशहांचा कटाक्ष आहे."— मॉनसेराट.

इ. स. १५८१ च्या काबूलच्या मोहिमेत मॉनसेराट बादशहाबरोबर होता. यावेळेला त्याला बादशहाच्या कडक लष्करी शिस्तीचा अनुभव आला. 'सिंधु नदी पार करण्यास जागा शोधून काढ' असे त्याने आपल्या एका अधिकाऱ्यास सांगितले. याबद्दल हलगर्जीपणा दाखवल्यांमुळे बादशहाने त्याला गुलाम म्हणून विकले नंतर अर्थातच त्याने त्याला क्षमा केली.

योग्य माणसांची योग्य कामावर नेमणूक करण्याचे कौशल्य, कायद्यांची कडक अंमलबजावणी व बादशहाची सदैव जागरूक कृती यामुळे त्याचा राज्यकारभार यशस्वी झाला.

याचा अर्थ बादशहा प्रत्येक बारीकसारीक बाबतीत जातीने लक्ष घालून आपल्या अधिकाऱ्यांना स्वतंत्रपणे काम करण्याची सवड देत नसे असा नाही. अधिकाऱ्यांनीच करण्याजोगी कामें त्यांच्याकडेच सोपवण्याचे त्याचे धोरण असे. "आपल्या प्रजाजनांकडून होणारी कामे राजाने स्वतः करू नयेत. इतरांनी केलेल्या चुका त्याला सुधारता येतील, पण त्याने केलेल्या चुका कोण सुधारणार!" असे अकबर म्हणे. ही एक केवळ पुस्तकी म्हण नव्हती. आपल्या अधिकाऱ्यांवर मोठी जबाबदारीची कामे सोपवून त्यांच्याकडून ती पुरी करून घेतल्याचे अनेक दाखले अकबराच्या कारकीर्दीत सापडतात. अशा वेळी त्याच्या कामात वळाढवळ न करता तो नुसती देखरेख ठेवीत असे.

**अकबराची न्यायदानाची पद्धत :**

चोख न्याय देण्याबद्दल जहांगीरची फार प्रसिद्धी आहे. याबाबतीत अकबर आपल्या मुलापेक्षा अनेक पटीने श्रेष्ठ होता. मनुष्यमात्रावर त्याचे इतके प्रेम होते की, कुठल्याही अपराधाची योग्य छाननी केल्यानंतरच आणि राज्यकारभार सुरळीत चालावा याच उद्देशाने तो कुणालाही शिक्षा करीत असे. न्यायदानात अपराध्याचा हुद्दा किंवा जन्म याचा तो विचार करीत नसे. "मी स्वतः अन्याय केला तर स्वतःलाही शिक्षा करण्यास मी मागेपुढे पाहाणार नाही. याबाबतीत माझीं मुले, नातेवाईक किंवा इतर लोक यांच्या बाबतीत तर मग बोलावयासच नको." अक्षम्य अपराधाबद्दल अनेक बड्या धेंडाना यथायोग्य शिक्षा केल्याची अनेक उदाहरणे बादशहाच्या चरित्रात आढळून येतात. बादशहाचा मुख्य सदर आणि प्रमुख अधिकारी शेख अब्दुल नबी याने अन्यायाने मथुरेच्या एका ब्राह्मणाला ठार मारले. त्याला अधिकारावरून कमी करून मक्केला हद्दपार करण्यात आले. याबाबतीत मॉनसेराट लिहितो, "परस्त्रीगमन आणि बाहेरख्यालीपणा याबद्दल बादशहाला फार चीड होती. त्याचा प्रमुख व्यापारी अधिकारी (हा बहुतेक जाला असावा) याने लग्न झाले असूनसुद्धा एका उच्च कुलीन ब्राह्मण मुलीवर बलात्कार केला. त्याला बादशहाच्या हुकमाने गळा दाबून ठार करण्यात आले. याप्रसंगी अनेक लोकांनी केलेल्या विनंत्या किंवा देऊ केलेली मोठी दंडाची रक्कम याचा काहीच उपयोग झाला नाही. अशा विकृत प्रवृत्तीच्या गुन्हेगारांना बादशहा चाबकाने फोडून काढीत असे."

राज्यात सर्वत्र योग्य न्यायालये असून प्रत्येक न्यायालयावर मुख्य काजी असे. तरीसुद्धा अकबर स्वतः आठवड्यातून दोनदा न्यायदान करी. यावेळी खालील न्यायालयातून आलेल्या अर्जाची किंवा प्रत्यक्ष त्याच्यासमोर आलेल्या अर्जाची सुनावणी होई. मॉनसेराट लिहितो "मुलकीकडील महत्त्वाचे आणि सर्व फाशीचे अर्ज यांची सुनावणी बादशहापुढे होत असे. अशावेळी म्हणजे बादशहा स्वतः न्याय देई तेव्हा बादशहाने निकालाचा विचार उच्चार केल्याशिवाय गुन्हेगारावर शिक्षेचा अंमल होत नसे." दु यारिक लिहितो, "न्यायाची अंमलबजावणी कडक रीतीने झाली पाहिजे असा बादशहाचा आग्रह असे. पण कुठलीही सजा देतांना–खास करून फाशीची सजा देण्यापूर्वी – तो फार विचार करीत असे. तो हजर असलेल्या कुठल्याही शहरांत काही लोक म्हणतात तशी तीन वेळा त्याची संमती घेतल्याशिवाय कुणालाही फाशी देता येत नसे. स्वतःच्या प्राणावर उठलेल्या गुन्हेगाराला त्याने हत्तीच्या पायाखाली दिले आणि

कधी कधी तो गुन्हेगारांना तुर्की पद्धतीने सजा देई, हे जरी खरे असले, तरी एकंदरित सौम्य शिक्षा देण्याकडे त्याचा कल होता. आपल्या प्राणावर उठलेल्या माणसाबद्दलदेखील या राजाच्या मनात करुणा असे. योग्य कारण दिसल्यास तो गुन्ह्याची माफी पण करीत असे. हे सहाजिकच आहे, कारण जुलुम जबरदस्ती करणे कुठल्याही माणसाला शोभत नाही आणि जगावर राज्य करणाऱ्याला तर खासच शोभत नाही " असे अकबराचे ब्रीद होते.

## थोर मुत्सद्दी :

(१) **सर्व धर्मांबद्दल सहिष्णुता** – चालू परिस्थितीच्या गरजा लक्षात घेऊन त्याबद्दल योग्य ती उपाययोजना धैर्याने आणि बुद्धिपुरस्सर करणारा अकबर एक मोठा मुत्सद्दी होता. जुन्या भ्रामक समजुती किंवा देशाला घातक ठरणारे रीतिरिवाज यांचा त्याने निर्धाराने त्याग केला. आपले राज्य स्थिर आणि कायम करण्यासाठी देशातल्या बहुसंख्य हिंदूंची आणि विशेषेकरून त्यातल्या प्रबळ रजपुतांची मने आपल्याकडे वळवून घेतली पाहिजेत, हे त्याने कारकीर्दीच्या सुरुवातीसच ओळखले होते. देशातली बरीचशी सत्ता रजपुतांच्या हातात आहे, हे त्याला पुरते माहीत होते. पूर्वीच्या मुघल राजांनी अनेक कायदे हिंदूंच्यावर मुद्दाम लादले होते. ते लढाईत पकडलेल्या बहुतेक सर्व हिंदूंना जबरदस्तीने मुसलमान करीत किंवा गुलाम म्हणून त्यांना विकत असत. अकबराने याला बंदी केली (१५६२). १५६३ साली यात्रेकरूंवरचा आणि १५६४ साली जिझिया कर त्याने रद्द केला. राज्यातल्या मोठमोठ्या अधिकाराच्या जागा जात किंवा धर्म यांकडे लक्ष न देता केवळ गुणवत्ता हेच प्रमाण मानून राज्यातील सर्व प्रजाजनांना खुल्या केल्या. मुसलमानेतर धर्मातील सर्व लोकांना धार्मिक स्वातंत्र्य दिले. यासंबंधी तो म्हणे, " सर्व लोकांबरोबर सलोखा राखणे माझे कर्तव्य आहे. परमेश्वराच्या इच्छेप्रमाणे ते वागत असतील, तर त्यात अडथळा आणणे योग्य होणार नाही; आणि तसे ते वागत नसतील तर त्यांच्या अज्ञानाची कीव करायला हवी. " या धोरणामुळे त्याच्या राज्यात अनेक हिंदु लोक दरबारात व त्याच्या छोवणीत दिसू लागले. इतकेच नव्हे तर मुलकी आणि लष्करी खात्यात फार मोठ्या हुद्यावर चढले. तोरडमल राज्याचा मुख्यमंत्री झाला, आणि मानसिंगला राज्यातील मोठ्यात मोठी म्हणजे सात हजारांची मनसबदारी मिळाली. ही मनसबदारी बादशहाच्या कुटुंबातील लोकांसाठीच असे. एवढी मोठी मनसबदारी मिळणारा सबंध राज्यात दुसरा एकच इसम

होता आणि तो म्हणजे बादशहाचा लाडका दूधभाऊ- खान इ- आझम, मिर्झा अझीझ कोका. अशा तऱ्हेने राज्याचा पाया मजबूत झाला. आणि हिंदूंच्या संबंधी सर्व भेदभाव दूर करण्यात आले. या सर्व सुधारणा घडवून बादशहाने विलक्षण धडाडी आणि आपल्या मुत्सद्देगिरीची चमक दाखवून दिली.

## (२) इस्लामी राज्याचे तत्त्वर दबातल

इतकेच करून अकबर थांबला नाही, तर इस्लामी राज्यासंबंधीच्या सर्व मुख्य तत्त्वांना त्याने फाटा दिला. इस्लाम हा राज्याचा एकमेव धर्म आणि त्यात इतर धर्मांचे आणि लोकांचे दुय्यम स्थान, ही सर्व इस्लामी राज्यसंस्थेची मुख्य तत्त्वे होती. देशात सर्वांत मोठी लोकसंख्या हिंदूंची, पण या राज्यपद्धती मुळे देशाच्या कारभारात आणि सामाजिक, राजकीय, आर्थिक व धार्मिक जीवनात त्यांना दुय्यम दर्जाचे नागरिक लेखले जाई, देशातल्या असंतोषाचे मुख्य कारण हेच होते. देशातील ही राज्यपद्धती बदलून टाकून सर्व धर्मांना सारखाच मान देणारी नवी राजवट अकबराने सुरू केली. राजा हा परमेश्वरी अंश आहे हे गृहित धरूनसुद्धा आपल्या प्रजाजनांमध्ये कुठल्याही तऱ्हेचा भेदभाव न करता त्यांचे रक्षण करणाऱ्या बापासारखा तो आहे असे अकबराचे ठाम मत होते. धर्माधिष्ठित जुनी राज्यसंस्था मोडून टाकून त्या ठिकाणी त्याने निधर्मी राज्यव्यवस्थेची स्थापना केली. सार्वभौमत्वाचा एक नवा सिद्धांतच त्याने चालू केला. याविषयी अकबर लिहितो, "मला जरा लवकर अक्कल आली असती, तर राज्यातल्या कुठल्याच स्त्रियांना मी माझ्या जनानखान्यात दाखल करून घेतले नसते. कारण माझे सर्व प्रजाजन हे मला माझ्या मुलां-सारखेच आहेत." आपल्या राज्यातल्या सर्व लोकांचे रक्षण करण्याची व त्यांना धार्मिक स्वातंत्र्य देऊन त्यांच्या दैनंदिन आयुष्यात ढवळाढवळ न करण्याची जबाबदारी अकबराने योग्य तऱ्हेने पार पाडली. एकंदर राज्यकारभाराची घडीच बदल्यामुळे असे होणे अपरिहार्य होते. जवळ जवळ पावणे चारशे वर्षे इस्लामी धर्माप्रमाणे चालणारे सरकार मोडून त्या जागी निधर्मी राज्य स्थापन करण्यात अकबराने फार मोठी मुत्सद्देगिरी, धैर्य आणि मनाचा खंबीर-पणा दाखवला यात शंका नाही. साम्राज्यातील लोकांना सुखी करण्यात आणि त्या साम्राज्याला बळकटी आणण्यात अकबराच्या या निधर्मी राज्यपद्धतीचा वाटा सर्वांत मोठा आहे.

## (३) देशात एकछत्री राज्य :

सर्व हिंदुस्थान एकछत्री अंमलाखाली आणण्याचा आदर्श उराशी बाळगणारा व त्यासाठी सतत प्रयत्न करणारा अकबर हा पहिला मुघल राजा होय. त्याच्यापूर्वी उल्लाउद्दीन खिलजी आणि काही अंशी महंमद बिन तुघ्लक यांनी असे प्रयत्न केले होते, पण ते केवळ राजकीय स्वरुपाचे होते. देशातल्या निदान सर्व सुशिक्षित लोकांसाठी तरी राज्यकारभाराशी निगडित असे समान साहित्य आणि कला निर्माण करून त्यांच्या मधून एक जिनसी समाज निर्माण करावा हे त्यांच्या धोरणात नव्हते. देशातला सर्व मुलुख एका राज्याखाली आणण्याची कल्पना आयुष्यभर अकबराच्या मनात होती. आणि तसे तो बोलूनही दाखवीत असे.अबुल फझलच्या अकबरनाम्यात या संबंधात वारंवार उल्लेख केलेला आढळतो. जन्मभर केलेले राजकीय डावपेच आणि लढाया यांच्या सहाय्याने अकबराने सर्व उत्तर हिंदुस्थान आणि अहमदनगरपर्यंतचा दक्षिणेचा प्रदेश आपल्या अंमलाखाली आणला. हिंदुस्थानात भौगोलिक आणि राष्ट्रीय ऐक्य स्थापन करण्याचे सतत प्रयत्न करून या कामी बहुतेक सर्व हिंदवासियांची मदत मिळविण्यचा प्रयत्न त्याने केला. देशात सगळीकडे शांतता आणि सुबत्ता, न्याय आणि चोख कारभार प्रस्थापित करण्याच्या हेतूने सर्व देशावर आधिपत्य स्थापणे अकबराला जरुरीचे होते, असा सिद्धांत अबुल फझल मांडतो. साम्राज्याच्या सर्व सीमा सुरक्षित करण्यासाठी त्याने वायव्येस हिंदुकुश पर्वतापर्यंत आपल्या राज्याच्या सरहद्दीचा विस्तार केला. पश्चिमेकडे अरबी समुद्र पूर्वेकडे बंगालचा उपसागर आणि ईशान्येकडे आसाम अशा त्याच्या साम्राज्याच्या सीमा होत्या. युद्धासाठी नेहमी तत्पर असलेली सुसज्ज आणि शिस्तबद्ध सेना त्याच्याजवळ होती. त्यामुळे देशात सगळीकडे शांती राहून परचक्राची भीती नाहीशी झाली. खेदाची एकच गोष्ट म्हणजे पोर्तुगीजांना देशातून हाकून देण्याची इच्छा बाळगणाऱ्या या राजाला स्वतःचे आरमार उभे करण्याचे कधीच सुचले नाही.

सर्व देशभर एकच तऱ्हेची राज्यपद्धती अंमलात आणून अकबराने राज्यासाठी एक भाषा, एक चलन सुरू केले. सर्व राज्यासाठी सनदी नोकर तयार करून निरनिराळ्याप्रांतांवर आलटून पालटून त्यांची नेमणूककरण्यात आली. यामुळे कारभारात एकसूत्रीपणा आणि राज्याला स्थैर्य आले. वडिलार्जित जहागिरीची प्रथा बंद करून निरनिराळ्या प्रांतांत निरनिराळ्या अधिकारांवर पगारी माणसे नेमली. कायमचा हक्क सांगण्यात येईल असा कुठलाच जमीनजुमला जहागिरदारांच्या

हातात राहिला नाही. यामुळे सर्व साम्राज्य एक आहे अशी भावना लोकांच्यात निर्माण झाली.

## (४) सामाजिक ऐक्याचे प्रयत्न :

याच्या इतकेच किंवा यापेक्षा अतिशय कठिण अशा एका सामाजिक समस्येकडे अकबराने आपले लक्ष वळविले. हिंदु आणि मुसलमान समाजांना एकत्र आणून त्यांमधून एक नवा संमिश्र हिंदी समाज निर्माण करण्याचा प्रयत्न अकबराने केला. या नाजूक कामाची सुरुवात त्याने आपल्या जनानखान्यात केली. आपल्या हिंदू राण्यांना आणि त्यांच्या दासींना हिंदू पद्धतीप्रमाणे होमहवन व मंत्र-जागर करण्याची पूर्णमुभा अकबराने दिली. हळुहळू झरोक्यातउभे राहूनप्रजाजनांना दर्शन देणे, तुला–दान करणे, इत्यादि हिंदू पद्धतींचा बादशहाने स्वीकार केला आणि रक्षाबंधन, दिवाळी, दसरा, वसंतोत्सव आणि शिवरात्री यांसारख्या हिंदु सणांमध्ये तो जातीनेभाग घेऊ लागला. दुसऱ्या दिवशीचा दसऱ्याचा सण साजरा करण्यासाठी आपल्या प्रिय मातेच्या मरणाचे सुतक आईला मूठमाती दिलेल्या दिवशीच बाजूला ठेवणारा अकबर याबाबतीत किती दक्ष होता याची सहज कल्पना यावी आपल्या मुलांची रजपूत राजकन्यां बरोबरची लग्ने तो हिंदू पद्धतीने लावत असे लग्नाची वरात वर–राजाला घेऊन वधूच्या घरी जाई आणि तेथे हिंदू आणि मुसलमानी अशा दोन्ही पद्धतींचे धार्मिक समारंभ पार पडत. हिंदू पद्धतीप्रमाणे जवळच्या नातलगांच्या मृत्यूनंतर स्वत: केशवपन करण्याची पद्धत त्याने सुरू केली. आईच्या आणि आई सारख्याच असणाऱ्या जिजी अनगा या दाईच्या मृत्यू-नंतर त्याने संपूर्ण स्मश्रू केली. नंतर अनेक मुसलमानांनी या पद्धतीचा स्वीकार केला. अबुल फझल आणि फैझी यांनी वडिलांच्या मृत्यूनंतर पूर्ण श्मश्रू केला. आपल्या आईच्या मृत्यूनंतर अझीझ कोकाने पण तेच केले असावे. बारा वफ्त आणि दोन ईद या सणांच्या निमित्ताने बादशहा मोठाल्या मेजवान्या देत असे. हीच पद्धत त्याने दसऱ्यासारख्या हिंदु सणांसाठी सुरू केली. या दोन्ही समारंभांमध्ये प्रतिष्ठित हिंदू आणि मुसलमान हजर राहात असत असे मानाव यास काही हरकत नाही. त्यांच्यासाठी निराळी व्यवस्था पण केलेली असावी, अशा तऱ्हेने हिंदू आणि मुसलमान समाजाला एकत्र आणण्याचे बादशहाचे प्रयत्न चालू होते. त्याच्या हयातीत या धोरणाला बरेच यश आले, पण त्याच्या मृत्यूनंतर त्यात फारसे यश आले नाही. पण असे प्रयत्न केल्याबद्दल अकबराची तारीफ

करावी तेवढी थोडीच आहे. त्याच्या पश्चात् झालेल्या राजांनी ५०-१०० वर्षे हे प्रयत्न तितक्याच आस्थेने चालू ठेवले असते, तर हे दोन निरनिराळे समाज मुस्लिम वर्चस्वाच्या काळात एकमेकात मिसळून गेले असते असे समजण्यास हरकत नाही.

अकबराने हिंदू समाजात अनेक सुधारणा केल्या. मुलामुलींच्या लग्नाची वयोमर्यादा वाढवून दिली. बहुपत्नीकत्वास आळा घातला. जबरदस्तीने सती जाण्यास बंदी केली. भिक्षा मागणे बंद करण्याचा प्रयत्न केला. वेश्याव्यवसाय आणि मद्यपान यांवर निर्बंध घातले.

## (५) सांस्कृतिक ऐक्य :

फारसी भाषा ही दरबारी भाषा केल्यानंतर सुशिक्षित समाजासाठी त्या भाषेत उत्कृष्ट ग्रंथरचना करण्यासाठी त्याने अनेक विद्वानांना प्रोत्साहन दिले. स्वतःच्या देखरेखीखाली भाषांतराचे एक स्वतंत्र खाते उघडून त्याकरवी संस्कृत, अरेबिक, तुर्की आणि ग्रीक भाषांतील अनेक उत्कृष्ट ग्रंथांचे फारसीमध्ये भाषांतर करवून घेतले आणि ते ग्रंथ आपल्या सरदारांच्या आणि अधिकाऱ्यांच्या हातांत पडतील अशी व्यवस्था केली. हिंदू मुसलमान आणि ख्रिश्चन लोकांचे धर्मग्रंथ आणि त्यांच्या भाषेतील इतर साहित्य फारसी भाषेत भाषांतरित करण्यात आले. सर्व जातींतल्या लोकांना एकमेकांच्या उत्कृष्ट साहित्याची आणि विचारांची ओळख व्हावी असा हेतू यामागे होता. त्यातले जुने विषय काढून नव्या आणि सर्व लोकांना हव्या असलेल्या विषयांचा समावेश केला. हिंदू आणि मुसलमान या दोघांनाही एकत्र शिकविणाऱ्या शाळा सुरू झाल्या. हिंदू लोकांनी फारसी भाषेचा अभ्यास करून त्यात मुसलमाना इतकेच किंबहुना काकणभर अधिकच प्रावीण्य मिळविले. संस्कृत आणि हिंदी साहित्य आणि काव्य याला पण अकबराने पाठिंबा दिला यामुळे उत्कृष्ट हिंदी साहित्याचे एक नवे युग निर्माण होण्यास मदत झाली. सूरदास आणि तुलसीदास याच काळातले. त्यावेळच्या पद्धतीस अनुसरून शिक्षणाचा सार्वत्रिक प्रसार करण्याचे प्रयत्न अकबराने केले नाहीत. तसेच अशा शिक्षण-प्रसारासाठी छापखान्यांचा फार उपयोग होतो हे पण त्याच्या लक्षात आले नाही.

## (६) वास्तू-शिल्पकला

हिंदू आणि मुसलमान या दोन्ही पद्धतीचे योग्य मिश्रण करून अकबराने एका नव्या वास्तुशिल्पकलेला जन्म दिला. हिंदु-मुसलमानांची मिश्र शिल्पकला

असेच त्याला नाव द्यावे लागेल. युरोपिय आणि अमेरिकन वास्तु–शिल्पकला इकडे येईपर्यंत या शिल्पकलेचे प्राबल्य देशात सगळीकडे होते. ११ व्या शतकात तुर्की लोक प्रथम हिंदुस्थानात आले, तेव्हा हिंदी शिल्प पुष्कळ प्रगल्भ अवस्थेत असलेले त्यांना आढळून आले. अनेक तऱ्हेचे कोरीव काम केलेले खांब, त्यावर तुळया टाकून वर घातलेले, जमिनीला समांतर असलेले छत, छतापासून सर्व बाजूंनी बाहेर निघालेले सज्जे आणि त्यांना तोलून धरणारे त्रिकोणी आधार, निमुळती शिखरे आणि भितीतून बाहेर आलेल्या कमानी ही या हिंदी शिल्पांची वैशिष्ट्ये होती. तुर्की शिल्प मुख्यत: कमानदार असून त्यात अर्धवर्तुळाकार कमानी उलटचा केलेल्या घंटांसारखे शिखर, उंचउंच आणि नाजुक मनोरे, छोटे छोटे खुले चौथेरे, सरळ व उंच खांब, मधे मोठे अंगण असे असे. या दोन्ही पद्धतींचा एकमेकांवर थोडाबहुत परिणाम झाला, तरीसुद्धा जवळ जवळ ३५० वर्षे या दोन्ही शिल्पकला एकमेकींपासून दूरच राहिल्या. या दोन्हींचा एका योजनाबद्ध पद्धतीने मिलाफ करण्याचे काम अकबराने केले. याची योजना राज्याच्या सुरुवातीसच करण्यात आली. आग्र्याचा किल्ला, फत्तेपूर सिक्री आणि लाहोर व अलाहाबाद किल्ल्यातील इमारती या अभिनव शिल्पांची साक्ष देतात. त्याचा. मुख्य अभियंता कासीमखान याच्या देखरेखीखाली १५६५ साली आग्र्याच्या. किल्ल्याचे काम सुरु झाले. तीन ते चार हजार उत्कृष्ट गवंडी या किल्ल्याच्या कामावर पंधरा वर्षे खपत होते. किल्ल्यात अकबराने एकंदर ५०० इमारती बांधल्या. या इमारती म्हणजे बंगाली व गुजराथी शिल्पाचे उत्कृष्ट नमुने होते त्यांपैकी जहांगिरी महाल ही एकच इमारत आता शिल्लक राहिली आहे त्याची आखणी मुसलमान पद्धतीची असली तरी बांधणी हिंदू पद्धतीची आहे. दगडी त्रिकोणांनी उचलून धरलेल्या तुळयांवर याचे छत एका रेषेत सपाट बांधलेले असून इमारतीला चौकोनी दरवाजे आहेत. महालाच्या एकंदर बांधणीवर हिंदू पद्धतीचा इतका पगडा दिसतो की, ग्वाल्हेर, चितोड किंवा उदेपूर येथील कोणत्याही इमारतीबरोबर तो शोभून जावा असा दिसतो. फत्तेपूर सिक्रीमधल्या इमारतीवर व खास करून दिवाण इ. खास, ज्योतिषसदन, मरियम आणि जोधबाईचा राजमहाल, तुर्की सुलतानाचा महाल इत्यादी इमारतींवर हिंदू आणि मुसलमान शिल्पांची मिश्र छाप पडलेली दिसून येते. शेख सलीम चिस्तीच्या कबरीवरसुद्धा या नव्या शिल्पाचा परिणाम झाल्याशिवाय राहिला नाही. परिणामी वास्तुशिल्पाची एक नवी पद्धत जन्मास आली. हिंदू–मुस्लिम शिल्प याच शब्दात तिचे यथार्थ वर्णन करता येईल. बादशहा अनेक तऱ्हेच्या प्रासादांची आखणी करून आपली स्वप्ने साकार करतो असे अबुल फझल

म्हणतो. याविषयी मॉनसेराट लिहितो, "अकबराच्या भव्य व शोभिवंत राजवाड्यांची तुलना युरोपमधल्या कुठल्याही राजवाड्यांशी करता येईल. खालपासून वरपर्यंत त्यांची बांधणी खोदीव दगडांची असून त्यात नाना तऱ्हेचे कोरीव काम केलेले व चित्रे काढलेली आहेत. हिंदुस्थानातील इतर राजांनी बांधलेल्या राजवाड्यांच्या मानाने हे प्रासाद उंच असून चार खांबांवर उभे केलेले आहेत. प्रत्येक खांबावर मनोरे बांधलेले आहेत. त्यातच छताचे सज्जे पण काढले आहेत.'

दगडावर कोरीव काम करणाऱ्यांनाही अकबराने उत्तेजन दिले पण दगडामध्ये पुतळे खोदण्यावर त्याचा विशेष भर नव्हता. तरीसुद्धा चितोडचे विजेते वीर जयमल आणि पट्टा यांच्या हत्तीवर बसलेल्या मूर्ती दगडात खोदून घेऊन आग्र्याच्या किल्ल्याच्या दिल्ली–दरवाजाबाहेर स्थापन करण्यात आल्या. तांबड्या रेतीच्या दगडांत कोरलेले दोन प्रचंड हत्ती फत्तेपूर सिक्रीच्या राजवाड्याच्या दरवाजावर ठेवले होते. या दरवाजाचे नाव हत्तीपोळ असे होते. मरियमच्या राजवाड्यात व्हरांड्याच्या बाजूवर वळचणीवर दगडात कोरलेले हत्ती आणि इतर पुष्कळ प्राणी आहेत. लाहोरच्या किल्ल्यात तुळयांना लावलेल्या लगींवर मोर आणि इतर पक्षी आणि पुष्कळ प्राणी कोरलेले होते.

## (७) चित्रकला :

जिवंत प्राण्यांची चित्रे काढणे कुराणात निषिद्ध मानले आहे; पण अकबराला लहानपणापासून या कलेची फार आवड होती आणि पर्शियाचा शहा इस्माईल सफावी याच्या दरबारात असलेल्या चिनी किंवा मंगोली चित्राचा अकबराने परिचय करून घेतला. अकबर म्हणतो, 'अनेक लोकांना चित्रकला आवडत नाही, पण ती ज्यांना आवडत नाही ते मला आवडत नाहीत. ईश्वराला ओळण्याची खास कला चित्रकाराजवळ आहे असे मला वाटते. जिवंत प्राण्यांचे अवयव चितारतांना त्यांचे वैशिष्टच उमगले नाही म्हणजे त्याला प्राणदात्या ईश्वराची आठवण होते आणि अशा तऱ्हेने त्याच्या ज्ञानात भर पडते.' परस्परविरोधी मतांची सांगड घालण्याचा हा एक कुशल प्रयत्न होता. त्यावेळचे दोन सर्वात प्रसिद्ध चित्रकार हेरातचा बिझाद आणि त्याचा शिष्य तबरीखचा आघा मिरख हे होते. दोघेही मध्य आशियातले, त्यापैकी बिझाद हा प्रथम बाइकाराच्या सुलतान हुसेनच्या पदरी आणि नंतर इराणचा शहा ईस्माइल सफावी याच्या पदरी होता. चिनी किंवा मंगोली चित्रकलेमध्ये फेरफार करून

त्याने तिला पूर्णपणे इराणी स्वरूप दिले. अकबराने याच स्वरूपात ही कला हिंदुस्थानात आणून तिची दरबारात स्थापना केली. लहानपणी बादशहाला चित्रकला शिकविणारा ख्वाजा अब्दुस समद याला तरुण बादशहाने राजवाड्याच्या भिंतींवर चित्रें काढण्याचे व निरनिराळ्या लोकांच्या तसबीरी तयार करण्याचे काम दिले. अकबराच्या उत्तेजनामुळे येथेच इराणी आणि परंपरागत हिंदुस्थानी या दोन्ही चित्रकलांचा योग्य संगम घडून आला. कालांतराने त्यातला विदेशी भाग नाहीसा होऊन ही कला संपूर्णपणे हिंदुस्तानी झाली. अब्दुस समदच्या चित्रात हे स्पष्ट दिसून येते. अनेक ठिकाणांचे प्रसिद्ध कलाकार अकबराच्या आश्रयासाठी त्याच्या दरबारात आले आणि त्यामुळे चित्रकलेची एक नवीनच धाटणी सुरू झाली. राजाचा दरबार, जनान्यातील व शिकारीची दृश्ये, वेणी-फणी करीत असलेल्या स्त्रिया, आणि अनेक लोकांच्या तसबिरी, अशी अनेक तऱ्हेची चित्रे या शाळेत काढली गेली. याशिवाय सुंदर बांधणीच्या निरनिराळ्या पुस्तकांतून, खास करून ऐतिहासिक ग्रंथांत अनेक चित्रांचा समावेश करण्यात आला. अशा तऱ्हेने जुन्या पूर्वग्रहदूषित रूढीला फाटा देऊन मुघल किंवा हिंदी चित्रकलेचे नवे दालन उघडण्याचे श्रेय अकबराकडे जाते. हस्ताक्षर आणि भित्ती-चित्रे यालाही अकबराने खूप उत्तेजन दिले.

## (८) संगीत कला :

लहानपणापासून संगिताची आवड असणाऱ्या बादशहाने संगीतकलेचे नवे पर्व सुरू केले. "बादशहाचे संगिताकडे फार लक्ष असते. या मधुर कलेच्या उपासकांना तो नेहमी उत्तेजन देतो." असे अबुल फझलने लिहून ठेवले आहे. हिंदूंची गायनकला तो लाल कलावंत ह्यांच्याकडे शिकला." हिंदी भाषेतला प्रत्येक उच्चार आणि निश्वास त्याने मला शिकविला "असे बादशहा म्हणतो. या कलेतले अनेक नामवंत कलाकार त्याने आपल्या दरबारात जमवले. राजा मानसिंग तोमार याच्या ग्वाल्हेर घराण्यात तयार झालेला तानसेन याचा येथे उल्लेख केला पाहिजे. राजाश्रयामुळे हिंदू आणि मुसलमान गायनपद्धतीचे मिश्रण शक्य झाले. या मिश्रणामुळे जुन्या हिंदू गायनपद्धतीमध्ये बरेच फेरफार झाले. त्याचा परिणाम म्हणजे आज सर्वांना माहीत असलेली व देशभर मान्यता पाव-लेली हिंदुस्थानी गायनकला.

सनातनी मुसलमान धर्मात गायनकला पण निषिद्ध होती पण बादश-हाच्या आश्रयामुळे जुन्या काळी हिंदुस्थानात संस्कृतीचे शिखर मानली गेलेली

ही कला पुन्हा वैभवास चढली. सर्व जातीतले लोक या कलेचा अभ्यास करू लागले. दरबारात नव्यानेच सुरू झालेल्या संगीत शाळेकडे अनेक कलोपासक आकर्षित झाले आणि बादशहाच्या आश्रयामुळे व उत्तेजनाने ही संगीत शाळा खूपच भरभराटीस आली.

## (९) सर्वत्र एकच धर्म स्थापन करण्याचे प्रयत्न :

देशातल्या अनेक धर्मांचे सार एकत्र करून निरनिराळ्या धर्मांमुळे उत्पन्न होणारा दुजाभाव व धर्मवेडेपणा कायमचा नाहीसा करण्याचा प्रयत्न अकबराने केला. साम्राज्याचा पाया भक्कम करण्यासाठी सर्व लोकांनी एकाच धर्माचा स्वीकार करणे आवश्यक आहे या हेतूने त्याने हा प्रयत्न केला. अकबराच्या या प्रयत्नाबद्दल व्हिन्सेंट स्मिथने त्याला महामूर्ख ठरविले आहे. या प्रयत्नामागचा स्तुत्य उद्देश आणि ध्येयवाद व्हिन्सेंट स्मिथला समजला नाही, असे म्हणावे लागते. पण अशा तऱ्हेचा नवा धर्म मान्य होण्याचा काळ अजून फार दूर होता. त्यामुळे सोळाव्या शतकात हा प्रयत्न अयशस्वी होणे अपरिहार्य होते. आजच्या २०व्या शतकातसुद्धा असा प्रयत्न यशस्वी होईल अशी खात्री देता येत नाही.

## (१०) आर्थिक भरभराट :

आपल्या प्रजाजनांचे जीवन मान योग्य असावे अशी खबरदारी अकबर घेई. शेती, उद्योगधंदे आणि व्यापार यांना उत्तेजन देणाऱ्या आणि प्रत्येक माणसाला काहीतरी काम असावे असा प्रयत्नाकरणाऱ्या थोड्याफार राजांत अकबराची गणना होते. असे प्रयत्न करणारा तो पहिलाच मुसलमान राजा होता असे म्हटले तरी चालेल. त्यावेळचे अर्थशास्त्र अर्थातच आजच्याइतके सुधारलेले नव्हते पण देशाची भरभराट, शेती आणि उद्योगधंदे यांना उत्तेजन देण्यात आणि लोकांना काम करण्याची व काटकसरीने राहण्याची सवय लावण्यात आहे हा सिद्धांत अकबराने आत्मसाय केला होता. परिणामी शेतकऱ्यांचे हितसंबंध सुरक्षित राखण्यासाठी, तसेच व्यापारी आणि उद्योगधंदा करणारे यांना संरक्षण देण्यासाठी त्याने अनेक बारीकसारीक नियम पालून दिले. या त्याच्या धोरणामुळे परदेशातले अनेक व्यापारी आणि प्रवासी या देशात आले आणि देशाची प्रचंड भरभराट झाली.

## अबकराचे इतिहासातले स्थान :

अकबराची एकंदर कारकीर्द त्यावेळच्या लोकांनाच काय, पण सर्व पुढील पिढ्यांनासुद्धा नेत्रदीपक वाटावी अशी आहे. शत्रूमध्ये फूट पाडणाऱ्या, अनेक

अडचणीवर मात करणाऱ्या अकबराच्या नशिबाचा अबुल फझल वारंवार उल्लेख करतो. "एचेबार ( अकबर ) मोठा दैववान राजा होता यात शंका नाही. हवे होते ते सर्व त्याच्या आयुष्यात त्याला मिळाले, त्याने हातात घेतलेले कोणतेही काम यशस्वी झाले नाही असे कधी घडलेच नाही. यामुळे जगाच्या पूर्व गोलार्धात 'अकबरासारखा नशीबवान' ही एक म्हणच होऊन बसली." अकबराच्या एकंदर कार्याचे समालोचन करतांना दु यारिक लिहितो. "अकबर हा खरोखरच एक फार मोठा राजा होता. प्रजाजनांनी मान दिला, प्रेम दाखवले, आज्ञापालन केले आणि राजाबद्दलची थोडी भीती मनात बाळली, तरच राजा मोठा ठरतो हे अकबराला माहीत होते. अकबरावर सर्व लोकांचे प्रेम होते. गरिबांशी ममतेने वागणारा आणि मोठ्यांवर वचक ठेवणारा राजा अकबर होता. गरीब, श्रीमंत-ख्रिश्चन, मुसलमान आणि इतर सर्व थरांतल्या लोकां-संबंधी तो सारखीच न्यायबुद्धी दाखवी. यामुळे राजा आपल्याच बाजूचा आहे असे त्यांना वाटे."

अकबर हा जगातला सर्वांत श्रीमंत राजा होता. चाळीस दशलक्ष पौंडांची नाणी त्याच्या नुसत्या गंगाजळीत होती. तो धनाढ्य होता हे खरेच, पण त्या-वेळच्या इतर राजांच्या मानाने त्याची योग्यता सर्वश्रेष्ठ होती. इंग्लंडची राणी पहिली एलिझाबेथ, फ्रान्सचा राजा चवथा हेन्री आणि इराणचा राजा पहिला अब्बास हे १६ व्या शतकातले मोठे राज्यकर्ते समजले जातात. पण ध्येयनिष्ठा आणि स्वकर्तव्याची जाणीव किंवा प्रत्यक्षात पार पाडलेली मोठमोठाली कामे यापैकी एकाही बाबतीत त्यांना अकबराची सर येणार नाही. त्याने घालून दिलेले कायदे केवळ त्याच्याच पिढीत नाही, तर पिढ्यान् पिढ्या चालू राहिले. इतिहासकार व्ही. ए. स्मिथच्या शब्दांत सांगायचे तर, "लोकांचा राजा होण्याचे गुण बरोबर घेऊनच अकबर जन्माला आला होता. इतिहासाला अवगत असलेला अत्यंत थोर सम्राट हे त्याचे बिरूद मान्य करायला हवे." मध्ययुगीन भारताचा तो सर्वांत मोठा व प्रसिद्ध राजा होता. भारताच्या संपूर्ण इतिहासात त्याच्या-एवढा मोठा राज्यकर्ता झालाच नाही. सर्वार्थाने तो आपल्या राष्ट्राचा अधि-पती होता !

# सूची

## अ–औ

## क



## ख



## ग



## च-ज-झ



## ट



## त

### भ



### म



### य-र



### ल-व



### श-स

## ह

महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृती मंडळ, मुंबई

# नवी प्रकाशित पुस्तके

| | | |
|---|---|---|
| १. | आचार्य भागवत संकलित वाङ्मय खंड १ ला<br>सं. प्रा. अ. के. भागवत | रु. २५ |
| २. | वाटचाल<br>नाना कुंटे | रु. ३१ |
| ३. | ध्वन्यालोक ( खंड १ ला ) – अनुवाद<br>प्रा. पु. ना. वीरकर व प्रा. मा. वा. पटवर्धन | रु. ७१ |
| ४. | श्री. के. क्षी. वाङ्मयीन लेखसंग्रह | रु. ५६ |
| ५. | डॉ. माधवराव पटवर्धन वाङ्मय-सूची<br>सं. डॉ. सु. रा. चुनेकर | रु. ४० |
| ६. | कोल्हटकरांची पत्रे —<br>सं. डॉ. रा. शं. वाळिंबे | रु. ४० |